प्रकाशक :

शेठ लालचंद हिराचंद
अध्यक्ष, जैन संस्कृति संरक्षक संघ,
फलटण गल्ली, सोलापूर ४१३००२

वीर निर्वाण संवत २५०१
भ. महावीर २५०० वे
निर्वाण महोत्सवी वर्ष
इ. स. १९७४–७५.

मूल्य रु. २०–००

मुद्रक :

कुमुदचंद्र फुलचंद शाह
मे. सन्मती मुद्रणालय,
१६६, शुक्रवार पेठ, सोलापूर - २

" प्राध्यापक जे डी भोंमाज यानी भरत चक्रवर्तीच्या व्यक्तित्वावर आणि भरतवर्षाचे नामकरण या घटनेवर प्रकाश टाकण्यास समर्थ असलेली विपुल सामग्री, भारतीय साहित्यातील विविध स्तरामधून शोधून काढून, तिचे सतुलित सकलन आपल्या या ग्रथात समग्रपणे सादर केले आहे भरतवर्षातील निरनिराळ्या सास्कृतिक प्रवाहाच्या स्वरूपासंबधी त्यांनी येथे माडलेला परिशीलनात्मक दृष्टिकोण खरोखरच विचारप्रवर्तक आहे। आपल्या भूमीच्या अतिप्राचीन परपरेच्या व सनातन सस्कृतीच्या परिसरामध्ये प्राजळपणे अभ्यास करण्याची आणि आपले परिशीलन दक्षतेने पार पाडण्याची ज्याना आस्था असते अशा अभ्यासूच्या अध्ययनासाठी या ग्रथाची योग्यता मोठी आहे "

— डॉ आ ने. उपाध्ये

आपल्या देशाच्या नामकरण-प्रणालीचा आणि नाभि-ऋषभ-भरत-कालीन तदनुषंगिक सांस्कृतिक तथ्यांचा एक ऐतिहासिक अभ्यास-



# भरतवर्षनामकरण

## इतिहास आणि संस्कृती



नाभेः पुत्रश्च ऋषभः ऋषभाद्भरतोऽभवत् ।
तस्य नाम्ना त्विदं वर्षं भारतं चेति कीर्त्यते ॥

— स्कदपुराण, कौमारखण्ड तथा
— शिवपुराण, ३७/५७



जैन संस्कृति संरक्षक संघ-जीवराज जैन ग्रंथमाला-सोलापूर, ग्रंथांक म—४१
भगवान महावीराच्या २५००—२५०१ निर्वाण-महोत्सवी वर्षाचे प्रकाशन.

# प्रकाशकीय निवेदन

सोलापूर निवासी पूज्य ब्रह्मचारी जीवराज गौतमचद दोशी यानी इ. स. १९४० साली आपल्या न्यायोपार्जित सपत्तीचा विनियोग जैन धर्म आणि समाज यांच्या उन्नतीसाठी करण्याचा निश्चय केला. त्याच्या कार्यवाहीसाठी त्यानी देशभर प्रवास केला, अनेक विद्वानांची भेट घेतली आणि त्यांच्याशी सखोल चर्चा केली. नंतर १९४१ सालाच्या ग्रीष्म ऋतूमध्ये श्री सिद्धक्षेत्र गजपथ ( नाशिक ) येथे एक विद्वत् संमेलन भरविण्यात येऊन अधिक विचारविनिमय करण्यात आला फलतः ' जैन सस्कृति संरक्षक संघ ' या संस्थेची स्थापना झाली. त्यासाठी पू ब्रह्मचारीजीनी त्याचवेळी रु ३०,००० ची देणगी दिली.

पुढे त्याची परिग्रह-निवृत्ती वाढतच गेली. १९४४ साली त्यांनी दोन लाख रुपयाची आपली संपत्ती सघाला विश्वस्त निधीच्या स्वरूपात अर्पण केली. त्याच सघातर्फे ' जीवराज जैन ग्रथमाले ' चेहि सपादनकार्य सतत होत आहे प्राकृत-सस्कृतादी ग्रथ त्यातून प्रकाशित होत असतात सघाच्या वार्षिक बैठकीमध्ये याच मालेत १९५४ साली मराठी ग्रथासाठी स्वतत्र विभाग निर्माण करण्याचे ठरवून पूज्य जीवराजबाबानी त्यासाठी पुनः सत्तर हजार रुपये संघाच्या स्वाधीन केले त्या निधीतून मालेच्या मराठी विभागाचेही प्रकाशन कार्य चालू आहे

दि. १६-१-१९५७ रोजी पूज्य ब्रह्मचारीजीनी सर्वस्वाचा त्याग करून अत्यंत सतोषभावनेने समाधिमरण स्वीकारले

' भरतवर्षनामकरण : इतिहास आणि संस्कृती ' हा प्रस्तुत ग्रंथ याच जीवराज जैन ग्रंथमालेतील ४१ वे मराठी-पुष्प असून भ. महावीर २५०० व्या निर्वाणमहोत्सवी वर्षाच्या प्रसंगी प्रकाशित करण्यात येत आहे हा ग्रंथ धर्म, सस्कृती आणि इतिहास या क्षेत्रातील अभ्यासूंना आणि इतर जिज्ञासूंनाही उपयुक्त ठरेल अशी आशा आहे.

—प्रकाशक



स्व. ब्र. जीवराज गौतमचंद दोशी

मस्थापक

जैन संस्कृति-संरक्षक-सघ, सोलापूर.

# आद्याक्षर

भगवान महावीरांच्या निर्वाणकल्याणकाच्या २५००–२५०१ या महोत्सवी वर्षाच्या प्रसंगाने वाचकांना ही भेट सादर करीत आहे

आपल्या देशाच्या प्राकृतिक रचनेसारखेच त्याच्या नामकरणाचे स्वरूपही इतके विलोभनीय आहे की, त्या नामकरणाची पूर्वपीठिका समजून घेण्याची ऊर्मी दाबून ठेवण्यात यश लाभत नाही तो सारा इतिहासच उन्मेषकारी आहे सस्कृतीचे जतन करण्यामागे जी मूल्ये मानवाला कवटाळाविशी वाटतात ती सर्व या नामकरणाच्या घटनाचक्रात सद्भावाने आढळतात या सबधीचे पूर्वसाहित्यही विपुल असून विविध प्रणालीतून त्याचे सगोपन व सवर्धन झालेले आढळते तरी परतु ज्यांची दृष्टी निर्मळ नाही अशानी त्याचा आदर मोकळेपणाने केलेला दिसत नाही उलट काही जणानी तर त्याला विकृत स्वरूप देण्याचाही अट्टाहास वेळोवेळी केलेला आढळतो त्यामुळे या विषयावर किंवा त्या परिसरात आधुनिक काळी साहित्याची निर्मिती प्रांजळपणे व्हावी तितकी झालेली नाही ही उणीव भरून काढण्याचा विचार गेल्या १५ वर्षापासून मनात ठाण माडून होता तो आज या ग्रथाच्या रूपाने सफल होत आहे

जीवनमूल्यात्मक भारतीय श्रद्धा, वैचारिक अधिष्ठान व आचारप्रणाली समृद्ध करण्यामध्ये जैनधर्माचा वाटा फार मोठा आहे. आज ज्ञात असलेले या भूमीवरील सर्वात प्राचीन पाहुणे जे वैदिक आर्य त्याच्या सस्कृतीपेक्षाही तो निश्चितपणे प्राचीन असल्यामुळे आणि इतर कोठूनही कोणत्याही काळी येथे त्याचे नव्याने आगमन झालेले नसल्यामुळे तसेच बाहेरून येथे येऊन स्थिरावलेल्या अगर परत गेलेल्या प्रत्येक सस्कृतीवर त्याचा प्रभाव पडलेला असल्यामुळे जैनधर्मच या भरतभूमीवरील सनातन सस्कृती आहे ही वस्तुस्थिती आहे आज येथे विद्यमान असलेल्या इतर सर्व धर्मावर अहिंसेची, समतेची, अविरोधी प्रगतीची, मैत्रिभावाची आणि परस्परोपग्रहाची जी भद्रमुद्रा कायमची ठसलेली दिसते तिचे श्रेय केवळ जिनधर्माला किंवा जैन तीर्थंकरांच्या

सर्वोदय तीर्थालाच आहे, हे अमान्य करता येत नाही. त्याची प्राचीनता केवळ साहित्यात किंवा शिलालेखातच आढळून येते असे नव्हे तर आजपर्यंत शक्य झालेल्या उत्खननातील पुराव्यातही ती सुसंगतच ठरते. ती सनातन परपरा मोहेंजो-दारो व हरप्पा येथील सस्कृतिकालापर्यंत तर सहज पोहचते असे ख्यातनाम पुरातत्त्वज्ञाचे म्हणणे आहे तिची व्याप्तीही भारतातील कोणत्याही स्थलकालातील अतिम सीमेपर्यंत पोहचते

यासाठीच आपल्या सस्कृतीचे एक अविनाभावी मूलघटक म्हणून भारतीय संस्कृतीच्या अभ्यासकाना तिच्या इतर अगोपांगावरोवरच भरतवर्षाच्या नामकरण-प्रणालीचा व सस्कारात्मक प्रभावांचाही सविस्तर अभ्यास करणे अत्यत आवश्यक आहे यासाठी सखोल व प्रमाणभूत अभ्यास आणि सशोधन करण्यासाठी आवश्यक असणारी साधन-सामग्री हव्या त्या प्रमाणात उपलब्ध होणे शक्य असून ती निरनिराळया भाषेतील कलाकृतीमध्ये आणि विविध सशोधनात्मक विमर्ष-ग्रंथांमध्ये इतस्ततः विखुरलेली आहे तिचा योग्य तऱ्हेने उपयोग करून तो समग्र अभ्यास विद्वानांसमोर प्रमाणासह मांडण्याची आवश्यकता तीव्रतेने जाणवत होती. तिच्याच पूर्ततेचा हा एक प्रयत्न !

भरतवर्षाच्या नावाच्या संदर्भात जी विकृती वाहेर पडत आली आहे तीच या ग्रथरचनेतील खरी अडचण होय त्यामुळे इच्छा नसूनही खंडण-मडणाचा अगीकार थोडा तरी करावाच लागला. शिवाय या क्षेत्रात आधुनिक काळातील प्रामाणिक ग्रथच नव्हे तर इतर कोणत्याही प्रकाशनाचा अभाव तीव्रपणे जाणवल्याशिवाय राहिला नाही याला अपवाद फक्त एकच लेख तो प्रि करमरकरांनी १९५१ साली लखनौ येथील प्राच्यविद्या परिषदेमध्ये वाचला होता आणि पुण्याच्या भाण्डारकर संशोधन मंदिराने १९५५ साली तो आपल्या ३६ व्या वार्षिकात प्रसिद्ध केलेला आहे. याशिवाय आपल्या देशाच्या नामकरणाचा आणि त्यामागील घटनाचक्राचा योग्य प्रकारे, एकत्रितपणे व सर्वांशाने परिचय करून घेण्यासारखा परिपूर्ण, व्यापक आणि प्रामाणिक ग्रथ अभावानेच जाणवत होता त्यामुळे तद्विषयक साहित्य विपुल असूनही वैफल्य आणि उणीव जाणवल्याशिवाय राहात नव्हते विविध

काळातील आणि विविध संप्रदायांतील बहुविध विचारधाराची एक सुसगत आणि पूर्णाकार प्रतिमा निर्माण करणे आवश्यक वाटले विषयाच्या विस्ताराची कक्षा लक्षात घेऊन सर्व बाजू सुसंगतपणे माडण्यासाठी शक्य ती सर्व काळजी घेण्याचा प्रयत्न केला आहे. यासबधी प्रमाणभूत व मूलगामी परिचय एकत्रितपणे करून देणारा अभ्यासपूर्ण ग्रंथ आता प्रथमच उपलब्ध करून देण्यात आनंद होत आहे.

एका विशाल संस्कृतीच्या परिवारातील अनेक अगोपांगे येथे एकरूपतेने एका भव्य सस्कृतीचे रूप साकार करतात. त्यामुळे ऐतिहासिक व साहित्यिक गरजाची पूर्ती होण्यास मदत होते मन्वतर युगातील विविध वृत्तांताचा शोध घेऊन, अनेक तऱ्हेने त्याची तर्कसंगत समीक्षा करून, सुसगत ठरलेल्या घटनांचा स्वीकार करून भरतवर्षाच्या नामकरणाचा आणि तदनुषगिक सस्कृतीचा जो इतिहास साध्य झाला तो या ग्रथाच्या रूपाने अभ्यासूना व जिज्ञासूना सादर करीत आहे

येथे पहिल्या विभागामधील चार प्रकरणे प्राचीन भारतीय जीवन-साहित्याचे स्वरूप आणि ऐतिहासिक मूल्य याच्या विवेचनासाठी वाहिलेली आहेत दुसऱ्या विभागातील ५ ते ९ या पाच प्रकरणामध्ये आपल्या भूमीच्या नामकरणाचे सागोपाग विवरण, विवेचन आणि त्याचे परपरागत इतिवृत्त तथा विमर्ष ग्रथित केला आहे त्यापुढील पाच प्रकरणामध्ये आपल्या जीवनातील सास्कृतिक मूल्ये आणि त्याचा आविष्कार विशद करून सागितला आहे अतिम प्रकरण स्वयस्पष्ट आहे त्यातील परिच्छेदाचे अक प्रकरणाचा सदर्भ दाखवितात आणि परिशिष्टे तर सर्वच विधानांना व निष्कर्षांना पूरक आणि पुष्टिदायक आहेत

आपल्या भूमीची प्राकृतिक स्थित्यतरे, वर्ष-क्षेत्राची नामकरण-परपरा, शलाका पुरुषाच्या पुरुषार्थाचा उत्सेध, मानवी जीवनाचे भारतीय मूल्यांकन, मानवातील ओजोगुणाचे कार्यक्षेत्र, ऋषभप्रणीत साधक शासनप्रणाली, क्षत्रियानुयोगातील जैन श्रद्धा आणि प्रतीके याच्याबरोबरच तदनुषगिक भारतीय जीवनातील **नाभि-ऋषभ-भरत-**कालीन सास्कृतिक तथ्याच्या आणि आपल्या जीवनावरील त्याच्या प्रभावाच्या अभ्यासाचा वेध घेणारा पहिलाच प्रयत्न या ग्रथात साकारला आहे या ग्रथाच्या

अभ्यासाने भरत-संस्कृतीच्या मौलिक प्रेरणा व मानवी आराधना यांचे परिज्ञान होण्यास मदत व्हावी, ऋषभप्रणालीच्या एका अव्यक्त अगाला मूर्ताकार मिळावा, आपल्या संस्कृतिसवर्धनाचे उदात्तीकरण साध्य करण्यामध्ये नाभि-ऋषभ-भरतादी नृपतीनी आणि त्याच्या आम्नायातील इतर जैन क्षत्रियानी पार पाडलेली महत्तम कामगिरी प्रत्ययास यावी, प्रसगी विरोधी भासणारीही साधनेतील सुसंगती त्यांनी कशी साध्य करून दाखविली याचे आकलन होण्यास गती मिळावी हीच इच्छा !

प्रतिपाद्य विषयाची अंगोपागे, आलोचनात्मक चर्चा आणि तुलनात्मक विस्तार आवश्यक वाटल्याने त्यांचा स्वीकार केला आहे. प्रारभीचे ‘ अतरंग-दर्शन ’ स्वरूपदर्शक आहे ‘ सूची ’ प्रगत अभ्यासाला उपयुक्त व्हाव्यात ही अपेक्षा अशा स्वरूपातील हा ग्रंथ **वीर-निर्वाणाच्या महोत्सवी प्रकाशनाच्या** निमित्ताने वाचकाना सादर करताना ही अल्पशी सेवा सफल होवो एवढीच प्रार्थना

अकस्मात उद्भवलेल्या माझ्या आजारामुळे मुद्रिते तपासण्यात जरा दुर्लक्ष झाले काही काळ ते मला मुळीच करता आले नाही. काही चुका राहून गेल्या वाचकानी त्या सुधारून घ्याव्यात माझे बंधू **पार्श्वनाथ** यांनी त्याही स्थितीत ते काम नेटाने चालू ठेवले. अन्य अनेकाची अनेक प्रकारे मदत झाली ‘ सन्मति मुद्रणालया ’ च्या चालकांनी काम सतत चालू ठेवण्याची दक्षता बाळगली या सर्वांचा मी आभारी आहे

पुणे विद्यापीठातील तत्त्वज्ञान विभागाचे प्रधान मार्गदर्शक **डॉ सुरेद्र बार्लिंगे** यानी अमूल्य वेळ खर्चून या ग्रंथासाठी आकाराने छोटी पण आशयाने मोठी अशी प्रस्तावना लिहिली आहे यावरून त्यांची या विषयासबधीची आत्मीयता आणि दृष्टिकोण व्यक्त होतो. त्याच्या या लेखाचे महत्त्व स्वयसिद्ध आहे अशा प्रस्तावनेच्या अभावी एक तीव्र उणीव जाणवल्याशिवाय राहिली नसती ! या पूर्तीबद्दल त्याचे आभार मानावेत तितके थोडेच आहेत

**जीवराज ग्रंथमालेच्या** अधिकाऱ्याचे व **संघाच्या** विश्वस्ताचे ऋण व्यक्त करण्यासाठी माझ्या भावना शब्दाकार पावत नाहीत

सोलापूर, मकरसक्रान्ती, १९७५ **जिनेन्द्रकुमार भोमाज**

# प्रस्तावना

प्रत्येक समाजाभोवती मिथ्सचा विळखा पडलेला असतो. पारपरिक मिथ्स म्हणजे त्या समाजातील इतिहासाचे गोत्रापत्यच होय. अशा मिथ्समध्येच समाजाचा विस्मृत इतिहास साठविलेला असतो. अर्थात् हा इतिहास शोधून काढणे अत्यत खडतर असते. ऋषीचे कूळ आणि नदीचे मूळ शोधू नये असे जे म्हणतात ते उगीच नव्हे! पण या सामान्य नियमाला धाब्यावर बसवून खडतरपणावर मात केल्यानतरच खऱ्या संशोधनास सुरुवात होत असते.

भरताचे कूळ व भरतवर्षाच्या नामकरणाचे मूळ शोधण्याचा असाच एक सशोधन पद्धतीचा उत्तम प्रयत्न माझे प्राध्यापक मित्र जिनेन्द्रकुमार भोमाज यानी केला आहे. भारत किंवा भरतवर्ष हे आपल्या देशाचे नाव का पडले असा प्रश्न अनेकांना पडला असेल. शकुंतला आणि दुष्यन्त याचा पुत्र भरत या चक्रवर्ती राजावरून आपल्या देशाचे नामकरण झाले असावे हे स्पष्टीकरण अगदीच लटके वाटते. कारण दुष्यन्ताला मोठे केले ते कालिदासाने. मुळात हा राजा, जरी तो कधी काळी विद्यमान असला तरी, एखाद्या मोठ्या जहागीरदारापेक्षा सुद्धा मोठा असेल किंवा नाही याची शकाच आहे

तीच गोष्ट भरत नावाच्या आर्य टोळचा या देशात वावरत होत्या याही स्पष्टीकरणाची ! हे एक स्पष्टीकरण आहे असे भासावे ही केवळ एक अपेक्षा ! पण 'कोणे एके काळी कोणीतरी कोठेतरी राहात असावेत' हे जसे शास्त्रीय व तर्कशुद्ध स्पष्टीकरण नव्हे तशीच अवस्था वरील स्पष्टीकरणाचीही झाली आहे कारण ते केवळ एक आभासपूर्ण वलय आहे. त्यामुळे माहिती अशी काहीही मिळत नाही. कोणी तरी भरत किंवा कोणत्या तरी भरत नावाच्या टोळचा पूर्वी येथे असल्याच पाहिजेत. त्याशिवाय या आपल्या देशाचे नाव भारत असे प्रचलित होण्यास काही आधारच उरत नाही. पण या विधानात कोणत्याच घटनेची निश्चित माहिती नाही ही केवळ एक मडलाकार पुनरुक्ती झाली आहे. आणि त्यातून फक्त एक हेत्वाभास व्यक्त झाला आहे. मुळात नसलेला आधार स्वतःहून निर्माण करण्याचा एक हव्यास स्पष्टच समजून येतो त्यामुळे इतिहासाचा सूर मात्र मुळीच गवसणार नाही इतिहासाची लय त्यामुळे लागणार नाही. हा सूर आणि ही लय मिळवावयाची-साधावयाची असेल तर आपण अधिक खोलात शिरले पाहिजे.

आपल्याला चिकटलेले पूर्वग्रह आपण सोडून दिले पाहिजेत. 'आपला इतिहास म्हणजे आर्यांचा इतिहास, आम्ही म्हणजे शुद्ध आर्य' हा असाच एक पूर्वग्रह होय. या पूर्वग्रहामुळेच आपण जातीयता निर्माण केली भूखण्डात राहणाऱ्या सर्व 'शुद्ध' समाजात अन्य अन्य रक्ताचे मिश्रण झाले असलेच पाहिजे हे जसे आपण ओळखले पाहिजे त्याचप्रमाणे आर्य येथे येण्यापूर्वी हा भूप्रदेश निर्मनुष्य नसला पाहिजे हे देखील आपण ओळखले पाहिजे या भूप्रदेशाला आर्यपूर्व इतिहास आणि संस्कृती असू शकते हे या ग्रथात केलेल्या कालानुक्रमाच्या विवरणावरून लक्षात येणे सोपे जावे आणि आज ज्याप्रमाणे पौरस्त्य व पाश्चात्य सस्कृतीचा सगम झालेला आपणास दिसून येतो त्याप्रमाणे प्राचीन काळीही झाला असला पाहिजे किंवहुना असा सगम प्रत्यही होतच असतो हेही आपण ओळखले पाहिजे. अशी ही इतिहासाच्या पोटात दडलेली-दडविलेली सत्येच मिथ्‌च्या रूपाने आविष्कृत होत असतात !

भारताचा असा हा विस्मृत इतिहास जैन-बौद्ध वाङमयातही आविष्कृत झालेला असणार अशा ह्या अव्यक्त इतिहासाचे 'उत्खनन' करण्याचा प्रा. जिनेन्द्रकुमार भोमाज याचा हा प्रयत्न खरोखरच स्तुत्य आहे. त्यावद्दल ते अभिनदनास पात्र आहेत मात्र असे सशोधन हे 'भरतवाक्य' आहे असे कोणीही समजू नये अशा सशोधनात पुढील प्रगत अभ्यासाला नेहमीच वाव मिळत राहतो पहिल्या प्रयत्नातच किंवा पुढील प्रत्येक वेळी सशोधकाला सर्वच इतिहास 'घासून पुसून' आणि "चक्क करून" माडता येतो असे समजता कामा नये. या ग्रथकर्त्याने मात्र अशा अवघड कामात सफाईने यश मिळविले आहे. तरीही या मूळ प्रमेयावर आगामी काळात अनेक सस्करणे पुनरावृत्त व्हावीत ! किंवहुना काळाच्या ओघात मूळ प्रमेय अधिक सुधरत गेला तरीही त्यामुळे अशा मूळ सशोधनाचे महत्त्व मात्र मुळीच कमी होत नाही.

जैन इतिहासाच्या क्षीरसागरात अनेक रत्ने दडलेली आहेत. ती प्रकाशात आणण्यासाठी यासारखा सर्वांगीण प्रयत्न आजपर्यंत अभावानेच जाणवत होता. ती उणीव भरून काढण्यासाठी जैन इतिहासाचे समुद्रमंथन आवश्यकच आहे. त्यातून आपणास पटणारी किंवा न पटणारी अनेक सत्ये बाहेर येतील. सत्याचे सत्यत्व आपल्याला ते पटणारे आहे किंवा नाही यावर अवलंबून नसते. सत्य हे सत्य म्हणूनच स्वीकारावयास पाहिजे ऋषभपुत्र भरत याच्या नावावरून भरतवर्षाचे नामकरण झाले असेल तर ते स्वीकारावयास काहीच हरकत असू नये. किंवहुना त्यामुळे एक आजतागायत न सुटलेले कोडे सुटणार आहे, नव्हे सुटत आहे !! भरतवर्ष या नामकरणाची परपरा भक्कम पायावर आधारित आहे ती अवचित टपकलेली नाही त्याचा मागोवा कमीत कमी नाभिकालापर्यंत तरी निश्चित सापडत आहे. नाभिवर्षाचा दुवा काही कमी महत्त्वाचा नाही.

या दृष्टीने लेखकाच्या या सशोधनामुळे या विषयावरील संशोधनाचे एक नवीन दालन प्रगत अभ्यासासाठी खुले झाले आहे. म्हणूनच या प्रकरणावर अतिम पडदा पडला आहे असे कोणीही समजू नये व येथेच थांबू नये कोणत्याही अभ्यासावर असा अतिम पडदा कधी पडतच

नसतो. कारण संशोधन करताना आपल्या अभ्यासग्रंथातून जेवढे सांगितलेले आढळते ते तेवढेच ग्राह्य असते आणि त्यापलीकडे काही नसते असा अभिनिवेष कुणीही धरू नये. तो येथे ग्रंथकाराने धरलेलाही नाही. आपल्या पुराणातील आणि आगमातील विधानांना ग्राह्यतेचा निकष लावून त्यातील सत्ये पारखून घेतली आहेत त्यासाठी विविध क्षेत्रातील आणि विरोधी संप्रदाय–प्रणालीतील उपलब्ध ग्रंथामधून काढलेल्या साक्षी पुराव्याच्या विशालतेवरून हे स्पष्ट व्हावे

विशेषत: निरनिराळ्या संप्रदायातून जेव्हा पुराणे किंवा इतर ग्रंथ यांची रचना केली जाते तेव्हा एक मुख्य सूत्र आणि त्याभोवती गुंफलेले इतर पदर यांची तयार झालेली एक प्रकारची गमत आढळते. त्यांचा एक विशिष्ट आकृतिबंध निर्माण झालेला दिसतो त्या गुंत्यातील मुख्य सूत्र नेमके सापडण्यावरच सत्याचा शोध अवलंबून असतो अशा एका खास सूत्राची पकड ग्रंथकाराला जमली आहे। ज्याप्रमाणे हिंदू दैवताच्या भोवती एक प्रकारचे कथावलय निर्माण झालेले आहे तसेच कथावलय **बुद्ध** किंवा **जैन तीर्थंकरांच्या** संदर्भातही निर्माण झालेले आहे हिंदू पुराणातील **मनू, प्रजापती** किंवा **ब्रह्मदेव** यांच्या कथा आणि **ऋषभदेव** इत्यादींच्या कथा यांमध्येही यामुळेच साम्य आढळते. **जैन** साहित्यात ऋषभनाथांना '**कृत युगाचा स्रष्टा**' (पृ. १७८) म्हणतात ते काही उगीच नव्हे. त्यामुळेच जैन दृष्टिकोनातून "**ऋषभनाथ–आदिनाथ ही एक भारतीय श्रद्धा आहे**" (पृ. १७८) असे म्हणता यावे.

या जैन श्रद्धेत सर्व भारतीयांचा इतिहास गोवलेला नसेलच असे म्हणता येऊ नये. प्रस्तुत ग्रंथकाराने जैन श्रद्धेचे निश्चितच दर्शन घडविले आहे. मात्र त्यात सर्वच भारतीयांचा इतिहास आणखी कितपत साठविलेला आहे किंवा नाही याचा यापुढील तपासही करावयास हवा. अर्थात् ग्रंथकर्त्याने असाही प्रयत्न काही कमी केला आहे असे म्हणता

येणार नाही. **भरतवर्षाच्या** नामकरणाच्या विविध स्रोतांबरोबरच **ऋषभदेवासंबधीही ऋग्वेद, ब्रह्माण्डपुराण, वायुपुराण, अग्निपुराण, भागवतपुराण** इत्यादी ६०–६५ सहिताग्रथातून आणि अनेक आधुनिक विमर्ष–ग्रथातून जी वचने आणि विधाने आढळतात त्याचा परामर्श ग्रथकर्त्याने उत्तम रीतीने घेतलेला आहे आणि त्यावरून काढलेल्या निष्कर्षात सुसगतीही चागलीच साधलेली आहे. पुरावे घेण्याची व सकलन–सपादन करण्याची शैली तसेच चिकित्सा–पद्धती, निष्कर्षातील सुसंगती इत्यादी सशोधनाच्या विविध क्षेत्रातील शास्त्रशुद्ध मार्ग यशस्वी ठरला आहे

अगदी थोडक्यात सागावयाचे म्हणजे अत्यत अभ्यासपूर्ण आणि अनेक सशोधन-समस्याना नवा वाव उत्पन्न करणारा असा हा एक विचारप्रवर्तक ग्रथ आहे. **या ग्रंथाच्या अभ्यासामुळे विचारवंत निश्चितच अधिक संशोधनास प्रवृत्त होतील.** ग्रथकर्त्याने घेतलेल्या कष्टाचे चीज होवो एवढीच इच्छा.

पुणे विद्यापीठ,
२३–३–१९७५

**सुरेन्द्र बार्लिंगे**

# अंतरंग–दर्शन

: १ :

# पूर्वगत

अनादिनिधनं तुङ्गमनल्पफलदायिनम् ।
उपाध्वं विपुलच्छायं श्रुतस्कन्धमहाद्रुमम् ॥

— महापुराण, १/१८

# १ : पूर्वगत

## संस्कृति-संघर्ष

पूर्वकालापासून भारतावर अनेक आक्रमणे झाली ती अनेक प्रकारची होती राजकीय आक्रमण अत्यत प्रखर असले तरी सास्कृतिक आक्रमण त्याहून किती तरी अधिक प्रमाणात परिणामकारी ठरत असते सस्कृतीचा ठसा थेट मनावर उमटत असल्यामुळे त्याचा आरभ, विस्तार, दृढमूलता आणि फलदानता चटकन व उघडपणे दिसून येत नाही मानवी वर्तनाचे सस्कार न कळत व अतस्थपणे होऊ शकतात परतु एकदा मनाशी एकरूप झालेले पण परिणामाच्या दृष्टीने अयोग्य व अहितकारी ठरणारे सस्कार काढून टाकणे मात्र सहजपणे जमत नाही त्यासाठी सयमाची आणि तपश्चर्येची आवश्यकता असते पाणी सखल भागाकडे सहजपणे धावते पण उंच पातळीवर न्यावयाचे असल्यास फार कष्ट सोसावे लागतात त्याप्रमाणे

अमेरिका, आयर्लंड इत्यादि पुढारलेल्या देशातल्याप्रमाणे आज भारतातही सस्कृति-सघर्ष चालूच आहे मात्र हा सघर्ष परकीय लोकाशी ,नसल्याने याचा विचार राष्ट्रीय पातळीवर होत नाही. म्हणूनच येथील राष्ट्रीय जीवनात फार मोठ्या ठळक प्रमाणात खळवळ माजलेली दिसून येत नाही एवढेच । त्यातील प्रखरता सुप्त असली तरी परिणाम मात्र त्रासदायकच ठरत असतो आपल्या देशातील नागरिकामध्ये निरनिराळे सास्कृतिक गट आहेत परस्पर हेव्या दाव्या-मुळे गटवाजी दिवसेंदिवस जास्त तीव्रच होत असते समतेची होळी पेटते उरते ती केवळ द्वेषाची राख, पण तीच राख पुन प्रचारासाठी अभिमानाने वापरली जाते, अगावर मिरविली जाते त्यामुळे नव्या पिढीत पुन नव्याने द्वेषाग्नी पेटतो त्यात गरीब व अल्पसख्य मानव होरपळून निघतो अल्पसख्य आणि अल्पशक्ती मानव नष्टप्राय होतो अग्निकुमाराची सख्या वळावते सख्यावळाने ते अधिकच मातताता. त्याच्यातील मानवतेच्या सस्काराची क्षमता नष्ट होते स्नेहभाव सपल्याने ते अधिकच ज्वलनशील वनतात त्यातून पुन आगी भडकतात आणि ही भडकण्याची क्रिया दिवसेदिवस जास्तच भयकारी होत राहते हा अन्याय वाढतच जातो सख्यावळाची उन्मत्तता उत्तान दशेला पोहोचते

पण सुसस्काराचे सामर्थ्यही काही लेचेपेचे नसते त्याची जनसख्या कमी असली तरी गुणवत्ता मोठी असते गुणवत्ता ही सदैव कार्यशील राहात असल्याने आणि त्या सुसस्कारामधील तेज सदैव ओजपूर्ण असल्याने त्याची सर्वार्थाने राख-रागोळी कधीच होत नाही त्यातील गुण मानवाच्या जीवनातील दोष दूर करण्यास उपयोगी पडत असल्याने ते पूर्णपणे नष्ट व्हावेत असे कोणालाच वाटत नाही गुणवत्ता नेहमी अस्तित्वरूपच असते आणि मानवी जीवनाला गुणाचा फायदा होतच असतो त्यामुळे गुणाला क्षिती नसते पण अल्पसख्येमुळे सामाजिक जीवनात

जो लौकिक त्रास होतो त्याचा परिहार करण्याचा एकमेव उपाय म्हणजे न्यायबुद्धीची प्राणप्रतिष्ठा करणे हेच होय

## सांस्कृतिक सत्त्वांची जोपासना

न्यायाचा मूलाधार सत्यतत्त्व होय. म्हणून विस्मृतीत गेलेल्या व जात असलेल्या पूर्ववर्ती सत्याचा शोध लावणे, ते प्रकाशात आणणे आणि सामाजिक जीवनात त्याचा फायदा करून घेणे व करून देणे मानवी जीवनाच्या दृष्टीने आवश्यक असते जेव्हा वस्तुनिष्ठ इतिहासाचे विस्मरण होते तेव्हा सामाजिक व राजकीय अन्यायाला जोम चढत असतो तो कमी करण्यासाठी **सांस्कृतिक सत्त्वांची जोपासना करणे हा एकमेव उपाय असतो** त्यामुळे सहजीवनाची दोन्ही चाके सुसंगतपणे चालतात आणि संघर्ष कमी कमी होत जातो अशा अनमोल हेतूसाठी गतकालीन जुने ऐतिहासिक सत्य नव्याने जगासमोर मांडणे भाग पडते सामाजिक जीवनाचे धोरण स्पष्ट व सुसंगत हवे असल्यास आणि आपापले हितसंबंध सुरक्षित ठेवावयाचे असल्यास आपापल्या संस्कृतीचे संरक्षण नीटपणे केले पाहिजे संघर्ष टाळून सहजीवनाचे धोरण राबविण्यासाठी आपल्या संस्कृतीभोवती पूरक व संरक्षक कार्याची कक्षा निर्माण करून त्यावरील आपले नियंत्रण पूर्णांशाने शाबूत राखले पाहिजे.

एकेकाळी या भारतात सुसंगत सांस्कृतिक जीवनाची अविसत्ता सर्वसमर्थ होती देशांतर्गत संस्कृतीमध्ये सावत्रभाव नव्हता आणि तिच्या सामर्थ्यसंपन्नतेमुळे परकीय संस्कृती कोणत्याही प्रकारे खटका उडेल असे वर्तन करण्यास उद्युक्त होत नव्हती भारतीय संस्कृती गाफिल नव्हती, पण तशी दृश्य आवश्यकता न भासल्याने तिचे लष्करी सामर्थ्य कमी होत गेले त्यामुळे संस्कृतीच्या सीमा दुर्लक्षित राहिल्या व संरक्षक बाबींवरील नियंत्रण कमी पडले सामाजिक जीवनाला एकच अवस्था दीर्घकाळ मानवत नाही कालमानाला अनुसरून त्यामध्ये नित्य नवा बदल हवा असतो स्थितिप्रिय वृत्ती मंदावत राहते आणि कालाच्या डोहात बुडून जाते, किंवा निःसत्त्व बनून आक्रमणाला बळी पडते भारतीय संस्कृती सनातन असली तरी कालाचा ओघ प्रवाही व परिणमनशील असल्याने तिची स्थितिशीलता कालाच्या प्रभावापुढे टिकू शकली नाही भारतावर आक्रमणे होत राहिली त्यावर परकीय संस्कृतीचाही प्रभाव पडू लागला त्यामुळे स्वतःच्या मूलसंस्कृतीला अवकळा प्राप्त झाली !

## साहित्य आणि संस्कृतिरक्षण

साहित्य म्हणजे संस्कृतीची तटबंदी स्वसाहित्य लुप्त झाल्याने संस्कृतीच्या तटबंदी कोसळल्या आपली अविसत्ता जाऊन परकीय सत्ता मानेवर बसली तिने मात्र आपल्या साहित्याची नवी तटबंदी भक्कमपणे उभी केली त्या योगाने जो

कोडमारा झाला त्यामुळे परकीय सत्तेखाली राहून सुख लाभेना व परसत्ता झुगारून देण्यासाठी जो जोम लागतो तो जन्मालाच येईना अशी विचित्र दशा प्राप्त होऊन जिवतपणीच मरणावस्था भोगावी लागली व आजही लागत आहे **साहित्य सस्कृतीची माता व पिताही आहे** सुसस्काराना जन्म देऊन त्याचे पालन–पोपण करणे आणि सरक्षण व सवर्धन करणे अशी दुहेरी पात्रता साहित्यात असते आपले मूळ साहित्य ज्या भापेत लिहिले गेले तिला आज **अर्धमागधी प्राकृत** म्हणतात **तीच आपल्या साहित्याची ध्वजा आहे** हा ध्वज विजय-स्तभावर सदैव फडफडत ठेवणे आपले सर्वांचे कर्तव्य आहे त्यासाठी आस्थेवाईकपणे प्राकृत भाषेचा आदर केला पाहिजे. तिला आज दुर्दैवाने स्वभूमीतूनच परागदा व्हावे लागत आहे प्रयत्नपूर्वक तिची प्राणप्रतिष्ठा केली पाहिजे अधिकृत भारतीय भाषाच्या पक्तीत तिला मानाचे स्थान लाभले पाहिजे प्रयत्न केल्याशिवाय ते स्थान सहजासहजी मिळणार नाही तिची आज होत असलेली व उद्या होणारी अवहेलना गपचूप पाहणे आपणास परवडणार नाही कारण मानवी जीवनात तिचे जे स्थान आहे ते सर्व प्राणिमात्रानाही हितकर आहे तिच्या गरजेची तहान कधीही न मिटणारी आहे **मैत्रीभाव, गुणाचा आदर, दया-परोपकार, सहकार तसेच परमताविषयी सहिष्णुता** आणि विरोधी मताचा द्वेष न करता **माध्यस्थ** भावाचा अगीकार इत्यादी गुणरूप **मानवतेच्या मूलतत्त्वांची खाण म्हणजेच प्राकृत भाषा**

अशा गुणाशिवाय कुणालाही सघर्प-विरहित सहजीवन जगणे शक्य नाही सास्कृतिक जीवनाचे ध्येय तिच्या अभावी चेतनाहीन ठरेल! प्राकृत भाषेतील जीवनतत्त्वाशिवाय कोणताही मानव कधीही सुखी आणि समाधानी होणार नाही म्हणून त्या भाषेचा अभ्यास करणे आपल्या दैनदिन जीवनचर्येचाच एक भाग आहे प्राकृतचे सशोधन व परिशीलन जीवनोपयोगी व जीवनदायी आहे ती सर्वात जुनी भाषा असल्याने इतर सर्वांपेक्षा गुणसमृद्धही आहे त्यात मानवी जीवन-विचाराचा फार मोठा सग्रह आहे प्राकृतातील रत्ने उज्वल आहेत म्हणून त्यातील इतिहासाची जपणूक करणे मानवी कर्तव्य ठरते भारताच्या मूळ सस्कृतीच्या सरक्षणाच्या दृष्टीने हा अभ्यास महत्वाचा आहे प्रत्येक समाज आपापली भाषा सवर्धित करण्याचा प्रयत्न करीतच असतो प्रत्येक राजकीय सत्तेला सरक्षणाची जितकी गरज असते तितकीच मोठी गरज सस्कृति-सरक्षणासाठी आपापल्या मूळ भाषेची असते अशा मूळ कर्तव्याकडे दुर्लक्ष करणे म्हणजे आपल्या अस्तित्वालाच सुरुग लावणे होय! अभ्यासाने प्राकृत भाषा पुन समाजाभिमुख केली तर भारतीय सस्कृतीही अधिक सपन्न बनून येथील मानवी जीवन सुखकारक होईल! कारण साहित्याचा पारपरिक अभ्यास सस्कृतीच्या सीमाचे सरक्षण करण्यास उपयुक्त ठरत असतो

## प्राकृत भाषेची देणगी

पण कालदोषामुळे अगर अन्य कारणामुळे आपल्या संस्कृतीच्या सीमा-रक्षणाचे मूलकार्य लुळे पडले त्यावरोबर नवागत संस्कृतीची भाषा अधिकच वलिष्ठ झाली तिचे वळ जनजने वाढत गेले तसतसे मूळ भाषेचे वळ कमी प्रभावकारी ठरू लागले आणि मुद्दाम तसे ठरविण्यातही येऊ लागले तरीही एतद्देशीय मूळ भाषेचे जीवानुसारी महत्त्व, तिचे आगळे स्वरूप आणि वेगळी अस्मिता कायम टिकावी म्हणून अनेक प्रयत्न झाले ते प्रयत्न शतकानुशतके यशस्वीही ठरले त्या यशाचा गंध सर्वत्र दरवळत राहिला तो जातिवंत गंध इतका प्रभावी ठरला की नव्या भाषेवरहि त्याचा मनस्वी परिणाम झाला त्यामुळे त्या आक्रमकाच्या नव्या भाषेचे मूळ रूप जरा वेळ तरी वाजूला हटले तिने प्राकृतचे तथ्य अगीकारले मानवाच्या पोषणाच्या दृष्टीने प्राकृतची जी वैशिष्टचे होती ती सर्व अगीकारण्याचा तिने महान् प्रयत्न केला म्हणून तिलाही पुनरावर्तित भारतीय स्वरूप प्राप्त झाले अशी भारतीयता म्हणजे तिला मिळालेली मूलप्राकृतचीच देणगी आहे हे इतिहास विसरू शकत नाही

## मूलसंस्कृतीचा प्रभाव

ऋग्वेदाला मूर्तिपूजा ज्ञात नाही यजुर्वेदात पशुयज्ञ वलिष्ठ आहे तर इतरत्र अग्निपूजा सार्वत्रिक आहे तरीही यज्ञसंस्थाच वैदिक धर्माचा कणा समजला जातो त्यामागचे मन अभ्यासनीय आहे चारही वेदात आत्म्याचे स्वरूप निश्चितपणे सांगितलेले कोठेच आढळत नाही सयम, तपश्चर्या, ध्यान या धार्मिक मार्गांचा मागमूसही दिसत नाही उपनिषद काळामध्ये प्रथमच त्याना आत्मतत्त्वाची प्राथमिक जाणीव झाली पण त्याचे सम्यग्दर्शन मात्र शेवटपर्यंत होऊच शकले नाही ते यज्ञकर्मात होरपळून गेले असावे ! त्याच्याच षड्दर्शनानी एकमेकाशी खूप विरोध केलेला आहे त्यावरून त्याचे स्वरूप उघडे पडते मात्र सयमादिक तथ्याचा व तत्त्वाचा स्वीकार व सत्कार वेदोत्तर काळात मोठ्या तन्मयतेने केलेला आढळतो अगीकार केल्यानतर पुढील काळामध्ये ती नवी तथ्ये आत्मसात झाल्यावर मात्र त्याचा भरपूर आविष्कार करण्याचा फार मोठा खटाटोप झाला पण मूळ पायाच वेगळा असल्याने नतरचा स्वीकार उघडा पडलेला स्पष्ट दिसतो परिणामत त्याच्या तत्त्वाच्या आविष्कारामध्ये विसगती निर्माण झाली प्रयत्न करूनही ती टाळता आली नाही उलट खोट्या अभिनिवेशामुळे ती वाढतच गेलेली दिसते आज तिचे स्वरूप वरवर सर्व-समावेशक दिसले तरी त्यातील विस्कळीतपणा दृष्टीआड करता येत नाही त्याभाषेचे अनतर कालीन अतरग ना स्वत चे ना दुसऱ्याचे असे विदूषकी थाटाचे वाटते अर्थात या नव्या मिश्रणाचेही स्वागत होत आहेच त्यातील मिश्र रुची मिश्र लोकाना आवडतेच

ना वैदिक ना दार्शनिक अशी अवस्था प्राप्त झाल्याने अलिकडील काही शतकात नव्या सस्कृतीला देशवाचक किवहुना स्थलवाचक असे नवे नाव देण्यात आले आहे पण त्यातही विदेशी थाट आहेच स चा उच्चार ह करणे ही मुख्यत्वे पारसी इत्यादी पाश्चिमात्याची परपरा त्यानुसार त्या लोकानी सिंध प्राताला हिंद म्हटले असले तरी येथील भापातज्ञानी व सस्कृतीचा अभिमान बाळगणाऱ्यानी स्वत ला हिंदू म्हणवून घेण्यात काही अर्थ, काही स्वारस्य आहे असे दिसत नाही. आजच्या हिंदूच्या नदीविपयक भावना लक्षात घेतल्या तरी त्या वहुभाग गगाधिष्ठित आहेत सिंधूपेक्षा त्या गगेशी जास्त निकट व अकाट्य आहेत यावरून वेदनिष्ठ लोक खरे तर ज्या यवनाचा तीव्र द्वेष करतात त्याचेच अनुकरण जास्त प्रमाणात करतात असे दिसते शिवाय हिंदूचा अर्थ फक्त सिंधप्रानीय असा आहे तो शब्द अखिल भारताला, या वर्षप्राय देशाला मुळीच लागू होत नाही आज तो शब्द प्रातिनिधिकही ठरु शकत नाही असे अनेक दोष असतानाही त्याचा तीव्र अभिमान वाळगण्यात स्वत ला धन्य समजणारे खुशाल समजोत ! ! त्यामुळे प्राकृत भापेला किंवा तीतील जीवनाधिष्ठित तत्त्वाना काहीही वाधा पोहोचत नाही. तिच्या गुणाना क्षिती नाहीच म्हणून तिची अखड स्मृती जागृत ठेवणे, आदर करणे मानवी कार्य आहे ते प्रत्येकाने केले पाहिजे

## आपले कर्तव्य

येथील प्राकृतिक व मौलिक सस्कृतीवर जी ग्लानी आली आहे ती तिची राजवट दुवळी झाली म्हणून या चालू युगातील राजवट, तिचे स्वरूप, शासनाची पद्धत, दण्डाचा विनियोग इत्यादी सर्वच गोष्टी लोकाधीन आहेत तेव्हा लोकानीच ती राजवट अनुकूल करून घेतली पाहिजे आपली मौलिक भारतीय सस्कृती शावूत राखली पाहिजे तिची कीर्ति दिगतात नेली पाहिजे तिचा अनुभाव प्रभावी केला पाहिजे तिच्यातील फलदानशक्ती वाढविली पाहिजे तिच्या प्रकृतिधर्मा-विरुद्ध कृती करण्याचे धार्ष्ट्य कुणीही करणार नाही इतके तिचे सामर्थ्य वाढले पाहिजे आता लोकशाहीचे युग आले असल्याने परिस्थिती वदलली आहे ती अजूनही जास्त अनुकूल करून घेतली पाहिजे आक्रमकाचे त्यावेळचे तत्र आज उपयोगी पडणार नाही हे उघड आहे आणि आपल्या मार्गात कुटिलता असणार नाही याची खात्री आहे कारण आपल्या प्रगतीचा **सर्वेषाम् अविरोधेन** हा मत्र अत्यत मानवी आहे त्याकडे वाकडा डोळा करून पाहण्याचे सामर्थ्य कोणातही असणार नाही आपण भारतीय साहित्याकडे व सस्कृतीकडे कोणत्या धोरणाने पाहतो हे ध्यानात घेणे सर्वांनाच भाग आहे **ऋषभपुत्र भरत** चक्रवर्तीची स्मृती जिवत ठेवणारा हा विशाल भूप्रदेश कोणत्याही परिस्थितीत स्वसस्कृतिहीन व स्वभापाहीन असा पोरका ठरता कामा नये मग अखिल जीवमात्रासवधी मैत्रीभाव वाळगणाऱ्या

या संस्कृतीशी वैर स्वीकारणारा कोणीही कितीही बलिष्ठ असो, त्याच्या हाती सापडून फुकट बळी जाता कामा नये यासाठी ऋषभेय भरताच्या वंशजांनी सदैव दक्ष असले पाहिजे

भारतावर एके काळी अधिसत्ता गाजवीत असताना प्राप्त झालेल्या अभ्युदयाच्या वेळीही ही **भरत-संस्कृती** इतर कोणालाही कधीही उपद्रवकारक ठरली नाही तिने भरतवर्षाला देखील कोणताही उपद्रव केला नाही **नाभि-ऋषभ-भरत** याच्या परंपरेतून चालत आलेली ही संस्कृती मातेप्रमाणे अखिल जंतुमात्राची हितचिंता वाहते भारतीय साहित्यात यासाठी अनेक पुरावे उपलब्ध आहेत आपली संपन्न संस्कृती शत्रुत्वाच्या टाचेखाली तुडविली जाऊ नये म्हणून पूर्वसूरींनी वेळोवेळी अनेक उपाय योजले म्हणून ती वारसारूपाने आपल्यापर्यंत येऊन पोहोचली आहे आपल्या वाढत्या वंशजासाठी ती अधिक संपन्न करून पुढील पिढीपर्यंत पोहोचविणे आपले एकमेव मानवी कर्तव्य आहे

## काही उपाय

यासाठीच तिच्या स्वरूपासंबंधी व उपयोगासंबंधी काही संदेह असतील तर ते दूर करणे, तिची गुणवत्ता निश्चित करणे, सबंधित मानवाची व मानवी गटाची अगर राष्ट्राची मान्यता मिळविणे इत्यादी मार्ग म्हणजे त्यावरील उपायाचाच एक भाग होय तिच्यावर परकीयांचे वर्चस्व प्रस्थापित होऊ नये म्हणून तिचा अभ्यास सदैव चालू ठेवणे हिताचे आहे हे ज्यांना पटते त्यांनी स्वतःहून तो अभ्यास कसून केला पाहिजे इतरांची खात्री पटविण्यासाठी कालानुरूप प्रयत्न पद्धतशीरपणे व अव्याहतपणे केला पाहिजे प्रांतीय सरकारांची मान्यता व मदत मिळविली पाहिजे, विद्यापीठामध्ये स्वतंत्र शाखा उघडून त्या समर्थपणे चालविल्या पाहिजेत उच्च स्तरावर प्रकाशन संस्था व संगोपन संस्था स्थापन करून त्या नेटाने चालविल्या पाहिजेत मंदीर-मठ-पाठशाळांचा भरपूर उपयोग केला पाहिजे स्वाध्याय मंडळे चालविली पाहिजेत शाळा–कॉलेजमधून सर्वत्र त्याची वर्णी लावून घेतली पाहिजे प्रसंगी नव्या विद्यालय–महाविद्यालयांची स्थापना केली पाहिजे या सर्व स्तरावरील प्रयत्नांचा प्रभाव केंद्र सरकारवर पडल्याशिवाय राहणार नाही त्यामुळे मोठ्या प्रमाणात खर्च करण्याच्या प्रसंगी केंद्र सरकारची मदत सहज मिळेल

आपल्या संस्कृतीला अधिकार व प्रतिष्ठा प्राप्त होण्यासाठी प्राकृताला भारताची अधिकृत भाषा म्हणून मान्यता मिळणे आवश्यक आहे तो आपला हक्क आपण बजावून दाखविला पाहिजे यासाठी हीच वेळ योग्य आहे सध्या जागृतीला चांगला काळ लाभल्याचा अनुभव येतो भगवान महावीराच्या निर्वाणाच्या २५००

च्या महोत्सवाची पर्वणी चालू आहे मोठ-मोठ्या सस्था व व्यक्ती त्यामध्ये भाग घेण्यासाठी पुढे सरसावत आहेत अखिल भारतीय स्तरावर जी एक मोठी उत्सव-समिती दिल्ली येथे स्थापन केली आहे तिचे नेतृत्व स्वत पतप्रधान इदिरा गांधींनी स्वीकारून कार्याची कमान उचाविली आहे सास्कृतिक कार्य अगीकारण्यास व अगीकृत कार्य तडीला नेण्यास ही मोठी सधी चालून आली आहे यावेळी मागे न राहता मोठमोठ्या सास्कृतिक व सामाजिक सस्था उभ्या केल्या पाहिजेत जुन्या सस्थाचे पुनरुज्जीवन केले पाहिजे पैसा पुरविला पाहिजे शिक्षण-सशोधन-प्रकाशन इत्यादी कार्ये गतिमान केली पाहिजेत

## सावधगिरी

युद्धातील जेते वर्षा–दोन वर्षाच्या आतच सभोवतालच्या व दूरवरच्याही, जरा असमर्थ असलेल्या इतर प्रदेशाच्या मुक्तीकरणाची भाषा बोलू लागतात त्यातील मुक्तीकरणाचा अर्थ दुसऱ्याच्या दृष्टीने फसवा व स्वत च्या दृष्टीने स्वार्थी असतो त्यातील विस्तारीकरणाचा भाग गुप्त राहात नाही पण ते योग्य वेळी समजणे आवश्यक असते मुक्तीकरणाच्या फौजेच्या जूखाली एकदा मान मुक्तपणे गुतल्यावर मग पुन तेथून सुटका करून घेणे जवळ जवळ अशक्यच असाच प्रसग आपल्या सस्कृतीवर येऊ नये असे वाटत असल्यास योग्य वेळीच सावधगिरी बाळगणे आवश्यक आहे कारण वैदिकीकरणाची भाषा फोल ठरल्यावर आता नव्या जोमाने हिंदवीकरणाची भाषा पुन प्रबल होऊ पाहात आहे गेल्या काही दशकात राष्ट्रवादाच्या नावाखाली हिंदुराष्ट्रवादाचा पुरस्कार करण्यात आला आणि हिंदवेतराना 'परसहिष्णुता' बहाल करण्याचा आव आणला गेला तरीही परिस्थिती त्याना अनुकूल ठरली नाही वस्तुत त्याच्या सहिष्णुतेची इतराना गरजच भासली नाही कारण ती ओजस्वी आणि गुणबीजात्मक नसल्याने तिचा प्रभाव पडू शकला नाही शिवाय त्या सहिष्णुतेच्या आड आत्मवरिष्ठता व परकनिष्ठता लपली असल्याने त्याचे वर्तन छद्मीच ठरले म्हणूनच हिंदवीकरणाचा खरा अर्थ कोणाल्याच उमजत नाही कारण हिंदू या शब्दाचा अर्थ त्याना पाहिजे तसा त्याच्या अभिनेत्यापासून अनुसरत्यापर्यंत कोणालाच लावता आलेला नाही पण भाषाशास्त्र जमले नाही म्हणून त्याचे काहीच अडणार नाही त्याना सुसगती व सहभाव याचे वावडेच आहे दलितावर हात उगारण्यात, त्याचे पिण्याचे पाणी बद करण्यात अशाना पुरुषार्थ वाटतो ( ता इदापूरमधील बावडा प्रकरण, १९७२ ) त्यात मध्याचे भाऊबदही हिरीरीने भाग घेतात अशा वेळी वर्णभेदातून उद्‌भवलेली जातीयता, अहगड, तुच्छता, वर्गभेद इत्यादी प्रकारची विषमता अशीच पसरत राहिल्यास मानवता धोक्यात आल्याशिवाय राहणार नाही

## नाम संस्कृतीवर हल्ला

या देशाची मूळ संस्कृती मात्र मानवतेची माता आहे. ती दुर्बल झाल्यास, आजारी पडल्यास मानवताच पोरकी बनेल! म्हणून तिच्यावरील कोणताही आघात सहन करता कामा नये मुक्तीकरणाची भाषा जशी फसवी असते तशीच हिंदवीकरणाची भाषाही कुटिल नीतीमध्ये पारगत आहे ज्या भारतीयाचे पूर्वज समाज-जीवनाच्या आणि मानवी समतेच्या उत्तुग शिखरावर विराजमान होते त्यांना संस्कृति-दान करण्याच्या वल्गना करणारे वैदिक आर्य स्वत स्वार्थामुळे उथळवृत्तीचे, वर्णश्रेष्ठत्वामुळे दाभिक आचाराचे व वृत्र-सग्रामातील यशामुळे घमेडखोर बनले या पार्श्वभूमीवर आर्यपूर्वकालीन संस्कृतीचा अभ्यास करताना तिच्या उत्तुगतेने मन उचबळून येते आणि मूलभारतीय संस्कृतीच्या उदात्त स्वरूपाचे दर्शन जगाला घडविण्यात मनाला अपूर्व साफल्य लाभते

ऋषभपुत्र भरताचा अन्य भरत करण्याचा त्या नीतीचा प्रयत्न तर आज शतकानुशतके अव्याहत चालू आहे त्यासाठी खऱ्या भरताला हेतुपूर्वक दूर सारून दुसऱ्या–तिसऱ्याच दत्तक भरताला पुढे करण्याचा हव्यास सतत चालूच असतो इतर क्षेत्रातील अनेक प्रकारचे तोतये आपणास पूर्ण परिचित आहेत पण त्या सर्वापेक्षा हिंदवीकरणाची चाल फारच वेगळी आहे इतर तोतये पुढे येतात ते निदान खरी व्यक्ती गैरहजर आहे याची निश्चिती झाल्यावरच आणि खरी व्यक्ती हजर होताच किंवा खरे-खोटे सिद्ध होताच तोतये काळे करतात पण हिंदवीकरणाची धुरा वाहणारे कोणत्याही तत्त्वाच्या सिद्धासिद्धतेची तमा बाळगीत नाहीत खरेपणा व खोटेपणा याचा पडताळा त्याना पहावयाचा नसतोच फक्त आपले घोडे पुढे दामटावयाचे असते! बस्स अगदी एकमेव कार्य!! ते अगदी जोमाने करीत राहतात मग शकुतलेचा पुत्र सर्वदमन हाती सापडो नाही तर कुठली सुदास–दिवोदासाची आर्य टोळी भेटो! मिळेल त्याला वेठीला धरतात आणि खरा भरत म्हणून पुढे करतात असे करताना प्रत्येक नव्या प्रसगी ते स्वत चेच मागचे म्हणणे स्वत च खोडून टाकतात! त्याचा कोणताही विधिनिषेध त्याना नसतो कारण कोणत्याही प्रकारची शुद्ध उरलेलीच नसते

## पुरातन पुराव्यांचे जतन

तेव्हा अशा घटनेतून होणाऱ्या आघाताची दखल खऱ्या संस्कृतीला घेतलीच पाहिजे आणि ती आताच घेतली पाहिजे दीर्घकाल वाट पाहिल्यास संस्कृतीच्या सत्य स्थितीची साक्ष देणारी भाषा, त्या भाषेतील ग्रथ किंवा त्यातील अवतरणे आणि अन्य सदर्भ कालाच्या प्रवाहामध्ये बुडून जातील! मग आपल्या हाती तोतयाचा निरास करण्यासाठी कोणताही उपाय शिल्लक उरणार नाही उलटपक्षी

तोतया संस्कृतीला दीर्घकाळ वाव मिळाला तर तिलाही काही वाङमयीन पुरावे नव्याने तयार करता येतील त्या नव्या पुराव्याना जुन्याच्या अस्तित्त्वा अभावी प्रतिष्ठा लाभेल ! मग नाइलाज म्हणून इतर जगही त्याचा मान ठेवण्यास सुरवात करते ही जगरहाटी आहे ती रोखून धरता येणार नाही तेव्हा मूळ संस्कृती शाबूत व शुद्ध राखण्यासाठी मूळ भाषेचा, आपल्याच प्राकृतिक भाषेचा अभ्यास केला पाहिजे अभ्यासाशिवाय कोणतीही जुनी भाषा जिवत राहात नाही यास्तव परकीय भाषेपेक्षा स्वभाषा अभ्यासणे अखेरपक्षी हिताचेच ठरते

## अभ्यासाचा नंदादीप

कारण या प्राचीन व मौखिक परपरेतून प्रवाहित झालेल्या प्रदीर्घ आणि अथाग अशा श्रुतग्रथाच्या समुहामध्ये असे काही विषय व अशी काही स्थळे आहेत की जर त्याचा सखोल व श्रुतपरपरेला अनुसरून नीटपणे अभ्यास केला नाही तर ती स्थळे दुर्बोध राहतात इतकेच नव्हे तर परक्याना त्यातून अपबोध, अपसमज निर्माण होण्याची फार मोठी शक्यता सभवते आणि एकदा काकमास-भक्षणासारख्या गैर समजुती प्रचलित झाल्या की त्याचा परिहार करणे कठीण जाते काही ठिकाणी अर्थद्विधा प्रवृत्त होतो तर काही ठिकाणी विरोध व विसगती दिसू लागते. काही ठिकाणी परपरा तुटलेली आढळते श्रुतग्रथातील असा भाग वितर्काला वाव निर्माण करतो एकाच घटनेबाबत अनेकविध आणि विरुद्धही विधाने आढळतात ती सर्व पारखून-निरखून घ्यावयाची तर त्याचा समग्रतेने व साकल्यानेच अभ्यास करावा लागतो इतरानाही मार्गदर्शन करावे लागते नाही तर '**को न विमुह्यति शास्त्रसमुद्रे**' असा प्रसग निर्माण होतो यासाठी शास्त्रशुद्ध सशोधनाची व विवेकपूर्ण अनुशीलनाची गरज असते हा परपरागत अभ्यासाचा नदादीप सतत तेवत ठेवावा लागतो व नवख्याला प्रकाशाचा पुरवठा करावा लागतो त्याबरोबरच जाणून बुजून वाकड्यात शिरून, अर्थाचा अनर्थ करणाऱ्यावर सतत पहारा ठेवून त्याचा योग्य वेळीच परिहार करावा लागतो

## तत्त्वाच्या विपर्यासाचे भय

काही साहित्यिकच नव्हे तर तात्त्विक व दार्शनिक वैशिष्ट्ये अशी असतात की ती सामान्यत सामान्य माणसाना जगावेगळी वाटतात खरे तर ही वैशिष्ट्ये म्हणजेच त्या संस्कृतीचा स्वत चा असा खास आत्मा असतो केवळ पोषाखामुळे वेगळी भासणारी संस्कृती कालातराने उघडी पडते तशी ही **नाभि-ऋषभ-भरत** याची मूळ संस्कृती वेगळी नाही ती गभर नवरी असून तिला स्वत चे असे खास व्यक्तित्व आहे तिला स्वत चा आत्मा आहे तिचे गुणवैभव विशाल आहे तिने जगाला अनेक प्रकारची देणगी दिली आहे ती स्वय-पुष्ट असून दुसऱ्याचे पोषण करण्यास समर्थ आहे

स्याद्वादासारखे एखादेच उदाहरण पुरे आहे याचा अर्थ मी मी म्हणणाऱ्या विद्वानानाही लवकर आकलन होत नाही हिंदूधर्माचा पुनरुद्धार करणाऱ्यात अग्रगण्य समजल्या गेलेल्या शकराचार्यानाही त्याचा अर्थ शेवटपर्यंत आकळला नाही वस्तुत अशा प्रकारची तत्त्वे सारभूत असून ती दीर्घकालीन विचारमथनातून निर्माण झालेली आहेत या सिद्धान्ताचा योग्य तो आदर राखण्यासाठी, त्याचा परिचय दुसऱ्याना यथार्थतेने करून देण्यासाठी तशाच उच्च स्तरावरील थोर प्रयत्नाची खास गरज आहे. ती गरज जाणतेपणाने भागविण्याचा प्रयत्न प्रत्येक नव्या पिढीमध्ये प्रामाणिकपणे झाला पाहिजे नाही तर त्याचा स्वत ला समजेल तसा अर्थ इतरेजन लावतात आणि आपल्या विरुद्ध आपल्याच तत्त्वांचा शस्त्रासारखा उपयोग करण्यास त्याना वाव मिळतो

असे घडू द्यावयाचे नसेल तर आपणच योग्य असा मार्ग चोखाळणे हिताचे ठरते संस्कृतीवरील अशा प्रकारचा अनर्थकारी प्रसग कशा रीतीने थोपविता येईल याचा विचार अभ्यासाने साध्य होतो परकीय आक्रमणाविरुद्ध उभे राहण्यास भक्कम आधार मिळावा म्हणून प्रत्येक प्रातातील व केंद्रातील राजसत्तेच्या ठिकाणी मूळ प्राकृत भाषेच्या व तत्त्वज्ञानाच्या अभ्यासाची विद्यापीठे निर्माण केली पाहिजेत आपल्या समाजातील लोकाची संख्या अभ्यास क्षेत्रात वाढत राहिली पाहिजे संस्कृती नेहमी साहित्य–मुखानेच बोलते आणि प्राकृत भाषा ही त्या साहित्याची जननी आहे तीच अस्सल भारतभाषा आहे ती जिवत राहिली पाहिजे तिचे ओज वाढले पाहिजे. यासाठी अभ्यासासारखे उपाय योजले पाहिजेत तुलनात्मक व सर्वांगीण अभ्यास होण्यासाठी संस्कृत, पाली, तामीळ, कन्नड, हिंदी, मराठी अशा इतर भाषाचाही चागला दर्जेदार अभ्यास सहजसाध्य करून घेतला पाहिजे

### आजचा कर्मयोग

आणि हे सर्व आताच साध्य करून घेणे आवश्यक आहे. नाही तर आपल्या उच्च तत्त्वानाही नीच दशा प्राप्त होईल आपल्याला आपल्याच मालकीच्या घरात दुसऱ्याच्या ताटाखालचे माजर होऊन जगावे लागेल आपल्याच दारात भिकारी म्हणून राहण्याचा प्रसग ओढवेल ! आजचीच दशा इतकी खालावली आहे की जगातील सर्व जीवमात्राचे कल्याण साध्य करणाऱ्या आपल्याच उच्चतम जीवन-तत्त्वांचा खरा अर्थ आपल्याच पिढीला समजेनासा झाला आहे–समाधिमरणविधीला आत्महत्या, अपरिग्रहाला दारिद्र्य आणि मंगलमय दिगंबर अवस्थेला अमगल, अश्लील ठरविणाऱ्याना निरुत्तर करण्याचे सामर्थ्य आज किती जणात उरले आहे? उलट आपण निरुत्तर होतो तेव्हा आपली अवस्था कशी होत असेल ! इतरेजन आपली सभावना कशी करतील हे सागण्यास भविष्यकार कशाला पाहिजे? यास्तव ही फजिती टाळावयाची असेल तर आपल्या संस्कृतीचा व भाषेचा सखोल अभ्यास

करण्याशिवाय दुसरा मार्ग नाही आज आपली दशा त्रिशकूसारखी होत आहे ही अवस्था नाशकारी आहे आपण आपली सस्कृती सोडून दुसरी बहुजनाची स्वीकारावी म्हटली तरी तीही स्वीकारू शकत नाही कारण तसे केल्यावरही आपण परके व हीनच ठरणार । कारण दीक्षा देणारा उच्च असतो तर घेणारा सदैव नीचस्थानीच राहतो उपकारकर्ता उपकृताला आपल्यापेक्षा मोठा कधीही होऊ देत नसतो आणि बरोबरीचा मानही देत नसतो म्हणूनच आपले आपणच श्रेष्ठ बनणे हा एकमेव उपाय । यासाठी आपली सस्कृती आणि तिला आधार म्हणून आपला देश विद्यमान नसतानाही नव्याने निर्माण करण्याचा प्रयत्न जगामध्ये चाललेला आहे मग असलेली सस्कृती आणि तिच्या वारसपणाचे हक्क मुद्दाम सोडून देण्यात काय साध्य होणार ? अशा प्रसगी खबीर मनाने आपण आपलीच परपरागत सस्कृती कवटाळली पाहिजे याशिवाय अन्य तरणोपाय नाही

## दुहेरी उपेक्षा

आपल्या राष्ट्रीय धोरणाच्या सुसगतीला अनुसरून आपण अलीकडच्या काळात अलिगड किंवा काशी येथील विद्यापीठाप्रमाणे खास आपल्यासाठी स्वतत्र विद्यापीठे मागून घेतली नाहीत कारण तशी आपली सास्कृतिक परपराच नाही केन्द्रीय किंवा प्रातीय सरकारनेही अशी खास सोय पाली व सस्कृत भाषेसाठी केली पण प्राकृतसाठी वैशाली ( उत्तर विहार ) येथील योजना तयार असूनही प्रत्यक्षात राबविली नाही कालमानाला अनुसरून आपली जुनी मठ–पाठशाळा–स्वाध्यायमदिर या पद्धतीची शिक्षणप्रणाली बद पाडली पण त्याऐवजी नवा पर्याय काही आपण निर्माण केला नाही राष्ट्रातील शिक्षणाची गती किती तरी वेगाने सुधारत आहे त्यामध्येही आपणास आपला न्याय्य वाटाही मिळविता आला नाही तशी उत्सुकताही कधी दाखविण्यात आलेली नाही आपली स्वत ची विद्यापीठे स्थापण्याचे धैर्यही कुणी दाखविले नाही श्रवणबेळगोळबाबतीत मध्यतरी थोडासा प्रयत्न झाला होता परतु तोही शेवटी सिद्ध झाला नाहीच कारण तेथेही सरकारावलबनच नडले विद्यमान असलेल्या विद्यापीठामध्ये आपला स्वत चा अभ्यासक्रम चालू करवून घेणेही फारसे जमलेले नाही काही सधन शिक्षणप्रेमी लोकानी विश्वस्त निधी निर्माण करून स्थानिक पातळीवर काही अभ्याससस्था निर्माण केल्या आहेत पण त्याची अवस्था चागली नाही त्या अगदीच रेगाळत चालतात त्याच्यामध्येच प्रेरणा व चेतना कमी आहे तेव्हा त्या सस्था इतराना काय देणार ? अशा प्रकारची उपेक्षा दिवसानुदिवस वाढतच आहे

जैन तीर्थक्षेत्र कमिटयामध्येही पैसा आळसावतच पडलेला आहे स्वाध्याय मडळाच्या पद्धतीने मोठमोठे ग्रथालय व वाचनालय चालविणे आपणास जवळ जवळ माहीतच नाही मदिराची निर्मिती मात्र बऱ्या प्रमाणात चालू असते पण

मंदिरामध्ये मूर्तीच्या प्रतिष्ठेबरोबर श्रुताध्ययनाचीही प्रतिष्ठा अत्यंत महत्त्वाची आणि तितकीच गरजेची बाब आहे हे प्रतिष्ठाकार सोईस्करपणे विसरतात, नव्हे टाळतात असे म्हटले तर ते जास्त वस्तुनिष्ठ विधान ठरेल! काहीजण हा सर्व कालदोषाचा प्रकार मानतात. कालदोष टाळण्यासाठी संस्थेच्या संचालनामध्ये योग्य तो फरक करावा लागतो हे खरे असले तरी मुळातून संस्थाच बंद करणे म्हणजे कालदोषावर उपाय शोधणे नव्हे. काळाला अनुसरून उपयोगी पडतील अशा नव्या प्रतिष्ठित संस्था निर्माण केल्याशिवाय जुन्या बंद करणे म्हणजे नवी चप्पल न घेताच जुनी फेकून देण्यासारखी अवस्था होय! अशा चुका सुधारण्याचे धैर्य कुणालाही झाले नाही आणि येथपासूनच संस्कृतीची उपेक्षा सुरू झाली.

## स्वसंस्कृती हा मानवी हक्क

हिंदवीकरणाचे वर्चस्व वाढू लागल्याने आपल्याला झळ पोहोचते याची आठवण होताच काही दशकापूर्वी विशेषत: उत्तर भारतीय जैनांमध्ये जरा खळबळ निर्माण झाली. त्यांनी जरा चळवळ केली. पण काही लोकांनी आपली आडनावे 'जैन' असे लावण्याखेरीज त्यातून विशेष असे काहीच निर्माण झाले नाही. काही जणांनी मोठमोठी नावे धारण करून महासभा–महामंडळे स्थापन केली, तर काही सुशिक्षितांनी लहान-मोठी पत्रके-पाक्षिके काढण्यास सुरुवात केली. पण त्यांना हवी तेवढी चालनाशक्ती लाभली नाही. त्या सर्वच संस्था कार्याच्या फळाच्या दृष्टीने खुज्या ठरल्या. हे नमूद करताना मनापासून खेद होतो. स्वाध्यायशाळाच बंद पडल्याने माणिकचंद परीक्षालयासारख्या संस्थाही निष्प्रभ झाल्या. अतिरेक्यांनी मंदिरावर व मुनींवर अघात करण्याचा प्रयत्न केला तेव्हा निषेध प्रकाशित करणे, सरकारकडे दयेचा अर्ज करणे आणि शेवटी मूग गिळून गप्प बसणे हा आपला सांस्कृतिक जीवनक्रम!! ही दयनीय अवस्था सहन करण्यात उपसर्ग–विजयही नाही की परिषह-जयही नाही. हा कोणताच पुरुषार्थ नव्हे!

आपण अधिक जागृत झाले पाहिजे. आपली संस्कृती समर्थ केली पाहिजे व त्यासाठी जाणीवपूर्वक झटत राहिले पाहिजे. किल्ल्याची तटबंदी मजबूत केली पाहिजे. सरहद्दीचे संरक्षण दक्षतेने केले पाहिजे आणि संस्कृतीच्या पोषणासाठी पूरक संस्था उभ्या करून त्या बलिष्ठ केल्या पाहिजेत. अशा सामाजिक संस्था अस्तित्वात असल्याशिवाय आपली संस्कृती विद्यमान राहणार नाही. कुणाचीही मनधरणी करून आपणास आपले मनोबल शाबूत राखता येणार नाही. संयुक्त राष्ट्रसंघात योग्य ते स्थान व योग्य तो मान मिळावा म्हणून प्रत्येक छोटा देश देखील जितक्या तन्मयतेने प्रयत्न करतो तितक्याच हिरीरीने आपल्या संस्कृतीला राष्ट्रीय जीवनात मानाचे स्थान मिळविण्यासाठी आपण प्रयत्नशील राहिले पाहिजे. हा आपला मानवी हक्क आहे. तो आपण प्रस्थापित केलाच पाहिजे.

आपल्याला जर आपल्या जीवनातील उद्दिष्टे साकार करावयाची असतील, आपल्या स्वत च्या पद्धतीने जीवन जगावयाचे असेल, आपल्याच मनाची योग्य सभावना करावयाची असेल तर प्रथमत आपणास आपल्या सामाजिक जीवनामध्ये पोषणाच्या दृष्टीने व रक्षणाच्या दृष्टीने पात्र व समर्थ बनले पाहिजे यासाठीच तर सस्कृतीची गरज असते, तिची अपेक्षा वाढत जाते खऱ्या सस्कृतीचा दुसऱ्या कोणालाही उपद्रव होत नसतो सस्कृतीचा मार्ग समता व सहाय्यता याच्या प्रागणातूनच पुढे जात असतो With malice towards none and with generosity towards all असे तिचे मार्गदर्शन उच्च व उदात्त असते वर्गा-वर्गातील, राष्ट्राराष्ट्रातील, भिन्न भिन्न राजकीय वा सामाजिक समुहामधील सघर्ष कायमचा मिटविण्यासाठी आणि त्याच्याही पुढे वधुभाव, दया, प्रेम, सहकार आणि सहिष्णुता निर्माण करण्यासाठी सर्वोत्तम मार्ग म्हणजे सस्कृति-सवर्धन होय मानव जातच नव्हे तर जीवमात्र अस्तित्वात असेपर्यंत या गुणाची कदर केली जाईल कारण ते जीवनानुसारी असून जीवनाचे पोषण करण्यास समर्थ आहेत सर्व तत्त्वांचा मूलाधार जीवनच आहे जीवन व सस्कृती अविनाभावी आहेत सस्कृतीची गरज कधीही सरणार नाही सस्कृती ही मानवाची मूलप्रेरणा आहे ती जीवन-समर्थ आहे ती एक न सपणारी, न दुखावणारी अशी अद्‌भुत पण अतर्गत शक्ती आहे ती अणुशक्तीपेक्षा सरस असून सुदरही आहे सस्कृती नित्य प्रभावशील असते तिचा इतरावर हळू हळू पण निश्चित परिणाम होत राहतो त्यामुळे सामाजिक जीवन सफल होते म्हणून मानवाने सस्कृतीचा पाठपुरावा आदिमकालापासून केलेला आढळतो

## संस्कृतीद्वारे सामर्थ्य

तरी पण राजकीय सत्ता मदान्ध असते राजकारणात आणि भाडणात प्रत्येक राष्ट्राची भूमिका स्वार्थमूलकच असते मानवाचा व न्यायाचा विचार करण्याच्या मन.स्थितीत कोणतेच राष्ट्र असत नाही युद्धकारणातील व शस्त्र-विजयातील कुटिल अनुभवाचा विसर पडून चालणार नाही युद्धाघात हा मर्माघातच असतो सुप्रतिष्ठित सस्कृतीच रक्षणास समर्थ ठरत असल्याने तिची प्रतिष्ठा वाढविणे हे आद्य कर्तव्य ठरते तिचे योग्य रक्षण झाले तर राजकीय हेतूवर व युद्धनीतीवर तावा ठेवता येतो म्हणजे **युद्धावरही अतिमच नव्हे तर सार्वकालिक उपाय म्हणजे संस्कृतीच.** म्हणून सस्कृति-सगोपनाला दुसरा पर्यायच उरत नाही प्राजलपणा, मैत्रीभाव इत्यादी सास्कृतिक मूल्ये मृगजळाप्रमाणे आभासात्मक आहेत अशी भावड्या व सरळमार्गी लोकाची कल्पना करून देण्यात येत असते पण ती कल्पना खोटी असून फसवणुकीच्या पोटी तिचा जन्म झालेला असतो आपण फसलो की तत्त्वे फसवी असतात असा आविर्भाव निर्माण करण्याचा तो एक

प्रयत्न असतो संस्कृती किंवा तीतील मूलतत्त्वे जशी दुसऱ्याना फसविण्यासाठी नसतात तशीच ती स्वत फसण्यासाठीही अंगीकारावयाची नसतात. दुसऱ्याला फशी पाडू नये हा आपला बाणा असावा परंतु फशी न पटण्याइतकी आपली योग्यता निश्चितपणे सबळ असली पाहिजे संस्कृती आत्मसात केल्यानेच अशी योग्यता प्राप्त होते, ती टाकल्याने नव्हे! निदान न फसण्याइतके तरी प्रत्येकानी चतुर बनलेच पाहिजे तो एक संस्कृतीचाच पूरक भाग आहे या संस्कृतीरूपी महावस्त्रालाही ताणे आणि बाणे अशा दोन्ही घटक-अंगांची आवश्यकता असतेच म्हणून बावरया कल्पनाविश्वातून बाहेर पडा आणि संस्कृति-संगोपनाच्या कार्याला वाहून घ्या हाच आजच्या काळातील सर्वांचा सांस्कृतिक अभियोग होय

आपल्या भरतवर्षाच्या नामकरणाच्या मूलसूत्राचे सार्थ विवेचन करण्यातील हेतू एवढाच की वैदिक आर्यांच्या आगमनापूर्वीचे आणि त्याही पूर्वीचे आपले अतिप्राचीन पूर्वज कोणत्या प्रकारचे जीवनसूत्र अंगीकारीत होते, त्यांची विचारसरणी कशी होती, त्यांच्या रीतीभाती व आचारवारा कोणत्या पद्धतीच्या आणि श्रद्धेच्या गमक होत्या इत्यादी तथ्ये जाणण्याची स्वाभाविक जिज्ञासा तृप्त व्हावी या विषयावरील ऐतिहासिक प्रमाण स्वतंत्रपणे उपलब्ध होण्याचा संभव कठीण वाटत असला तरी, ज्या प्राचीन ग्रंथावरून इतिहास-निर्मितीला उपयोगी अशी बरीच साधनसामग्री नव्याने संकलित करता येते, तेथे तो इतिहास अगदी शास्त्रशुद्ध स्वरूपात तिथि-वारासह आयता मिळत नसला तरी, सगतवार संकलनाच्या तर्कशुद्ध निरीक्षणावरून मूळ भारतीय जीवनाच्या माहितीची मांडणी, ऐतिहासिक दृष्टीने करण्यास आवश्यक तितक्या प्रमाणात ती उपलब्ध होणे संभवते हा एक मोठा लाभ होय! आणि हा लाभ सर्वांना ज्ञात होणे आवश्यक आहे काही निवडक प्राचीन ग्रंथ ऐतिहासिक प्रमाणाला मोठ्या प्रमाणात साधनीभूत ठरत असल्याने अनंतर कालात होत गेलेल्या फेरबदलासंबंधी सुसंगत तर्क बांधण्यास व त्यावर चिकित्सा करण्यास मदत झाल्याशिवाय राहणार नाही. मनुष्यप्राण्यास ज्ञान संपादन करता येऊन, पूर्वजांची ऐतिहासिक परंपरा पाहून पुढील काळाचाही विचार करता येतो मागील कालखंडासंबंधीचा अज्ञानांधकार नष्ट होऊन सध्याच्या जीवनस्थितीमध्ये न्यून काय आहे, लक्ष्य काय आहे, अधिकोत्तर काय करणे शक्य आहे, आवश्यक कार्य कोणते आहे इत्यादी विविध जीवनक्षेत्रात प्रवेश मिळून वैचारिक प्रेरणा आणि कार्यशक्ती प्राप्त करण्यास हा अभ्यास तौलनिक क्षेत्रात मार्गदर्शक ठरावा असे वाटते

: २ :

# भारतीयता

ऋभषस्य चरितं हि परमं पावनं महत् ।
स्वर्ग्यं यशस्यमायुष्यं श्रोतव्यं च प्रयत्नतः ।।

— शिवपुराण, ४/८.

# २ : भारतीयता

## भारतीयतेतील सत्तत्त्व

आपल्या भारताचे राष्ट्रीयत्व अगदी सुनिश्चित असले तरी भारतीयत्व मात्र एकमधी नाही निदान आजचे भारतीयत्व तरी बहुरंगी आहे मानवताही बहुविधच आहे त्यातील मौलिक तथ्ये अनेक आहेत ही एक सत्यस्थिति आहे तरी देखील त्या सर्वांमधील आदिम घटकतत्त्व भरतमय असून भरतनिष्ठाही स्पष्ट आहे त्यातील आधारभूत तथ्य भरत आहे हे सत्य मात्र कुणालाही नाकारता येणार नाही प्रकाशसुद्धा बहुतत्त्वांकित आहे उजेड, उष्णता, ज्वलनशीलता, किरणमयता इत्यादी अनेक तथ्ये विद्यमान असली तरी त्यातील ओज प्रधानभूत आहे सत्य तत्त्वातील शाश्वत सत्ता कालाधीनच आहे त्याचा बाह्याविष्कार देश-काल-परिस्थितीशी एकरूप होऊनच दृगोचर होत असतो सत्यस्थितीची आयुर्मर्यादा आपल्या जाणीवाच्या पार पलीकडे पसरलेली असल्याने मूळ तथ्य व्यक्तीच्या ज्ञानकक्षेच्या पलीकडे अज्ञातच राहते म्हणून काही त्याचे अस्तित्वच नाकारता येत नाही नाकारणाऱ्याचे अज्ञान उघडे पडते नाकारणारा नष्ट होतो आणि मागे शेष उरते ते केवळ सत्य तत्त्व ते मर्त्य जीवनाच्या मानाने अमर आहे एखाद्या व्यक्तीच्या अनुभवाच्या कक्षेतील सत्य हे त्रोटकच ठरत असले तरी अनेक व्यक्तींच्या परंपरेतून सत्य तत्त्वाची जोपासना करता येते ही प्रक्रिया भविष्याच्या बाबतीत जशी खरी आहे तशीच ती इतिहासाच्या अभ्यासाच्या साधनाने पूर्वकालीन घटना प्रकाशात आणण्यासाठीही उपयोगी पडते म्हणून इतिहास-संशोधनाला महत्त्व प्राप्त होते आणि अशा संशोधनाने आपल्या ज्ञानाची महत्ता वाढविता येते त्या जोरावर ती व्यक्ती, तो समाज, ते राष्ट्र महत्त्व पावते अशा महत्त्वासाठी झटणे हे मानवी दृष्टिकोणातून एक महान जीवितकार्य आहे

## तथ्यानुकूल अभ्यासप्रणाली

मौलिक तथ्याच्या शोधासाठी दृष्टिकोणही मूलगामी असणे आवश्यक आहे त्यासाठी गुणानुकरण उपयोगी असले तरी अधानुकरण मात्र आत्मघातकी ठरते. दुसऱ्याच्या अभ्यास-प्रणाली तिसऱ्यासाठी पंगूही ठरतात ! म्हणून स्वत्वानुसारी प्रणाली स्वत च्या परपरेतून प्राप्त झालेल्या नसतील तर डोळस दृष्टीने त्या नवीनही तयार कराव्या लागतात जर तथ्य बलिष्ठ असेल आणि प्रयत्न समर्थ असेल तर अशा प्रणाली नव्या विचारापाठोपाठ आपोआप धावत येतात अभ्यास सत्त्वशील होण्यासाठी याची फारच आवश्यकता भासते

## युरोपीय प्रणालींचा आविष्कार

ज्ञात किंवा अज्ञात काळापासून आपल्या भारतावर परकीय आक्रमणे फारच झाली. त्यातील काहींचा परिणाम दीर्घकाल टिकला, काहींचा अल्पकाळ तर काहींचा क्षणिकच. राष्ट्रीय, राजकीय, सामाजिक, धार्मिक व व्यक्तित्वविषयक परिणाम थोड्या-फार प्रमाणात आपणास भोगावाच लागला व आजही लागत आहे इतर सर्व परिणामापेक्षा प्राचीनकाळी धार्मिक परिणाम व अर्वाचीन काळात साहित्यिक, मानसिक व बौद्धिक परिणाम फारच बलवत्तर ठरले वैदिक आर्यांच्या विचारधारेतील जातीयता आजही फलदानशक्तीमध्ये बलवत्तर आहे त्याची फळे आपण चाखत आहोतच मोगल-मुसलमानांच्या सपर्काचे राष्ट्रीय फळही काही कमी तीव्र नाही. मात्र यापेक्षाही बलवत्तर प्रभाव आपल्यावर पडलेला आहे तो इग्रज-युरोपियाच्या साहित्यिक प्रणालीचा साहित्य बुद्धीवर व मनावर फार मोठ्या प्रमाणात परिणाम करीत असल्याने व्यक्तित्व घडविण्यामध्ये साहित्यिक सस्काराना सिंहाचा वाटा लाभलेला आहे. इतर कोणत्याही मार्गापेक्षा साहित्याद्वारे घडविलेले व्यक्तित्वाचे सस्कार दूरपरिणामी ठरतात पिढ्यानपिढ्या त्याची वाढ आपोआप होत राहते साहित्य व्यक्तित्वामध्ये खोलवर विंधून तेथेच रुजत राहते हाच परिणाम आजच्या भारतीयामध्ये स्पष्टपणे आविष्कृत झालेला दिसत आहे.

## संस्कृतिशून्य शिक्षण

या विश्वपरिणामी इंग्रजी साहित्यामुळे स्वतत्रपणे विचार करण्याची प्रवृत्ती रुजत गेली ही फार मोठी देणगी आपणास लाभली ही जमेची बाजू मान्य करूनही खर्चाची बाजू दुर्लक्षणीय ठरत नाही नवसमाज घडविण्यामध्ये साहित्याचा प्रभाव फार मोठा असला तरी एखाद्या जीवन-पद्धतीच्या आविष्काराचा प्रभाव वाचकाच्या जीवनपद्धतीला पोषक नसताना किंवा हानिकारक असतानाही तो अधप्रणालीने स्वत वर निमूटपणे लादून घेणे हे मानवी दृष्टिकोणातून पाहता

वाईटच मानावे लागते इग्रजांचा अहगड आणि भारतीयाचा न्यूनगड वाढू देणे किंवा वाढवीत राहणे हे कशाचे लक्षण ठरते ते उघड आहे निदान ते आपल्या राष्ट्रीयत्वाला आणि व्यक्तित्वालाही हानीकारकच आहे असे सिद्ध झाले आहे जरा खोलवर विचार करणाऱ्याला ही गोष्ट उमजल्याशिवाय राहात नाही

अशा परिस्थितीतही काही भारतीय, थोर विचारप्रवर्तक बनून सर्वत्र प्रख्यात झाले ही आपल्या भाग्याची गोष्ट ! मात्र त्याचे श्रेय केवळ इग्रजी विचारप्रणालीला देता येणार नाही परतु पुष्कळशा इतिहासकाराची वृद्धि इग्रजी पाण्यावर पोसली गेल्याने, त्यानी त्याच पाण्याचा पाट नम्रपणे साभाळण्यासाठी किनाऱ्याप्रमाणे त्याचीच विचारसरणी वाहण्याचे हमाली काम पतकरले आणि आयुष्यभर त्याची थोरवी व उच्चता दुसऱ्याच्या मनावर ठसविणारी ओवी गाता गाता, त्याच्या राजकीय धोरणाचाही पाठपुरावा केला त्यासाठी त्याच्याच छत्राखालील भारतीय इतिहासकारानी देखील येथील देशभक्ताची, वीराची व राष्ट्रपुरुषाचीही दखल घेतली ती केवळ पुंड व बंडखोर किंवा दरोडेखोर या नात्यानेच परकीय मुसलमानानी तर शिवाजीला पहाडी चुहा म्हणण्यापर्यंत मजल मारलेलीच होती. मग त्याच्यामध्ये आणि या नव्या आग्ल-विद्याविभूषित भारतीय इतिहासकारामध्ये तथ्याच्या दृष्टीने असा कोणता महत्त्वाचा फरक आहे ? मग ही न्यूनगडता मालविण्यासाठी, आपल्याच पूर्वजाच्या ओजाची खरी जाणीव लोकाच्या मनामध्ये निर्माण करण्यासाठी, पुढील पिढीवर यथातथ्य सस्कार योग्य रीतीने बिंबविण्या-साठी आपल्या पूर्वपुरुषश्रेष्ठाच्या थोर व प्रभावी व्यक्तित्वाची दखल खऱ्या भारतीयानी नाही घ्यावयाची तर कोणी ? खरा इतिहास भावी पिढीला कळणार कसा ? त्याच्या तेजस्वी गुणावर कालदोषामुळे साचून राहिलेली राख फुकावयाची कशी ? त्याच्या व्यक्तित्वातील ओजाचा लाभ इतराना होणार कसा ? पूर्वदिव्याच्या सपर्काशिवाय विद्यमान तरुणाचा भावी काळ उज्वल होणार कसा ? राष्ट्रात ओज ओतण्याचे सामर्थ्य येणार कोठून ?

## अन्यदत्त प्रणाली

उत्खननामुळे अगर इतर मार्गाने सापडलेल्या, नव्याने ज्ञात झालेल्या सस्कृतीचा अभ्यास करून त्यापैकी जी सस्कृती कालानुक्रमाने पूर्ववर्ती ठरेल तिला सर्वापेक्षा प्राचीन किंवा आद्य मानवी सस्कृती मानणे चूक आहे हे, जेव्हा त्याहीपेक्षा प्राचीन सस्कृतीचा नव्याने शोध लागतो तेव्हा सहजपणे उमजते असे असले तरी आपापली सस्कृती इतरापेक्षा जास्त पुरातन ठरविणे ही एक सुसस्कृत मानवातील वाढीस लागलेली सहजप्रवृत्ती आहे प्रत्येकाचा अभिमान, अभिनिवेश, अहता, अस्मिता किंवा गर्व फारच तीव्रतेने जागृत होतो तो नेमका अशा वेळीच मग त्याच्यात अधिकाधिक पुरातन ठरण्याची एक प्रकारची शर्यतच सुरु होते त्यामुळे

या पर्यंतीच्या खोटचा आविर्भावातून खोटया श्रद्धा आणि आभासात्मक पुरावे निर्माण करण्यात प्रत्येकजण गढून जातो आणि असे मानवसमूह जर अभ्यासात समबल ठरले तर खरा निर्णय अधिकच दुरावत जातो आणि सामान्य वाचकाना त्या मायाजालात शिरणे नकोसे होऊन जाते मग कालातराने ते मानवाचे कार्यक्षेत्र थडावते पण त्यापैकी एखादा जर अधिक प्रमाणात प्रभावक ठरत असेल आणि दुसरा त्याच्या प्रभावाने स्तिमित होत असेल किंवा निष्प्रभ होत असेल तर शिवाजीला दरोडेखोर ठरविणाऱ्या इतिहासकाराची एक नवी जात निर्माण होते व ती परप्रेरणेने पुढे सरसावते खास स्वतःची अशी एक राष्ट्रीय अभ्यासाची स्वानुकूल प्रणाली निर्माण करण्याची त्याची पात्रता नसते. ते स्वत्वाची क्षिती बाळगीत नाहीत ठरीव पाटातून निमूटपणे वाहणाऱ्या मोटेच्या पाण्याप्रमाणे ते अन्यदत्त प्रणालीतून खुशाल वाहवत जातात ती उताराची ओढच त्याना प्रगती वाटते त्याना त्यातील तो अधोगामी आवेग आवडतो परिणामी त्याचा व राष्ट्राचाही उत्कर्ष न होता अपकर्ष मात्र जरूर घडून येतो

## भटकेपणा : एक अतिव्याप्त कल्पना

पाश्चात्यानी आपल्या प्रवृत्तीतून प्रचलित करून ठेवलेली अशीच एक श्रद्धामय अभ्यास-प्रणाली म्हणजे मानव हा पूर्वकाली रानटी अवस्थेत भटकत होता कालातराने काही भटक्या टोळ्या नदीकिनाऱ्यावरील सुपीक जमिनीवर स्थिरावल्या आणि त्या स्थिर जीवनातून निरनिराळ्या संस्कृतीचा जन्म झाला मानव जात सुसंस्कृत झाली आणि त्यापैकी काही संस्कृतीची उन्नती आजही प्रकर्षाने होत आहे पण काही मात्र काळाच्या उदरात नष्ट झाल्या, तर काही अजूनही रानटी अवस्थेतच जीवन कठीत असून मानवी प्रगतीला मुकलेले आहेत, इत्यादी स्वरूपाची दृढमूल झालेली साचेवद विचारधारा ! ही विचारधारा ज्याना लागू पडते असे काहीं मानवसमूह आज सुसंस्कृत राष्ट्राच्या रूपाने दृष्टोत्पत्तीस येतात हे खरे आहे तरी पण इतिहासाच्या तत्त्वप्रणालीच्या दृष्टीने आज जे जसे दिसते ते तेवढेच मानणे सार्थ ठरत नाही नष्ट झालेल्या संस्कृती किती ? त्या नष्ट का झाल्या ? त्या सर्वांचाच उदय त्याच्या पूर्ववर्ती भटक्या अवस्थेतूनच झाला होता काय ? शिवाय भटक्या अवस्थेतून निर्माण झालेल्या अशा काही मोजक्या राष्ट्राच्या संस्कृतीखेरीज, ज्याचा भटकेपणा व असंस्कृतपणा कोणत्याही तऱ्हेने सिद्ध होत नाही, अशा आर्यपूर्वकालीन भारतासारख्या दुसऱ्या पुष्कळ राष्ट्राच्या संस्कृतीचा खोलवर अभ्यास न करताच, त्याच्या घटनात्मक स्वरूपाकडे दुर्लक्ष करून, सर्व मानव संस्कृतीच्या दृष्टीने एकतर्फी व एकागी विधान कुणालाही प्रस्थापित करता येणार नाही जे कोणी राष्ट्ररूपाने राजकीयदृष्ट्या आज सामर्थ्यशाली बनले आहेत त्याचेच मत जगातील सर्व मानवावर लादणे इतिहास-

तत्त्वाला अनुसरून योग्य ठरणार नाही यावावतीत वहुमतही उपयोगी पडणार नाही त्यासाठी ज्या त्या मानवसमुहाचा यथार्थ अभ्यास करणे हाच मार्ग सर्वथैव उपयोगी आहे, दुसरा नव्हे !

## भटकेपणा आणि संस्कृती

ग्रीक, रोमन, इंग्रज, आर्यवशीय जर्मन अशाच्या सस्कृतीचा जन्म भटक्या अवस्थेतून झालेला आहे असे मानतात पण त्यामुळे निखिल मानवी सस्कृतीचा जन्म भटक्या अवस्थेतूनच झाला असे मानण्यास कोणताच तर्कशुद्ध आधार नसल्याने ते मत सुसगत व सर्वकष ठरत नाही आर्यवंश म्हणजे नेमके काय हे अद्याप अज्ञातच आहे शिवाय आर्यांच्या टोळ्या प्रवास करीत करीत निरनिराळ्या प्रदेशात गटागटानी पोहोचल्या हे मान्य केले तरी एखादी आर्य टोळी जेथे गेली तेथे त्या काळी किंवा तत्पूर्वी एखादी उच्च सस्कृती नादत नव्हतीच असेही सिद्ध होत नाही किंवा त्या त्या आधुनिक देशात स्थिर होण्याच्या अगोदरचे आर्य प्रवासी असले तरी, त्याना 'सस्कृतिविरहित भटके मानव' म्हणता येत नाही मग भटकेपणाचा व संस्कृतीचा सवध कसा व कोणता, समजावयाचा ? ते दोन्ही एकत्रित असू शकतात तर त्याना असंस्कृत म्हणता येणार नाही आणि सुसस्कृत असतानाही भटकत राहण्याचे आणि दुसऱ्याशी झगडत राहण्याचे कारण उरत नाही शिवाय जे लोक भटकेपणा न स्वीकारता आपापल्या प्रदेशात सुस्थिर राहिले त्याना असस्कृत व रानटी कसे म्हणावयाचे ?

## त्रोटक विचारधारा

प्रवासी आर्य जेथे पोहोचले तेथे त्याचा तद्देशीय मानवाशी सघर्ष झाला त्यातून राजकीय व सग्रामात्मक जय किंवा पराजय कोणाचाही झालेला असला तरी त्यापैकी कोणी एक केवळ असस्कृत होता असे सिद्ध होत नाही सस्कृती आणि सग्रामस्वरूपाचा जय तथा रानटीपणा आणि सघर्षातील पराजय याचा परस्पर सवध कोणता ? सस्कृती आणि सग्रामविजय यांचे अकाट्य नाते सदैव सिद्ध होत नाही वस्तुस्थिती त्याच्या उलट असलेली मात्र प्रत्ययास येते शिवाय पराभूत मानवसमूह पुन किंवा नव्याने भटकत भटकत तिसरीकडे निघून जातो आणि जेता मात्र कायम एके ठिकाणी स्थिरावतो असाही निश्चित अर्थ काढता येत नाही ती चर्चा वर्तुळाकार फिरत राहील ! अशा अनेक कारणाने 'भटक्या अवस्थेतून मानवी संस्कृतीचा जन्म झाला' ही विचारप्रणाली सुसगत, सर्वकष व सर्वगत ठरत नाही अशा तर्काला काही थोड्याशाच मानवी टोळ्याच्या वृत्तान्ता-शिवाय दुसरा आधार नाही काही टोळ्या कोठे तरी स्थिरावल्या व सुसस्कृत वनल्या याचा अर्थ सर्व मानवी जमात भटकी होती असे म्हणणे तर्कसगत वाटणे शक्यच नाही

शिवाय केवळ स्थिर राहिल्यामुळे मानवसमूह सुसंस्कृत होतो असे मानल्यास आज कित्येक देशातील आदिवासी ज्या भौगोलिक अवस्थेमध्ये वंशानुवंशे स्थिर राहूनही सुसंस्कृत न होता आदिवासीच्या रानटी अवस्थेतच आजही संस्कृतीशून्य जीवन जगत आहेत तर पूर्वकाली भटके असूनही तेथे त्याच भौगोलिक परिस्थिती-मध्ये केवळ स्थिर झाल्यामुळे संस्कृतिसंपन्न बनून सुखाने, समाधानाने व वैभवाने राहणारे लोकही आहेत हे स्पष्ट दिसते, तर मग या दोन समूहामध्ये एवढे मोठे अंतर पडण्याचे कारण काय असावे ? त्याच त्या साचेबद्ध विचारप्रणालीमध्ये त्याचे उत्तर सापडणे शक्य नाही म्हणून ती विचारप्रणाली त्रोटक आहे तेव्हा स्थिर जीवनाचा व सुसंस्कृतपणाचा तथा प्रवासी जीवनाचा आणि असंस्कृतपणाचा अन्योन्याभावी संबंध कितपत मानावयाचा याला काही मर्यादा पडतात असे मानणे निश्चितपणे आवश्यक आहे. पूर्वावस्थेत भटके जीवन नसूनही प्रथमपासून स्थिर समाजजीवनाचा सुसंस्कृतपणे अनुभव घेणारा मानवसमूह कोठेच नव्हता असे मानणे वाष्टर्याची परिसीमा होय !!

## कुटुंबसंस्था स्थैर्यनिदर्शक !

आज मानवाचा पूर्वकाळ जेवढा ज्ञात आहे व अधिकाधिक ज्ञात होत आहे तेवढ्या विशाल कालावधीमध्ये कुटुंबसंस्थाविरहित मानवी जीवन आढळून आलेले नाही हे विदारक सत्य आहे कुटुंब ही आपल्या जीवनातील मूलगामी संस्था असून ती मानवतेची गमक आहे कुटुंबसंस्थाविरहित मानवी जीवन कधी काळी अस्तित्वात असेल असा केवळ तर्क करण्यास कोणताही आधार आज उपलब्ध नाही किंवा नव्याने उपलब्ध होण्याची संभावनाही नाही तशातच मानवी जीवनातील इतर अनेक मूलगामी संस्थाप्रमाणेच कुटुंबसंस्था देखील स्थिर जीवनाचेच एक प्रतिक आहे कारण स्थैर्याशिवाय ती पोसवू शकत नाही कुटुंबाच्या घटकामध्ये आजा-आजी, आई-वडील आणि मुले-मुली तसेच कधी कधी सुना-जावई अशा तीन पिढ्या एकत्र नांदण्याची संभावना असते हा तीन पिढ्याचा काळ काही नगण्य नव्हे कुटुंबामध्ये काही विशिष्ट आचार-विचारात्मक कुलाचार निश्चित झालेले असतात त्याची जोपासना व शिकवणूक आणि प्रत्येकाच्या वर्तनावर त्या दृष्टीने प्रत्यक्ष देखभाल, शिक्षा, दंड इत्यादी तदनुरूप संस्कारात्मक क्रिया-कर्तव्ये चालू असतात पूर्वजाचा आदरसत्कार इत्यादी स्वरूपाचे पूजाविधी कटाक्षाने पाळण्यात येत असतात. रोगराईवर उपचारपद्धती, प्रसवकाळी मदत, विकलांग व्यक्तीची देखभाल, उत्पादन क्षेत्राचे संरक्षण, बाळ-बाळतणीची जोपासना इत्यादी अपरिहार्य कर्तव्ये पार पाडावीच लागतात आणि अशा कर्तव्यांना भटकेपणा मानवणे दुरापास्तच स्थानविषयक स्थैर्यच अशा कर्तव्याच्या पूर्तीसाठी अनुकूल असते.

अन्न सापडेल तिकडे प्रवास हा न्याय फक्त भटक्या म्हणजे अपराधी आणि वहिष्कृत टोळक्यानाच लागू होतो, सन्मान्य मानवी जीवनाला नव्हे ! एक तर अन्न वाटेल तेथे सापडत नाही निवारा तर स्थाननिष्ठच असतो निपजाऊ जमीनही भटकी किंवा वदलती नसते उपलब्ध असलेल्या उपजाऊ जमिनीवर **मालकी हक्क प्रस्थापित करण्याची मानवाची भावना मूळ प्रवृत्तीचे निदर्शक असून ती मानवाइतकीच जुनी आहे** प्रत्येकजण तो एक आपापला जीवन-मरणाचाच प्रश्न समजत असतो इतकेच नव्हे तर मालकी हक्काचे सरक्षण करता करता जीव गमावण्याचा प्रसग आला तरी मालकी हक्क एखाद्या तिऱ्हाइताकडे आणि विशेपत शत्रूकडे न जाता आपल्याच वशातील वारसाकडे जावा म्हणून तो मोठ्या कटाक्षाने घडपडत राहतो आणि ही घडपड मानवाची मूळ प्रवृत्ती गणली जाते

## पीक आणि स्थैर्यवाद

विशिष्ट भौगोलिक परिस्थितीमध्ये निपजाऊ वनलेली जमीन अगर मानवी कष्टाने तशी तयार केलेली शेती नेहमी तिच्या मालकाच्या आयुष्याच्या मानाने जास्त काळ स्थिर स्वरूपाची राहते जमिनीतील एका निपजानतर पुन निपज होण्यास वारा महिन्यापेक्षा फार मोठा काळ सामान्यत लागत नाही तेव्हा अशी नित्य पिकाऊ जमीन विनाकारण टाकून देऊन अनिश्चित भटकेपणा कायमच्या स्वरूपात कोण कशासाठी स्वीकारील ? मानव तितका मूर्ख कधीच नव्हता मानव तर खचितपणे वुद्धिमान प्राणी आहे **सस्कारक्षमता व सस्कारप्रियता ही मानवी वैशिष्ट्ये आदिम कालापासून त्याच्यामध्ये स्पष्टपणे आढळतात.** शेती व पीक-सवर्धन ही प्रक्रियात्मक कला देखील मानवाच्या इतिहासकालाइतकीच सनातन व पुरातन आहे **शेती हा सर्व सस्कृतीचा पाया आहे** त्याचा परस्पर सवध अकाट्य आहे शेतीच्या उत्कर्पाशिवाय सस्कृतीचा उत्कर्प होत नाही कारण अन्न या प्राथमिक गरजेची पूर्ती शेतीच्या साहचर्यानेच होते !

शेतीच्या प्राताातील अनेक शोध हे सकटमय अवस्थाचे गमक आहेत अन्न दुर्मिळ झाल्यावरचा इतिहास फार वेगळा ठरत असतो त्या इतिहासावरून कधी काळी सुवत्ता नव्हतीच असे समजणे गैर आहे शेती ही वनस्पतीच्या प्राताातील अवस्थातर आहे भूमीप्रमाणे वनस्पती केवळ स्वयभू आहे जेव्हा वनस्पती स्वाभाविकपणे मानवाच्या अन्नविपयक गरजा भागवीत होती असाही एक कालखड मानणे शक्य आहे आणि शेतीतील पिकापेक्षा नैसर्गिक वनस्पती अधिक सुस्थिर आहे मानवी देहाच्या दृष्टीने वनस्पतीच आद्य पोपणतत्त्व आहे पुढे त्या वनस्पतीचा वारसा शेतीला मिळाला आणि मानवी पोपणावरोवरच कुटुवाच्या पारपरिक हक्काचा शेती हा प्रमुख कणा वनला

ज्यानी मानवाला मूलत शिकारीवृत्तीचा आणि मासभक्षकच कल्पिला त्यांनीच मानवी जीवनाचा आरभ रानटी मानला त्याची इतिहासविषयक विचारधारा निराळ्या दिशेने वाटचाल करीत असते। पण मासभक्षणापेक्षा वनस्पतिप्रणीत अन्नभक्षणाचे विश्व फार विशाल आहे जे मास खातात तेही वनस्पतिमूलक अन्न खातात शिवाय ज्या प्राण्याच्या देहापासून मांस मिळते ते सर्व प्राणी मूलत वनस्पतिभक्षकच आहेत म्हणून फक्त मासभक्षक प्राण्याचे जग फार लहान आहे मग फक्त मास खाणाऱ्या मानवाची काय कथा ? तेव्हा भूमी, वनस्पती आणि शेती या सर्व गोष्टी जीवनाच्या मूलाधार तथ्ये असून ती स्थिर आहेत मग त्यावर अवलबित असे मानवी जीवन भटके का मानावे ?

## शेती आणि स्थिरता

व्यापाऱ्यालाही एक मानव म्हणून स्थिर जीवनच हवे असते व्यापार-वृद्धीसाठी मात्र त्याला प्रवास मानवू शकेल, पण शेतकऱ्याला खास कामासाठी करावा लागणारा प्रवासही मानवत नाही तर भटकेपणाची काय वार्ता ? म्हणून **शेती ही स्थैर्याची ध्वजा आहे.** शेतीचा अर्थ या ठिकाणी व्यापकतेने घ्यावयाचा आहे नागरणे, पेरणे, कुळवणे, कापणे-खुडणे, मळणे-वारवणे आणि साठवणे या आधुनिक अर्थाने शेतीची मर्यादा मी सकुचित करीत नाही पेरलेल्या, लावलेल्या किंवा आपोआप उगवलेल्या गवत, लता, वृक्ष इत्यादी वनस्पतीपासून मूळ, फल, शाकपाला, शाखा ( खोड ड ), करीर, कद, फूल, बीज इत्यादी रूपाने देहाच्या पोषणाची साधनसामग्री उपटून, तोडून, गोळा करून मिळविणे आणि पुढील हगामापर्यंत त्याची बेगमी करून साभाळणे, अशा सर्व प्रपचात्मक व्यापाला मी शेतीचा व्यवसाय म्हणतो या पृथ्वीतलावरील वनस्पतीचा काळही मानवाएवढाच ( आधुनिक शास्त्रज्ञाच्या मते मानवाहून फार जुना ) पुरातन आहे तेव्हा आपापल्या कक्षेतील अशा वनस्पतीवरचा व त्या जमिनीवरचा मालकी हक्क स्वखुषीने सोडून विनाकारण कोणता मानव भटकत राहील ? सामान्यत वन्य पशूदेखील आपापला परिसर सोडून विनाकारणच इतरत्र जात नाहीत पक्षी विशिष्ट हवामानातील हगामाला अनुसरून प्रदेशातर करतात पण कार्यहेतु सिद्ध होताच ( हगाम सपताच ) मूलस्थानाला निश्चितपणे परततात ! मग बुद्धिमान, सस्थाप्रिय व सस्कारक्षम मानवाबद्दल अधिक सांगण्याची काय गरज आहे ?

मानव मूलत भटका असण्याचे प्रयोजनच काय ? '**अन्न गोळा करण्यासाठी**' असे उत्तर देणे चूक आहे कारण अन्न मूलत वनस्पतीपासून व थोड्या प्रमाणात प्राण्यापासून मिळते पण वनस्पती मुळीच भटकी नसते एवढेच नव्हे तर ती त्याच भूमीत वारवार पिकते सर्वच्या सर्व वनस्पती एकदमही पिकत नाही निरनिराळ्या ऋतूमध्ये निरनिराळी वनस्पती पिकते पुन पुन पिकण्याचा कालांतरही फार

मोठा नसतो एक ऋतू पूर्णपणे सपण्याच्या आतच दुसरा नेमेचि येत असतो त्याचप्रमाणे एक पीक सपण्याच्या आतच दुसरे पीक त्याच परिसरात पिकून तयार असते त्यासाठी दुसरा प्रदेश शोधावा लागत नाही अशी वस्तुस्थिती असताना भटकती कोण कशासाठी पत्करेल ? मिळालेल्या जमिनीतील पिकाचा हक्क कोण सोडून देईल ? शिवाय जाऊन जाऊन कोठे जाणार ? नव्या प्रदेशात अन्न असेल तर तेथील लोक परक्याना येऊ देणार नाहीत आणि अन्नच नसेल तर कोणीही तिकडे फिरकणार नाही कदाचित विनामालकीचे नैसर्गिक अन्न एखाद्या ठिकाणी असेल तर तेथे एकदा मालकीचा जम वसविल्यावर पुन टाकून देण्याचा खुळेपणा कोणीही करणार नाही

## संततीची जोपासना व स्थिरता

जसे शेतीचे मूलतत्त्व भटकेपणाला प्रतिवध करते तसेच कुटुबसस्था देखील भटकतीला पूरक ठरु शकत नाही उलट भटकेपणा कुटुवसस्थेला मारकच आहे गर्भापासून नवजात मूल तीन-चार वर्षाच्या वयाचे होईपर्यंत घडून येणारी कौटुविक स्थित्यतरे मानवाला चार-पाच वर्षाच्या आत पुन प्रवासक्षम होऊ देत नसतात शिवाय अशा अवस्था त्या कुटुवातील सर्व व्यक्तीच्या बावतीत एकाच वेळी सुरू किंवा वद होत नसतात एकाच व्यक्तीमधील अशी स्थित्यतरे स्थगित होत असतानाच दुसऱ्या व्यक्तीच्या बावतीत त्या नव्याने चालू होतात कुटुवातील सर्व व्यक्ती एकाच वेळी भटक्या जीवनाला सक्षम वनावेत ही केवळ एक शुद्ध आशेचीच बाब आहे ! म्हणून प्रवासी मानवसस्था वैश्विक पातळीवर कल्पणे विसगतच नव्हे तर अनैसर्गिकच जास्त ! !

## परिग्रहसंज्ञा

शिवाय मानवी मनही स्थैर्याभिलाषीच आढळते मनाचे ऐतिहासिक अवलोकन करता ते कधी काळी स्थैर्याभिमुख नसण्याचे काहीच कारण दिसत नाही आहार, निद्रा, मैथुन याप्रमाणेच 'परिग्रह' देखील एक मूलसज्ञा आहे तेव्हा ग्रहणशीलता ही एक मानवाची सहज प्रवृत्ती आहे गृहित वस्तूमध्ये घर-दार, जमीन-जुमला या सर्वात प्रमुख वावी आहेत त्यावरील मालकी हा मूळ हक्क आहे तो वजावण्याची प्रवृत्ती अभावरूप मानण्यास कोणतेच सवळ कारण नाही या वृत्तीचा उदय अनतरकाळी झाला असे गृहित धरल्यास आहार, निद्रा व मैथुन या प्रवृत्ती देखील क्रमवर्ती किंवा अनतरकाळीन मानाव्या लागतील ! म्हणजेच कधी काळी मानव अशा सज्ञानी रहित होता असा तर्क निघेल ! पण तो प्रत्यक्ष अनुभूत जीवनाशी सुसगत नाही

घर-दार, जमीन-जुमला वगळल्यास मालकी हक्क कशावर प्रस्थापित करावयाचा ? आणि इतर परिग्रह वस्तूची स्थिती जागेशिवाय कशी मानावयाची ?

तेव्हा जमीन व त्यावरील मालकी ही जीवनाशी मुळापासूनच निगडित आहे त्याची ताटातूट कल्पनेतही संभवत नाही काही निर्वासित, अपराधी, समाजद्रोही, बहिष्कृत असे मानवी गट भटक्या प्रवृत्तीचे आढळून येतात, हे खरे असले तरी तेवढ्या सुताने स्वर्ग चढून समस्त मानव प्राणीच भटक्या वृत्तीचा होता किंवा निसर्गत असू शकतो असे मानणे म्हणजे, समाज-प्रशासन कितीही चांगल्या रीतीने प्रतिष्ठित झाले तरी चोर-दरोडेखोराचा सद्भाव आढळतोच म्हणून सर्वच मानव कधी काळी चोर-दरोडेखोर होता असे समजण्यासारखेच ते हास्यास्पद आहे

## सत्ययुगाची श्रद्धा

तेव्हा भौगोलिक स्थिती, कौटुंबिक कर्तव्य, वंशोत्पत्तीची आस्था, जनन-क्रियेची अवस्था, आवश्यक सहकार्य, परस्पर संरक्षण आणि मनाचा साहजिक कल या व अशाच इतर जीवनाच्या आवश्यक अंगांचा विचार करता भटक्या अवस्थेची कल्पना सरसकट सर्वच मानवसमुहाला लागू होत नाही शिवाय मानवी जीवनाच्या अवस्थांतराच्या अभ्यासामध्ये सत्ययुगाची कल्पनाही पुरस्कृत आहेच त्याकडे मुळातूनच दुर्लक्ष करण्याचे कारण काय ? निरनिराळ्या विचारसरणी-पैकीच ही एक पुरातन उपपत्ती आहे इतर सर्व विचारप्रणालीमध्ये आढळतात तशाच काही त्रुटिता याही विचारसरणीत असणे संभवनीय असले तरी ती पूर्णपणे टाकाऊ ठरत नाही तिलाही स्वत चा असा काही एक मूलभूत आधार आहेच आणि ही सत्ययुगाची कल्पना वरील भटक्या जीवनाच्या कल्पनेच्या आत्यंतिक विरोधी आहे इतर कोणत्याही विचारसरणीमुळे या कल्पनेचा परिहार झालेला नाही ही वस्तुस्थिती नाकारता येत नाही कारण त्यामुळे काहीही साध्य होत नाही शिवाय ती भारतीय जीवनश्रद्धेशी किती तरी सुसंगत आहे !

भारतीय जीवन हे एक स्वतंत्र तथ्य आहे. ती न अभ्यासता पाश्चिमात्य विद्वानांनी पुरस्कारलेली भटक्या जीवनाची कल्पना उराशी बाळगणे ही अंधश्रद्धा नव्हे तर दुसरे काय ? आपापल्या ज्ञात पूर्वावस्थेला अनुसरून आपापली अभ्यास-प्रणाली तयार होत असते अशी प्रणाली, अशी श्रद्धा स्वीकारून स्वत च्या जीवनविषयक तथ्याचा अभ्यास वस्तुस्थितीला अनुसरून करणेच सुसंगत ठरते म्हणून अशा वेळी परकीयता टाळावी हेच उत्तम ! ! परंतु पाश्चात्यांच्या पठडीत तयार झालेले काही भारतीय इतिहासकार ही परकीयता सांभाळणारेच ठरले आहेत ही दुर्दैवाची घटना होय त्यामुळेच काही वाचकांवर व काही अभ्यासकांवर त्या प्रणालीचा खोलवर ठसा उमटलेला आहे स्वतंत्र अशा शुद्ध भारतीय अभ्यासाच्या पद्धतीवर पडलेला हा परकीय प्रभावाचा व अंधानुकरणाचा कलंकच अलंकार म्हणून मिरविणे योग्य नव्हे !

## चिरस्थायी जीवनमूल्यांचा आधार

भारतीय जीवनापेक्षा पाश्चिमात्याची विचारसरणी वेगळी असणे साहजिकच आहे कारण त्याच्या जीवनाची वाटचालच वेगळी ! त्याच्याच दृष्टिकोणातून त्यानी ते पाहिलेले असणार ! पण ते राजकीय क्षेत्रात दीर्घकाळ प्रभावशाली वनल्याने स्वत च्या परपरेकडे त्यानी वरिष्ठतेच्या दृष्टीने पाहिले ज्याच्यावर त्याची राजकीय सत्ता स्थिरावली त्याना केवळ जित म्हणून त्यानी कनिष्ठ व कुत्सित लेखले पण अशी जितावस्था किंवा असा सग्रामविजय नैमित्तिकच असतो, नित्य नव्हे ! त्या त्या काळापुरते ते ते स्वरुप सत्य असल्याचा भास होतो पण सनातन सत्य काही वेगळेच असते ते नैमित्तिक अवस्थाच्या सीमेपलीकडे असते त्याचे अस्तित्व नैमित्तिकानुसारी नसते अशा तात्कालिक घटना शतकानुशतके परिणामकारी ठरल्या तरीही त्यावरून चिरतन तत्त्वाचा विचार करता येत नाही. कारण चिरंतन तत्त्वाला त्या प्रासगिक घटना आधारभूत नसतात चिरतनत्त्व प्रसगातीत आणि विशिष्ट कालवर्ती घटनेच्या कक्षेवाहेर विद्यमान असल्याने त्याचे आकलन प्रासगिक वृत्तातानी होत नाही. त्यासाठी प्रासगिक वृत्तान्ताच्या पलीकडे जाऊन त्या त्या वस्तुस्थितीतील तत्त्वाचाच—प्रसगातीत चिरस्थायी गुणाचाच अभ्यास करावा लागतो हिमावस्थेतील किंवा वाष्पावस्थेतील प्रासगिक आविष्काराचा किंवा पर्यायाचा विचार करून जलतत्त्वाच्या मूल गुणाचे ज्ञान होत नाही कारण ते मूल गुण प्रसगातीत असतात वाहते पाणी पाहून त्या वहन-क्रियेला (गतीला) जलाचे घटक तत्त्व समजल्याने अनवस्था प्रसग ओढवल्याशिवाय कमा राहील ? तेव्हा पाश्चात्य विद्वानांचा अभ्यास त्यतच्या ज्ञात पूर्वावस्थेला धरून सुसंगत वाटला किंवा एक अध्ययन म्हणून तो श्रेष्ठ दर्जाचा व विचारप्रवर्तक असला अथवा त्या अध्ययनाचे तत्र प्रभावी असले तरीही तो सर्वंकष किंवा वैश्विक असतो असे मात्र नव्हे. त्याचा निष्कर्ष भारतीय जीवनपद्धतीला किंवा त्याच्यापेक्षा वेगळ्या अशा जीवनप्रणालीला अथवा विश्वातील समस्त मानवी जीवनातील चिरतन तत्त्वाना लावता येणार नाही कारण त्यानी वापरलेले निकष प्रासगिक व प्रादेशिक असल्याने विश्वातील समग्र जीवन जाणून घेण्यास ते उपयोगी पडत नाहीत त्याचे सामर्थ्य तोकडे पडते

यासाठी एकसारखाच प्रसग ज्याच्यावर ओढवला नाही किंवा त्या त्या विशिष्ट प्रदेशाचा परिणाम ज्याच्यावर झालेला नाही अशाच्या जीवनाला दुसऱ्याच्या जीवन पद्धतीचे निकष वळजबरीने व हट्टीपणाने लागू करण्याचा व्यर्थ प्रयत्न करीत बसू नये उलट आपापल्या जीवनप्रणालीचा अभ्यास करण्यासाठी ज्याना त्याना आपल्यासाठी स्वतत्र व ज्या त्या जीवनाला अनुरूप अशीच अभ्यास-प्रणाली व विचारसरणी शोधावी लागते त्याशिवाय गत्यतर नाही त्याशिवाय

तत्त्वदर्शन सम्यग व समीचीन ठरणार नाही आभासाच्या पाठीमागे लागून तत्त्वाचा प्रकाश लाभणार नाही आपल्या जीवनाचा अभ्यास परकीय व गैर लागू असलेल्या विचारप्रणालीतून वाहवत नेणे योग्य नव्हे ! इतिहासविषयक विचार-पद्धती जीवनानुसारी असणे आवश्यक आहे.

## भटकेपणा सर्वंकष नाही !

या भारतीय भूमीवर देखील जीवनाच्या धारा विविध आढळतात त्यापैकी एखादी धारा अभ्यासून तीच इतर सर्वांना लागू करता येणार नाही भारतातील वैदिक आर्य आणि आणखी काही प्राचीन व अर्वाचीन वंश पूर्वीच्या त्यांच्या भटक्या अवस्थेतून मुक्त होऊन या भूमीवर एकदाचे स्थिर झाले हे खरे असले तरी इतर सर्वच आदिम, मध्यम किंवा अंतिम कालखंडातील भारतीय वंश भटके होते असे सिद्ध होत नाही आजचे बरेच भारतीय अस्सल एतद्देशीय आहेत त्यांचे आद्य पूर्वजही याच देशाचे भूमिपुत्र होते आणि त्यांचे सर्व वंशजही याच मातीचे पारंपरिक पुत्र आहेत ते कधीही कोठेही दुसरीकडे गेले नाहीत आणि कोणत्याही काळी, कोणत्याही इतर देशातून येथे आलेले नाहीत त्यांचा निर्वंशही झालेला नाही ते या देशाचे अस्सल भूमिपुत्र आहेत ही भूमी वैदिक आर्यांच्या आगमन-काळाच्या पूर्वीपासूनही ज्याचे नाव सातत्याने धारण करीत आली आहे त्याच ऋषभपुत्र भरत चक्रीची ती प्रजात वंशावळ आहे

> **भरतखण्ड के प्राणी जे ते । प्रजा भरत राजा की ते ते ।**
> **भरत नरेश ऋषभ की शाखा । ताते लोग पितामह भाखा ।**
>
> — बनारसी विलास, ३८

आजही ते खरे भारतीय आहेत त्यांचा देश आजही भरतवर्ष, भरतक्षेत्र, भरतखंड किंवा भारत याच नावाने विख्यात आहे तेच या मध्य कालीन भारताचे वतनदार किंवा वारसदार किंवा वक्कलिग आहेत या भूमीवरील त्यांची मिरासदारी वेळोवेळी प्रभावी, अप्रभावी, अंशात्मक किंवा नगण्य झाली असेल अथवा काही काल खंडित झाली असेल ! कारण अशी मिरासदारी देखील कालाच्या अधीन असते काल तर सर्वपरिणामी असतो त्यामुळे असा बदल घडणे असंभवनीय नव्हे पण तेवढ्यावरून त्यांचा अस्सलपणा नष्ट होत नाही किंवा खोटाही ठरत नाही चोरांनी मलिद्यावर डल्ला मारला तरी मालकी हक्क बदलत नाही आणि न्यायतत्त्वही बदलत नाही ज्याच्या हातात सत्ता तो पारधी हा न्याय शिकारी वृत्तीतून प्रादुर्भूत झाला असल्यामुळे त्याच प्रकारच्या जीवन-पद्धतीला तो लागू करावा दुसरीकडे तो गैरलागू ठरतो तो सर्वंकष ठरविता येणार नाही न्यायदेवतेच्या क्षेत्रात त्याला महत्त्व उरत नाही तेव्हा भटक्याला

ओसरी मिळाल्यावर काही काळाने स्थैर्य प्राप्त होताच मूळ मालकालाही त्याच्या सगतीमुळे भटका ठरविण्यात अर्थ नाही आपण भटके तर सारेच भटके हा न्याय कसा प्रतिष्ठा पावू शकेल ? म्हणून ही भटकेपणाची विचारसरणी ज्याची त्यालाच लागू करावी ती समस्त मानवाची सर्वंकष कथा नव्हे ! !

## कृतज्ञतेची कमतरता

मानव सामान्यत. कृतज्ञतेचे गोडवे गात असला तरी तो प्रसग काळाच्या पडद्यामागे सरकल्यावर ती कृतज्ञबुद्धी सोडून देऊन, स्वत लाच जो तो कृतिवीर व गुणवान समजू लागतो त्याच्यावरील वेळ निभावताच त्याचे मन प्रथम स्वार्थाने सकोचते व नतर आत्मनिष्ठ बनते. त्यामुळे कालान्तराने त्याची दृष्टी अधारते मग आमरण कृतज्ञ राहणे स्वत लाही जमत नाही तेथे त्याच्या वशजाविषयी काय विचारावे ? आणि अतीत कालीन पूर्वजाशी कृतज्ञ राहण्यासाठी तर मन फारच विशाल करावे लागते त्याचे शौर्य, धैर्य, उपकार इत्यादी गुण आणि कार्य आपल्या दृष्टीच्या टप्प्यात आणण्यासाठी स्वत च्या मनात त्या त्या गुणाविषयी व कृतीविषयी चाड असावी लागते किंवा त्या प्रकारच्या गुणाच्या आराधनेची क्षमता अगात असावी लागते ती नसेल तर इतरानी केलेले गुणकीर्तनही त्याचे काळीज कातरत जाते म्हणून काही, निष्ठावतानी आपली ओवी न गाता बद करावी असे नाही

## स्फूर्तिस्थळांची विपुलता

आपण ज्ञात इतिहासाच्या जरा अधिक मागे, आणखी मागे गेलो तर अनेक पिढ्याना स्फूर्तिप्रद ठरू शकतील असे घटना-प्रसग भारताच्या इतिहासात विपुल आढळतील त्या त्या प्रसगाच्या निमित्ताने प्रगट झालेले धैर्य, शौर्य, शाती, विश्वबधुता, सहजीवन, सहयोग, 'जगा आणि जगू द्या असा पूर्णपणे सस्कारित झालेला मानवी जीवनाचा मत्र, अभित्सा, प्रेरणा, प्रकर्ष, सततोद्योग, मानवी गुणाची सिद्धी, समृद्धी, सतोष इत्यादी मानवी वैभव आणि त्याची थोर परपरा, याशिवाय मानवाने पादाक्रान्त केलेली मानवतेची अत्युच्च शिखरे, आजच्या भारताचे भवितव्य घडविणाऱ्या विद्यमान नागरिकाच्या नजरेत भरली पाहिजेत, असा प्रयत्न खऱ्या इतिहासकाराने प्राजळपणे केला पाहिजे यामुळे ज्योतीने ज्योत पेटावी तसे **पूर्वदिव्याने** भाविकाळ उज्वल व रम्य करण्याचे सामर्थ्य राष्ट्रात आजही वाढीस लागेल किंवा नवी शक्ती निर्माण होईल हे शब्दातच सागावयास पाहिजे असे नाही **भारतातील ठिकठिकाणची इचाइंचागणिक भूमी दिक्कालान्ता-पर्यंत टिकणाऱ्या अभित्सेने प्रेरित होऊन, स्मारकाच्या रूपाने आपल्या भालप्रदेशावर जे नाव धारण करीत** आहे त्याकडे जरा खोलवर लक्ष पुरविले तर

ज्याच्या ठिकाणी स्फूर्ती देण्याचे सामर्थ्य दडून बसले आहे असी किती तरी स्थळे प्रेक्षकाच्या नजरेत भरतील!

## भरतसंस्कृतीची अटळता

आपल्या वर्षप्राय देशाचे नामकरणच विचारात घ्या ना या भूमीच्या **नामकरणाचा समग्र वृत्तांत पूर्वीच्या साहित्यात ओतप्रोत भरला आहे.** त्या नावाचा महिमा कित्येक ग्रंथाच्या पानापानातून साकार होत राहतो. त्या नावाच्या प्रभावाला महान विभूतीचे वलय प्राप्त होते. हे वलय इतके विस्तारत गेले आहे की त्याचे अस्तित्व निरनिराळ्या क्षेत्रातील, विविध श्रद्धेतील, नाना परंपरेतील आणि तत्कालीन प्रादेशिक भाषेतील थोर परंपरेमधील ग्रंथांमध्ये पानापानागणिक जाणवल्याशिवाय राहात नाही. **या वृत्तांताची महती इतकी अभीष्ट आहे की पंथ, धर्म, भाषा इत्यादीमधील विषमता व विरोधही तिला रोधू शकत नाहीत.** अशा सर्व क्षुद्र मर्यादांचा भेद करून ती थोरवी सर्वत्र सर्व काळी विलसत राहिली आहे! **ऋषभपुत्र भरत चक्रवर्तीने** ज्या मानवी ध्येयाने प्रेरित होऊन या विशाल भूभागावर एकछत्री सुराज्याची स्थापना केली त्याच ध्येय-परंपरेने त्यांच्या वंशजांनी दीर्घकालपर्यंत त्या सुराज्याच्या तत्त्वाचा सांभाळ केला मानवी जीवनावर त्याचा परिणाम खोलवर होऊन त्याची फळे दीर्घकाल लाभत राहिली मानवतेच्या विरोधी प्रवृत्तींना आळा घालून, मानवाना हानीकारक अनर्थाच्या बाधीचा निःपात करून **ज्या मानवधर्माची पूजा बांधली त्याची प्रतिष्ठा चिरंतन आहे.** कारण ती अंगभूत गुणावर अधिष्ठित आहे ती टाकताच येत नाही ती नष्ट होईल तेव्हा मानव हा मानव राहणार नाही म्हणून ती ध्येयसिद्धी निखिल मानवाना आदर्शभूत आहे

## भरत आणि भारतीयता

जेथे जेथे असामान्य असा मानवी पुरुषार्थ आढळतो तेथे तेथे दिव्यत्वाचे दर्शन घडते त्यामुळे दुर्मिळ आणि असाध्य अशी मानवी उत्कर्षाची शिखरे पादाक्रान्त करण्यास कारणीभूत झालेली कर्तबगारी सामान्य नसून ती दैवी शक्ती साध्य झालेल्या थोर पुरुषाची सिद्धी होती असे समकालीनाना व अनंतरकालीन वंशजानाही वाटणे स्वाभाविक असते. उन्नत अशा समाज-जीवनाला साधनीभूत असलेल्या शांतता आणि सुव्यवस्था या दोन तथ्याना वाहिलेली आणि मानवी राष्ट्रवादाचा पुरस्कार करणारी बलवत्तर शासन संस्था व गुणी राज्यव्यवस्थेची परंपरा निर्माण करणे हे चक्रवर्ती भरताच्या कुलपरंपरेचे ध्येय होते. त्याच ध्येयाच्या पूर्तीसाठी अवतरलेली सिद्धहस्त मानवी विभूती म्हणजे **प्रथम चक्रवर्ती ऋषभपुत्र भरत हीच होय.** त्याची स्मृती चिरकाल ताजी ठेवण्यासाठी वाहिलेला

एक अनमोल अर्घ्य म्हणजेच आपल्या देशाचे नव्याने घडवून आणलेले भरतवर्ष किंवा भारत हे नामकरण

मात्र या नामकरणाचा इतिहास आजच्या भारतवासीयाच्या स्मरणातून दूर होत आहे, नव्हे तो इतिहास पुसून टाकण्याचा कटाक्षाने प्रयत्न होत आहे। त्यासाठीच त्या नामकरणामध्ये ज्या भरताची प्राणप्रतिष्ठा केली आहे त्या व्यक्तीबद्दल नेहमी सभ्रम निर्माण करण्याचा प्रयत्न होत असतो अलौकिक वृत्तान्ताने भारावलेला हा इतिहास विसरणे कृतज्ञतेच्या दृष्टीनेच नव्हे तर ध्येयवादाच्या व मानवधर्माच्या साधनेच्या दृष्टीनेही हितावह नाही आपल्या पूर्वसूरीनी ही असामान्य कर्तबगारी आपापल्या परीने निरनिराळचा ग्रथात गौरविली आहे पण तो गौरव आज जुन्या ग्रथातील दुर्बोध पानामध्ये जीर्णावस्थेत पडून राहिल्याने सामान्य नागरिकाना दुरावला आहे त्यातील भाषाही आजची नाही पूर्वसूरीनी जपून ठेवलेल्या त्या इतिहासाचा ठसा या नव्या युगातील जनतेच्या अत करणात उमटविणे आवश्यक आहे ती जबाबदारी नव्या अभ्यासकानी उचलली पाहिजे. असे वाटते की या भरताचा व आपल्या देशाच्या नामकरणाचा समग्र इतिहास प्रगट करणारा एखादा महाग्रथ निर्माण झाला पाहिजे. आजच्या जनतेच्या नव्या भाषेतून त्याच्या अनेक आवृत्ती निघून निरनिराळचा प्रदेशातील लोकाना तो सहज सुलभ झाला पाहिजे अनेक राष्ट्रभक्त व कर्तबगार व्यक्तीना तो नवी स्फूर्ती देईल, शौर्याचे व कल्याणकारी राज्य-कारभाराचेही धडे देईल. त्यामुळे नवी पिढी आपल्या पराक्रमाला नवा तजेला आणील भारतीय भूमीचे व सस्कृतीचे सरक्षण व सवर्धन साध्य होईल निदान आपल्याच भूमीच्या नावासबधीचा सभ्रम तरी कायमचा नष्ट होईल.

मानवी पराक्रमाची व गुणानुसारी लोकशासनाची गाथा पोटात घेऊन भरत चक्रीचा इतिहास आपल्यासमोर आदर्शाप्रमाणे उभा आहे पूर्वीच्या परपरागत मार्गाने आपल्या पूर्वजानी जिवाजतन साभाळलेला हा ठेवा आजच्या नव्या पिढीच्या हाती सुपूर्त करण्याची सधी साधली तर आपले जीवन अधिक उत्फुल्ल होऊन कृतार्थ ठरेल या ज्वलत इतिहासाच्या स्मरणातून मिळालेल्या स्फूर्तिदायक ओजाने भारतीय जीवन समृद्ध होईल।।



: ३ :

# इतिहास-साधना

आत्मैव वेदितव्येषु प्रियेष्विव हि जीवितम् ।
इतिहासः प्रधानार्थः श्रेष्ठः सर्वागमेष्वयम् ।।

— महाभारत, आदिपर्व, २/३६

# ३ : इतिहास-साधना

## अनुरूप अभ्यास-प्रणालीची प्रतिष्ठा

सास्कृतिक, राजकीय किंवा ऐतिहासिक सिद्धान्ताची तर्कशुद्ध माडणी करणारे लेखक निर्माण होण्यासाठी एक विशिष्ट परिस्थिती निर्माण व्हावी लागते अशी परिस्थिती पश्चिमेकडील देशात इ सनाच्या आरभकालापासूनच जशी अनुकूल झाली होती तशी भारतात अनेक शतकापर्यंत झाली नव्हती. भारतावर परकीय आक्रमणे फार झाली त्याचा प्रतिकार करीत असताना तर्कशुद्ध ऐतिहासिक विचारांची आणि वृत्तान्ताची माडणी करणारे तज्ञ निर्माण होण्यापेक्षा येथे भारतात क्रियाशील नेतेच अधिक प्रमाणात निर्माण झाले. भारतीय लेखकाच्या लिखाणातून इतिहासाच्या स्वरूपामध्ये सुसगतपणा निर्माण न होता फक्त तत्कालीन वृत्तान्ताची जंत्री गोळा–बेरीजाच्या स्वरूपातच अधिक झालेली दिसते तरी पण त्याच्या प्रासगिक लिखाणातून– पुराणकथातून इतस्तथा विखरून गेलेला इतिहास व ऐतिहासिक तथ्याचा अभ्यास सगतवार करता येणे विद्यमान अभ्यासकाना अशक्यच आहे असे नव्हे त्यासाठी काही खास पद्धतीच्या अभ्यास-प्रणालीचा स्वीकार करावा लागेल आणि ते कष्टाचे होईल हे खरे ! पण त्यासाठी त्याला अशक्य गणून तो अभ्यास टाकून देणे योग्य नव्हे

प्रत्येक सस्कृतीला केव्हा ना केव्हातरी ग्लानी येत असतेच असाच तो भारताचा पुराणकाल होता दिगत कीर्तीची सस्कृती एके काळी आघाडीवर असली तरी कालातराने ती सपन्नता सपुष्टात आली होती येथील सस्कृती परिस्थितीची गुलाम झाली होती धर्मविचाराच्या नावाखाली नाकर्त्याची वृत्ती बोकाळली होती सपत्तीचे व सस्कृतीचे चैतन्यहीन सागाडे सगळीकडे साचले

होते गती संपून गतानुगतिकता निर्माण झाली होती चैतन्य सपून स्थितिप्रियता प्राप्त झाली होती अशा वेळी पुन. प्रेरणेची आवश्यकता भासत असते इतिहासाच्या परिशीलनात्मक ज्ञानाने ती प्रेरणा स्वयचलित होते प्रगतिरूपी रथाला वेग येण्यासाठी इतिहासरूपी आधारभूमीची गरज असते

## संभ्रमाचा परिहार

मानवाची सस्कृती परिपुष्ट करण्याच्या कार्यामध्ये इतिहासाचा वाटाही तितकाच महत्त्वाचा आहे पूर्वानुभवरूप इतिहास-प्रेरणा आणि कालानुरूप विवेक ही दोन प्रगतिरूपी रथाची प्रवर्तनशील चाके आहेत प्रस्थापित भ्रम, अज्ञान व सामाजिक जीवनावरील अवास्तव वर्चस्व यापासून मनाला मुक्त करणे हे इतिहासाचे कार्य आहे विवेक जागा झाल्याने अवश्रद्धा दूर होतात अपसमजांचा परिहार होतो विकृत कल्पनाचे उच्चाटन होते नवी चेतना जन्मते परपरेची चिकित्सा, शासन, समाज व राष्ट्र याकडे पाहण्याची दृष्टी कल्पनेच्या आकाशापेक्षा सत्याच्या आधारभूमीकडे वळते ऐतिहासिक सत्याच्या सस्कारामुळे धर्म, राजकारण, अर्थकारण यामध्ये न्यायवृत्तीचा उदय होतो धर्म आणि राजकारण याचे भिन्नत्व, व्यक्तीला स्वतंत्र अभिव्यक्ती, आचाराला विशाल स्वातत्र्य, मानवी मनाला समतोलपणा इत्यादी जीवनतत्त्वावरील मगल श्रद्धाची उत्पत्ती होऊन त्याचे दृढीकरण होते. परकीय सस्कृतीबद्दल अयोग्य कुतूहलता निर्माण होत नाही स्वातत्र्य, समता, न्याय, लोकशाही या सवधीच्या विचारधनाची उसनवारी करावी लागत नाही. आपलीच सपत्ती उपकृतपणे व दीनतेने स्वीकारण्याची पाळी येत नाही स्वामित्वाची जाण निर्माण होते. जुनी मरगळ मरून जाते नवी चेतना प्रदीप्त होते. पुरातन सपत्तीची केवळ निधिस्वरूप बनलेली अवस्था पालटते सपत्तीला विनियोगात्मक मूल्य प्राप्त होते साचून पडलेली अडगळ उपयोगी साधन-सामग्री ठरते. कूपमंडूक वृत्ती जाऊन मानवाला मंडणभूत अशी नवदृष्टी लाभते. रक्ताने, वर्णाने व्यक्ती तीच उरली तरी वृत्तीने, मननाने, नीतीने व बुद्धीने घडविलेला एक नवा विचारवत साकार होतो जागृती ही एक किमया आहे अधाराला उजाळा लाभून पहाटेचा जन्म होतो. मन भ्रमातून व पूर्वग्रहातून मुक्त होते व्यक्ती स्वयजीवनास समर्थ व पात्र बनते. नव्या जाणिवामुळे व नव्या प्रमाणभूत आधारामुळे वस्तुस्थितीचे रास्त मूल्याकन होते अनिष्ट प्रथा आणि अन्याय नष्ट करणे किंवा कमी करणे शक्य होते. त्यासाठी चळवळी उभ्या राहतात समानतेच्या भावनेतून राजकीय क्षेत्रातील राष्ट्रीय स्वामित्वासबंधीचा न्यूनगड नाहीसा होऊन उत्सेव आणि अभिमान जागृत होतो. चैतन्यामधून नव्या आकाक्षाचे अंकुर पालवतात

## मानवी वरदान

यामुळे इतिहासाचा अभ्यास एक मानवी वरदान आहे त्याच्या अभावी मन स्थितिप्रिय बनते आदर्श दूरस्थ वाटतात प्रयत्न वाझ ठरतात गतानुगतिकता वाढत जाते दुसऱ्याच्या उचीने डोळे दिपून जातात लाचारी व लाघवता वाढते मानव स्वत च्याच धनाचा दुसऱ्यासाठी भारवाहक बनतो दानत मावळते, दैन्य उगवते म्हणून इतिहासनिष्ठा जेवढी अधिक तेवढीच प्रगतीची आशाही अधिक समाजाची नवी रचना व लोकाभिमुख राजकीय बदल, आत्मविश्वास व आत्मप्रतिष्ठा प्रस्थापित करण्यास इतिहासजन्य प्रेरणा समर्थ ठरते परास्त जीवनाचे मार्ग बदलणे, उन्मत्त जीवन उखडणे, स्वाभिमान उजळविणे इत्यादी कार्यांच्या सिद्धीसाठी मागील अनुभवाचा अभ्यास आवश्यक असतो त्याच्या अभावी स्वाभिमान, स्वावलबन व स्वयशासन ही तीन मानवी मूल्ये आपल्या आवाक्याच्या बाहेरच राहतात मानवी सघर्षाच्या ऐतिहासिक अभ्यासाने वाचकाला ओजाची प्राप्ती होते ओजस्वी विचारानी जनमत प्रभावित होते स्वत च्या जयोत्सवाने आत्मप्रत्यय वाढून जनमानसात उत्साह निर्माण होतो नव्या युगासाठी नवे ऐक्य साकारते असुरक्षिततेची भीती नष्ट होते न्यूनगड आणि त्यासारखे इतर दुबळे विचार जन्मण्यापूर्वीच विरून जातात स्वतत्र राजकीय व राष्ट्रीय अस्तित्वाचे बीजारोपण होते मनोमालिन्य नष्ट होते. चेतोवृत्तीला तेज चढते आचार-विचाराची दिशा बदलते. प्रयत्नाचा वेग वाढतो. प्रगतीच्या गतीला मार्ग सापडतो अन्यायाचा प्रतिकार वाढतो जेथे अवगुणाची चीड व सद्गुणाची चाड अकुरते तेथेच मानवतेचा महावृक्ष तरारून वाढतो त्याच्या शात सावलीत अखिल प्राणी गुण्यागोविंदाने एकत्र नादतात व जीवनानदाचा अनुभव घेतात म्हणून पूर्वकालीन इतिहासाचा अभ्यास आपल्या अभ्युदयास आधारभूत ठरतो

## पुराणकालीन घडणावळ

प्राचीन व अतिप्राचीन भारताचा इतिहास राजाच्या जीवनापुरता मर्यादित असला तरी त्या इतिवृत्ताच्या परिसरातून सुसगत वृत्तात एकत्रित करून व त्यातील विचारांची सगती साधून त्या काळच्या परिस्थितीचे व घडत असलेल्या सामाजिक परिवर्तनाचे चित्र तयार करता येते भारतीय पुराणातील इतिवृत्ताचा सबध प्राचीन राजाच्या स्थितीशी निकटवर्ती असला तरी मानवी घडपडीची प्रेरणा, त्याच्या सुखदु खाच्या कल्पना व ऐहिक जीवनाची अवस्था याचाही अभ्यास करण्यास प्राचीन पुराण ग्रथ उपयोगी पडू शकतात. शातता, सुव्यवस्था सुरक्षितपणा, न्याय आणि स्वकीय–परकीय, दैवी–आकस्मिक इत्यादी आघाताचे व अपघाताचे निवारण, अशा प्रकारच्या मूल गरजा भागविणे सामाजिक

जीवनाला आवश्यकच असते पुराणकाळात ही सर्व आर्थिक-राजकीय-सामाजिक-मानवी जबाबदारी पार पाडणारी एकत्र संस्था होती ती संस्था राजाच्या अधिकारातच काम करीत होती त्यामुळे पुराणातील बहुतेक सर्व वृत्तात राजाधिष्ठित असला तरी त्यात सामाजिक जीवनाच्या इतर अंगोपांगाचेही वर्णन होणे शक्य आहे म्हणून तसा अभ्यास केल्यास तो उपयुक्त ठरतो

त्या प्रथमावस्थेत लोकशाहीची कल्पनासुद्धा राजाधिष्ठितच होती आपल्या **गरजेनुसार लोकानी पहिला राजा निवडला ही घटना मानवी इतिहासात दीपस्तंभासारखी ठळक असून महत्त्वाची आहे** ज्यानी केवळ राजमूलक इतिहास वाचला त्याना लोकशाही परकीय, कौतुकाची व अपूर्वाईची वाटते युरोपीय प्राचीन राजाचा अवतार लोकाच्या निवडीतून झालेला नाही इतकेच नव्हे तर ते लोकाच्या जीवनाशी समरस होत नव्हते कित्येक तर स्वत ला ईश्वर किंवा ईश्वरी अथवा दैवी अंग मानीत असत लोकानुवर्ती किंवा लोकासमान व लोकासाठी नसलेल्या त्या राजापासून शासनसंस्था मुक्त करण्याचा इतिहास क्रांतीकारी व उद्दीपक वाटल्यास नवल नव्हे आणि याच वळणातून ज्यांनी सर्वच शासनसंस्थाकडे पाहिले त्याच इतिहासकारानी स्वत्व विसरून परक्याचे गोडवे गायिले आहेत । आणि त्यानीच भारतीय इतिहासाला युरोपीय इतिहास-काराच्या वळणावर नेले हा काहीसा भारताच्या इतिहासाचा परकीय अवतारच होय या विधानातील उद्देश मर्यादित असला तरी ती एक प्रत्यक्ष घडलेली भारताच्या दुर्दैवाची घटना आहे मात्र डॉ. केतकरांची विचारसरणी अपवाद असून ती भारतीय जीवनाला जवळची आहे भारतीय जीवन समजून घेण्याचा त्यानी प्रांजळ प्रयत्न केला आहे.

## महाभारतातील दृष्टिकोण

भारतातील सर्वच प्राचीन वृत्तकार व इतिहासकार इतिहासपर दृष्टीने अभ्यास करण्यास अपात्रच होते असे म्हणण्यास सबळ आधार नाही थोड्याना तरी योग्य दृष्टी अवश्य लाभलेली होती नाही तर—

**इतिहास – प्रदीपेन मोहावरणघातिना ।**
**लोकगर्भगृहं कृत्स्नं यथावत् संप्रकाशितम् ।।**

— महाभारत, आदिपर्व, १/८४.

या विधानातील दृष्टिकोण जन्मालाच आला नसता मनातील सभ्रम नष्ट करण्यास आणि जगातील सर्व घटना जशाच्या तशा स्पष्टपणे दाखविण्यास इतिहास एखाद्या प्रखर दिव्याप्रमाणे उपयोगी पडतो हे पूर्व भारतीयाना नीटपणे

माहीत होते म्हणून त्यानी इतिहासाच्या अभ्यासाला इतर सर्व अभ्यामामध्ये श्रेष्ठ मानले होते (शातिपर्व, २-३६) इतिहासाच्या अभ्यासाने बुद्धीमध्ये एक प्रकारची निष्ठा तयार होते (आदिपर्व, ६२/१७) आणि बुद्धीचा प्रकर्ष होतो (आदि, २/३९) असा त्याचा विश्वास होता अर्थ, काम, धर्म व मोक्ष या चारही पुरुषार्थासबधी जीवनाचा परामर्ष घेण्याइतके इतिहासाचे क्षेत्र विशाल आहे (आदिपर्व, २/३८३ व ६२/२३) अशी त्याची श्रद्धा होती यावरून त्याना इतिहासदृष्टी नव्हती असे मानणे धाष्टर्याचेच होय ।

ही इतिहासदृष्टी त्यानी परकीयापासून घेतली असे म्हणणे देखील तर्कसगत नाही भारताचा व युरोपाचा परस्पर सबध जेव्हा आलेला नव्हता त्यावेळीही त्यानी इतिहासाचा विचार केलेला होता इतिहासाचा अभ्यास व त्याच्या स्वरूपाचे विवरण या क्षेत्रात तरी प्राचीन भारतीयाना स्वत ची अशी एक दृष्टी लाभली होती इ सनपूर्व तिसऱ्या–चवथ्या शतकातील **कौटिलीय अर्थशास्त्रातही** इतिहासाच्या अभ्यासाचे महत्त्व व कार्य दोन्हींचीही नोद व्यवस्थित केलेली आढळते तेथे राजानेही नित्याचा एक क्रम म्हणून रोज इतिहासाचा अभ्यास करावा इतिहासाशिवाय राजाचा अभ्यास पूर्ण होत नाही असा स्पष्ट उल्लेख आहे तसेच **महाभारतामध्ये** पुष्कळ ठिकाणी– "हे ऋषिजन हो, हा सशय माझ्या हृदयात शल्याप्रमाणे रुतून बसला आहे तो इतिहासकथनाने काढून टाका एवढीच माझी सर्वात मोठी अपेक्षा आहे" अशा अर्थाचा उल्लेख ठिक-ठिकाणी सापडतो आणि खरोखरच महाभारतातील– विशेषत **शातिपर्वातील** सर्वच उपदेशाची पूर्ती **इतिहासाच्या दृष्टान्तानेच** केलेली आढळते

## कौटिल्यकालीन व्यापकता

**कौटिल्याने इतिहास** हा शब्दही मोठ्या व्यापक अर्थाने वापरला आहे त्याच्या दृष्टीने इतिहासाच्या परिसीमा अधिक विशाल होत्या त्याचा इतिहास लढायापुरता मर्यादित नव्हता आपल्याकडे सास्कृतिक इतिहासाला किंवा इतिहासाच्या सास्कृतिक स्वरूपाला महत्त्व येण्यास केव्हा सुरवात झाली हे सर्वांना ज्ञातच आहे म्हणजे इतिहासविषयक शास्त्रीय दृष्टिकोण कोणाचा अधिक प्रगत होता हे यावरून स्पष्ट दिसते **कौटिल्याच्या** पूर्वीच्या काळीही इतिहासाच्या सीमा कमीत कमी **पुराण, इतिवृत्त, आख्यायिका, उदाहरण, नीति-विचार** व **अर्थशास्त्र** इतक्या विशाल क्षेत्रातील मानवी व्यवहाराचे दर्शन घडविण्यास समर्थ होत्या शिवाय **अर्थशास्त्र** हा ग्रथही किती विशाल आहे हे येथे सागण्याची अधिक गरज नसावी यामध्ये समाज जीवनातील महत्त्वाच्या सर्व अगोपागाचा विचार केलेला आहे

## याकोबींच्या दृष्टिकोणाचा परामर्ष

पुराण म्हणजे केवळ दंतकथा अशीच व्याख्या याकोबींना मान्य असली तरी ती अगदी तशीच सर्वमान्य होणार नाही पुराणातील प्रमुख पात्र विषयामध्ये दन्तकथा पुष्कळ असल्या तरी त्यात इतिहास मुळीच नाही असे कदापि म्हणता येणार नाही वस्तुस्थिती अगदी तशीच असती तर सहस्रावधी वर्षातील शेकडो पुराणसंग्रहामध्ये थोडी देखील सुसंगती आढळली नसती ! त्यातील अंधश्रद्धामय दंतकथा वगळता इतिहासाच्या अभ्यासाला उपयुक्त अशी कच्ची सामग्री देखील भरपूर आहे म्हणूनच त्याचा उपयोग चांगल्या प्रसिद्ध इतिहासतज्ञानींही केलेला आहे आणि असा इतिहास सर्वमान्य झालेला आहे

फॉर्बस, कर्नल टॉड इत्यादी इतिहासकारानी प्राचीन जैन ग्रथाचे साहाय्य घेऊन त्यातून ऐतिहासिक माहिती स्वीकारली आहे कारण जैन पुराणाचे स्वरूप निश्चितपणे अधिक अनुकूल आहे ती अधिकाधिक सुसगत आहेत क्वचित् प्रसगी विविधता आढळली तरी कोठेही विसगती आहे असे मात्र आढळत नाही एखाद्या वृत्तान्ताचा किंवा घटनेचा मूलस्रोत अगम्य किंवा अज्ञात असल्यामुळे त्याच्या बाबतीत केलेल्या तर्कामध्ये एकच मतप्रवाह तयार होणे जवळ जवळ अशक्यच असते असा प्रकार पूर्वीच होता असे नसून तो आजही अनुभवास येतो एखादी ऐतिहासिक व्यक्ती एका पक्षाला ईश्वरी अवतार वाटत असली तरी दुसऱ्या पक्षाला तीच व्यक्ती अगदी सैतानासारखी वाटते आणि त्याच्या विरोधी श्रद्धा पुण्यमय वाटते म्हणून काही त्याना केवळ दतकथाचा सग्रह मानता येणार नाही डॉ आल्सडोर्फ, डॉ ब्रुहण ( Dr Klaus Bruhn) याच्यासारखे भारतीय विद्येत प्रवीण असणारे प्रसिद्ध जर्मन विद्वान्, चोवीस जैन तीर्थकराच्या जीवनानुसारी असलेल्या जैन पुराणांना तर जागतिक इतिहास ग्रंथ (Universal History) म्हणून मान्यता देतात तेव्हा प्राचीन भारताचा अभ्यास करताना जैन पुराण ग्रथ वगळून मुळीच चालणार नाही त्याशिवाय त्या प्रकारच्या अभ्यासाची पूर्तीच होत नाही खरे तर हिंदू पुराण-ग्रथानाही त्याच्या निर्माणकाळी बऱ्याच प्रमाणात इतिहासाचे स्वरूप असावे परतु कालातराने त्याचा आपल्या हेतूसाठी उपयोग करणाऱ्या धर्मप्रचारकानी, लोकावर प्रभाव पाडण्यासाठी त्यात नवनवे नवलपूर्ण बदल केले त्यामुळेच त्यातील इतिहास-तत्त्व दूषित झाले असावे, अशी शक्यता सभवनीय आहे काहीही असो या दूषणाचा सपर्क जैन पुराणाना तितकासा घडू शकला नाही एवढे खरे म्हणूनच त्याना विश्व–इतिहास म्हणतात ते सार्थ आहे

## प्राचीन इतिहास-श्रद्धा

**युधिष्ठिराच्या** समस्येची पूर्ती करण्यासाठी **महाभारतात** उदाहरणरूपाने निरनिराळ्या संदर्भात नल, रामचंद्र, सत्यवान इत्यादी राजांचा जीवनवृत्तान्त निरनिराळ्या ऋषींच्या मुखातून वदविलेला आहे. त्यावरून **"इतिहासामुळे योग्य मार्गदर्शन होऊ शकते. निदान मनात धैर्य व समाधान निर्माण होऊ शकेल, ओढवलेले संकट सहन करण्यास एखादा प्रकाश-किरण मनाला चेतना देईल."** अशी प्राचीन काळीही श्रद्धा होती हे सिद्ध होते. त्यांची इतिहास विषयक कल्पना धूसर नव्हती एवढे नक्की. खऱ्या दुःखाचा परिहार करण्यास खरी उदाहरणेच समर्थ असतात. म्हणून **युधिष्ठिरादिक पांडवांना** आणि इतरांनाही पूर्व ऋषींनी पूर्वीचा जो वृत्तान्त सांगितला तो कपोल-कल्पित आहे असे मानण्यास कोणतेच कारण दिसत नाही. त्या फार फार प्राचीन इतिवृत्ताच्या परिसरात नंतरच्या काळी सामान्य बुद्धीच्या मानवांनी काही भर घालण्याची पद्धत प्रचलित झाली असावी. त्यामुळे पुढील संग्रहामध्ये तशा अप्रमाण कथांचा अंतर्भाव मोठ्या प्रमाणात होत गेला असावा एवढेच!

## प्राचीन भाषांचा अभ्यास

जगाचा प्राचीन इतिहास प्रकाशात आणावयाचा झाल्यास अत्यंत प्राचीन भाषांचा अभ्यास करणे क्रमप्राप्त आहे. अशा प्राचीन भाषा भारतात कमी नाहीत. भारतामध्ये प्राचीन इतिहासाची पुष्कळ साधने शिल्लक आहेत. **संस्कृत, अर्धमागधी** इत्यादी अनेक समकालीन भाषाच नव्हेत तर **वेदपूर्वकालीन आर्ष भाषाही** कोणत्या ना कोणत्या स्वरूपात उपलब्ध होत आहेत. त्यांच्या अभ्यासाला अद्याप सुरवातही झालेली नाही. आपली प्रगती फक्त **अशोकाच्या धम्मलिपींच्या** चार-सहा प्रकारापर्यंत सरसावलेली आहे. त्यापूर्वीचा अभ्यास नगण्य आहे. आणि त्यानंतरच्याही काळातील निरनिराळ्या **प्रशस्ती व लेखखंड** आपल्या इतिहासाचे स्वरूप स्पष्ट करण्यास उपयोगी असून देखील त्यांचा व्हावा तितका अभ्यास होत नाही. अशी लेख-सामग्री कदाचित् आजच्या इतिहास-शास्त्राला अनुसरून योग्य त्या स्वरूपात उपलब्ध होत नसेल! पण ती अपेक्षाही योग्य नव्हे!! परंतु त्यामुळे त्यातील तथ्यांची किंमत कमी होत नाही. आणि **याच दृष्टीने वेदादिक ग्रंथही इतिहासयोग्य नसतील म्हणून त्यामध्ये इतिहासाच्या अभ्यासाला योग्य अशी सामग्रीच मिळत नाही, असे ठासून सांगणे इतिहासद्रोह ठरेल.** अशा प्रकारचा दृष्टिकोण आत्मघातकीच होय.

अशा संहितांचा उपयोग पूर्वकाळी धार्मिक कार्यासाठीच होत होता. शिवाय ग्रंथांतर्गत विविध प्रशस्ती व पूर्वीच्या **भाटांना व मागधांना** मुखोद्गत असलेल्या

उद्गीताचा, जयघोषाचा व काव्यांचा उपयोग राजाची प्रशंसा करण्यासाठीच झालेला असला तरी ते आज पुष्कळ प्रमाणात सुरक्षित असल्याने अभ्यासासाठी त्याचा उपयोग करण्यास कोणताच प्रत्यवाय नसावा मनोरंजनात्मक तथा ललित साहित्याचा आणि इतिहास-सामग्रीचा विरोधच असतो असे नाही. बाण असते ती संशोधकाची व अभ्यासकांची त्या पूर्वकालीन राजाच्या पराक्रमातून राजकीय घटनाचा व त्याच्या दानपत्रातून लोक-कल्याणकारी व्यवहाराचा व हेतूचा बोध स्पष्टपणे होतो हा इतिहासच नव्हे काय ? रंजकतेला व नवलाईला तत्कालीन पद्धतीप्रमाणे प्राधान्य दिल्यामुळे ऐतिहासिक तथ्य आणि सत्य घटनाचे स्वरूप अतिरिक्त प्रमाणात मांडल्याने कल्पनाचा प्रपंच वाढतो व इतिहास दुरावतो ही गोष्ट खरी असली तरी ते लेखक व गायक त्या प्रकारच्या साधनांचा उपयोग करणारे व त्याचे ऐतिहासिक महत्त्व ओळखणारे इतिहासतज्ञ नव्हते आणि त्याचा उद्देशही तसा नव्हता, ही स्थिती लक्षात घेऊन त्या साधनाचे शास्त्रीय दृष्टीने विश्लेषण आजच्या इतिहासकारानी केल्यास त्यातील शुद्ध व सत्य घटनांचा अर्थ शोधता येणे कठीण नाही

## अनैतिहसिकत्वाचा प्रादुर्भाव

आजच्या खऱ्या इतिहासकारानीही प्रशंसा पूर्णपणे वगळलेली आहे असे दिसत नाही जेव्हा लेखक प्रशंसाशील बनतो तेव्हा विधानामध्ये अतिशयोक्तीचा दोष निर्माण होतच असतो म्हणून इतिहासातही विरोध व काही प्रमाणात असत्य तथा असत्यासत्य अवतरतेच परिणामी दोन ऐतिहासिक विधाने परस्पर विरोधी आढळतात असा विरोध वा आभास तथा अवभास पूर्णपणे टाळणे आजपर्यंत कुणालाही जमलेले नाही म्हणून आजचा सुशिक्षित इतिहासकार देखील आपल्या विधानामध्ये वादातीत किंवा सर्वगत तथा सर्वकष असत नाही. मानसभावनेसाठी इतिहास मुद्दामही विपरीत करण्यात येतो काही भाग लपविण्यासाठी नेमकी त्याविरुद्ध असलेली असत्य घटना पुढे मांडण्यात येते याचा स्पष्ट अर्थ असा की पूर्व घटना सत्य असते आणि तिला ऐतिहासिक महत्त्व असते तथापि विरोधी पक्षाला किंवा कधी कधी स्वपक्षियानाही ती यशकारी वाटत नाही म्हणूनच त्या घटनेचा विपर्यास करण्यात येत असतो याचाच अर्थ विरोधी किंवा पर्यायी इतिहासकारच खरा असतो वा त्याच्या वृत्तान्ताला ऐतिहासिक महत्त्व असते ! म्हणून पक्षाभिमान व स्वाभिनिवेश सोडून घटनाचे विश्लेषण करावे लागते त्यातील खोटेपणाची व लपडावाची कारणे शोधली असता खऱ्या संशोधकास खरा इतिहास आपोआप सामोरा येतो म्हणून प्राचीन ग्रथाचा चिकित्सक अभ्यास आवश्यक आहे

## हंस-क्षीर न्याय

अशा प्रकारचा ऐतिहासिक गोधळ आणि सत्य घटनाचा परिहार केवळ आपल्याच प्राचीन ग्रथात झालेला आढळतो असे नव्हे हा मानवी स्वभाव सर्वत्र सारखाच कार्यकारी राहत असल्यामुळे पाश्चात्य इतिहासातहि अशा गोष्टी आढळून येतातच प्रख्यात ग्रीक इतिहासकार **हिरोडोटस** याच्या इतिहास-ग्रथात ऐकीव कथा, लोकरजनाचा ललित भाग, खुषामत इत्यादी इतिहासाला मारक विधाने नाहीत असे कोण म्हणेल ? इ सनपूर्व पाचव्या शतकात **इराणवर ग्रीसने** जो विजय मिळविला त्याचा इतिहास त्याने लिहिला हे खरे पण त्याही पूर्वीच्या काळाचा इतिहास वा वृत्तान्त दन्तकथारूपाने त्याला जसा उपलब्ध झाला तसाच त्याने लिहून काढला त्याची छाननी केली नाही तो स्वत च म्हणतो– My duty is to report all that is said, but I am not obliged to believe it all alike

तेव्हा 'पूर्ववृत्तातातील खोटेपणाची कारणे शोधली तर सशोधकास खऱ्या इतिहासाचे दार उघडे दिसते !' या डॉ **केतकरांच्या** विधानानुसार पुराण ग्रथातून देखील खरा इतिहास शोधून काढता येतो हे खरे आहे म्हणून प्राचीन ग्रथाकडे अगदी त्याज्य बुद्धीनेच पाहण्याचे कारण नाही समतोल भावना स्वीकारली तर प्राचीन वा प्राचीनतम लेखातूनही अधिक सुसगत असा इतिहास शोधता येतो सर्व सववित घटनाची माहिती सग्रहीत व सकलित करून त्यातील वृत्तान्ताचे मूल्यमापन केल्याने लुप्त इतिहास स्पष्ट होतो आजची स्थिती ही कालच्या स्थितीचा परिपाक असल्यामुळे कालची स्थिती समजावी असे वाटणे ही मानवाची सहजप्रवृत्ती आहे पण कालच्या अनेक घटनावृत्तावरून योग्य दिशा सापडण्यासाठी त्याची समतोल छाननी आवश्यक असते छाननी करीत असताना त्या ग्रथाचा दृष्टिकोणही समजावून घेणे क्रमप्राप्त ठरते त्यातील ज्या घटितामध्ये इतिहासाचा उद्देश स्पष्ट आढळतो तो भाग साधन-सामग्री म्हणून स्वीकारण्यास हरकत नसते कारण अतिप्राचीन ग्रथ पूर्णतया इतिहासस्वरूपी नाहीत त्यामध्ये मानवी घटनासमवेत दैवी व कल्पित घटनाचाही समावेश झालेला असणे सहज शक्य असते कारण तो कालाचा गुणधर्म आहे

त्याशिवाय त्यात स्वधर्माभिमान व स्वधर्माचाराचा आविष्कार व पुरस्कारही असतो यावरून एवढेच दिसते की त्या काळी विषयवार वा विशिष्ट पद्धतीला अनुसरून ग्रथरचना होत नव्हती त्याचे स्वरूप सहिताकार किंवा केवळ सकलनात्मक होते ज्ञात अशी सर्व पूर्वपरपरा पुढे चालू ठेवणे एवढाच त्याचा उद्देश असावा म्हणून शास्त्रीय स्वरूपाचे इतिहास-ग्रथ निर्माण झाले नसतील किंवा त्याचे प्रमाण कमी असेल, अथवा वृत्तान्ताच्या नोदणीमध्ये आजच्यासारखा

कालानुक्रम आणि शास्त्रशुद्ध, तर्कसंगत असा दृष्टिकोण त्यांना लाभलेला नसेल! कदाचित तत्कालीन वाचकाची ती गरजही नसेल!! पण एवढ्यावरून त्यामध्ये इतिहास-सामग्री अजिबात नाही असे म्हणणे धाष्टर्याचे ठरेल. त्या विशाल समुहातून योग्य ग्रंथ निवडून त्यामध्ये विखुरलेली उपयुक्त सामग्री शोधणाऱ्याची मात्र वाण पडेल इतका मोठा पसारा उपलब्ध आहे.

हिंदू पुराणांचा तर स्पष्ट दावा आहे की– १) मानवी जगाची उत्पत्ती, २) उत्पत्तीमधील पुनरुत्थाने, ३) निरनिराळे वंश, ४) युगपरिवर्तन आणि ५) निरनिराळ्या वंशातील थोर पुरुषाची कामगिरी, कर्तबगारी, त्यांच्या जीवनातील महत्त्वाच्या घटना इत्यादीसंबंधी माहिती लिहिणे हाच त्यांचा उद्देश होता. म्हणजे त्यामध्ये आजचा शास्त्रीय दृष्टिकोण नसला तरीही तेथे इतिहासाला पोषक व आवश्यक तथा उपयुक्त साधन-सामग्रीचा संग्रह आहेच. मात्र आज तो संशोधला पाहिजे.

## जैन साहित्यातील ऐतिहासिकता

जैन आगम व पुराण ग्रंथ अर्धमागधी, संस्कृत, प्राकृत आणि अपभ्रंश अशा सर्व प्राचीन भाषामध्ये उपलब्ध असून ते जास्त प्रमाणात लोक-जीवनानुवर्ती आहेत. म्हणूनच इतिहासाला अधिक जवळचे ठरतात. तर्कविसंगती नाही. मानवी घटनांवर दैवी आरोप नाहीत. आणि सर्वव्यापी व सर्वज्ञ देवतांचा मानवी जन्मावतार व तदनुषंगिक अतिमानवी कथा व चरित्र, त्याचप्रमाणे इतर अद्‌भुत घटनाही नाहीत. निरनिराळ्या पुराणसंग्रहांत एकाच घटनेबाबतीत मतभेद नाहीत. हजारो वर्षांच्या कालांतरामध्ये टिकून राहिलेली निरनिराळ्या प्रांतातील व भाषेतील शेकडो लेखकांमधील सुसंगती वाखाणण्यासारखी आहे. अंधश्रद्धादिक अनेक प्रकारचे मुक्त व स्वच्छंद आरोप जैन पुराणांच्या संदर्भात करता येत नाहीत आणि केले तरी ते टिकत नाहीत! त्यातील विषयही वरील पाच विषयक्षेत्रापेक्षा अधिक विशाल असून तो मानवी जीवनाला व मानवी हेतूंना अनुसरून सुसंवादी आहे.

एतेषां चरितं ब्रूमः शलाकापुंस्त्वशालिनाम् ।
महात्मनां कीर्तनं हि श्रेयोनिःश्रेयसास्पदम् ॥

– त्रिषष्टि ...चरितम्, १/१/२९

धर्मोऽत्र मुक्तिपदमत्र कवित्वमत्र तीर्थेशिनां चरित्रमत्र महापुराणे ।

– उत्तरपुराण, प्रशस्ति. ३८

मिथ्यावादान्धकारस्थितिमपघटयद्वाङ्मयूखप्रतानैः ।

– महापुराण, १/२१०.

लोकसंस्थानमत्रादौ राजवंशोद्‌भवस्ततः ।
हरिवंशावतारोऽतो वसुदेवविचेष्टितम् ॥ ७१ ॥
चरितं नेमिनाथस्य द्वारवत्या निवेशनम् ।
युद्धवर्णननिर्वाणे पुराणेऽष्टौ शुभा इमे ॥ ७२ ॥

— हरिवशपुराण, सर्ग १

समाजातील सर्व श्रेष्ठ राजाचे चरित्र सागणे, लौकिक-कल्याण आणि आत्मकल्याण याचे विवरण करणे, सर्व तीर्थंकराचे चरित्र विशद करताना कल्याणदायी मार्गाचे विवेचन करणे, दु खापासून सुटका होण्याचा मार्ग स्पष्ट करणे; शब्द-शास्त्राच्या मदतीने अज्ञानरूपी अध काराचा नाश करणे, जगताची अवस्था, राजवशाची उत्पत्ती, हरिवशासारख्या मोठमोठ्या वशातील श्रेष्ठ पुरुषाची कर्तवगारी, वसुदेवासारख्याचा महान् लोकप्रवास, लोकव्यवहारातील सर्व क्षेत्रामध्ये प्रमुख असणाऱ्या नेमिनाथासारख्या श्रेष्ठाचे चरित्रवर्णन, द्वारका इत्यादी महानगरीचे उदयास्त, युद्धप्रसगाचे विश्लेषण आणि त्याचा शेवटी झालेला परिणाम इत्यादी मानवी जीवनातील सर्व अगोपागाचे यथातथ्य दर्शन घडविणे हा जैन पुराण-साहित्याचा उद्देश असतो त्यातील विषय सर्व क्षेत्रातील विशाल प्रश्नाना स्पर्श करतात थोडक्यात (१) लोकविभाग, (२) शलाका पुरुषाचे वर्णन, (३) ज्ञानाच्या सर्व साधनाचे वर्णन–विवेचन, (४) सगीतादी सर्व मनोरजनाचे मार्ग, (५) जीवनावश्यक तत्त्वाचे निरूपण, (६) शुभाशुभ आचार–व्यवहाराचे मार्गदर्शन, (७) सभा – समेलन – परिषदाचा इतिहास, (८) विहार–प्रवास, (९) ज्ञान मिळविण्याच्या मार्गांचा उद्‌गम आणि विकास व (१०) जीवनमार्गातील विशिष्ट सास्कृतिक परपरा अशा विविध विषयाचे निरूपण करणे असा विशाल सास्कृतिक विषय जैन पुराणामध्ये हाताळलेला असतो तेव्हा असे विवेचन मानवी जीवनव्यवहाराला मार्गदर्शन करण्यास उपयोगी नाही असे कसे म्हणता येईल ?

## दोष-संभावना आणि प्रांजळपणा

एखाद्या विशिष्ट राष्ट्रीय घटनेचा मूळ आधार शोधण्यासाठी किवा त्या सदर्भातील अनेक वृत्तान्तामधून एकाची निवड करण्यासाठी घडलेल्या सर्व घटनाची माहिती सगतवार माडावी लागते विसगती वगळून सुसगतीकडे वळण घ्यावे लागते अशा वेळी स्वत च्या व्यक्तिगत श्रद्धा दूर साराव्या लागल्या तरी उपलब्ध होणारी सुसगती टाळता येत नाही हे ज्याला जितके साधते तितका तो लेखक इतिहासाला प्रामाणिक ठरतो अधश्रद्धा उराशी बाळगल्याने मात्र पर्यायी मते खोटी ठरविण्याची किंवा अनुल्लेखाने त्याना शह देण्याची भावना दृढावते

अशा कल्पनात्मक व्यवहारातून एका इतिहाससम काल्पनिक ग्रंथाची निर्मिती होते असा प्रकार हिंदू पुराणातून बहुतेक सर्वत्र आढळतो त्यामुळेच 'भारतीयांनी पूर्वकाळी इतिहासाच्या अभ्यासासंबंधी अनास्था दाखविली' अशा प्रकारच्या आरोपामध्ये पुष्कळ प्रमाणात तथ्य आहे असे म्हणावे लागते अशा आरोपापासून दूर राहण्यासाठी उपलब्ध होणाऱ्या सर्वच पुराण ग्रंथाचा अभ्यास करताना निरनिराळी परपरा व विविध प्रवाह यामधून मूलस्रोत ताडून पाहावा लागतो हे खरे असले तरी भारतातील सर्वच प्राचीन साहित्य सर्वथैव टाकाऊ ठरविण्यात अर्थ नाही साहित्यावर त्या त्या युगाचा प्रभाव पडत असतोच भारतातीलच नव्हे तर बाहेरचाही प्राचीन मानव अशा अनैतिहासिक प्रभावाने संभ्रान्त झालेला आढळतो मानवाची उत्पत्ती आदमपासून किंवा त्या परपरेतून झाली आहे या इतिहासबाह्य श्रद्धेच्या टाचेखाली ग्रीक, अरब, मुसलमान इत्यादी सर्वच लोक परास्त झालेले होते तेव्हा असा क्रूर दोषारोप फक्त भारतीयावरच लादता येणार नाही

म्हणून पुराणातील सुसगत तथ्य शोधून ते शास्त्रीय पद्धतीने व साधार पुराव्याने माडणे हेही आजच्या इतिहासकाराचे कर्तव्य आहे असे सशोधन इतिहास-लेखनाचेच एक अग आहे रचलेल्या कल्पना व घडलेल्या घटना एकाच तोलाने मोजता येणार नाहीत विश्लेषणात्मक दृष्टिकोणातून त्यांची पारख न केल्यामुळे इतिहास दूषित होतो काही अभिनिवेशयुक्त कल्पितांमुळे नैतिकतेचे पोषण होत असले तरी त्यामुळे बुद्धिवादी विश्लेषणाची प्रवृत्ती कमी होते आणि इतिहासाची किमत मात्र घसरते यासाठीच इतिहासाच्या अभ्यासामध्ये स्वत च्या नैतिक श्रद्धा राबवू नयेत म्हणजे घटिताचा पारखून घेतलेला अर्थ इतिहासाला पोषक ठरतो या दृष्टीने पुराणग्रथातून व इतर आगमातून उपलब्ध होणारी व सुसगत ठरणारी घटिते याचा इतिहासाची उपकारक सामग्री म्हणून स्वीकार करण्यास प्रत्यवाय उरत नाही त्यातून निर्माण झालेला इतिहास मानवी जीवनाला पोषक ठरतो. आपल्या देशाच्या नावाच्या वृत्तान्तातील खरेपणा शोधण्याठी हाच प्रामाणिक दृष्टिकोण राबविला आहे.

## राष्ट्रीय जीवनातील चार तथ्ये

राष्ट्राच्या कालक्रमावर ऐतिहासिक भावनाचा प्रभाव पडतच असतो त्यातून त्या राष्ट्राचे नीतिशास्त्र जन्मते. नीतिशास्त्रामुळे राजकीय व्यवहाराला मार्गदर्शन लाभते आणि त्याचा विकास होतो म्हणून इतिहास जपणे हे प्रत्येक संस्कृतिकाराचे ब्रीद ठरते. ज्याला इतिहास नाही किंवा इतिहास घडविता येत नाही त्याचे राष्ट्रीय जीवन लगडे पडते आणि प्रसगी तोही संपून जातो. कालप्रवाहात टिकत नाही त्याला राष्ट्रीयत्व व व्यक्तित्व उरत नाही अर्थशास्त्र या ग्रथातील विषयाचा परामर्ष घेतला तर हे विधान सहज समजण्यासारखे आहे

एखाद्या समाजावर किंवा राष्ट्रावर परकीय सत्तेचे आक्रमण होण्याच्या अगोदरच अदृश्यपणे विपरीत व विषपूर्ण इतिहासाचे आणि मनोभग व मनोमालिन्याचे आक्रमण यशस्वी झालेले असते त्यामुळेच परचक्राच्या टाचेखाली भरडून जाण्याचा व नामुष्कीचा प्रसग ओढवतो केवळ प्रासगिक सग्राम–सामर्थ्यामुळे नव्हे ! कारण सस्कृतिसपन्न मानवाच्या जीवनात मागल्याची ज्योत त्याच्या अगभूत गुणाच्या ओजावरच तेवत असते एखाद्या प्रसगी इंधनासारख्या बाह्य सामग्रीच्या योगाने प्रखर बनलेल्या दिवटीने त्या ओजावर आकस्मिकपणे सग्राम-विजय मिळविला तरी तेवढ्याने मौलिक ओज मदावत नाही कोणतेही बाह्य इंधन आतरिक ओजाचा पराभव करू शकत नाही. उलट काही काळाने इंधन जळून जळून सपते त्याबरोबर स्वत पराभवच जळून जातो आणि ओज मात्र सदैव तेजाळत राहते म्हणून सबल सस्कृतीच्या आणि जिवत भावनेच्या राष्ट्रावर राक्षसी आघात झाला तरी कालातराने त्याचा परिहार करण्याची पात्रता शिल्लक राहतेच यासाठीच इतिहास जपणे हे राष्ट्रीयत्वाचे प्रतीक ठरते. **इतिहास जिवंत असला तर संस्कृती प्रगत होते आणि प्रतिष्ठा लाभते**

विखरून राहिलेल्या लोकामध्ये एकी निर्माण करण्याचे प्रयत्न इतिहासाच्या सस्कारामुळे सफल होतात हे यहुदी लोकानी पुन एकदा सिद्ध केले आहे सामान्यत अल्पसख्य जनता नेहमी विखुरलेलीच असते पण भारतात तर धर्म, भाषा, सस्कृती आणि भौगोलिक स्थिती इत्यादिकामुळेही विस्कळित मन स्थिती निर्माण झालेली आहे भौतिक अर्थाने दूरस्थ असूनही राष्ट्रीय व सास्कृतिक भावनेने स्वस्थ आणि समीपस्थ राहू इच्छिणाऱ्यासाठी वरील दृष्टिकोण फारच महत्त्वाचा ठरतो प्रदेश किंवा निवासस्थान वेगळे असूनही एकता आणि एकीचे बळ निर्माण करावयाचे असेल तर अनपायकारी **जीवनमूल्यावरील श्रद्धा व सहयोगात्मक सांस्कृतिक भावना** सदैव जिवत राहण्यासाठी **ओजाची** गरज असते ओजाला ग्लानी आली असताना पुन प्रेरित होण्यासाठी स्वत च्या पारपरिक **इतिहासाचे ज्ञान** यथार्थतेने अभ्यासण्याची गरज असते म्हणून चारही तथ्ये पूरक आहेत त्या सर्वांचा योग्य सपर्क साधला तर राष्ट्रीय जीवनाचा धागा वळलेल्या दोरखडाप्रमाणे बळकट होतो

## सत्यावर सत्तेची कुरघोडी

युद्ध, जय आणि पराजय या घटना इतिहासात लक्षवेधी ठरतात जिताची सत्ता नष्ट होते विजयाला प्रतिष्ठा लाभते. जय कोणत्याही प्रकाराने लाभला तरी तो सत्यावर प्रभुत्व गाजवितो आणि पराजिताना हीन लेखतो दण्डसत्तेच्या जोरावर विजयी पक्ष जेव्हा दुसरी बाजू नष्ट करतो तेव्हा तो काही प्रमाणात सत्याला व न्यायाला बदिस्त करून टाकीत असतो अशा प्रसगी चागला

इतिहासकारही नडतोच अशा वेळी तोड काढणे कठीण असते जेव्हा सत्यालाही वंचित व्हावे लागते तेव्हा त्याबद्दल केवळ कीव वाटते ! युद्धामुळे एखाद्या राष्ट्राचा पाडाव होतो. या घटनेवर इतिहासकाराचे मत काय असते ते विष्णु-पुराणात एके ठिकाणी पृथ्वीच्या मुखातून खालीलप्रमाणे व्यक्तविले आहे–

दृष्ट्वा ममत्वात् धृतचित्तमेकम् ।
विहाय मां मृत्युवशं व्रजन्तम् ।।
तस्यानुयस्तस्य कथं मम त्वम् ।
हृद्यास्पदं मत्प्रभवं करोति ।।
पृथ्वी ममैषाऽऽशु परित्यजैनाम् ।
वदन्ति ये दूतमुखैः स्वशत्रून् ।।
नराधिपास्तेषु ममातिहासः ।
पुनश्च मूढेषु दयाऽभ्युपैति ।।

– विष्णुपुराण, अंश ४, अ २४, श्लोक १२८ ते १३६

" ही पृथ्वी माझी माझी म्हणून मजवर आपली मालकी गाजविणारा राजा मृत्युपथाला लागलेला पाहून त्याच्या पाठोपाठ येणारे राजे पुन माझ्यावर मालकी गाजवितात आणि ' ही पृथ्वी माझी आहे, तू तावडतोब हिचा त्याग करून निघून जा ' असे शत्रूना आपल्या दूताकरवी वजावतात तेव्हा अशा राजाचे मला प्रथम हसू येते पण ते सर्वच मूर्ख आहेत असे कळताच त्याची केवळ दया येते ! "

या पार्श्वभूमीवर पुराणात मागे सांगितलेल्या विविध क्षेत्रातील घटना जशा समजल्या त्या केवळ तशाच नोंदण्याचे कार्य झाले त्याची छाननी नाही, कालक्रमही नाही आणि शास्त्रीय दृष्टिकोण तर नाहीच नाही त्याना त्यावेळी तशी आवश्यकताही वाटली नसावी त्याचा मुख्य आविष्कार मानवी जीवनक्रमाचे नैतिक आदर्श निर्माण करणे, नीतिशास्त्राचे नियम बांधून देणे अशा स्वरूपाच्या क्षेत्रामध्ये झाला आहे मात्र विदित असलेल्या माहितीची नोंद करणे व ती जतन करणे या स्वरूपात त्यांची ऐतिहासिक भावना स्पष्ट दिसते. त्यात राजसत्तेची व राजकीय संस्थाची मीमांसा कमी आढळते कारण सामान्य लोकाना त्यावेळी त्याची महिती समजली नव्हती म्हणून गरजही भासली नाही भूमीवरील अधिसत्ता ही शूराची असते त्यासाठी शूराशूरामध्ये लढत होत आली आहे कोणाचा तरी जय किंवा पराजय ठरलेलाच असतो त्यात मन घालण्याचे प्राकृत जनतेला कारणच नव्हते फक्त सत्तेवर आलेल्या राजाला कर भरला की संपले ! ! अशी सामान्य स्थिती आढळली तरी सर्वच जुने साहित्य उपेक्षणीय ठरत नाही

काही ग्रथ निश्चितच इतिहासाला उपकारी ठरण्यास समर्थ आहेत ही गोष्ट वरील विवेचनावरून स्पष्ट होते.

## मार्गदर्शक तथ्य

शिवाय प्राचीन ग्रथात अतर्भूत केलेला कालखडही फारच विशाल आहे कालचक्राची गती अप्रतिहत चालू आहे जेव्हा पुढील वृत्तान्त महत्त्वाचे ठरतात तेव्हा मागील इतिवृत्त छाटून कमी करावा लागतो कालातराने तो इतका कमी करावा लागतो की त्यातील घटनावर्णनाला स्थानच उरत नाही तेव्हा त्या घटना वगळून सदृश घटनाचक्रामधील जे तथ्य विधानरूपाने उरते तेच तत्त्व म्हणून ग्राह्य ठरते अशा तथ्यामुळे जीवनातील व्यवहाराला ध्येयानुसारी मार्गदर्शन घडते म्हणून त्या जीवनतत्त्वाना, त्या मानवी तथ्याना मात्र फाटा देता येत नाही अशी मार्गदर्शक तथ्ये जतन करण्याचा प्रयत्न मात्र प्राचीन ग्रथामधून प्राजळपणे झालेला दिसतो इतिहासाच्या दृष्टिकोणातून देखील ही आस्था कमी महत्त्वाची मानता येत नाही कारण पुढील जीवनाचा उत्कर्ष व अपकर्ष अशा तथ्यावरच अवलबून असतात. ज्ञानासाठी पूर्व घटनाचक्रापेक्षा त्यातील उपादेय तत्त्वच आवश्यक असते त्याच तथ्यावरून सस्कृतीची नवी दिशा समजते नव्या युगातील नवा मार्ग लवकर सापडतो. सनातन मार्ग व आपत्कालीन मार्ग ओळखण्याचे सामर्थ्य येते जीवन-विषयक तथ्ये चिरतन नसतात There is no absolute truth is the real truth.

जीवनातील तथ्ये देश-काल-परिस्थितीला अनुसरूनही बदलतात पण हा बदल म्हणजे नेमके काय हे कळणे आवश्यक असते ते जाणण्याचे सामर्थ्य अशा विविध घटनाचक्रामधून मथन करून काढलेल्या कल्याणकारी तथ्यावरच अवलबून असते नेहमी जय होत असतो तो सामर्थ्याचा पण त्या सामर्थ्याला सत्याचा आधार हवा असतो म्हणून सत्याचाच जय होतो असे म्हटले जाते म्हणजेच सत्य आणि सामर्थ्य याची ताटातूट झाली असताना सभ्रान्ती ही ठरलेलीच असते अशी भ्राती नष्ट करण्यासाठी भिन्न सस्कृतीतील सघर्षाचा परामर्ष घेणे, परिमथनाने त्यातील तथ्याचा शोध घेणे आणि स्वत जी जीवनावश्यक तथ्ये, पूर्वानुभवाचा निकष वापरून, सग्रहित केली असतील त्याच्याशी त्या शोधित तथ्यांचा मेळ कितपत बसतो हे पाहणे अशा विविध प्रयत्नातून पूर्वेतिहास दृष्टिपथात आणता येतो पूर्व सूरीनी त्या त्या काळी जीवनमूल्याचा तत्त्व म्हणून अंगीकार केला होता त्यालाच मुकाटयाने कवटाळणे आजच्या इतिहासकाराला शोभणारे नाही कारण काळाच्या प्रवाहाबरोबर जीवनमूल्येही बदलत राहतात आणि त्याच ओघाने ती जुनी तत्त्वेही बदलतात म्हणून अशा गृहीत तत्त्वापेक्षा त्या त्या काळाच्या घटनाचक्रामधून ऐहिक दृष्टीने परिशीलन करून त्यातून जे

समाजधारणेला हितकर असे तथ्य निघेल तेच स्वीकारणे वस्तुस्थितीला अनुसरून असते आणि तेच अनुरूपही ठरते

## जीवनमूल्यांचा शोध

राष्ट्राचा किंवा समाजाचा उत्कर्ष व अपकर्ष केवळ जय व पराजय यावरच अवलंबून राहात नाहीत किंवा नैतिक अध.पातानेच सर्वनाश होतो असेही नाही. जसे कर्तव्यभ्रष्ट वृत्ती, सत्तेची अभिलाषा, उन्मत्तपणा, अदूरदृष्टी, अविचार, विभूतिपूजा इत्यादी अनेक अंतर्गत परिवर्तने तसेच अपघात, आकस्मिक परिवर्तन, दैवी आपत्ती आणि कालचक्राचे परिणाम याना अनुसरूनही स्थित्यंतरे संभवतात अशाही स्थित्यंतरामुळे जीवनमूल्ये बदलतात वास्तव तथ्ये देखील पुन पुन तपासून पहावी लागतात तेव्हा इतिहासकाराला एका स्थित्यंतरामधील जीवनमूल्ये व त्याच्या अनुरोधाने कवटाळलेली तत्त्वे निराळ्या कालखंडातील स्थित्यंतरामध्ये जशीच्या तशी लागू करता येत नाहीत त्याला दृष्टी विशाल करावी लागते विविध स्थित्यंतरे व विविध जीवनमूल्ये याचा अभ्यास मोठ्या प्रमाणात व खोलवर करावा लागतो त्याशिवाय कोणती मूल्ये कोणत्या काळची व कोणत्या प्रकारच्या संस्कृतीची आहेत हे समजत नाही त्यामुळे संग्रहित केलेल्या घटनाचा अभ्यास करण्यासाठी कोणतेच प्रभावी निकष सापडत नाहीत म्हणून परिशीलनात्मक अभ्यास करताना विशाल माहिती तपशीलासह जमवून ती मानवी कल्याणाच्या निकषावर तपासावी लागते निरनिराळ्या पुराव्याने ती पुन पुन दुरुस्त करावी लागते आणि जे बिनचूक कल्याणदायी असेल तेच निवडावे लागते

## घटनाप्रामाण्य भूमिका

प्राचीन ग्रंथामध्ये अशी दृष्टी कोठे कमी, कोठे जास्त तर कोठे अभावानेच आढळते वेद-ग्रंथातील इतिवृत्तामध्ये आणि घटनाचक्रामध्ये इतिहासदृष्टी फार कमी असली तरी त्यातील वृत्तात व घटना इतिहास निर्माण करण्यासाठी उपयोगी पडत नाहीत असे नाही इतिहास-मंदिर उभारण्यासाठी लागणारा माल तेथे अगदी मूळ स्वरूपात ( कच्चा ) आढळतो. मात्र पुराणातील वृत्तांताची मांडणी करताना त्यामागे राष्ट्रे व थोर घराणी याचा इतिहास जमेल तितक्या प्रमाणात जतन करण्याची भावना दिसते ही भावनाही काही कमी महत्त्वाची नाही घडलेल्या घटनामधून आणि वर्तलेल्या वृत्तान्तामधून सुसंबद्ध इतिहास निर्माण करताना चिकित्सक प्रक्रिया आणि विवेकपूर्ण बुद्धी फार मोठ्या प्रमाणात राबवावी लागते. त्याशिवाय इतिहासात सुसंगती व घटनाप्रामाण्य निर्माण होत नाही तो वस्तुनिष्ठ न राहता काल्पनिक, ललित व रंजक होतो त्यामुळे त्यातून नेमका बोध घेणे कठीण जाते किंवा घेतलेला बोध फसवा व निरुपयोगीच ठरतो. पण त्याबरोबरच

केवळ शुद्ध चिकित्सावृत्तीही इतिहास निर्माण करू शकत नाही ती वृत्ती उदाहरणशून्य असल्याने प्रत्यक्ष जीवन जगत असताना त्यापासून कोणताच बोध घेता येत नाही त्याचा 'नेद नेद' हा घोष निराकार व निरुपयोगी ठरून जन्मत च नष्ट होतो उलट इतिहास नेहमी घटनाप्रधान व घटनाधिष्ठित असतो. सत्य घटनानाच मानवी अर्थ असतो अर्थाची चिकित्सा करूनच तथ्याचा स्वीकार करावयाचा असतो स्वनिर्मित तथ्यावरून जीवनाचा अर्थ आणि त्यानुसार घटना हा उलटा क्रम इतिहासाला मारक ठरतो. त्यातून दन्तकथेला व अधश्रद्धेला अनुकूल अशी भारुडे निर्माण होतात म्हणून चिकित्सा हा निकष आहे, वस्तुस्थिती नव्हे वस्तुस्थिती आकलण्यास सत्य घटना व वृत्तान्तच इतिहासाला मूलाधार ठरतात. म्हणून प्राचीन ग्रथातील घटना व वृत्तान्त याचा इतिहासाचा प्राथमिक आधार म्हणून स्वीकार करण्यास हरकत नसावी आणि तो वृत्तान्त इतिहास म्हणून मान्य होण्यासाठी चिकित्सेचा निकष लावून पारखून घ्यावा म्हणजे असा इतिहास नवा वाटला तरी मन विचकून जाणार नाही अशी खात्री आहे भरत-वर्षाच्या नामकरणाचा प्रस्तुत इतिहास अशाच प्रामाण्यावर आधारलेला आहे

## पूर्वघटितावरील नवे हेत्वारोप

जून १९७२ सालापासून माध्यमिक शाळेतील अभ्यासक्रम सुधारून शिकविण्याचा प्रयत्न होत आहे त्या निमित्ताने इतिहासाच्या अभ्यासाचे ध्येय विशद करून मागताना महाराष्ट्र सरकारने म्हटले आहे की ऐतिहासिक घटनाचा उल्लेख करताना भारताच्या लोकशाही समाजवादी समाजरचनेस पोषक अशी मनोवृत्ती घडविण्याच्या धोरणाचा पुरस्कार केला आहे. तसेच गेल्या दोन हजार वर्षात मानव जातीने निसर्गावर व मानव समाजातील अपप्रवृत्तीवर मात करण्याचे जे जे प्रयत्न केले त्याचाही परिचय या अभ्यासक्रमात मुद्दाम समाविष्ट केला आहे पूर्वकाळातील वैभवशाली परपरेचा यथार्थ परिचय झाल्याने, पुढील पिढीच्या मनावर प्रातभेद, भाषाभेद, जातिभेद, धर्मभेद निर्माण करून ती पोसवणाऱ्या अपप्रवृत्तींचा प्रभाव पडणार नाही उलट सामाजिक जीवनाला आवश्यक अशा प्रवृत्ती समजसपणा आणि राष्ट्रीय ऐक्य याची प्रेरणा निर्माण होऊन कल्याणकारी समाजस्थिती निर्माण करण्यात तो प्रवृत्त होईल आतर-राष्ट्रीय शाततेचा तो पुरस्कर्ता होईल अशी अपेक्षा व्यक्त केली आहे ही पुरस्कृत अपेक्षा सफल व्हावयाची असेल तर इतिहासाच्या सशोधनाची व लेखनाची पुढील पथ्ये पाळावी लागतील वरील मार्गदर्शनाला अनुसरून नवा इतिहास कसा लिहिला जावा या सदर्भात सरकारने सात उद्दिष्टे सागितली आहेत सध्याच्या आपल्या उदयकाळात इतिहासाच्या शिक्षणाला नवे वळण देण्याची आवश्यकता निर्माण झाली आहे भावी काळातील शिक्षणाबाबतच्या वाढत्या गरजा लक्षात घेऊन

अधिक परिणामकारी इतिहासाचा नव्याने अभ्यास करण्यास पुढील उद्दिष्टे उपयोगी ठरावीत–

१) आपल्या देशातील सामाजिक, राजकीय, आर्थिक व सांस्कृतिक पार्श्वभूमी समजावून देणे २) वर्तमानकाळाचे आकलन होईल अशा रीतीने भूतकाळाचा अन्वय लावणे ३) निकोप राष्ट्रवादाची भावना वाढीस लावणे. ४) जागतिक संदर्भात भारताचा इतिहास सांगून विश्वबंधुत्वाची आणि आतरराष्ट्रीय समजसपणाची भावना वाढीस लावणे ५) इतिहासाची वस्तुनिष्ठ भूमिका स्वीकारण्याची वृत्ती निर्माण करणे ६) राष्ट्रभक्ती व भावनात्मक ऐक्य याचा प्रादुर्भाव निर्माण करणे. आणि ७) मानव समाजाच्या प्रगतीवर सामाजिक, आर्थिक व राजकीय प्रवाहाचे कोणते परिणाम झाले याचा अभ्यास करणे

ध्येय, साधने व धोरण या त्रयीसबंधी वर जे सांगितले आहे त्यांपैकी इतिहासाचा दृष्टिकोण वस्तुनिष्ठ बनेल आणि राष्ट्रीय एकात्मभाव मनावर ठसेल असे लेखन करणे उपयुक्त होणार आहे यात विरोध असण्याचे कारणच नाही. आतरराष्ट्रीय समजसपणाही आवश्यकच आहे पण या गोष्टी साध्य होण्यासाठी नेमके काय करावयाचे ? आपणास हवी तशी घडविण्यास इतिहास काही भावी काळातील नववस्तू नव्हे इतिहास ही पूर्व काळातील घटना असते त्याचा अन्वयार्थ घटिताना अनुसरूनच लावावयाचा असतो जुना आकार मोडून हवा तसा नवा आकार द्यावा असे एखादे खेळणे नव्हे ते गतकाल कोणालाही परतविता येत नसतो Even the eternity itself cannot retrive the past time. म्हणून आपली मनोवाछिते इतिहासावर लादता येत नसतात

आतरराष्ट्रीय समजसपणा किंवा राष्ट्रीय ऐक्य निर्माण करता यावे म्हणून निरनिराळ्या मानवी समाजात अनेक कारणांनी झालेल्या वितुष्टाची फलिते दृष्टीआड कशी करावयाची ? आणि आपण काणाडोळा केला तरी ते झाकूनच राहील याची काय खात्री ? उलट ते इतर मार्गाने उघड झाल्यावर इतिहास-लेखनातील खोटेपणा सिद्ध होऊन अधिकच अविश्वास निर्माण होत असतो म्हणून इतिहासाच्या बाबतीत मन पूत लपवालपवी चालत नसते शिवाय स्वत.च अगीकारलेल्या वस्तुनिष्ठ भूमिकेला ते बाधक ठरते. ‘ इतिहास म्हणजे जेथे मानवी जीवनाचे अनेकविध प्रयोग झाले अशी एक प्रयोगशाळा आहे. ’ ही सर्वमान्य अशी शास्त्रीय दृष्टी मन पूत मार्गाने निर्माण करता येणार नाही आणि ती पोसवलीही जाणार नाही मग विशिष्ट हेतू मनात ठेवून इतिहास शिकविणे कसे शक्य आहे ? ‘ जे काही घडले ते असे आहे व जे घडू शकले नाही ते असे आहे ’ या वृत्तीने घटिताची यथार्थ कल्पना देऊन मग त्यातून कोणता बोध घ्यावा हे विशद करणे उपयुक्त आहे या वस्तुनिष्ठ बोध-विवरणातूनच हवा असलेला

समजसपणा व ऐक्यात्मक भावना निर्माण करता येतील खरा इतिहास वगळून किंवा आपणास हवा तेवढाच भाग स्वीकारून केलेला अभ्यास यथार्थ होऊ शकत नसल्याने त्या अभ्यासातील उद्दिष्टे सफल होणे शक्य नाही म्हणून इतिहासाच्या अभ्यासाचे शास्त्रीय वळण चुकवून चालणार नाही त्यामुळे इतिहासाचीच हानी होऊन सारेच मुसळ केरात जाईल ! !

थोडक्यात सरकारच्या किंवा कोणाच्याही त्या त्या काळी स्वीकारलेल्या धोरणानुसार इतिहासाला हवी ती नवी नवी वळणे देऊन सत्य इतिहासाला वगल देता येणार नाही तसे करणे योग्य तर नाहीच पण शक्यही होणार नाही कारण अशी धोरणेही व्यक्तीला व परिस्थितीला अनुसरुन पुन पुन बदलत राहतात. पण एकदा घडून गेलेला इतिहास पुन पुन कसा बदलता येणार ?

## समाजाभिमुखता

इतिहास समाजाभिमुख करावयाचा तर त्यासाठी वावग्या वळणाचीच काय गरज आहे ? केवळ राजाचा, राज्यकारण्याचा, राज्य मिळविणाऱ्याचा किंवा राज्याचा कारभार चालविणाऱ्याचा त्यानाच प्रिय वाटणारा वृत्तान्त त्याच्याच चाकोरीतून सागणे हे इतिहासाचे मुख्य अग नसावे कारण इतिहासाचा मुख्य विषय सामाजिक जीवन हाच आहे त्यामुळेच इतिहास समाजाभिमुख असावा. त्यात समाजाचा प्रगतीचा व स्थित्यतराचा विचारविनिमय असावा एके काळी समाज-जीवन व सामाजिक स्थित्यतरेही राजावरच आधारित होती हे खरे असल्याने त्या काळचा इतिहास तसाच सागावा लागेल ! आजच्या युगात राजाना किंमत उरलेली नसली तरी आजच्या लोकशाही युगातील मूल्यमापनाची तथ्ये, जेव्हा लोकशाहीची भावनाही निर्माण झाली नव्हती अशा राजेशाहीच्या युगाला लागू करणे गैर असून त्यामुळे विपर्यास निर्माण होईल !

एके काळी समाजच मुळी राजाभिमुख होता **‘राजा कालस्य कारणम्’** ही वस्तुस्थितीच होती **‘यथा राजा तथा प्रजा’** ही सर्वग्राह्य नीती होती. राजा बोले दळ हाले ही स्थिती फार दूरची नाही तेव्हा आज विसाव्या शतकात समाजाची प्रगती जनताप्रधान असली तरी ती तशी पूर्वकाळी नव्हती मग त्या पूर्वगत गोष्टीवर आता कोण काय उपाय करणार ? राजाभिमुख असलेला इतिहास जनताभिमुख ठरविता येणार नाहीच राजेशाही कालान्तराने जुलमी झाली तरी ती आरभापासून शेवटपर्यंत सदैव आणि सर्वत्रच तशी होती असे नव्हे विशिष्ट समाज व्यवस्थेतूनच जातीयता निर्माण झाली असली तरी तिला कालान्तरानेच कुजकी अवस्था प्राप्त झालेली दिसून येते झाडातील आंबा जसा पिकतो तसा कुजतोही म्हणून त्या फळाचा वृक्षावरील जन्मच कुजका होता असे का मानावे ?

हा इतिहासाच्या अभ्यासातील बोध-ग्रहणाचाच भाग आहे उपयुक्त किंवा उद्दिष्ट बोध घेण्यासाठी इतिहासाच्या मूळ घटनाकडे दुर्लक्ष करणे किंवा त्याचे वर्णन मन पूत करणे, अशा प्रकारच्या वृत्तीची व प्रवृत्तीची काय आवश्यकता आहे ? इतिहासाच्या शास्त्रीय स्वरूपाला दूषण लावून आपलीच वचना करून घेण्यात कोणताच उद्देश साध्य होत नाही

## भरत–संभ्रम

आपल्या देशाच्या नामकरणाच्या इतिहासाचाही असाच विशिष्ट हेतू मनात बाळगून मुद्दामच विपर्यय करण्यात येत असतो इतिहास-शून्य किंवा इतिहास-विरोधी दृष्टिकोण बाळगल्याचा तो एक दृश्य परिणाम होय भरत या संज्ञेतील भरत व्यक्ती दुसरी कोणतीही नसून ऋषभपुत्र भरतच आहे हे सूर्यप्रकाशाइतके स्पष्ट असताना केवळ लेखकाच्या उद्दिष्टामध्ये ते बसत नाही म्हणून दुसऱ्याच एखाद्या भरताचा आभास जाणीवपूर्वक निर्माण करण्यात येत असतो प्रयत्न करूनही दुष्यन्तपुत्र भरताचा हव्यास पुढे चालू ठेवणे जेव्हा अशक्य होते तेव्हा भरत नावाच्या एका आर्य टोळीचा लटका आधार स्वीकारण्यात येत असतो. त्या तथाकथित भरत टोळीचा प्रमुख सुदास असताना त्या सुदासाच्या नावानेच देश का ओळखला जाऊ नये ? किंवा ज्याच्यावरून त्या टोळीला भरत हे नाव पडले तो भरत मात्र अधारातच कसा ? किंवा केवळ सुदासासारख्या अन्य व्यक्तीच्याच पराक्रमाच्या आधारावर, ज्याचे व्यक्तित्वच स्पष्ट झालेले नाही अशा एखाद्या भरताला एवढे प्राधान्य का ? अशा प्रकारचे कधीच न सुटणारे अनेक प्रश्न दत्त म्हणून डोळ्यासमोर उभे राहत असतानाही त्याकडे दुर्लक्ष करण्याची भावना अट्टाहासाने का टिकवून धरावी लागते ? शिवाय महाभारतासारख्या मान्यवर ग्रथातील मानव वंशाचे विवरण करणाऱ्या अध्यायामध्ये स्पष्टपणे भरतवंश हा पुरुवंशापेक्षाही फारच नतरचा असल्याचा उल्लेख वारवार आढळतो ( आदिपर्व, अध्याय ९५, ७५ इ ) दुष्यताचा पुरुवश, त्यापूर्वीचा यदुवंश व नहुषाचा वंश इत्यादी अखड वशपरपरा मनूपासून किंवा त्याही पूर्वीच्या प्रजापतीपासून अतूटपणे उपलब्ध असतानाही तेथे मध्येतरीच सुदासाचा भरतवश अकालीच घुसडून देणे म्हणजे स्वत च्याच वशपरपरेचा विच्छेद करणे होय ! महाभारतात जो भरतवशाचा उल्लेख येतो तो दुष्यतपुत्र भरताच्या वशजानाच उद्देशून असतो अन्य भरतवश महाभारताला माहीत नाही उलट ऋषभपुत्र भरतासबधाने किती तरी सुसगत पुरावे उपलब्ध आहेत. ते अनिष्ट भावनेने न अगीकारता, स्पष्ट व समर्थ पुरावा उपलब्ध नसताही केवळ अपेक्षित अनुमानावर आधारलेल्या इतर भरत नावाचा हव्यास इतका दीर्घकाळ का टिकावा ? तसेच आपल्या अपेक्षित उद्देशाप्रमाणे हवे ते

अनुमान कल्पनेने तयार करून त्या निराधार अनुमानाला अनुसरून इतिहासाचे लेखन केल्यास सस्कारी जीवनाच्या दृष्टीने त्याला काय किंमत उरणार ?

## आपला सांस्कृतिक वारसा

**वैदिक आर्यांच्या टोळ्या भरतवर्षात** येण्यापूर्वी येथे जणू काही सास्कृतिक जीवन नव्हते किंवा इतिहास लिहिण्यासारखे काही घडलेच नव्हते अशा मताचे ढापणे डोळ्यावर ओढून **मूळ भारतीयांची** अवहेलना करणे स्वमताच्या हेतुपूर्तीस साधक वाटले तरी, आणि काही काळ जगाला चकविता आले तरी पूर्वेतिहास नष्ट होत नसतो. घुवडाने डोळे मिटले तरी सूर्यकिरणे काळवडत नसतात. कालप्रभावाने काही काळ ग्लानी निर्माण झाल्याने भारतीयाच्या जीवनाला ओहोटी आली होती त्यातच परकीय आक्रमणे झाल्याने त्यांचे जीवनतेज अधिकच मदावले ओजप्रद कार्य लुप्त झाले नवे शोध, नवी दृष्टी, नव्या विद्या इत्यादींच्या अवतरणाला वावच मिळाला नाही याचा फायदा घेऊन त्याचा जुना ओजस्वी इतिहास बुद्ध्याच बदलण्यात येऊ लागला सत्तेच्या व परिस्थितीच्या बळावर पूर्वघटिताची नोंद व त्याच्या जीवनयोगाची कल्पना विपर्यस्त माडण्यात येऊ लागली पूर्वज्योत तेवती ठेवली तर नव्या ज्योती चेतविण्यात सहज लाघवता लाभते स्वत चा पूर्वेतिहास हा असाच तेवत्या ज्योतीसारखा उपयुक्त असतो. म्हणूनच इतिहास-साधनेला अखड तेजोनिधीप्रमाणे महत्त्वाचे स्थान आहे. **नाभि-ऋषभ-भरतकालीन** ओजोनिधी तुमच्याच मालकीचा आहे त्याचे वारस आपणच आहोत परक्याप्रमाणे नव्हे तर मालकाप्रमाणे त्याचा स्वीकार करा

प्रत्येक सस्कृतीला इतिहास असतो आर्यपूर्व भारतीयाच्या इतिहासाच्या अभ्यासाने जीवन सुखी व समृद्ध करू शकणाऱ्या विद्यांचा विकास होतो **मानवी स्वास्थ्याला पुन. एकदा स्फुरण चढण्यासाठी मूळ भारतीयाचा इतिहास अभ्यासला पाहिजे.** जीवनश्रद्धेतील सशय, विमोह, विभ्रम व अज्ञान नष्ट होऊन यथार्थ ज्ञानाचा प्रकाश लाभेल! विजेच्या उद्‌गमापासूनच ओजाचा पुरवठा होतो त्याप्रमाणे **भरतकालीन संस्कृतीपासून चेतनेचा व स्फूर्तीचा लाभ होत राहील !** उलट स्वत च्या मूळ सस्कृतीविषयी उदासीनवृद्धी वाळगली तर मात्र फ्यूज गेल्याप्रमाणे मानवी व्यवहारात ग्लानी अवतरेल! जीवनाला नव्या क्षितिजावरील विज्ञाननिष्ठा व सस्कृतीनिष्ठा या दोहींची सातत्याने गरज आहे विज्ञानाने जीवनाला गती प्राप्त होते तर सस्कृतीमुळे स्वास्थ्य प्राप्त होते यापैकी एखादे तथ्य गमावले तरी सुख व समृद्धी सपुष्टात येतात केवळ विज्ञाननिष्ठेने सस्कृतिनिष्ठा नष्ट होते व स्वास्थ्य सपते उरतो तो केवळ विज्ञानातून अवतरलेला विनाश! दोन्हींची आराधना एकत्र व एकाच वेळी जमणे कठीण असले तरी त्याशिवाय गत्यंतरच नाही अशा आराधनेसाठीच पूर्वेतिहास उपयोगी पडतो

म्हणून जुना इतिहास आणता येईल तेवढा प्रकाशात आणावा. आपल्याच संस्कृतीची माहिती इतरांनी जशी सांगितली तशी निमूटपणे ऐकावी हा जीवनप्रसंग म्हणजे एक अद्भुत विनोद होय!

## स्वकीय इतिहासनिष्ठा

अतिदीर्घकालीन स्वास्थ्यामुळे राष्ट्रीय संरक्षणाच्याबाबतीत भरतप्रजेमध्ये बेभानवृत्ती इतकी साकळली होती की या भरताच्या भूमीवर परकीयांनी सुखेनैव आक्रमण केले, भटके वाटसरू म्हणून उत्तरेकडून उतरले, भाडले, स्थिरावले, सत्ता भोगली आणि मूळ संस्कृतीचा सत्यानाश आरंभून स्वच्छंद इतिहास निर्मिला. राजकीय सत्तेच्या बळावर स्वतःच्या उच्चतेचा व प्राकृत जनांच्या हीनतेचा प्रचार केला. तरीही भरतप्रजेची उपेक्षा वृद्धी व उदासीनता हटली नाही. गतवैभवाची जाण नाही, ओजस्वी वारश्याची चाड नाही, वर्तमानासंबंधी औत्सुक्य नाही, भविष्याचा वेध घेण्याची प्रेरणा नाही अशी असंजी दशा प्राप्त झाल्याने त्यांचे जीवित नगण्य ठरत गेले. इतिहास पुसला तर संस्कृतीची कथा खुटतेच! फलतः जीवन परसूत्री बनते. परकीयच पालक बनतात. त्यामुळे ओजाचा प्रवाह बंद पडून जीवनातील साहस, शौर्य, वीर्य, धैर्य, पराक्रम इत्यादी क्षेत्रातील ज्योती विझून जातात. हीच आपत्ती भरतप्रजेवर कोसळली व ती दीर्घकाळ टिकली. याच अंधारात विपरीत घडत गेले. मलावणीबरोबरच दक्षिणाही मिळविण्यासाठी कित्येकांनी परस्तुती आरंभिली. त्यामुळे खरा इतिहास प्रकाशात येऊच शकला नाही. पुढे स्वतःचा चरितार्थ चालविण्यासाठी लोकांच्या अज्ञानाला खतपाणी घालणाऱ्या पुरोहित वर्गाने अध्ययन-अध्यापनाची सारी मस्याच बळकावून ठेवली. प्रसंगी कार्यकारणमीमांसा करण्यासाठी इतिहास एक प्रभावी शस्त्र असल्यामुळे सत्ताधाऱ्यांनी व मतलबी साक्षरांनी त्या पूर्वेतिहासाचा परिहार बुद्ध्याच केला.

आता नव्याने ही प्रकाशज्योत पुन. प्रदीप्त करावयाची असल्यास इतिहासनिष्ठा आराविली पाहिजे. त्यामुळेच गत-जीवनातील विविध उन्नतशिखरे प्रतिभासित होतील. ओजाचे अनेक ओघ एकत्र मिळून व्यक्तिमत्त्व अधिकोत्तर क्रियाशील बनेल! श्रद्धा, ज्ञान व क्रिया एकाकार होऊन परिपूर्णता लाभेल. श्रद्धेचा प्रवाह मनोमालिन्य वाहून नेतो. ज्ञानाची ओजस्वी लाट जीवननौकेची दिशा गुणोत्कर्षाकडे वळविते. तर श्रद्धा-ज्ञानप्रणीत क्रिया जागतिक व मानसिक दुरित नष्ट करते, बल आणि पौरुष यांना चालना देते, सारे जीवन उजळून टाकते. स्वकीय इतिहासाचे ज्ञान सर्व सन्मानाचे, पराक्रमाचे, ऐश्वर्याचे आणि स्वाभिमानाचे मूलस्रोत आहे. स्वतःच्या उज्वल इतिहासाच्या विस्मरणाने परकीय प्रेरणा उसनी घ्यावी लागते आणि त्यातून अनेक अनिष्टे उद्भवतात. बौद्धिक

आनद झाल्याचा क्षणिक फायदा चटकदार भासला तरी समाजोन्नतीची व मानसिक उदात्तीकरणाची प्रक्रिया सावण्याची क्षमता परकीय प्रेरणेत सभवत नाही म्हणून स्वकीय इतिहासाच्या ज्ञानाची मातव्बरी मोठी आहे. इतिहासाचे प्रयोजन जाणले पाहिजे त्याशिवाय राष्ट्रीय जीवनाचा अभ्युदय प्राप्त करणे कठीण आहे स्वत चा पूर्वेतिहास व सद्य स्थिती आणि परकीयाचा प्राचीन व समकालीन इतिहास याच्या परिशीलनाने व तुलनेने जीवनदृष्टीमध्ये विशालपणा, बुद्धीमध्ये प्रगल्भता व वागण्यामध्ये विचक्षणता आणता येते. म्हणून प्राचीन भारताच्या इतिहासाच्या प्रत्येक अगाचा पद्धतशीर अभ्यास करून विकासाची सामग्री वाढविली पाहिजे



: ४ :

# भरतशोध

इतिहासप्रदीपेन मोहावरणघातिना ।
लोकगर्भगृहं कृत्स्नं यथावत्संप्रकाशितम् ।।

— महाभारत, आदिपर्व, १/६४

# ४ : भरतशोध

## नामकरणातील भरतनिष्ठा

वास्तविक या वर्षप्राय भूखण्डाला भरतवर्ष, भरतक्षेत्र, भरतखंड किंवा भारत हे नाव कोणत्या भाग्यवत राजाच्या कीर्तीला अनुसरून पडले आहे याचा निश्चय करणे आजमितीला अजिबात कठीण नाही कारण त्यासाठी आवश्यक भासणारे सर्व पुरावे बहुविध प्रमाणात उपलब्ध असून ते अगदी स्पष्ट व नि सदिग्ध आहेत भरत नावाच्या एका प्रसिद्ध राजाच्या कीर्तीने ही खण्डप्राय निवासभूमी नामाकित झाली आहे हे एक प्रतीत सत्य असून या भूमीचे नाव स्वत च अर्थवाही आहे त्यामुळे सर्व विद्वान ही घटना मान्य करतात पण भरताच्या व्यक्तित्वाबद्दल मात्र वेळोवेळी वादग माजतात या वावदूकपणामध्ये दुराग्रहच जास्त असतो कारण त्यात जो अर्थ स्पष्टपणे व्यक्त होतो तो कबूल करण्यात वैदिक परपरेचा अभिनिवेश नडतो मात्र त्याच परपरेतील पुराणे मुक्त कठाने भरताची व्यक्तिरेखा उद्घोषित करतात पण ते कबूल करण्यात वेदनिष्ठाच्या पायाखालची वाळू घसरते मग 'माझेच नाक वर' या अभिनिवेशाने सापडेल त्या भरत नावाला ते उरी कवटाळण्याचा प्रयत्न करतात पण तो त्याचा दत्तक वारसाही शेवटी अनिश्चित व निरुपयोगी ठरतो त्यामुळे त्याची वृत्ती पिसाळल्यासारखी होते अनेक भरत शोधून त्याना आपला वैदिक वारसा बहाल करण्याचा प्रयत्न करता करता ते आपलेच हसे करून घेतात

## 'वर्ष' संज्ञेची परंपरा

वास्तविक भरतवर्ष या नावावरील सस्कारात्मक वलयच मुळी अवैदिक आहे त्याचे स्वरूप जसे जैन परपरेत चपकळ बसते तसे इतरत्र जमत नाही

स्वराष्ट्राला किंवा निवासभूमीला वर्ष म्हणण्याची परंपरा वैदिक आर्यांच्या राजघराण्यात रूढ असल्याचे कोठेही दिसत नाही. पुराण या शब्दाप्रमाणेच वर्ष हा शब्दही संस्कृतमध्ये रूढ झाला असला तरी त्याला जो विशिष्ट अर्थ प्राप्त झालेला आहे तो प्राकृत परंपरेतूनच स्वीकारलेला आहे. नाभिवर्ष–भरतवर्ष ही परंपरा निश्चितपणे वैदिक आर्यांच्या आगमनापूर्वीची आहे. संस्कृतमध्ये हिमवर्ष इत्यादि नावे नंतरच्या काळातच रूढ झाली आहेत. त्यात निश्चितपणे अजनाभवर्ष-नाभिवर्ष-भरतवर्ष या परंपरेचे अनुकरण झालेले आहे.

## भरतवर्ष : अर्थाविष्कार

प्राचीन प्राकृत ग्रंथामध्ये 'भरह-वास' किंवा 'भारह-वास' असा उल्लेख येतो. यातील वास या शब्दाच्या मूळ अर्थाचा शोध घेणे आवश्यक आहे. 'भरतवर्ष' या त्याच्या संस्कृत पर्यायापासूनच त्याचा अर्थ लावण्याचा प्रयत्न आजवर झालेला आहे. परंतु भरतवर्ष हे पद Back formation च्या पद्धतीने रूढ झालेले आहे. अशी अवस्था पुष्कळ शब्दांची झालेली आढळते. उदाहरणार्थ 'वैताढ्य' हे एका पर्वताचे नाव. प्राकृत ग्रंथकार तो शब्द 'वेयड्ढ' असा वापरतात. त्याचा सरळ अर्थ विजयार्ध असा आहे. चक्रवर्तीच्या दिग्विजयाची ती अर्धी सीमा होय. अर्धचक्रीचे राज्य तेथपर्यंतच असते. म्हणून विजयार्ध हे नाव सार्थ आहे हे निराळे सांगणे नको. पण पुढे काही संस्कृत ग्रंथकारांनी वेयड्ढ शब्दाला पुन्हा संस्कृतभाषेचे रूप देऊन त्याचे वैताढ्य असे नवे रूप सांधले. पण हा नवा वैताढ्य शब्द उच्चारशास्त्रानुसारी असला तरी मूळ अर्थाचा निदर्शक ठरत नाही. याच कारणासाठी वास शब्दाचे पुन्हा संस्कृत रूपांतर वर्ष असे करणे तितके अर्थवाही होत नाही. वास याचा सरळ अर्थ निवास– निवासस्थान असा आहे. त्यावरून देश, राष्ट्र इत्यादी भूखण्डवाचक अर्थ निघतो. भरत शब्दाचे प्राकृत रूप भरह किंवा भारह आहे. प्राकृतत्वामुळे दीर्घादेश आला आहे. त चा ह होणे देखील उच्चारशास्त्रानुसारच आहे (वृति=विही; वसति=वसही. लूणवसही, विमलवसही इ.–प्राकृतप्रकाश, २/९). म्हणून भारहवास याचा सरळ अर्थ भरतवास म्हणजे भरताचे राज्य, भरताचा देश, भरताचे राष्ट्र असा आहे. पण मूळ वृद्ध्यादेश लक्षात न घेता काहीजण भारतवर्ष किंवा केवळ भारत असाही प्रयोग करतात. यामुळे आपल्या देशाला भरतवर्ष किंवा भारतवर्ष आणि भारत अशी दोन्ही अभिधाने रूढ झाली आहेत.

प्राकृत वास शब्द संस्कृत वर्ष शब्दावरूनही तयार करता येतो. वर्ष>वस्स>वास (अश्व>अस्स>आस प्रमाणे). पण भरतवासमधील वास शब्द वस् धातुपासूनच आला आहे. संस्कृतातील वर्ष शब्दापासून नव्हे. याकडे

दुर्लक्ष करता येत नाही तेव्हा भरतवर्ष यातील **वर्ष** याचा अर्थ वतन या अरबी शब्दासारखाच आहे वशपरपरागत चालत आलेली आपली हक्काची निवासभूमी किंवा निजमडळ वा स्वराष्ट्र असाच त्याचा अभिप्राय आहे तात्कालिक स्वीकारलेली किंवा दुसऱ्याच्या हक्काची किंवा दुसऱ्याकडून घेतलेली अशी परकीय भूमी नव्हे आक्रमित भूमीही नव्हे चक्रवर्तीची राज्यसीमा निश्चितच असते. त्याबाहेर त्याचे राज्य कधीही विस्तारलेले नसते आणि त्याची नियत मर्यादा कमीही करता येत नसते पूर्ण चक्रीची जन्मसिद्ध हक्काची निवास-भूमी, स्वदेश, स्वराष्ट्र असा **वर्ष** या पदाचा अर्थ सुनियत आहे नतर कालातराने कोणत्याही राजाचा परपरागत देश हा अर्थ झाला या **वर्ष** सज्ञेला समानार्थी दुसरा शब्द **विजय** असाही जैन साहित्यात आढळतो विजयार्ध आणि विदेहक्षेत्रातील ३२ चक्रवर्ति-विभागाच्या विजयान्त नामकरणामध्ये विजयपदातील जैन सस्कृती स्पष्ट जाणवते **मंगलावती–विजय, गधमालिनी–विजय** इत्यादी नामावळीसाठी जबूदीवपण्णत्ति ग्रथातील विशेषत· ८ वा ९ वा उद्देश पहावा

काही जैनेतर प्राकृत ग्रथामध्येही त्याचा उपयोग याच अर्थाने केलेला आढळतो इ सन ८०० च्या सुमारास लिहून पूर्ण झालेल्या **लीलावई** या प्राकृत महाकाव्यातही '**वास**' हा शब्द स्वत चे मूळ राज्य याच अर्थाने वापरला आहे ह्याचा कर्ता कोऊहल हा जैनेतर आहे–

**इय विविह-पयारं जक्खगणा आसीसिऊण णरणाहं।**
**णिय-णिय-वासाहुत्तं सव्वे ते उवगया झत्ति॥**

– लीलावई, १३१८

( **सप्त गोदावरी भीम** या प्रदेशात काही कारणाने आलेले ) यक्ष, गधर्व इत्यादी राजे आपापल्या **वासाकडे** गेले येथे **वास** याचा अर्थ स्वत चे मूळराज्य असा स्पष्ट आहे विशेषत यक्ष, गधर्व या योनीतील राजे दुसऱ्या भूमीवर आक्रमण करीत नाहीत त्याची स्वत ची भूमी नियत असते तेव्हा **वास** याचा दुसरा अर्थ सभवत नाही

राजकीय दृष्टीने या शब्दाकडे पाहावयाचे झाल्यास त्याचा अर्थ स्वभुक्ती–स्वत च्या उपभोगाच्या अधिकाराचा प्रदेश असा होतो मूलराज्य, स्वराष्ट्र, स्वराज्य इत्यादी पदावलीत प्रकारान्तराने याचा अर्थ विशद करता येईल **लीलावई** काव्याचा नायक राजा हाल हा स्वराष्ट्र ( अश्मक देश ) सोडून **सप्त-गोदावरी-भीम** या गोदावरीच्या मुखाकडील प्रदेशात गेला होता प्रवासाचा हेतू सिद्ध झाल्यावर तो आपल्या मूळ देशातील **पैठण** येथे येतो त्या सदर्भात त्याच्या स्वत च्या राज्यप्रदेशाला **स्वभुक्ति–प्रदेश** असे म्हटले आहे यक्ष-गधर्वादी

राजेही स्वभुक्ति-प्रदेशाकडेच गेले तेव्हा तेथे वास शब्द वापरला आहे. यावरून वास म्हणजे स्वभुक्ति–विषय हा अर्थ सुनिश्चित आहे–

**सिग्घयरं संपत्तो सभुत्ति-विसए पइट्ठाणं ॥**

– लीलावई, १३२२

खरे तर चक्रवर्तीच्या राज्यप्रदेशालाच वास किंवा संस्कृत अवगुंठनामध्ये वर्ष म्हणतात दुसऱ्या शब्दात वर्ष याचाच अर्थ चक्रवर्तीचे स्वतःचे राज्य भरत-क्षेत्रामधील सहाही खंडातील संपूर्ण भूविभाग. यापैकी पोदनपुरासारखा थोडासाही भाग चक्रीच्या राज्याच्या सीमेच्या बाहेर असू शकत नाही हा चक्रवर्तीच्या इच्छेचाही प्रश्न नसतो ही त्याच्या चक्ररत्नाचीच महती आहे समग्र वर्षातील ( विजयातील ) इंच-न्-इंच भूमी जिंकल्याशिवाय दिग्विजयाच्या कार्यक्रमापासून चक्ररत्न परावृत्त होऊच शकत नाही त्यामुळे दिग्विजयासाठी बाहेर पडलेल्या चक्रवर्तीला राजधानीमध्ये पुन प्रवेशच करता येत नाही अशी तात्त्विक बाब असल्याने 'वर्ष' या पदाची व्याख्याही तत्त्वशुद्ध व नियत आहे त्याच्या सीमा कधीही कमी किंवा जास्त होत नाहीत– करता येत नाहीत ! ! म्हणजेच वर्ष हा प्रत्येक चक्रवर्तीचा स्वभुक्तीच असतो स्वतःच्या राज्यप्रदेशाचा उल्लेख स्वतः भरत चक्रवर्तीनेही मद्भुक्ति असा स्पष्टपणे केला आहे–

**अहं हि भरतो नाम चक्री वृषभनंदनः ।**
**मत्साद् भवन्तु मद्भुक्तिवासिनो व्यंतरामराः ॥**

– महापुराण, पर्व २८/१२०

' मी वृषभपुत्र भरत चक्रवर्ती आहे म्हणून माझ्या राज्यामध्ये राहणाऱ्या व्यंतरदेवांनी (यक्षांनी) माझ्या स्वाधीन व्हावे' असा आदेश भरताने भरतवर्षातील सर्वच यक्षादिक निवासींना धाडला यावरून वर्ष म्हणजे चक्रवर्तीची स्वभुक्तीच असते हे उघड आहे

भागवतादिक पुराण ग्रंथामध्येही या संदर्भातील वर्ष हा शब्द याच पारंपरिक अर्थाने योजलेला आढळतो–

**तस्य हि इंद्र स्पर्धमानो भगवन्वर्षे न ववर्ष, तदवधार्य भगवान् ऋषभदेवो... ... स्ववर्षं अजनाभं नाम अभ्यवर्षत् ।**

–भागवत पु , ५/४/३

या ठिकाणी भगवन् वर्ष किंवा स्ववर्ष या पदाचा अर्थ स्पष्टपणे भगवानाचा (ऋषभनाथाचा) देश किंवा स्वराष्ट्र असाच आहे

पुढील अनेक ठिकाणी याच सदर्भात 'वर्ष' पदाऐवजी अवनी, भूमी, भूखण्ड इत्यादी राष्ट्रवाचक शब्द वापरलेले आहेत त्याच्या निरीक्षण-परीक्षणावरून वर सागितलेला 'वर्ष' पदाचा अर्थ समधिक स्पष्ट प्रतिभासित होतो

जिनसेन आचार्यांनी आपल्या महापुराणामध्ये या वर्षाभिधानाच्या नामकरणाच्या इतिहासाची नोद करताना या समस्त षट्खण्डात्मक क्षेत्रविभागाला भरतवर्ष याच अर्थाने स्पष्टपणे भरतावनी असे म्हटले आहे–

**यन्नाम्ना भरतावनित्वमगमत् षट्खण्डभूषा मही**

– महापुराण, ३७/२०३

विष्णुपुराणामध्येही भरतवर्ष याच अर्थाने भरतभूमिभाग अशा पदाची योजना केली आहे–

**गायन्ति देवाः किल गीतकानि**
**धन्यास्तु ते भारतभूमिभागे ।**

– विष्णुपुराण, २/६/२४

एकनाथी भागवतामध्ये तर भूमी आणि वर्ष ही दोन्ही पदे एकार्थवाची असून, शिवाय अशी भूमी ही राजाची प्रत्यक्ष निवासभूमी किंवा स्वराष्ट्रच होय असे स्पष्टातिस्पष्ट विधान आढळते–

**तो भरतु राहिला ये भूमिकेसी ।**
**म्हणौनि भरतवर्ष म्हणती यासी ।।**

– सार्थ एकनाथी भागवत, अ २/१४६

आणि नारदपुराणामध्ये तर भारताच्या अशा विशिष्ट भूविभागाचा अर्थ 'पितृ-पितामह-क्रमाने आपल्या वशपरपरेतून प्राप्त झालेले कुलराज्य' अशा शब्दामध्ये स्पष्ट केला आहे–

**स राजा प्राप्तराज्यस्तु पितृपितामहक्रमात् ।**

– नारदपुराण, ४८/६

पुढील कालखडामध्ये यालाच स्वराज्य अशी सबोधना प्राप्त झालेली स्पष्टपणे लक्षात येते

भरतवर्ष व भरतक्षेत्र या दोन सुविख्यात अभिधानाच्या खालोखाल भरतखड असा व्यपदेशही साहित्यात प्रचलित आहे. याचा अनुभव वरीलप्रमाणे केवळ प्राकृत-सस्कृतमध्येच नव्हे तर आधुनिक सर्व भारतीय भाषामध्येही अव्याहत येतो

प्रसिद्ध हिंदी कवी सूरदासांनी आपल्या सूरसागर ग्रंथात याच पूर्वनिद्दामाची नोंद पुढील पदात केली आहे–

**भरत सो भरत खण्ड को राव।**
**करे सदा ही धर्म अरु न्याव॥**

– सूरसागर, पचम स्कध, पान १५१.

आणि बनारसी विलासमध्येही वरील विधानाला शब्दश. त्याच सुरामध्ये साक्ष आढळते–

**भरत खण्ड के प्राणी जे ते।**
**प्रजा भरत राजा की ते ते॥**

– बनारसी विलास, ३८

## नामकरणातील संस्कृतीचे दर्शन

यावरून 'भरतवर्ष' या सज्ञेतील नामकरणाची परपरा अवैदिक असून ती प्राकृतप्रणालीशी निगडित आहे वर्ष आणि विजय हे दोन्ही शब्द जैन परपरेत एका विशिष्ठ अर्थाने वापरतात. चक्रवर्तीचे षट्खण्ड राज्य, चक्रवर्तीच्या दिग्विजयाची परिसीमा, एका चक्रवर्तीचा राज्यातील विशाल भूखण्ड, चक्रीच्या राज्याच्या विस्ताराचे एक परिमाण (Unit) अशा अत्यंत सुनिश्चित अर्थाने हे दोन्ही शब्द वापरतात विशेषत विदेहक्षेत्रातील चक्रवर्तीच्या ताब्यातील विशाल भूखडाला विजय शब्द वापरतात तर इतरत्र वर्ष शब्द वापरतात आणि ह्या सर्व कल्पना जैन सस्कृतीच्याच निदर्शक आहेत अशा प्रकारची कल्पना इतरत्र दिसून येत नाही म्हणून भरतवर्ष याचा अर्थ भरत चक्रवर्तीचा राज्यप्रदेश असा पारपरिक अर्थ असून त्यातील कल्पना निश्चितपणे अवैदिक आहे याच अर्थाने चक्रवर्तीच्या राज्याची सीमा दर्शविणाऱ्या मोठ्या पर्वताना वर्षधर पर्वत म्हणतात. ही कल्पना जैन सस्कृतीशिवाय इतरत्र कोठेही आढळत नाही.

याशिवाय वर्ष शब्द वृष् धातूपासूनही साधता येतो ज्या क्षेत्रविभागावर तीर्थकराच्या धर्मोपदेशाचा वर्षाव होत असतो तो प्रदेश वर्ष नावाने प्रसिद्ध आहे तीर्थंकराच्या धर्मचक्र-परिवर्तनाचा क्षेत्रविभागही निश्चित ठरलेला असतो असा वर्षाव प्रथमत आदिनाथानी केला म्हणून त्याना वृषभ असेही म्हणतात तीर्थंकरांच्या विहाराची क्षेत्रमर्यादा नियमित (षट्खण्डात्मक) समजण्याची पद्धतसुद्धा खास जैनाचीच आहे अशी प्रणाली वैदिक परपरेत कोठेच दिसत नाही राजाच्या नावाने नगरे वसविणे किंवा एखाद्या छोट्या प्रदेशाला प्रसिद्ध राजाचे

नाव देणे अशी पद्धत वैदिक परपरेत रूढ होती (महाभारत, आदिपर्व, ६३/२८ ते ३२) पण तेथे अगर इतरत्र कोठेही विशिष्ट भूखण्डाला किंवा राज्यप्रदेशाला **वर्ष** असे नामाभिधान मिळालेले दिसत नाही **मानववर्ष, हिमवर्ष** असे शब्दप्रयोग साहित्यात आढळतात पण ते पश्चात्कालीन आहेत त्यात केवळ भरतवर्षाचे अनुकरण दिसते कारण त्यामध्ये भौगोलिक मर्यादाचे सीमाकन मुळीच नाही. त्यामुळे अतिव्याप्ती व अव्याप्ती असे दोन्ही दोष सभवतात।

## महाभारतातील 'भारत' संज्ञा

दुष्यन्तपुत्र **भरताच्या** वशजाना **भारत** म्हटले आहे. आणि या देशाचे नाव **भारत** आहे म्हणून त्या दोन्ही नामपदाचा सपर्क साधण्याचा काहीजण प्रयत्न करतात पण तो ऐतिहासिक सत्य ठरु शकत नाही **महाभारत** ग्रथात सर्वत्र **भारत** हा शब्द वशवाचकच आहे कोठेही तो शब्द देशवाचक नाही शिवाय तो या वर्षप्राय देशातील सर्वच लोकाना उद्देशून कधीही वापरलेला नाही भारत-वशावरोबर इतर अनेक वश त्याचवेळी तेथे विद्यमान होते इतकेच नव्हे तर ते सर्व भरतवर्षातच राहात होते त्या पूर्वीचे पुरु इत्यादी वशसुद्धा भरतवर्षातच राहात होते म्हणजे **भरतवर्ष** हे नाव त्या वशातील लोकापेक्षा फार प्राचीन आहे म्हणून कोणत्याही प्रकारे आपणास कालविपर्यय करता येणार नाही **सुदासाच्या** आर्य टोळीतील लोकाना **भरत** म्हणत असत तोही एक वश असावा. त्याच्यापासून **भारत** ही सज्ञा साधण्यासाठी काहीजणाना वाटते की राष्ट्राची नावे व्यक्तीवरून पडत नसतात, तर ती वशावरूनच पडतात पण हेही म्हणणे खरे नाही कारण **आदिपर्वातील** ६३ व्या अध्यायावरून प्रदेशाना नावे ही व्यक्ती-वरूनही पडतात हे उघड दिसून येते शिवाय वशाची नावेही मूलत व्यक्तीवरून पडलेली असतात भारतवश दुष्यन्तपुत्र भरतापासून रुढ झाला आहे **पुरुवश** वा **पौरववश** ही पुरुराजापासूनच प्रचलित झाला त्याचप्रमाणे **कुरुवंश** व **कुरुदेश** ( कुरुक्षेत्र ) ही नावे कुरु या प्रसिद्ध राजापासूनच प्रचलित झाली म्हणून **भारत** हा शब्द प्राकृत **भारह** या पदावरून आलेला आहे हे निश्चित ठरते.

## व्यक्तिवाचक राष्ट्राभिधान

प्राचीन काळापासून ऐतिहासिक काळापर्यंत व्यक्तीच्या नावावरून देशाला ओळखण्याची पद्धत अखडित आहे ही गोष्ट अमेरिका इत्यादी दुसऱ्या खडातील अनेक देशाकडेही पाहिल्यास सहज लक्षात येईल—

**'अमेरिकस् वेस्पुशियस'** ( १४५१–१५१२ ) या **इटालियन** सागरी व्यापाऱ्याच्या नावावरून आजच्या अमेरिकेला **अमेरिका** असे

म्हटले जाऊ लागले. त्यावेळी नव्यानेच शोध लागलेल्या या देशाचा आराखडाही त्यानीच पहिल्यांदा तयार केला होता त्यानी नवीन जगातील ( अमेरिकेतील ) अटलांटिक-किनारा वगैरे प्रदेशाचा शोध लावला. या घटनेचा युरोपात व्यापक प्रमाणात प्रसार झाला. म्हणून जर्मन भूगोलकार मार्टिन वाल्डसीमूलर यानी १५०७ मध्ये अमेरिकस् यानी या प्रदेशाचा शोध लावल्यामुळे या प्रदेशाला "अमेरिका असे नाव देण्यात यावे" अशी सूचना केली त्यावेळी त्या कल्पनेचे सामान्यत. स्वागत केले गेले.'

— अमेरिकन वार्ताहर, मे १९, १९८२.

## सायणभाष्यातील अर्थसंभ्रांती

हिंदूच्या साहित्यिक परपरेला अनुसरून निश्चित असा एकच नव्हे तर भरत नावाचे अनेक राजे होऊन गेले (१) दुष्यंतपुत्र भरत हा कालिदासाच्या शाकुंतल नाटकामुळे जास्त प्रसिद्ध व विख्यात आहे नाटकाच्या प्रतिष्ठेमुळे या सर्वदमन भरतालाही एक प्रकारची प्रतिष्ठा नव्याने मिळाली ती प्रतिष्ठा जणु काही आणखी वाढविण्यासाठीच लोक एकाएकी याचा सबध भरतवर्षाच्या नावातील भरत राजाशी जुळविण्यात अभिमान वाळगू लागले सामान्य जनाची कथा सोडा पण डॉ. वासुदेवशरण अग्रवाल या दर्दी इतिहासकाराने सुद्धा आपल्या " भारत की मौलिक एकता" या ग्रथातील पान २२–२४ वर अशाच अर्थाचे विधान एकेकाळी केले होते अर्थात् या चुकीला देखील ऋग्वेदावरील सायणभाष्यातील–

'हे अग्नेय ! त्वा भरतो दौष्यन्तिरेतत्सज्ञको राजा वाजिभिर्वाजो हविर्लक्षणमन्नै तद्वद्भि ऋत्विग्भिः सह द्विता– इष्टप्राप्त्यनिष्टपरिहार द्विविधरूपेण शुनं मुखमुद्दिश्य ईडे स्तुतवान् ।'

या पदावलीचा आधार होता यात भरताचा परिचय दुष्यतपुत्र (दौष्यन्ति) असा करून दिला आहे पण ह्याचा सदर्भ भरत वर्षाच्या नावाकडे मुळीच नाही हा भरत शब्द देशवाचक नाही दुष्यतपुत्र भरताच्या नावावरून या देशाचे नाव रूढ झाले असा अर्थ काढण्यासाठी हा आधार असमर्थ आहे शिवाय अग्नि-पुराणादिक प्राचीन साहित्यातील इतर अनेक विधानाशी असा अर्थ सुसगत नाही तेथे भरतवर्षाच्या नावाच्या सदर्भातील भरताचा परिचय अगदी स्पष्ट शब्दात ऋषभदेवाचा ज्येष्ठ पुत्र असा करून दिला आहे त्यावरून भरतवर्षाच्या नामाभिधानाचा अधिष्ठाता दुष्यन्तपुत्र नव्हे हे उघड आहे म्हणूनच डॉक्टर

अग्रवालांनी आपली चूक नंतर स्पष्ट शब्दात सुधारली आहे ( मार्कण्डेयपुराण : सांस्कृतिक अध्ययन, पान १३८, पदटीपा )

## महाभारतातील संदर्भाचे विवरण

आपल्या देशाचे नाव भरतवर्ष असेच आहे भारत हा देशवाचक शब्दप्रयोग भारह या प्राकृत प्रयोगावरून प्रचलित झाला आहे महाभारतातील वंशवाचक भारत या शब्दाचा व वर्षवाचक भारत या संज्ञेचा परस्पर काहीच संबंध नाही दुष्यंतपुत्र भरताच्या ( सर्वदमनाच्या ) वंशजाच्या कुळालाच फक्त भारतकुल किंवा भारतवंश म्हटले आहे या वर्षप्राय देशातील सर्व रहिवाश्यांना उद्देशून भारत असे कोठेच म्हटलेले नाही किंवा सर्वदमन भरताच्या अगर भारतवंशाच्या कीर्तीवरून या देशाला नामाभिधान प्राप्त झाल्याचा स्पष्ट किंवा अस्पष्टही उल्लेख संबंध महाभारतात कोठेही नाही शिवाय ऋषभपुत्र भरत आणि दुष्यंतपुत्र भरत यांच्या नामकरणाच्या विधीमध्ये व अर्थामध्येही फार मोठा फरक आहे ऋषभपुत्र हा सर्वांचे भरण-पोषण करणारा खरा प्रजापाल असा नावानुरूप भरत आहे जो सर्वांचे भरण करतो तो भरत ही निरुक्ती ऋषभपुत्राच्या संदर्भातच योग्य ठरते

> इति प्रमोदमुत्पाद्य पुरे सान्तःपुरे परम् ॥ १५७ ॥
> प्रमोदभरतः प्रेमनिर्भरा बंधुता तदा ॥ १५८ ॥
> इत्यानंद परंपरां प्रतिदिनं संवर्धयन् स्वगुणैः ।
> पित्रोर्बन्धुजनस्य च प्रशमयँल्लोकस्य दुःखासिकाम् ॥
> नाभेयोदयभूधरादधरितक्षोणीधरादुद्गतः ।
> प्रालेयांशुरिवाबभौ भरतराड्भूलोकमुद्भासयन् ॥ २२२ ॥
> गुरुभारं वोढुं क्षमायाः क्षमः ॥ २२३ ॥

— महापुराण, पर्व १५.

महापुराणान्तर्गत १५ व्या पर्वातील या काही ओळी ऋषभपुत्राच्या भरत या नावाची सार्थकता सिद्ध करण्यास पुरेशा आहेत त्याच्या जन्मामुळे आणि अस्तित्वामुळे सगळीकडे आनंदाची उधाण-भरती आली होती नगरात, अंतःपुरात बन्धुवर्गात त्याच्या दर्शनाचा आनंद भरून ओसंडत होता आपल्या जनकासह त्या सर्वांचा तो आनंद आपल्या गुणाच्या बळावर भरताने प्रतिदिनी दुणावून दाखविला. एका आनंदातून दुसऱ्या आनंदाला बहार येत होता सर्वांची दुःखे शमली त्याच्या गुणकिरणाचा प्रकाश सर्वत्र फाकला आणि या पृथ्वीच्या पालनाचा भार वाहण्यास तो समर्थ ठरला सर्वदमन भरताशी तुलना केली तर ही स्थिती किती वेगळी आहे हे स्पष्ट जाणवल्याशिवाय राहणार नाही याच ग्रंथात नव्हे तर इतर सर्वत्रच यात सुसंगती आढळते—

**भरतानंदनं नंदा नंदनं चक्रवर्तिनम् । भरताख्यं.....**

हरिवंश पुराणातील (९/२१) ह्या ओळीची साक्ष पुरेशी आहे यावरून भागवत पुराणातील (५/५/२०) 'भरण प्रजानाम् ।' ही निरुक्ती ऋषभेय भरताला शास्त्रशुद्ध लागू होते।

पण दुष्यंतपुत्राच्या बाबतीत ऋषभपुत्रासारखी नावाची सार्थकता नाही कारण या नावाच्या पाठीमागे जी भूमिका आहे ती भरण-पोषण करणाऱ्याची नसून पोषित-पालिताचीच आहे तेथे भरण-पोषण करणारा राजा दुष्यंत आहे. तर सर्वदमन हा अस्वीकृत पुत्र असून केवळ पालनाच्या अपेक्षेने शकुंतला त्याला घेऊन दुष्यंतासमोर उभी आहे म्हणजे खऱ्या अर्थाने तो भरत नसून भर्तव्य आहे

**भरस्व पुत्रं दुष्यन्त मावमंस्थाः शकुंतलाम् ।। ११ ।।**
**तस्माद् भरस्व दुष्यन्त पुत्रं शाकुंतलं नृप ।। १३ ।।**
**शाकुंतलं महात्मानं दौष्यन्ति भर पौरव ।**
**भर्तव्योऽयं त्वया यस्मादस्माकं वचनादपि ।। १४ ।।**
**तस्माद्भवतु अयं नाम्ना भरतो नाम ते सुतः ।। १५ ।।**

—आदिपर्व, ७५/११ ते १५

या आकाशवाणीवरून शकुंतलापुत्र पूर्वी सर्वदमन नावाने ओळखला जात होता तरी त्याचे भरत हे दुसरे नाव कसे पडले याचा वृत्तांत समजतो या वर्षप्राय देशाच्या नामकरणाचा काहीही संबंध येथे नाही. पण पूर्वीचा त्याचा पुरुवंश मात्र त्याच्या कीर्तीवरून नामांतरित झाला त्याच्या कुलाला भरतकुल असे नवे नाव प्राप्त झाले आणि त्याचे वंशज भारत नावाने प्रसिद्ध पावले पण हा देश नव्हे शिवाय फक्त भरताच्याच वंशजांना भारत म्हटले आहे, इतर वंशजांना नव्हे त्याचवेळी दुसरे कित्येक वंश व वंशावळी विद्यमान होत्याच शेवटपर्यंत त्या स्वनामख्यातच राहिल्या.

भारत हा व्यपदेश महाभारतामध्ये सर्वत्र वंशवाचकच आहे. ते फक्त कुलाचे अभिधान आहे, देशाचे वा राष्ट्राचे मुळीच नव्हे—

**शकुंतलायां दुष्यन्ताद् भरतश्चापि जज्ञिवान् ।**
**यस्य लोकेषु नाम्नेदं प्रथितं कुलम् ।।**

—आदिपर्व, २/९६

**प्रणष्टं भारतं वंशं स भूयो धारयिष्यति ।**

—आदिपर्व, ६७/२४

त्वद्भक्त्या तु भजिष्यामि प्रख्यातं भारतं कुलम् ॥

— आदिपर्व, ९७/१२

भरताद् भारती कीर्तिर्येनेदं भारतं कुलम् ।
अपरे च ये पूर्वे वै भारता इति विश्रुताः ॥

— आदिपर्व, ७४/३१

दुष्यन्ताद् भरतो जज्ञे विद्वान् शाकुतलो नृपः ।
तस्माद्भरतवंशस्य विप्रतस्थे महद्यशः ॥

— आदिपर्व, ९४/१९

या देशात भरतवशाशिवाय दुसरे अनेक वश स्वनामख्यात असून ते सर्व एकाच वेळी येथे विद्यमान होते (आदिपर्व, ७५/१ व २) तेव्हा भारत याचा अर्थ या देशातील सर्व नागरिक असा मुळीच होत नाही

शिवाय सर्वदमन भरत हा चक्रवर्ती किंवा सम्राट झाल्यामुळे काही विशेष व नवीन घडले असेही नाही पूर्वी त्याच परपरेत पुष्कळ सम्राट होऊन गेले आहेत (आदिपर्व, ७५/३२) नहुष, ययाति, जनमेजय हे सर्व विश्वविजयी सम्राट होते (आदिपर्व, ९५/११) अयुतनायी देखील तितकाच मोठा राजा होता त्याने तर अयुतवेळा पुरुषमेध केला (आदिपर्व, ९५/२०) सर्वदमन भरताचे वडील दुष्यन्त स्वत ही अखिल भूमीचे अधिपती होते (आदिपर्व, ६८/३,४ व ५) या सर्वांपेक्षाही मनु व पुरु अतिश्रेष्ठ व कीर्तिसपन्न होते मानव वश मनूपासूनच प्रचलित झाला असे मानतात तर पुरूचा वंशही अतिविशाल कीर्तीचा म्हणून प्रख्यात आहे पण त्या सर्व नावावरून फक्त वशनामे रूढ झाली देशनामाशी या कोणाचाही सबध नाही या सर्व प्रजेला दक्षप्रणीत म्हटले आहे ( दक्षादिमा. प्रजा. । आदिपर्व, ७५/५ ) पण त्याचेही नाव या भूमीला कधी प्राप्त झाले नाही कारण या सर्वांचे वास्तव्य भरत वर्षातच होते भरत वर्षाचे नामकरण वरील सर्वांपेक्षा फारच प्राचीन आहे म्हणून सबधित भरत इतर सर्व भरतराजापेक्षा प्राचीनतम आहे

भरह-सगर-माहव-णल-णहुस-मंधाइ-दिलीमप्पमुह-
सव्वधरामंडल-पत्थिवसत्थ ।

— कुवलयमाला, पान १५/११

सर्वधरामडल किंवा सार्वभौम राजेश्वराच्या या क्रमवारीतही नल, नहुष इत्यादी सर्व सम्राट भरतानतरच नोंदलेले आहेत शिवाय या यादीमध्ये आदिम

स्थान भरह–भरत यानाच दिले आहे सगर, नल, नहुष इत्यादींच्याही पूर्ववर्ती असणारा हा भरत शकुंतला-दुष्यन्त-पुत्र असणे कदापि संभवत नाही

ऋषभपुत्र भरताचे जीवित जितके स्पष्ट, ठळक व सुनिश्चित आहे तितके दुष्यन्तपुत्र भरताचे नाही. त्याच्या जीवित घटनामध्ये अनेक ठिकाणी अस्पष्टता आहे विशेषत त्याचे नाव, त्याच्या भार्या, त्याचे पुत्र व उत्तराधिकारी या बाबतीत माहिती पुष्कळच त्रुटित आणि विसंगत आहे त्यामुळे त्या दोन व्यक्तीतील फरक स्पष्ट जाणवतो केवळ नामसादृश्यामुळे त्या दोन व्यक्तित्वामध्ये संभ्रम होण्याचे कोणतेच कारण उरत नाही, आणि तशी शक्यताही नाही. ठळक फरक पाहिल्यास एका दृष्टिक्षेपात त्याच्यामधील भिन्नत्व जाणवेल—

| | ऋषभपुत्र भरत | दुष्यंतपुत्र भरत |
|---|---|---|
| १) काल– | अंतिम मनू | मनूनतर फारच पश्चात्कालीन |
| २) वंश– | सर्वप्रथम वंश | पूर्वीचे अनेक वंश |
| ३) बंधुसंख्या– | १०० बंधू | कोणी नाही |
| ४) नाम– | निश्चित एकरूपता | विविधता–<br>सौद्युम्नि (शत ब्रा १३/५/४/१०)<br>दमन (भागवत पु ९/२०)<br>सर्वदमन (महाभा, आदि ७४/८)<br>भरत (महाभा, आदि ७५/१५)<br>( ,, ,, ९४/१९) |
| ५) पुत्रसंख्या– | सुनिश्चित | अनिश्चितता |
| ६) उत्तराधिकारी– | स्वत चा ज्येष्ठपुत्र अर्ककीर्ती | दत्तकपुत्र |
| ७) जीवित घटना– | सुसंगत | त्रुटित |
| ८) आयुष्य– | निश्चित कालखंड | विविध मतप्रणाली |

(२) दशरथपुत्र भरताने तर जो राज्य कारभार केला तो वडील बंधू रामचंद्र याच्याच नावाने केला असल्याने भारतातील वर्षाधिपतीच्या यादीत त्याचे नाव अंतर्भूत झालेलेच नाही आणि (३) नाट्यशास्त्रप्रसिद्ध भरत तर उघडच भरतमुनी म्हणून प्रसिद्ध आहे, राजा म्हणून नव्हे

## आर्य टोळीतील भरत व्यपदेशाचा परामर्श

अशा रीतीने भरत नावाच्या इतर सर्व राजाची नामावली निकालात निघाल्याने ऋषभपुत्र भरताशिवाय दुसऱ्या कोणत्याही परंपरेतील इतर भरताचाच

व्याम घेतलेल्या वेदनिष्ठानी (४) आर्य टोळीतील एका भरत व्यपदेशाचा आधार घेण्याचा आणखी एक पोरकट प्रयत्न केला आहे–

"भरत टोळीच्या सुदास राजाने या (दाशराज्ञ) युद्धात अन्य राजाचा पराभव केला सुदास विजयी झाला आणि त्याने सारा उत्तर भारत व्यापला उत्तर भारत आर्यावर्त झाला पण सरते शेवटी भरत लोक विजयी झाले भरताच्या या देशभरच्या प्रभुत्वामुळेच या देशाला 'भारत' किंवा 'भरतवर्ष' हे नाव पडले प्राचीन वाङ्मय चाळीत असताना आर्यांच्या वसाहती ज्या प्रदेशात झाल्या त्यांचा उल्लेख मिळतो."

– अभिनव इतिहास, इयत्ता आठवीसाठी. पुणे १९६९, पान ७८

ही किंवा अशाच प्रकारची विधाने वारवार प्रसिद्ध करण्यात येतात या वरील विधानाप्रमाणेच व्यक्तिपुरस्सर व विसगत अशा तर्कांना व अनुमानांना शिक्षण सस्थेतील पाठ्यक्रमातही स्थान मिळते आणि अजाण मुलावर अप्रामाणिक सस्कार होत राहतात याकडे सरकारचे अगर इतराचे असावे तितके लक्ष असत नाही हे आपले दुर्दैव होय वरील विधानातील तथ्यातथ्याची चिकित्सा करणे कठीण नाही—

१) त्याच अभिनव इतिहासामध्ये पान ७६–७८ वर आर्य हे भटके होते, टोळीवाले होते आणि त्यानी भारतात येऊन वसाहती स्थापन केल्या ते आपसातही भाण्डत असत केवळ पोटासाठीच येथे आले दाशराज्ञ युद्धात त्याना मोठा विजय मिळाला इत्यादी वृत्तात सविस्तर माडला आहे यावरून आर्य हेही परकीय आक्रमकच होते हे सिद्ध करण्यास दुसरा पुरावा नको आहे

२) टोळीवाले आर्य एतद्देशीयापेक्षा श्रेष्ठ नव्हते ते केवळ पोटासाठीच भटकणारे होते दाशराज्ञ युद्धात त्याना जो जय मिळाला तो येथील प्रादेशिक दहा राजाच्या मदतीनेच नतरच त्याचे भटके जीवन सपले याचा स्पष्ट अर्थ वैदिक आर्यांच्या आगमनापूर्वीच येथे राज्यसस्था नादत होती येथील मूळ रहिवाशी आर्यांप्रमाणे भटके व सस्कृतिशून्य किंवा हीन जीवन जगणारे नव्हते त्याचे जीवन सुसस्कृत होते. ते सामाजिक सस्था चालविण्यास पात्र होते

३) आर्य भारतात आले व त्यानी भारताचा उत्तर भाग व्यापला म्हणजे ते येण्यापूर्वीच या भूमीचे नाव भरतवर्ष असे सर्वश्रुत होते या भरतवर्षामध्ये जेथे जेथे आर्यांच्या वसाहती दृढमूल झाल्या त्यापैकी काही प्रदेशाना त्यानी स्वत ची नवी नावे नतरच्या काळी प्रचलित केली ती आर्यावर्त, ब्रह्मावर्त अशा

निराळ्या स्वरूपाची होती भरतवर्ष पद्धतीच्या नावाशी त्याचे सानिध्य नाही. त्यातील सांस्कृतिक धारा मूलत वेगवेगळ्या आहेत

४) ज्या आर्य राजाने दाशराज्ञ युद्ध जिंकले त्याचे नाव सुदास आहे तर त्याच्या टोळीचे नाव भरत आहे म्हणजे हा भरत कोणी राजा नव्हता आणि सुदास या राजावरून या भूमीस नाव पडलेले नाही शिवाय इंद्राने वृत्राचा पराभव करण्याच्या अगोदर एतद्देशीय मोठ्या राजाचा पराभव झाला नव्हता आणि वैदिक आर्यांना पूर्ण जय मिळाला नव्हता हाही उल्लेख ऋग्वेदात स्पष्टपणे पाहावयास मिळतो म्हणून सुदासने ही भूमी जिंकली हे विधान निकषावर टिकत नाही येथील मूळचा राजा व वैदिक आर्यांचा बलाढ्य शत्रू वृत्र हाच होता त्याचा पराभव सुदासने केलेला नाही म्हणजे सुदास किंवा त्याच्या भरत टोळीने हा देश जिंकला या विधानाला अर्थ उरत नाही आणि इंद्रासारख्या बलाढ्य विजेत्याचे नाव विख्यात असताना या भूमीला भरत टोळीच्या लोकांचे सामुहिक नाव प्राप्त होणे अप्रशस्तच नव्हे तर अशक्य आहे शिवाय इंद्राचेही नाव या देशाला प्राप्त झालेले नाही हे उघड सत्य आहे महाभारतातील भरतवंशीय लोकांचा काल दुष्यन्तपुत्र भरताच्या पश्चात्कालीनच आहे दुष्यन्ताच्या अगोदर भरतवंश अस्तित्वात असल्याचा उल्लेख महाभारतात तरी नाही. अन्यत्रही आढळलेला नाही. महाभारतातील आदिपर्वामध्ये वंशावतरण व वंशविवरण मोठ्या प्रमाणात दिलेले आहे प्रारंभ तर प्रत्यक्ष प्रजापती व मनूपासून झालेला आहे पुरू, यदू इत्यादिक मोठमोठ्या वंशांची माहिती तपशीलवार दिली आहे त्यात भरत-वंशाचा जो उल्लेख आहे तो निश्चितपणे पुरुवंशीय दुष्यन्त राजाच्या नंतरचा असून तो भरत वर्षाच्या नामकरणकालाच्या मानाने फारच अर्वाचीन आहे। दुष्यन्त स्वत पुरुवंशातील अठराव्या पिढीत जन्मला असून पुरुवंशापूर्वीही कित्येक वंश विख्यात होतेच पण त्यामध्ये दुसरा एखादा वैदिक भरतवंश निश्चितपणे आढळत नाही आणि पूर्वीच्या वंशकर राजांपैकी कोणाचेही नाव या भूमीला देण्यात आलेले नाही हेही स्पष्टच आहे

## ‘भरतानाम्’ या पदाची चिकित्सा

आदि पर्वातील ६८ व्या अध्यायामधील कुरुवंशकीर्तनामध्ये दुष्यन्त राजा पुरुवंशाचा वंशकर होता असे स्पष्ट म्हटले आहे (श्लो ३) मग भरताच्या जन्मापूर्वी, भरतवंश अस्तित्वात नसताना, या भूमीचे नाव काय असावे हा प्रश्न सहजच निर्माण होतो येथे आदित्य, पुरु, पौण्ड्र इ अनेक वंशातील लोक राहात होते, राजे, महाराजेही होते, सार्वभौम होते, चक्रवर्तीही होते दुष्यन्ताने देखील सर्व भूमी पादाक्रान्त केली होती (आदिपर्व ६८/३) पण त्यांपैकी कुणाचेही नाव या भूमीला देण्यात आलेले आढळत नाही त्या त्या कुलपुरुषांपासून विविध

कुल-नावे मात्र रूढ झाली वशनामावरून राष्ट्राला नाव देण्याची पद्धत महाभारताच्या परंपरेत प्रचलित नाही तेव्हा ऋग्वेदातील भरत शब्दाच्या अनेकार्थी पदावरून निश्चित असे कोणतेही विधान करणे कठीण आहे मात्र महाभारतातील (आदिपर्व ६२ इ) 'भरतानाम्' हे पद त्याच्या अर्थाची निश्चिती करण्यास नि सशय मदत करते तेथे त्याचा अर्थ वंश असाच आहे पण तो वश प्रारभकालीन नसून दुष्यन्तपुत्र भरताच्या नतरचा आहे हाच अर्थ वेदातील याच व्यपदेशाच्या पदाना लावता येईल काय ? या बाबतीत पुढील काही उल्लेखाकडे लक्ष वेधल्याशिवाय राहात नाही—

भरतानां महज्जन्म शृण्वतामनसूयताम् ।
नास्ति व्याधिभयं तेषां परलोकभयं कुतः ।। २६ ।।
भरतानां महज्जन्म महाभारतमुच्यते ।। ३९ ।।
भरतानां यतश्चायमितिहासो महाद्भुतः ।। ४० ।।

— आदिपर्व ६२/२६,३९,४०

या सर्व चिकित्सेवरून हेच सिद्ध होते की—

"भरताच्या या देशभरच्या प्रभुत्वामुळेच या देशाला 'भारत' किंवा 'भारतवर्ष' हे नाव पडले"

या विधानातील अनुमानाला कोणताही आधार नाही त्यात पूर्वापर सुसगती नाही केवळ 'भरत' या ध्वनीमुळे निर्माण झालेला तो एक भ्रम आहे

## डॉ. अग्रवाल यांचा भ्रमपरिहार

भरत-आर्य परकीय आक्रमकच असून त्याचा काल केवळ इ सनपूर्व २००० वर्षाच्या जवळपासचा आहे या भूमीचे भरतवर्ष हे नाव त्याहून फारच प्राचीन आहे भरत-आर्यांच्यामुळे या देशाला नवे नाव प्राप्त झाले असे विधान आर्यप्रणीत अगर इतर कोणत्याही ग्रथात आढळत नाही. तेव्हा असा हट्ट हा केवळ दुरभिनिवेशाचाच विलास आहे चुकून का होईना पण एके काळी डॉ वासुदेवशरण अग्रवाल यानी या देशाचे भरत हे नाव दुष्यन्तपुत्र भरतावरून पडले असे विधान केले होते त्याचा तो आधार चूक ठरल्यावर त्यानी ते विधान प्रामाणिकपणे मागे घेतले डॉ अग्रवाल हे खरे इतिहासज्ञ असल्याने, अग्निपुराणादिक अनेक प्राचीन ग्रथामध्ये या देशाच्या नावासबधी योग्य पुरावा मिळाल्यावर त्यानी आपली चूक नि सदिग्धपणे सुधारली— "मार्कंडेय पुराण . सास्कृतिक अभ्यास" ( पान १३८ पद-टिप्पण ) या आपल्या ग्रथात ते लिहितात—

'मैंने अपनी 'भारत की मौलिक एकता' नामक पुस्तकमें दौष्यन्ति भरतसे भारतवर्ष लिखकर भूल की थी इसकी ओर मेरा ध्यान कुछ मित्रोंने आकर्षित किया, उसे अब सुधार लेना चाहिए।'

तरी पण ज्याचा दुरभिनिवेश नदनो त्यागी या गन्द नन्हा गन्ड टाळे झाक केली असाच्यासाठी त्याच्याच ग्रंथातील भरपूर पुरावा वस्तुस्थितिनिदर्शना-साठी, न्यायनिष्ठेसाठी आणि सत्याच्या विचारासाठी नवल्या रीतीने प्रस्तुत करीत आहे काही जणाच्या अभिनिवेशाच्या तीव्रतेवरूनच अशा माहितींनी गरज का भासते ते कळते हा स्वतत्त्वाच्या अधिकाराचा आणि सास्कृतिक वारसा-हक्काचा प्रश्न असल्याने प्रत्येक सत्वशील माणसाला याची आवश्यकता पटल्याशिवाय राहाणार नाही

## सुदास–विमर्श

५) शिवाय भरतटोळीचा प्रमुख सुदास होता हे विधानही तपासून पाहण्या-सारखे आहे हा सुदास एक राजा होता ही बाब महत्त्वाची आहे वैदिक आर्य टोळचाटोळ्यानी भारतात उतरत असताना त्याच्याबरोबर कोणी राजा होता असे कोणत्याही विधानाने सिद्ध झालेले नाही तो परकीय राजा येथे येण्यापूर्वी कोणत्या देशाचे शासन करीत होता हे कळले तर आर्य कोठून आले हे नक्कीच सागता आले असते ! ! येथील व जगातील विद्वानाना आर्यांच्या मूळ निवासस्थानाची सदैव चर्चा करण्याचे कारण उरले नसते ! म्हणजेच सुदास हा जर राजा होता तर तो परकीय आर्य नसावाच तो या देशातीलच एक राजा असला पाहिजे आर्य आल्यावर त्याच्या ज्या ज्या एतद्देशीय राजाशी झगडा झाला त्यात सुदास प्रमुख होता व त्याला विजय मिळाला असला पाहिजे त्या विजयामुळे काही आर्य टोळया सुदासाला मिळाल्या असतील सुदास त्याचा नेता बनला असेल. सुदास या शब्दतील दास या पदाकडे लक्ष वेधल्याशिवाय राहात नाही वैदिक आर्य दासाचा द्वेष करीत होते ते दास किंवा दस्यू असा शब्द वापरून एतद्देशीयाना हीन लेखीत होते हेही स्पष्ट आहे जे आर्यपूर्वकालीन भारतनिवासी लोक आर्यांच्या द्वेषाला बळी पडले ते किती प्राचीन काळापासून या भूमीवर राहात होते या मुद्यावर विचार करणे कर्तव्य आहे

## पूर्वसंस्कृतीचा सुगावा

वैदिक परपरेतील आर्य टोळया येथील सिंधुखोऱ्यात उतरण्यापूर्वी या विशाल भरतवर्षातील काराकोरमपासून कन्याकुमारीपर्यंत, मुंबईपासून दिग्बोई-पर्यंत, क्वेट्यापासून कटकेपर्यंत आणि कोचीनपासून काचनगंगेपर्यंत पसरलेल्या अनेक छोटया–मोठ्या प्रदेशात आणि ब्रह्मपुत्रेच्या आग्नेय–पूर्व भागात काय होते,

समाज कोणता होता, राजे कोण होते, प्रजेचा जीवनक्रम कसा होता यासंबंधी विचार करणे इतिहासाच्या दृष्टीने सुसंगत आहे. सिंधुसंस्कृती कशी अवतरली, त्यातील जीवनकलेची साधना कुणी साध्य केली होती, त्यांचा मनोदय कोणत्या मानवी गुणांनी प्रेरित झाला होता, वेदपूर्वकालीन सिंधुसंस्कृतीसारखीच पण तेथून अगदी दूरवरच्या इतर भारतीय प्रदेशातही सापडणाऱ्या प्रगत संस्कृतीचे शिल्पकार कोण होते, द्रविडदेश, दमिळ किंवा तामिळनाडू या संज्ञेत अंतर्भूत असलेल्या संस्कृतीचा गौरव नवागत व आवासित आर्यांना सतत खुपत राहण्याचे कारण काय, इत्यादि जिज्ञासेची तृप्ती होणे पुढील प्रगतीच्या दृष्टीने महत्त्वाचे आहे. त्यांची स्तूपरचना, वास्तुकला, मूर्तिकला, लेण्या, ग्रंथसंपत्ती, जीवनचिकित्सेची अभ्यासपरंपरा, संरक्षण योजना, राजधानीची रचना, कृषिपद्धती, योगक्षेम-व्यवहार इत्यादींच्या अभ्यासावरून त्यांचा सांस्कृतिक दर्जा उच्च प्रतीचा होता, त्यांची समाज-व्यवस्था सहकारी आणि कल्याणकारी होती, त्यांचे राजवंश मोठे होते असे स्पष्ट दिसते. पण आजच्या इतिहास-ग्रंथात त्यांची दखल घेण्यात आलेली नाही. त्यांचा उज्ज्वळ इतिहास लुप्त होण्याचे कारण काय असावे, त्या बाबतीत आज काय करता येण्यासारखे आहे याचा परामर्ष घेणे मानवी हिताचे ठरणार आहे !

शास्त्रशुद्ध इतिहास निर्माण न करणे, प्रांतागणिक जीवनातील समंजसपणा व राष्ट्रीय एकात्मता अवलक्षित करणे, कर्मकाण्डाच्या आहारी जाऊन ऐहिक जीवनाची उपेक्षा करणे, जीवन श्रद्धेपासून भ्रष्ट होणे, मानवी जीवनाचे प्रतीक असलेली अभ्यास-साधना एखाद्या विशिष्ट वर्गाच्या हाती बहाल करून स्वतःची अवहेलना पाहात बसणे, आश्रिताचा स्वतंत्र समाजगट निर्माण होऊ देण्यात दक्षता न बाळगणे, तात्त्विक मतभेदातून निर्माण होणाऱ्या वर्गविग्रहाचा किंवा नव-नव्या राष्ट्रवादाचा बीमोड न करणे इत्यादि गतकाळातील अपपद्धती इतःपर मानवी जीवनातून दूर करण्याचे मार्ग शोधणे इतिहासाच्या परिशीलनानेच साध्य होत असते.

## वैदिक अवैदिक संघर्ष

शतकानुशतके एतद्देशीयावर आक्रमकाचे हल्ले झाल्यामुळे त्या संघर्षात पुरावे नष्टप्राय झाले आहेत. तरी पण विशाल साहित्यातून काही उपयुक्त पुरावे सापडतात. इतिहास-काळामध्ये सुद्धा या देशातील राजकीय, धार्मिक व सामाजिक कारणासाठी घडून आलेला क्रांतिकारी संघर्ष दुःसह होता. मुसलमानी घाटाचे राजवाडे व मशीदी बांधण्यासाठी, जैन मंदीरे उध्वस्त करण्यात आली (भारतीय संस्कृतिमें जैनधर्मका योगदान, भोपाळ, १९६२, पान ३४०-३४१ आणि हिस्ट्री ऑफ इंडिया अँड ईस्टर्न आर्किटेक्चर, पान २६३-२६४) पुराण-काळात पेटलेल्या वर्णद्वेषाग्नीमध्ये जैन ग्रंथाची हस्तलिखिते जाळण्यात आली

आणि लाकडी व मातीच्या स्मारकाची काळप्रवाहात वाताहत झाली उरली सुरली सामग्रीही जेत्याच्या ताव्यात जाऊन त्यामध्ये मन पूत बदल करण्यात आला त्यामुळे जैनधर्माचे सनातनत्व व प्राचीनत्व सिद्ध करण्यास मौलिक व खरे पुरावे शोधणे आज कठीण झाले आहे

तरी पण आज उपलब्ध झालेल्या भग्नावशेषात्मक, उत्खननात्मक, स्थापत्य-शिल्पात्मक, जैन साहित्यान्तर्गत आणि भारतातील वैदिक आर्यासह इतरांच्याही ग्रथातील उपलब्ध पुराव्यावरून जैन संस्कृतीच्या प्राचीनतेची कल्पना आल्याशिवाय राहात नाही आज ज्ञात असलेल्या शिल्पमूर्तीपैकी सर्वात प्राचीन असलेल्या दोन मूर्ती जैन धर्मीय आहेत (पाटणा म्युझियममधील Negative No 963 Arch No 8038 आणि Neg. No 962 – Arch No 8033) प्राचीन शिलालेख व पाण्डुलिपी या बाबतीतही हेच सागता येईल व्रात्य किंवा समण संस्कृती त्या काळी विद्यमान होती हे तथ्य वेदसाहित्याला सम्मत आहे जैनाची तीर्थक्षेत्रे, मन्दिरे, मूर्ती आजही भारतामध्ये सर्वत्र दिसतात 'भारतातील कोणत्याही ठिकाणी केंद्रबिंदू कल्पून १० मैलाच्या त्रिज्येने एक वर्तुळ आखल्यास निर्माण होणाऱ्या परिसरात काहीना काही जैन अवशेष सापडल्याशिवाय राहाणार नाही.' (विवेकाभ्युदय, एक कन्नड मासिक, १९४०, पान ९६) दक्षिण भारतासंबंधी मुग्धता असली तरी आर्यांच्या आगमनकाळी पूर्व, उत्तर व पश्चिम भारतातील बहुतेक सर्व प्रदेशामध्ये जैनाचा अधिवास होता हे वैदिक साहित्याला ज्ञात आहे म्हणून वैदिक सूत्रकारानी व स्मृतिकारांनी ब्राह्मणाना आदेश देऊन ठेवला आहे की त्यानी त्या प्रदेशात विहार करू नये ज्या ब्राह्मणानी मगध देशातील व्रात्य लोकांचे पौरोहित्य स्वीकारले त्याना दूषण दिले आहे. (कात्यायनसूत्र – ८ ६ २८, लाह्यायणसूत्र – २५ ४ २२, देवलस्मृति, महाभारत-कर्णपर्व, अध्याय ४५) ऋग्वेदामध्ये तर स्पष्ट उल्लेख आहे की—

> प्रजाहं तिस्रो अत्यामीयुर्न्यन्या अर्कमभितो विविश्रे ।
> बृहद्ध तस्थौ भुवनेष्वन्तः पवमानो हरित आ विवेशेति ।।
>
> — ऋग्वेद, ८/१०१/१४

या विधानाच्या ऐतरेय आरण्यकातील (आरण्यक २/१) अभिप्रायाप्रमाणे वंग, मगध आणि चेरपाद किंवा लिच्छवींचा वज्जीदेश या तीन प्रदेशातील लोकांचा वेदधर्मावर विश्वास नव्हता या संदर्भात अथर्ववेदातील ५/२२/५ ते १४ या भागाकडेही लक्ष वेधल्याशिवाय राहात नाही

शिवाय ऋग्वेदाच्या विहगावलोकनाने देखील असे दिसते की वैदिक आर्य सप्तसिंधूच्या खोऱ्यात वसाहत करण्याच्या अगोदर सिंध आणि पंजाब प्रान्तातील मूळ रहिवासी समर्थ व सुसंस्कृत असून ते त्याचा स्वत चा धर्म व आचारविधी

पाळण्यात अगदी कट्टर होते. त्याच्या विरोधामुळे नवागत आर्यांना आपला मार्ग काढण्यासाठी सकटे सोसावी लागली व सघर्ष करावा लागला त्याच्याशी होणारे तटे दीर्घकाल टिकले तेथे या दीर्घकालीन सघर्षाचा जो इतिहास उपलब्ध होतो त्यावरून तेथील मूळच्या संस्कृतीवर बराच बोधप्रद प्रकाश पडतो इंद्र या आर्य दैवताने सप्तनद प्रदेशातील मूळच्या पुढाऱ्याना मारून तेथील जमीन मरुत इत्यादी स्वपक्षीय लोकाना वाटून दिली इद्राचे प्रमुख शत्रू दस्यू आणि सिम्यू लोक होत–

**दस्यूञ्छिम्यूंश्च पुरुहूत एवै र्हत्वा पृथिव्या पूर्वानि वर्हीत ।**
**सनत् क्षेत्रं सखिभि श्वित्न्येभि सनत् सूर्यं सनपद. सुव्रजः ।।**

– ऋक् १/१००/१८

शिवाय इद्राने ३०,००० दासाना ठार मारले ( ऋक्, ४/३०/२१ ) आणि हजार दस्यूंना व सयूनाना कैद केले ( ऋ २/१३/९ ) सिम्यू व सयुन ही पदे प्राकृत समण किंवा संस्कृतभाषा–परिणत श्रमण शब्दासारखीच आहेत. 'सप्तनद प्रदेशातील पूर्वीचे रहिवासी दस्यू होते आणि आर्य त्याचे शत्रू बनले ' असा स्पष्ट उल्लेख अथर्व वेदातील पृथ्वीसूक्तात आढळतो ( १२/१/३७ ) ऋग्वेदातील काही भागावरून ( १०/२२, १०/२३; ६/२५/२, ६/६०/६, १/१००/१८, ६/४५/२४, १०/६२/१० इत्यादि) आपणास असेही आढळते की आर्य आणि सयूनामधील सघर्ष राजकीय कारणापेक्षा सास्कृतिक कारणासाठीच दीर्घकाल चालू होता.

सिम्यू किंवा सयून याच्याप्रमाणेच दस्यूचा देखील गुलाम असा अर्थ होत नाही उलट दस्यू हा प्रशसादर्शक शब्द असून त्याची व्युत्पत्ती दस् (प्रकाशणे) या धातूपासून साधली आहे असा स्पष्ट उल्लेख झेंड अवेस्तामध्ये आढळतो (गगा, जानेवारी १९३२, पान १८९–९० ) आणि म्हणून 'दक्ख्युमा किंवा दक्ख्यनाम सूरो ' याचा अर्थ तेजोगोलामधील ( ज्योतिष्कमडळातील ) सूर्य असा आहे आणि यामुळेच दिवोदास, सुदास, त्रसदस्यु यासारख्या पदव्या राजाच्या नावाला लावण्यात येऊ लागल्या. पाखण्ड, अपरोक्ष अशा काही शब्दाप्रमाणेच दस्यु शब्द देखील अनतर काळी विरुद्ध अर्थाने वापरण्यात येऊ लागला दस्यु वगैरे तद्देशीय मूळचे लोक वेदातील विधिधर्म पाळत नसल्याने अकर्मण म्हणून प्रसिद्ध पावले ( ऋग्वेद, १०/२२/८ ) ते वैदिक देवताची पूजा करीत नसल्याने अवेदस् व अयज्वन्; तसेच ते स्वत च्या दैवताच्या प्रतीकात्मक चिन्हाची पूजा करीत असल्याने सिसिनदेवा ( ऋक्, १०/९९/३ ) अशाही सज्ञा त्याना प्राप्त झालेल्या आढळतात त्याना अकर्मण, अमंत्र, अव्रत, अन्यव्रत इत्यादीही नावे मिळाली भास्कराचार्यास अनुसरून ( भास्करनिरुक्त, दुसरा भाग, १/२३ ) दस्यु हा शब्द

√ दस् (नष्ट करणे) या धातूपासून साधणेही शक्य आहे म्हणून दस्यु म्हणजे वैदिक विधींचा संहारकर्ता असा अर्थ होतो याशिवाय ते एका प्रदेशाचे व कुळाचेही नाव आहे दस्यु लोक असंस्कृत नव्हते की शास्त्र–कलादिकांनी विरहितही नव्हते (ऋग्वेद, ४/३०/२०, ५/३०/९, २/१२/११, शतपथ ब्राह्मण, १/६/४/२१; ४/३/१७, ऐतरेय ब्राह्मण, ४/२२ ) ते लोक चागले धार्मिक असून युद्ध प्रसंगीही न्यायमार्ग सोडीत नसत ( महाभारत–शांतिपर्व, २८१/१ )

याच संदर्भात डॉ. भटनागर यांचे एक मतव्य उल्लेखनीय आहे–

'असुर भी अलौकिक शक्तिसे सवलित है। कदाचित् देव भी उनका वध करनेमे सामर्थ्यहीन सिद्ध होते हैं। अत. उनके वधके लिए देवोको नवीन उपायोका अन्वेषण करना पडता है। उदाहरणार्थ वृत्र-वधके लिए ही इन्द्र दध्यङगके अश्वशिरसे वज्रका निर्माण करता है। असुर उत्कृष्ट योद्धा है, उनके शस्त्र तिग्म हैं। शम्बरके शत दुर्ग तथा कृष्णासुर की दशसहस्रसंख्यक सेनाका उल्लेख उनकी शक्तिको प्रकाशित करता है। ये राजनीतिज्ञ भी हैं। सरमा–कथामे पणि साम, दाम एवं भेद, तीनो नीतियोका प्रयोग करते हैं।'

– Institute of Higher Studies and Research,
Jayapur, Volume I, ( April, 1973 ), Page 3

वैदिक आर्य सिधु खोऱ्यात स्थिरावून गगा मैदानाच्या दिशेने वाटचाल करीत असताना त्याची गती मध्येच खुटली. उर्वरित भरतक्षेत्रावर त्याचा प्रभाव न जमल्याने पूर्वी जमा वृत्राचा द्वेष केला तसाच शेष भारताला, विशेषत दक्षिणापथाला त्यानी सदैव कमी लेखला कारण तिकडील राजानी प्रभावी विरोध केल्यामुळे तेथील लोकाना द्रविड, असुर, अनार्य, नाग किवा राक्षस मानून त्याना पाण्यात पाहिले इतिहासाच्या अभ्यासकाला मात्र तसे समजण्याचे काहीच कारण नाही इतकेच नव्हे तर वैदिक आर्यांनी निंदिलेला तो सर्व भाग इतर भरतक्षेत्राप्रमाणेच पावनप्रद आहे दक्षिणापथ तर विविध समृद्धीने स्वर्गतुल्य असून तेथील सुभग आणि चतुर प्रजा देवाप्रमाणेच आदरणीय आहे—

वहु-रयणायर-कलिओ सुरूव-वियरंत-दिव्व-जुवइ-जणो।
विवुहयण-समाइण्णो सग्गो इव दक्खिणो सहइ ॥

— कुवलयमाला, पान १०४/७

## संस्कृति-संगम

मात्र आर्यांनी जेव्हा काही स्वरूपात येथील मूळची अहिंसा स्वीकारली आणि आपल्या दैवतापेक्षाही व्रात्यमुनींचा आदर जास्त प्रमाणात करण्यास सुरवात केली तेव्हाच त्या दोघामधील सघर्ष कमी झाला (अथर्ववेदातील सपूर्ण १५ वा अध्याय) अशाच प्रकारची तथ्ये काही हिंदुपुराणातूनही आढळतात (वायुपुराण अध्याय १०) ऋषभनाथप्रणीत तपश्चर्येचा मार्ग वैदिक ऋषीनीही अनुसरला जरी जिनाचा हा ज्ञानमार्ग व त्यांची तपश्चर्या उपनिषदानी श्रेष्ठ मानली तरीही प्रत्यक्ष आचरणात मात्र त्या स्वीकृतीची उपेक्षाच झाली कारण सामान्य जनतेला त्या ज्ञानमार्गाचे आकलन होणे फारच कठीण आहे म्हणूनच आचरणाच्या दृष्टीने त्याचा वैदिक लोकावरील प्रभाव कमी झाला पण त्याच्या साहित्यातून मात्र त्याचा आदर केलेला आढळतो हिंदू धर्माचे पुनरुज्जीवन घडवून आणणाऱ्या पुराणसाहित्यात देखील जैन धर्माचा प्रभाव प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष रीतीने पडलेला दिसतो 'एकस्मिन् असभवात्' या व्यासकृत सूत्राचे स्पष्टीकरण करताना शंकराचार्यानी 'जैना एकस्मिन् एव वस्तुनि उभय प्ररूपयन्ति।' या शब्दात जैनाच्या अनेकान्तवादावर टीका केली आहे व्यास हे वैदिक परपरेतील ऋषी असून फार प्राचीनकाळचे समजले जातात महाभारत व्यासप्रणीत आहे अशी श्रद्धा आहे त्या व्यास महर्षींनी सुद्धा अनेकान्त या जैन सिद्धान्ताचा उल्लेख केला आहे. यावरून त्या व्यासप्रणीत महाभारत ग्रथाच्याही पूर्वकाळी जैनांचा अनेकान्त सिद्धान्त लोकामध्ये प्रसिद्ध पावला होता हे सिद्ध आहे.

## सांस्कृतिक व दार्शनिक संपर्काचे फलित

महाभारत आणि रामायणाच्या वाचनातून पुढील बाबी स्पष्ट होतात—

(१) अहिंसात्मक धर्म येथे प्रथमापासून रूढ होता

(२) वैदिक आर्यांच्या साहित्यामध्ये नतरच्या काळी अहिंसादिक तत्त्वाचा सामान्यत स्वीकार झाला

(३) त्यामुळे भागवत किंवा वैष्णव आणि शैव असे पथभेद निर्माण झाले

(४) पूर्वी रूढ असलेली गोहत्या वर्ज्य ठरली

(५) रथयात्रेसारख्या काही धार्मिक महोत्सवाचा त्यानी नव्याने स्वीकार केला

(६) मूर्तिपूजा स्वीकृत झाली

(७) वर्णव्यवस्थेवर आक्षेप येऊ लागले 'वज्रशुचि' चा विचार उपनिषदानीही केला

(८) शुक्लध्यानाचा स्वीकार केल्याने त्याच्या साधूमध्ये मुडक पथाचा उदय झाला

(९) सोमयाग पूर्णत मागे पडला

(१०) हिंदूच्या धर्म साहित्याने अशा तथ्याचा स्वीकार निरनिराळ्या काळी पूर्व परिहाराशिवाय केल्याने ते साहित्य विसगत तत्त्वविचाराचे माहेरघर बनले उदाहरणार्थ–

**मधुपर्के च यज्ञे च पितृदैवतकर्मणि ।**
**अत्रैव पशवो हिंस्या नान्यत्रेत्यब्रवीन्मनुः ॥**

– मनुस्मृति, ५/४१.

(११) विशेष म्हणजे हिंदूच्या ग्रथातील ऋषभनाथांच्या जीवनासबधीचा व त्याच्या धर्मासबधीचा वृत्तात मात्र एकमुखी व सुसगत राहिला आहे

## आर्यपूर्वकालीन प्राचीनता

या सर्व निवेदनावरून असे दिसते की जैन ग्रथामध्ये सुरक्षित ठेवलेला विषय अशा स्वरूपाचा आहे की तो हरप्पा–संस्कृतीशी सुसंगत आणि आर्यपूर्व-युगापेक्षा प्राचीन ठरतो मोहेंजोदारो येथील एक सर्पफणायुक्त नग्नमूर्ती सुपार्श्वनाथ किंवा पार्श्वनाथ तीर्थंकराच्या मूर्तीसारखीच दिसते हे नक्कीच कुतूहलजनक आहे डॉ. प्राणनाथ विद्यालंकार देखील मोहेंजोदारो येथे सापडलेल्या एका नग्न प्रतिमेच्या ( मुद्रा नबर ४४९ ) पीठावरील 'जिनेश्वर' ही अक्षरे वाचू शकले

चोवीस तीर्थंकरांच्या जीवनावर विश्वास ठेवण्याची परपरा अतिप्राचीन काळापासून प्रचलित आहे ही गोष्ट अलीकडील सशोधनाने सिद्ध झाली आहे जैन तीर्थंकराच्या अतिप्राचीन मूर्तीचे नमुने व त्यावरील कोरीव कला आणि मोहेंजोदारो येथील मुद्रिकावरील आकृत्या यामध्ये पुराणवस्तुशास्त्रानुसार काही निश्चित असे सुसगत दुवे सापडतात. असे दुवे याहीपेक्षा किती प्राचीन काळाचा वेध घेतात हे आताच सागणे कठीण आहे परतु एवढे खरे की मोहेंजोदारो येथील मूर्तीच्या दुव्यावरून इतिहासाचा अभ्यास करताना आपणास पार्श्वनाथ तीर्थंकराच्या काळाजवळच कायम थाबता येणार नाही आणि जैनधर्माच्या इतिहासाला पार्श्वनाथापासून ( इ सनपूर्व ९ वे शतक ) सुरवात होते असे तर मुळीच मानता येणार नाही.

अशा प्रकारच्या ऐतिहासिकतेबद्दल काही विद्वानाचे विचार उपयोगी आणि पूरक आहेत त्यासाठी पुढील सदर्भ उपयोगी पडतील—

1) A Chakravarty : Yesterday and today, PP. 59–71.
2) Sir Sanmukham Chetty's Lecture on 'Mahaveer Jayanti' at Madras, (Jain Sasana, P–291 )

3) Sir Kumarswami, Acting Chief Justice, Madras High Court, Vide Jain Law Supplement by C R Jain
(जैनशासन, पान २९६)
4) Mr. Ranganekar, Justice, Bombay High Court, A. I R 1939, Bombay-377.
५) लोकमान्य बाळ गगाधर टिळक ( परिशिष्ट ४ पहा )
६) इपिरियल गॅझेटियर ऑफ इडिया– पान ५४
७) डॉ राधाकृष्णन् : Indian Philosophy Vol. II, P 227
( परिशिष्ट ४ पहा )
८) डॉ म म गगानाथ झा ( परिशिष्ट ४ पहा )
९) डॉ मकलिया ( परिशिष्ट ४ पहा )
१०) प्रो फणिभूषण अधिकारी ( परिशिष्ट ४ पहा )
११) डॉ विमलचरण झा ( परिशिष्ट ४ पहा )
१२) म म प राममिश्रजी शास्त्री, बनारस ( परिशिष्ट ४ पहा )
१३) डॉ मगलदेव शास्त्री, भारतीय सस्कृतीका विकास, औपनिषद्-धारा, पान १८०.

## वैदिक पुराव्यावरून सार संग्रहण

या सर्व पुराव्यात्मक घटनावरून हेच सिद्ध होते की—

१) सुदास किंवा भरतटोळी याचे व्यक्तिमत्त्व इतके थोर नाही की त्याच्या नावावरून या सपूर्ण वर्षप्राय क्षेत्रविभागाला त्याचे नाव प्राप्त व्हावे.

२) केवळ भारत अशा पदाच्या उल्लेखावरून सत्य घटनाचा तर्क रचणे अशक्य आहे तो पुरुवशानतरचा कुलवाचक व्यपदेश आहे की देशवाचक आहे हे जाणण्यासाठी त्याचा कालानुक्रम व पूर्वापर सबध पाहणे आवश्यक आहे

३) जैनाचा इतिहास वैदिक आर्यापेक्षा फार पूर्वीचा आहे २४ तीर्थंकराच्या व्यक्तित्वाबद्दल शका उरण्याचे कारण नाही

४) ऋषभनाथ व भरत याचा इतिहास हिंदू पुराणातही सर्वत्र एक सारखाच सुसगत मिळतो

५) असा हा इतिहास भारतीय वैदिक पडित व युरोपीय सशोधक याना मान्य आहे

## वर्ष–नामकरणाचा एकमेव स्वामी

याशिवायही भरतसम दुसरी नावे आढळली तरी त्याचा विचार करण्याची कोणतीच गरज उरत नाही या सर्व भरतसम व्यक्तींपेक्षा एक फार मोठी महान

व्यक्ती या भूमीवर फार प्राचीनतम काळी होऊन गेली ती व्यक्ती निश्चितपणे या सपूर्ण वर्षप्राय भूमीची अधिपती होती त्या व्यक्तीच्या ख्यातीमुळेच हा देश पूर्वी दुसरे नाव धारण करीत असतानाही पुनः नव्याने 'भरतवर्ष' असा विख्यात झाला असा पूर्वापर सुसंगत इतिहास उपलब्ध आहे ती महान व्यक्ती म्हणजे युगादिराज ऋषभनाथ यांचा ज्येष्ठ पुत्र भरत होय. हीच एक श्रेष्ठ व्यक्ती प्रथम चक्रवर्ती बनून ९ निधी, १४ रत्ने, ३२००० राजे, कोट्यावधी चतुरग सेना इत्यादी लौकिक तथा अलौकिक दिव्य वैभवासह षट्खण्डभूमीवर न्यायाने राज्य करीत होती तो आदिराजांचा पुत्र असून या युगातील केवळ दुसराच अभिषिक्त राजा होय. तोच पहिला चक्रवर्ती झाला आणि त्याच्यानतर त्याचाच ज्येष्ठ मुलगा आदित्ययश (अर्ककीर्ती) राजा झाला त्याच्यापासून सूर्य (आदित्य) वंशाची निर्मिती झाली. याच भरताचा भाऊ बाहुबली व त्याचा ज्येष्ठ पुत्र सोमयश दोघेही महान प्रभावशाली होते सोमयशापासूनच सोम (चद्र) वंशाची उत्पत्ती झाली. त्यापूर्वी ईक्ष्वाकू हा क्षत्रियाचा एकच वश प्रचलित होता ईक्ष्वाकू या आदिम क्षात्रवशाचे ऊग्र, भोग, राजन्य व नाग असे पुन अतर्गत भेद पडले असल्याने त्या त्या नावानुसार पुन अनेक वश व वशशाखा कालातराने निर्माण झाल्या

या ऋषभपुत्र भरताशिवाय दुसरी कोणतीही व्यक्ती या देशाच्या नामकरणाच्या सदर्भात सभवणे सुतराम् अशक्य होय कारण या व्यक्तीसबधी, त्याच्या पूर्वजासबधी व वशजासबधीही सुसगत अशी भरपूर माहिती इतिहास-तत्त्वाला अनुसरून उपलब्ध आहे तिची दोन विरोधी परपरामध्ये नोदणी होऊन देखील ती अगदी एकमुखी आणि एकस्वरूपी टिकून राहिली आहे युगानुयुगे त्यासबधीची एकवाक्यता भग पावली नाही. ती व्यक्ती श्रद्धेला अनुसरून व पथाला अनुसरून बदलत गेलेली नाही सुसंगतीमधील इतके सातत्य दुसरीकडे सामान्यत आढळत नाही. हे आश्चर्यकारकच नव्हे तर अद्भुत आहे त्याचप्रमाणे या महान क्षेत्राची माहिती देखील पार युगारभापासूनच नव्हे तर युगातराच्या प्रक्रियेच्या आतरकालापासूनही सुसगत रीतीने उपलब्ध आहे म्हणून हा मूळारभ जाणून घेणे बोधप्रद आहे



: ६ :

# भरतवर्ष : नामकरण

अथ त्विदं प्रवक्ष्यामि धर्मतत्त्वं निबोध मे ।
पुराणमृषिभिर्दृष्टं धर्मविद्भिर्महात्मभिः ॥

— महाभारत, आदिपर्व, १२२/३

# ५ भरतवर्ष : नामकरण

प्राचीनतम जैन आगम ग्रथापैकी ठाणग, समवायग, जबूदीवपण्णत्ति इत्यादी प्रधान श्रुतग्रथामध्ये आपल्या देशाच्या नावासबधी आणि नामकरण प्रसगासबधी स्पष्ट उल्लेख आढळतात जबूदीवपण्णत्तिसुय हा ग्रथ ५ वा उपाग म्हणून प्रसिद्ध आहे यात एकूण १० प्रकरणे असून पहिल्यामध्ये भरतक्षेत्राचे वर्णन आहे दुसऱ्यात कालविभागासबधी सविस्तर माहिती असून तेथेच त्यावेळची भरतक्षेत्राची अवस्था, स्त्री-पुरुपाचा जीवनक्रम आणि युगप्रवर्तनाच्या आतरकालमध्ये होऊन गेलेल्या १५ कुलकरांची माहिती दिली आहे कुलकर नाभी, युगादिराज ऋषभनाथ याचेही अनुक्रमे १४ व १५ व्या स्थानी वर्णन आहे

ऋषभ प्रकरणामध्ये त्याचा सपूर्ण जीवनक्रम दिला आहे त्याच्या राज्याभिषेकाच्या महोत्सवाचे वर्णन सविस्तर आहे आणि शेवटी युगपरिवर्तनाला अनुसरून नर-नारीच्या बदलणाऱ्या जीवितावस्थाचे वर्णन आहे

आणि तिसऱ्या 'चक्कवट्टी' नावाच्या प्रकरणात ऋषभपुत्र भरत चक्रवर्तीच्या नावाची कीर्ती कायमची स्मृतिबद्ध करण्यासाठी या क्षेत्राला भरतवर्ष असे नाव प्रचलित झाले आहे हे स्पष्टपणे विदित करण्यासाठी सपूर्ण भरतचरित्राचे विवरण दिले आहे त्यामध्ये राजधानी विनीता (अयोध्या), भरताचे सौदर्य, चक्ररत्नाची उत्पत्ती व तत्सबधी महोत्सव, दिग्विजय, ऋषभकूट पर्वतावर नामलेखन, सुभद्रा या स्त्रीरत्नाची प्राप्ती, सुभद्रा-सौदर्य, ९ निधी, राजधानीकडे आगमन, १६००० यक्षदेवानी व ३२००० राजानी केलेला सत्कार, चक्री-राज्याभिषेक, १४ रत्नाचे वर्णन, चक्रवर्तीची विभूती, भरताचा जीवनक्रम आणि अखेर दीक्षा व निर्वाण इत्यादिक विषयाचे सविस्तर वर्णन केलेले आहे

त्याचप्रमाणे उत्सर्पिणी व अवसर्पिणी असे कालचक्राचे दोन मुख्य तथा प्रत्येकी ६ कालविभाग, त्याला अनुसरून होणारी भूमीची अवस्थांतरे, मानवी जीवनावरील परिणाम, कुलकर-तीर्थंकरादी शलाकापुरुषांचे कालानुसारी महत्कार्य, संस्कृतीची उत्थापने इत्यादींची स्पष्टतर माहिती दिली आहे हा आगमग्रंथ व यातील विषय जसा आम्नायमान्य आहे तसाच त्याला सांस्कृतिक स्पर्श असल्याने तो नेहमीच जिव्हाळयाचा वाटत आला आहे त्यामुळे जैन साहित्यपरंपरेमध्ये त्याची अनुवृत्ती शतकानुशतके होत राहिली पाण्ड्य देशातील पल्लववंशीय कांचीनरेश सिंहवर्माच्या समकालीन आचार्य सिंहनंदीने इ स. ३०२ च्या सुमारास रचलेला लोयविभाग हा आगमेतर ग्रंथ या क्षेत्रातील ज्ञात ग्रंथांमध्ये सर्वात जुना होय मात्र तो आज मूळ स्वरूपात उपलब्ध नाही इ स ११ व्या शतकाच्या अंती सिंहसूरी ऋषीने त्याचे पद्यमय संस्कृत रूपांतर संक्षिप्तपणे केले ती कृती लोकविभाग नावाने सोलापूरहून प्रकाशित झाली आहे

वरील विषयाचे व्यवस्थित निरूपण करणारा प्राचीनतम उपलब्ध मूळ ग्रंथ म्हणजे इ स ५०० ते ८०० च्या आंतरकालातील यतिवृषभकृत तिलोयपण्णत्ति हाच होय यातील गाथेत संख्यात्मक विवरणाचे प्रमाण फार मोठे आहे. हा ग्रंथ विषयाने व्यापक असून त्यातील ४ थ्या महाधिकारात ६३ शलाकापुरुषासंबंधी ऐतिहासिक माहिती व महावीर–निर्वाणानंतर १००० वर्षांनी झालेल्या चतुर्मुख कल्कीपर्यंतच्या राजवंशाची परंपरा वर्णिली आहे भरतक्षेत्राची स्थिती, व्याप्ती, क्षेत्रफळ, कुलकरांची कामगिरी, नाभि-ऋषभ-भरत यांच्या जीवितकार्यांची माहिती यथास्थल गाथा ४२१ ते २९१९ पर्यंत विशिष्ट पद्धतीने दिली आहे. यादृष्टीने जंबूदीवपण्णत्ति या आगमापेक्षा याची रचनाशैली पुष्कळच वेगळी आहे तरी परंतु त्यातील इतिवृत्त व सांस्कृतिक-प्रणाली सुसंवादीच आहे.

१३ व्या शतकातील सिद्धान्तचक्रवर्ती नेमिचंद्रकृत तिलोयसार ग्रंथातील ६ व्या अधिकारातही असाच वृत्तान्त दिला आहे तसेच पद्मनंदिकृत जंबूदीवपण्णत्ति-संगहोची रचना आगमासारखी असावी असा भास होत असला तरी त्याचा आधार तिलोयपण्णत्तिच आहे हे अभ्यासाने स्पष्ट होते त्याची रचना पारियात्र देशातील वारानगर येथे झाली असून तेथील राजाचा उल्लेख संती किंवा सत्ती असा केला आहे

श्वेतांबरपरंपरेतही आगमरचनेशिवाय जिनभद्रगणिकृत क्षेत्रसमास व संग्रहणी हे दोन ग्रंथ उल्लेखनीय आहेत मात्र त्यांच्या विस्तारामध्ये क्रमाने वाढ होत गेलेली आढळते. उपलब्ध बृहत्संग्रहणीचे संकलनकार १२ व्या शतकातील चंद्रसूरी होत यात फक्त मनुष्यलोकाचे वर्णन असून लोकविभागाच्या रचनेपेक्षा तेथील लोकाचे वर्णन अधिक विस्ताराने केलेले आढळते याशिवाय लोकस्थितीचे व कालचक्राचे वर्णन सर्व महापुराणांमध्ये सविस्तृत आढळते तरीही जंबूदीवपण्णत्ति या आगमाचे स्थान सर्वोच्च आहे

## आगम-प्रामाण्य

हा श्रुतागम ग्रथलेखनाच्या स्वरूपात नतरचा ( ५ वे शतक ) असला तरी तो आगमामध्ये प्राचीनतम आहे त्याची मौखिक परपरा तर भ महावीरापासून अतूट राहिली आहे म्हणून तो अतिप्राचीन ( कमीतकमी इ सनपूर्व ६ वे शतक ) आणि प्रमाणभूत असल्याने त्याची मान्यता विवादातीत आहे या ग्रथात या क्षेत्राच्या नामकरणासबधी असा उल्लेख आहे की–

### वर्षाभिधानाचा उपोद्घात

"से केणऽट्ठेण भते! एवं उच्चइ– भरहे वासे भरहे वासे। गोयमा, भरहे णं वासे वेअड्ढस्स पव्वयस्स दाहिणेणं चोद्दसुत्तरं जोयणसयं एक्कस्स य एगूणवीसइभाए जोअणस्स अवाहाए लवणसमुद्दस्स उत्तरेणं . .. वहुमज्झदेसभाए एत्थ णं विणिआ णामं रायहाणी पण्णत्ता .. . ." (सूत्र ४१)

श्री गौतम गणधरानी भ महावीराना एकदा प्रश्न विचारला की– हे भगवन्, या क्षेत्रविभागाला भरतवर्ष भरतवर्ष असे म्हणतात ते कोणत्या अर्थाने ? तेव्हा भ महावीर म्हणाले– हे गौतमा, लवण समुद्राच्या ( हिंदी महासागर ) उत्तर बाजूला पसरलेल्या ह्या भरतवर्षामध्ये विजयार्ध पर्वताच्या दक्षिण दिशेला ११४$\frac{१}{१९}$ योजन विस्तृत असलेल्या निरावाध अशा पुष्कळ प्रदेशाच्या केंद्रस्थानी विनिता (अयोध्या) नावाची एक राजधानी होती

### भरत आणि नामकरण-विधान

"तत्थं णं विणिआए रायहाणीए भरहे णामं राया चाउरंत-चक्कवट्टी समुप्पज्जित्था, महया हिमवंतमहंतमलयमंदर जाव रज्जं पसासेमाणे विहरइ। विइओ गमो रायवण्णस्स इमो, तत्थ असंखेज्जकालवासंतरेण उप्पज्जए जसंसी उत्तमे अभिजिए सत्तवीरियपरक्कमगुणे .. अणेगलक्खणपसत्थ-सुविभत्तचित्तकरचरणदेसभाए ..छत्तीसाहिअपसत्थपत्थिव-गुणेहिं जुत्ते . समरे अपराइए परक्कमविक्कमगुणे अमरावइसमाणसरिसरूवे मणुअवइ भरहचक्कवट्टी भरहं भुंजइ पणट्ठसत्तू।" ( सूत्र ४२ )

त्या विनिता राजधानीमध्ये चारी दिशेच्या अंतापर्यंत एकछत्री सत्ता गाजविणारा भरत नावाचा एक चक्रवर्ती राजा होता तो हिमालयापासून लवणसमुद्रापर्यंत पसरलेल्या विशाल अशा सर्व भूखंडावर राज्य करीत होता तो प्रथमराजवंशातील केवळ दुसराच राजा होता त्या ( ऋषभाच्या ) राजवंशात अनेक वर्षांच्या कालखंडानंतर तो यशशाली भरत, उत्तम अशा अभिजित नक्षत्रावर जन्मला होता सत्त्व, वीर्य, पराक्रम इ० त्याचे गुण प्रसिद्ध होते हात-पाय इत्यादी त्याच्या अवयवावर अनेक शुभ लक्षणे आणि मंगल चिन्हे विराजत होती तो राजाच्या छत्तीसच नव्हे तर किती तरी अधिक श्रीलक्षणांनी युक्त होता आपल्या सामर्थ्याच्या व पराक्रमाच्या जोरावर तो समरांगणात सदैव विजय पावत असे. रूपाने तो देवराजा शक्रासमान होता सर्व मानवांचा राजा असलेला तो भरत चक्रवर्ती सर्व शत्रूंना जिंकून या विशाल भरतक्षेत्रावर सुखाने राज्य करीत होता

> "तए णं से भरहे राया . ..... विणीए रायहाणीए. . .. भरहस्स वासस्स अण्णेसिं च बहूणं राईसर . . सत्थवाहप्पभिईणं आहेवच्चं पोरेवच्चं भट्टित्तं सामित्तं महत्तरगतं आणाईसरसेणावच्चं कारेमाणे पालेमाणे ओहयणिहएसु कंडएसु उद्धियमलिएसु सव्वसत्तुसु णिज्जिएसु भरहाहिवे णरिंदे . .. संपुण्णमणोरहे हयामित्तमाणमहणे पुव्वकयतवप्पभावणिविट्ठसंचियफले भुंजइ माणुस्सए सुहे भरहे णामधेज्जे त्ति।"
>
> ( सूत्र ६९ )

त्यानंतर तो भरत राजा संपूर्ण भरतवर्ष, पुष्कळ अन्य राजे, श्रीमंत, सार्थवाह इत्यादींचा अधिपती, नेता, धुरीण, स्वामी व ज्येष्ठतम विभूती बनून त्यांच्यावर अधिकार व सर्व सेनेवर प्रभुत्व गाजवीत सर्वांचे पालन करीत होता त्याने इतर सर्व परसैन्याचा पूर्ण पाडाव केला होता सर्व शत्रूंचे मर्दन करून त्यांना उधळून लावले होते सर्वांना जिंकल्याने त्या भरताधिपती राजाचे सर्व मनोरथ पूर्ण झाले होते. आपल्या प्रहाराने सर्व शत्रूंचा गर्व त्याने नष्ट केला होता पूर्व जन्मीच्या तपाचरणाच्या प्रभावाने प्राप्त झालेल्या सर्व मानवी सुखांचा भोग घेत होता त्या भरताच्या नावानेच या देशाचे नामकरण भरतवर्ष असे झाले

## 'अभिधान राजेन्द्र'ची साक्ष

प्राकृत विभागातील सर्व ज्ञानकोशामध्ये 'अभिधानराजेन्द्र' कोश फारच विख्यात पावला आहे तो स्वनामधन्य आहे. तेथील भरह या शब्दाच्या विवरणामध्ये भरतवर्षाच्या प्रसंगाने अनेक अवतरणे सादर केली आहेत तेथे त्या नामकरण चर्चेचा समारोप करताना म्हटले आहे–

"अस्मिन् क्षेत्रे प्रथमभरताधिपत्वेन प्रसिद्धं नामधेयं नाम यस्य स· तथा।"

— अभिधानराजेद्र, भरह, पान १४६७

या क्षेत्रात होऊन गेलेल्या प्रथम भरताधिपतीचेच नाव या देशाला मिळून तो देश त्याच्याच नावाने विख्यात झाला

'से केणट्ठेणं भंते, एवं उच्चइ– भरहे वासे भरहे वासे' इति सूत्रेण नामान्वर्थं पृच्छतो गौतमस्य प्रतिवचनाय . ... भरतचरित्रं प्रपंचितम्।'

— अभिधानराजेद्र, भरह, पान १४७८ इ०

'या क्षेत्राला भरतवर्ष भरतवर्ष असे म्हणतात ते कोणत्या अभिप्रायाने' असा जो गौतमाने प्रश्न केला होता त्याचे उत्तर म्हणून या क्षेत्राच्या नामाभिधानाचा अन्वयार्थ लावण्यासाठी येथे भरतचरित्र सविस्तर सागितले आहे

## भारताचा वंश व कुलपरंपरा

असा हा प्रथम भरताधिपती म्हणून प्रसिद्ध पावलेला भरत चक्रवर्ती युगादिकालीन प्रथम राजा जो ऋषभनाथ त्याचाच ज्येष्ठ पुत्र होय ऋषभाच्याच वशाला इक्ष्वाकू हे नाव मिळाल्याने भरतही इक्ष्वाकू वशीयच होय जंबूदीवपण्णत्तिमध्ये म्हटले आहे की—

सक्को वंसठवणा इक्खु अगू तेण हुंति इक्खागा।
जं च जहा जम्मि वए जुग्ग कासीअतं सव्वं ॥ २ ॥

ऋषभनाथांच्या वयाला एक वर्ष पूर्ण होण्याच्या आतच इद्राने वशस्थापना केली त्यावेळी इंद्राने उसाची (इक्षु) भेट आणली होती ती पाहून ऋषभबाळाने 'इक्षु' असा शब्द प्रथमच उच्चारला (आकू) त्यामुळे त्याना इक्ष्वाकू हे नाव प्राप्त झाले त्यावेळी जे बोलले ते सर्व सार्थच ठरले। (भावी काळातील इक्षूच्या उपभोग्यतेच्या निर्देशामुळे)

हा भरतपिता ऋषभनाथही दुसरा तिसरा कोणी नसून ज्याला नाभिकुलकराने प्रजेच्या विनतीला अनुसरून प्रजापालन कर्तव्यासाठी आणि नीतिनियमाचे उल्लघन करणाऱ्याना दण्डाने शासन करणाऱ्या राजाची गरज भासली म्हणून या युगाच्या प्रारभकाळी राज्याभिषेक केला तोच ही विभूती होय हेही स्पष्टच आहे–

उसभे णं अरहा कोसलिए तस्स णं पंच णामधेज्जा एवमाहिज्जंति तं जहा– उसभे इ वा[१] पढमराया इ वा[२] पढमभिक्खायरेइ वा[३] पढमजिणे इ वा[४] पढमतित्थयरे इ वा[५] ॥ २१० ॥

— आवश्यक चूर्णी, कल्पसुबोधिका

अरिहत झालेला कोशल देशाचा जो राजपुत्र ऋषभनाथ त्याची पाच नावे प्रचलित होती–– (१) ऋषभ ( वृषभ ), (२) आदिराज ( प्रथमनृपती ), (३) प्रथममुनी, (४) प्रथम जिनदेव आणि (५) प्रथम तीर्थंकर.

**राज्यसंस्थेची स्थापना**

छपुव्वसयसहस्सा पुव्विं जायस्स जिणवरिंदस्स ।
तो भरह-बंभिसुंदरी बाहुबलि-सुंदरी चेव ॥ १२४ ॥
देवी-सुमंगलाए भरहो बंभी य मिहुणगं जायं ।
देवीइ सुणंदाए बाहुबली सुंदरी चे व ॥ १२५ ॥
अउणापण्णं जुअले पुत्ताण सुमंगला पुणो पसवे ।
णीईणमईक्कमणे णिवेअणं उसभसामिस्स ॥ १२६ ॥
राया करेइ दंडं सिट्ठे ते विंति अम्ह वि स होउ ।
मग्गह य कुलगरं सो वेइ उसभो अ भे राया ॥ १२७ ॥

— आवश्यकचूर्णी, कल्पसुबोधिका

बाल्यावस्था सरल्यावर प्रथम तीर्थंकराना भरत–ब्राह्मी व बाहुबली–सुंदरी अशी दोन जुळी अपत्ये झाली भरत व ब्राह्मी या जुळ्याचा जन्म राणी सुमंगलेच्या पोटी झाला आणि सुनंदा राणीच्या पोटी बाहुबली व सुंदरी यानी जन्म घेतला त्यानतर पुन सुमगला देवीच्या पोटी ४९ युगलपुत्र ( जुळे भाऊ ) जन्मले त्या सुमारास पूर्वीच्या कुलकरानी प्रस्थापित केलेल्या हा, मा व धिक् अशा तीन प्रकारच्या दडनीतीचे पूर्वकाळी न होणारे उल्लघन नव्याने होऊ लागले ही घटना ऋषभांना सागण्यात आली, तेव्हा ऋषभदेवानी " नीतीचे उल्लंघन करणाऱ्यांना राजा दंड करीत असतो " असे सांगितले त्यावर लोक म्हणाले–– ' आम्हालाही राजा हवा ' पुन ऋषभनाथ म्हणाले ' नाभिकुलकराजवळ मागा ' तेव्हा नाभिकुलकर म्हणाले– ' ऋषभ हाच तुमचा राजा '

तओ ण उसभे अरिहा कोसलिए . महारायवासमज्झे वसइ । . . महारायवासमज्झे वसमाणे लेहाइयाओ गणिअप्पहाणाओ सउणरुअपज्जवसाणाओ बावत्तरिं कलाओ

**चोसट्ठि महिलागुणे सिप्पसयं च कम्माणं तिण्णि वि पयाहियाए उवदिसइ त्ति ॥ उवदिसित्ता पुत्तसयं रज्जसए अभिसिंचइ ।**

– जंबूदीवपण्णत्ति

**से य उसभे कोसलिए पढमराया . ...।**

– आवश्यकचूर्णी.

अनेक वर्षे राजकुमारावस्थेत घालविल्यावर कोशल राजपुत्र ऋषभदेव 'महाराज' पदावर आरूढ झाले. महाराजपदावर आरूढ होऊन राज्य करीत असताना लिपी व गणितापासून शकुनरुतापर्यंतच्या पुरुषाच्या ७२ कला, स्त्रियांना आवश्यक असे ६४ महिलागुण, १०० प्रकारचे शिल्प आणि तीनही प्रकारचे कर्म (जीवनोपायाचे मार्ग) या सर्वांचा उपदेश त्यांनी प्रजेच्या हितासाठी केला ही शिकवण संपल्यावर त्यांनी भरताचा कोशल देशाच्या राज्यावर, बाहुबलीचा तक्षशिलेच्या राज्यावर, अशा प्रकारे सर्व शंभर पुत्रांचा निरनिराळ्या प्रादेशिक राज्यांवर अभिषेक केला तो कोशल देशाचा युवराज ऋषभ म्हणजेच पहिला राजा होय अशा प्रकारे नाभिपुत्र व कोशल प्रांतीय युवराज असलेल्या ऋषभांनीच सर्वप्रथम राजपद भूषविले असल्याने ऋषभपुत्र भरत हा या वर्षप्राय भूमीवरील केवळ दुसराच राजा होय ।

यावरून हे निश्चितपणे सिद्ध होते की हिमालयापासून लवण समुद्रापर्यंत पसरलेल्या या विशाल क्षेत्रामधील कोशल प्रांतामध्ये कुलकर नाभिराज हे तेथील प्रजेचे मन्वन्तराच्या अंतिम भागामध्ये अग्रणी होते तो काळ कृत युगाच्या प्रारंभापूर्वीचा होता त्याच्या काळी काल–परिवर्तन वेगाने होत होते जीवनोपायाची उणीव भासू लागली होती हा, मा, धिक् या तीनही प्रकारच्या दण्डनीतींचे उल्लंघन होण्यास सुरवात झाली होती दण्डनीतीचा प्रभाव वाढविण्यासाठी, प्रजापालन सुकर होण्यासाठी आणि सामान्य अनुशासनासाठी राज्यसंस्थेची गरज जाणवत होती अशा वेळी नाभिकुलकरांचा मुलगा ऋषभकुमार हा सर्व अर्थाने शासनसंस्थेला योग्य व समर्थ असल्याने लोकांनी त्यांना आपला राजा म्हणून निवडला आणि त्यांचा राज्याभिषेक मोठ्या उत्सवाने साजरा केला अशा प्रकारे राज्यसंस्थेची प्रथमच स्थापना झाली. त्या आदिराज ऋषभाला एकूण शंभर पुत्र (परिशिष्ट १ पहा) व दोन मुली जन्मल्या त्या मुलींची नावे ब्राह्मी व सुंदरी असून शंभर पुत्रांमधील सर्वांत ज्येष्ठ मुलाचे नाव भरत होते तोच भरत ऋषभानंतर या विशाल क्षेत्राचा राजा झाला पुढे तो स्वत च्या पराक्रमाच्या व सामर्थ्याच्या जोरावर चक्रवर्तीपदाला पोहचला त्याचे नाव व यश सर्वश्रुत झाले आणि या क्षेत्राला त्याच भरताचे नाव मिळून या क्षेत्राची प्रसिद्धी भरतवर्ष या नव्या नावाने सर्वत्र पसरली

## आगमोत्तर परंपरेची अक्षुण्णता

भरतवर्षाच्या नामकरणाची परंपरा फक्त आगम–प्रामाण्यावरच आधारीत नसून इतर सूत्र, पुराण, काव्य, कथा इत्यादी सर्व प्रकारच्या व सर्व थरातील लौकिक साहित्य–ग्रंथातूनही अव्याहत चालत आलेली आढळते. धर्मसाहित्यातील व लोकसाहित्यातील ते सर्व उल्लेख अगदी स्पष्ट असून कुणाच्याही मनातील सभ्रम नष्ट करण्यास ते सर्वस्वी समर्थ आहेत—

### वसुदेवहिंडी

प्राचीन भारतीय संस्कृती आणि ऐतिहासिक तथ्ये या दृष्टीने वसुदेवहिंडी हा प्राकृत ग्रंथ स्वरूपाने फारच उपयुक्त आणि आकाराने विशाल आहे. पुराणाशिवाय प्राकृत कथासाहित्यही समृद्ध आहे. त्यामध्ये वसुदेवहिंडी अग्रगण्य आहे. याची रचना पुराण किंवा महाकाव्य अशा ठराविक शैलीमध्ये केलेली नाही. याची रचनाशैली देखील जैन साहित्याचे एक आगळे वैशिष्ट्य होय. यातील घटनाशील वृत्तान्ताची व्यापकता व विशालता लक्षात घेऊन याची तुलना प्रसिद्ध महाभारत या ग्रंथाशी करतात. या भीमकाय ग्रंथाचा व्याप ३० हजार श्लोकाइतका मोठा आहे. तरी रचनेचा कालखंड व रचनाकार या दोन्ही दृष्टीने हा ग्रंथ महाभारताप्रमाणे संकलनात्मक स्वरूपाचा नसून कर्तावेष्ठित आहे. पुढच्या काळातील पुराण, काव्य, कथा व नाटक अशा शैलीतील सर्व साहित्याचा तो मूलाधार आहे. यातील पहिल्या भागाचा कर्ता श्री संघदासगणी असून दुसरा भाग संघदासानंतर धर्मसेन गणीने पूर्ण केला आहे. संघदासाचा काल इ. सन सहाव्या शतकाचा पूर्वभाग होय. यातील मुख्य विषय श्रीकृष्ण पिता वसुदेव यांची विहारयात्रा असून तदनुषंगिक माहितीपैकी काही आचार्य–परंपरागत आहे तर काही लोकपरंपरेला अनुसरून लिहिली आहे. अशा या विख्यात ग्रंथातही या देशाच्या नामाभिधानासंबंधी स्पष्टपणे उल्लेख आला आहे—

> **इहं सुरासुरिंदविंदवंदियचलणारविंदो उसभो णाम पढमो राया जगप्पियामहो आसि । तस्स पुत्तसयं । दुवे पहाणा भरहो बाहुबली य । उसभसिरी पुत्तसयस्स पुरसयं जणवयसयं च दाऊण पव्वइओ । तत्थ भरहो भरहवासचूडामणी । तस्सेव नामेण इहं भारहवासं ति पवुच्चति ।**
>
> — वसुदेवहिंडी, प्र. खण्ड, पान १८६.

ऋषभनाथ हे जगातील सर्वांचे पितामह आणि या युगातील पहिले अभिषिक्त राजे होत त्यांच्या पदकमलावर सुरांचे व असुरांचेही राजे प्रणिपात करीत असत त्याना शभर पुत्र होते त्यामध्ये भरत आणि बाहुबली हे दोन प्रमुख होत. आपल्या शभर पुत्राना शभर नगरीचे राज्य देऊन श्री ऋषभनाथानी दीक्षा घेतली. त्या शभर पुत्रापैकी भरत हा सर्व भरतवर्षाचा एकमेव अधिपती झाला आणि त्याच्याच नावावरून ह्या वर्षप्राय देशाला भरतवर्ष असे नाव पडले

## पद्मपुराण

दिगंबर जैन साहित्यातील पद्मपुराण, महापुराण, हरिवंशपुराण या अत्यत विख्यात अशी तीन संस्कृत पुराण ग्रथत्रयामध्ये पद्मपुराण सर्वांत प्राचीन होय याचे ग्रथकार रविकीर्ती तथा रविषेणाचार्य एक महान् संस्कृत कवी होते त्यानी पद्मपुराणाची समाप्ती इ स ६७६ मध्ये केली चालुक्य नरेश दुसऱ्या पुलकेशीच्या काळी जैन कवी रविकीर्तीनी ऐहोळ येथे मेघुती मंदिर बाधविले आणि इतिहास व संस्कृत-काव्यकला या दृष्टीने अत्यन्त महत्त्वपूर्ण असा शिलालेख खोदविला त्यामध्ये रविकीर्तीची काव्यकीर्ती कालिदास आणि भारवि याच्यासारखी प्रख्यात होती असे म्हटले आहे

अशा या सूर्यासारख्या विशाल कीर्तीच्या ग्रथात भरतचक्रीच्या वैभवासबधी व आपल्या या वर्षाच्या नामकरणासबधी पुढील उल्लेख सुस्मरणीय आहे—

चक्रवर्तिश्रियं तावत् प्राप्तो भरतभूपतिः।
यस्य क्षेत्रमिदं नाम्ना जगत्प्रकटतां गतम् ॥

— पद्मपुराण, ४/५९.

भरत भूपतीला तर आता चक्रवर्तीचे वैभव प्राप्त झाले आणि त्याच्याच नावावरून या आपल्या निवासक्षेत्राची नामख्याती सर्व जगतात पसरलेली आहे

## महापुराण

जैनपुराण ग्रथामध्ये जिनसेन आचार्यांनी लिहिलेला महापुराण नावाचा ग्रंथराज सर्वत्र विख्यात आहे त्याला जैनांचा ज्ञानकोश हे सार्थ नाव प्राप्त झाले आहे या जिनसेनाचा काल इ सन ८ वे शतक होय हा ग्रथ स्वाध्यायासाठी अत्यत उपयोगी असल्याने प्रादेशिक भाषेतील अनुवादासह त्याच्या अनेक आवृत्त्या प्रसिद्ध झालेल्या आहेत जैनाचा प्राचीनतम इतिहास या ग्रथामध्ये फार मोठ्या प्रमाणात सुरक्षित आहे म्हणून भरतवर्षाचे नाव भरत चक्रवर्ती, आदिराज ऋषभ आणि अतिम कुलकर नाभिराज याच्यासबधी बरीच माहिती येथे उपलब्ध आहे त्यातील काही महत्त्वाचे उल्लेख पहा—

इति प्रमोदमुत्पाद्य पुरे सान्तःपुरे परम् ।
वृषभाद्रेरसौ वाल. प्रालेयद्युतिरुद्ययौ ।। १५७ ।।
प्रमोदभरतः प्रेमनिर्भरा वन्धुता तदा ।
तमाह्वद्भरतं भावि समस्तभरताधिपम् ।। १५८ ।।
तन्नाम्ना भारतं वर्षमितिहासीज्जनास्पदम् ।
हिमाद्रेरासमुद्राच्च क्षेत्रं चक्रभृतामिदम् ।। १५९ ।।

— महापुराण, पर्व १५.

उदयाचलापासून उगवणाऱ्या वालचद्राप्रमाणे तेजस्वी असा हा वालक वृषभनाथांच्या पोटी जन्मला त्यामुळे घरात व नगरात सर्वत्र परमानद पसरला. तेव्हा मनामध्ये आनदाची भरती आलेल्या वाधवांनी प्रेमनिर्भर होऊन, पुढे पट्खडाधिपती होणाऱ्या त्या मुलाचे नाव भरत असे ठेवले जेथे मानवाच्या मर्व वशाचा निवास आहे व जो हिमालयापासून समुद्रापर्यंत पसरलेला आणि चक्रवर्तीच्या राज्याएवढा विशाल भूखड आहे त्या क्षेत्राचे नाव ह्या भरताच्या नावावरून भारतवर्ष असे पडले.

या भरताचा व ऋषभाचा सोयरसंवध कोठेही, किंचितही सदिग्ध नाही हा भरत ज्याचा पुत्र आहे तो ऋषभही पहिल्या जैन तीर्थंकराशिवाय दुसरा कोणीही नव्हे तेव्हा भरतवर्षाच्या नामकरणाच्या सदर्भात दुसरा भरत असभवनीय आहे ऋषभनाथ स्वत ही तीर्थस्थापनेच्या अगोदर राज्याचे प्रशासन करीत होते ते या भूखडावरील प्रथम नृपती असून त्याचे साम्राज्य एकछत्री होते आपल्यामागे त्यानी ते साम्राज्य ज्येष्ठ पुत्र भरताला दिले आणि ह्या भरताचेही व्यक्तिमत्व व प्रशासनसामर्थ्य केवळ मानवाच्या अनुशासनापुरतेच मर्यादित नव्हते तर भरत वर्षातील यक्षादिकांवरही त्याचे आधिपत्य अखडितपणे चालत होते—

ततोऽभिषिच्य साम्राज्ये भरतं सूनुमग्रिमम् ।
भगवान् भारतं वर्षं तत्सनाथं व्यधादिदम् ।। ७६ ।।

— महापुराण, पर्व १७.

त्यानतर ऋषभांनी आपल्या ज्येष्ठ पुत्र भरताचा स्वत च्या साम्राज्य-पदावर अभिषेक केला आणि 'भरताच्या स्वामित्वामुळे ही भूमी भारतवर्ष वनली ' अशी घोषणा भगवानांनी स्वत च केली

वृषभस्तीर्थकृच्चैव कुलकृच्चैव संमतः ।
भरतश्चक्रधृच्चैव कुलधृच्चैव वर्णितः ।। २१३ ।।

शरीरदण्डनञ्चैव वधवन्धादिलक्षणम् ।
नृणां प्रबलदोषाणा भरतेन नियोजितम् ।। २१६ ।।

— महापुराण, पर्व २८

वृषभनाथ जसे पहिले तीर्थकर होते तसे ते राज्यकाळामध्ये कुलकरही (१५वे) होते आणि भरतेश्वर पहिले चक्रवर्ती असून त्याशिवाय कुलकरही (१६वे) होते भरताच्या राज्यकाळी अपराधी वृत्ती बळावल्याने भरत राजाने मारणे, बाधणे इत्यादिक नव्या प्रकारच्या शारीरिक दण्डयोजनाचा उपयोग करण्याची पद्धत सुरु केली

अहं हि भरतो नाम चक्री वृषभनंदनः ।
मत्साद्भवन्तु मद्भुक्तिवासिनो व्यंतरामरा ।। १२० ।।
इति व्यक्तलिपिन्यासो दूतमुख्य इव द्रुतम् ।
स पत्री चक्रिणा मुक्तः प्राङमुखीमास्थितो गतिम् ।। १२१ ।।

— महापुराण, पर्व २८

'मी वृषभपुत्र भरत चक्रवर्ती आहे म्हणून माझ्या राज्यामध्ये राहणाऱ्या व्यतरदेवांनी ( यक्षांनी ) माझ्या स्वाधीन व्हावे ' या अर्थाचा लेख त्यावर स्पष्ट लिहून चक्रवर्तीने सोडलेला तो बाण पूर्वेकडे तोड करून एखाद्या प्रमुख दूताप्रमाणे जलदगतीने निघाला

भरतपिता ऋषभनाथही दुसरे तिसरे कोणी नसून नाभिनदनच होत नाभिपुत्र वृषभनाथ जैनाचे आद्य तीर्थकर असल्याने त्याना मतिज्ञान, श्रुतज्ञान व अवधिज्ञान अशा तीनही ज्ञानाची प्राप्ती जन्मत च झाली होती—

नाभिश्च तन्नाभिनिकर्तनेन प्रजासमाश्वासनहेतुरासीत् ।
सोऽजीजनत्तं वृषभं महात्मा सोऽप्यग्रसूनुं मनुमादिराजम् ।।१३७।।

— महापुराण, पर्व ३

त्रिबोधकिरणोद्भासिबालार्कोऽसौ स्फुरद्द्युतिः ।
नाभिराजोदयाद्रीन्द्राद् उदितो विबभौ विभुः ।। ४ ।।

— महापुराण, पर्व १३.

ज्या नाभिराजांनी प्रजेला अर्भकाची नाळ कापण्याची कला शिकविली आणि सर्व मातापित्याना धीर दिला त्याच थोर नाभिकुलकरानी वृषभनाथाना जन्म दिला आणि ऋषभनाथानाही जो ज्येष्ठ पुत्र जन्मला तो १६ वा मनू व

पहिला चक्रवर्ती झाला नाभिराजरूपी उदयाचलावर उगवलेला, तीन ज्ञानरूपी किरणांनी प्रकाशणारा, तेजाने चकाकणारा तो बालरूपी सूर्य अनिर्वाचिक शोभेने विलसत होता

हा नाभिपुत्र वृषभनाथच जैनांचा पहिला तीर्थंकर होय. भोगभूमीमध्ये त्यापूर्वी नसलेली धर्मव्यवस्था त्यानेच नव्याने निर्माण केली. म्हणूनच त्या युगाचे रूपातरण कृतयुगामध्ये झाले. आणि इक्ष्वाकू या क्षत्रिय कुलातील आद्य पुरुषही तोच होय—

स एष धर्मसर्गस्य सूत्रधारं महाधियम् ।
इक्ष्वाकुज्येष्ठमृषभं ववाश्रसे समजीजनत् ॥ ५ ॥

— महापुराण, पर्व १२.

## भरतावनी

कृतयुगाच्या शिल्पकारीमधील राजा नाभी, अधिराजा ऋषभदेव अशा पुरस्सर परपरेमध्ये अवघ्या तिसऱ्या पीढीतच चक्रवर्ती भरताचा जन्म झाला त्याच्या यशोदुंदुभीचा आवाज विश्वव्यापी ठरला भरत प्रत्यक्ष राज्यश्रीचा शिरोमणी शोभला. पहिला चक्रवर्ती म्हणून त्याचे स्थान आजही अढळच राहिले आहे याची निशाणी म्हणजेच आपल्या परपरागत भूमीचे ‘ भरतावनी ’ म्हणून झालेले रूपातरण होय—

यन्नाम्ना भरतावनित्वमगमत् षट्खण्डभूषा मही
येनासेतुहिमाद्रिरक्षितमिदं क्षेत्र कृतारिक्षयम् ।
यस्याविर्निधिरत्नसंपद्रुचिता लक्ष्मीरुर:शायिनी
स श्रीमान् भरतेश्वरो निधिभुजामग्रेसरोऽभूत् प्रभुः ॥

— महापुराण, ३७/२०३

षट्खण्डानी विभूषित अशी ही विशालभूमी ज्याच्या नावामुळे भरतवर्ष ( भरतावनी ) म्हणून विख्यात झाली, रामाच्या सेतूपासून हिमालयापर्यंत पसरलेल्या या क्षेत्राचे पालन करीत असताना ज्याने समस्त शत्रूंचा नाश केला आणि भाण्डागारात ९ निधी व १४ रत्ने इत्यादी सर्वातिशायी संपदा प्रकट झाल्याने प्रत्यक्ष लक्ष्मीलाही ज्याच्या उरःस्थळावर विसावणे उचित वाटले असा तो श्रीमत व सर्वप्रभावी भरतेश्वर इतर सर्व चक्रवर्ती राजामध्ये अग्रिम स्थानी विराजमान झाला होता

## हरिवंशपुराण

या महापुराणापेक्षा कदाचित् थोडा काल अगोदर किंवा समकाळीच रचलेला पुन्नाट संघीय जिनसेन आचार्यांचा हरिवंश हा पुराणग्रंथही तितकाच प्रख्यात आहे त्यातही हा प्राचीन जैन इतिहास सापडतो ऋषभपुत्र भरत हा चक्रवर्ती राजा होता त्याने हिमालयापासून समुद्रापर्यंत सर्व भूमी साध्य केली आणि संपूर्ण भरतवर्षातील मानवावरच नव्हे तर डोंगरकपारीत राहणाऱ्या नागांवर, सुपर्णांवर व यक्षांवरही आधिपत्य गाजविले असा स्पष्ट उल्लेख मिळतो—

आरूढाश्वरथो धन्वी चक्रायुधपुरःसरः ॥ ४२ ॥
क्षुल्लकं हिमवत्कूटं यत्र तत्र गतः शरी ।
वैशाखस्थानमास्थाय बभाण रणदक्षिणः ॥ ४३ ॥
भो भो नागसुपर्णाद्याः शासनं शृणुताशु मे ।
देशस्था इत्यतश्चापमाकृष्य शरमाक्षिपत् ॥ ४४ ॥
हिमवत्कूटवासी तं सुरो दृष्ट्वा समागतः ॥ ४५ ॥
दिव्यामोषधिमालां स दिव्यं च हरिचंदनम् ।
दत्वा सपूज्य तं यातः शासनैषी विसर्जितः ॥ ४६ ॥
आगत्य चक्रवर्ती च ततो वृषभपर्वतम् ।
तत्रालिखन्निजं नाम काकण्या स परिस्फुटम् ॥ ४७ ॥
वृषभस्य सुतो भोऽहं चक्री भरत इत्यसौ ।
प्रवाच्य विजयार्धस्य वेदिकामगमत् प्रभुः ॥ ४८ ॥

— हरिवंशपुराण, पर्व ११.

( भरत चक्रवर्ती दिग्विजय करीत असताना भरतवर्षाच्या उत्तर टोकाला पोहोचला तेव्हा ) तो घोडे जुंपलेल्या रथात बसला होता. त्याच्या हातात धनुष्य होते विजयमार्गावर चक्ररत्न पुढे पुढे जात होते तो त्याच्या पाठोपाठ भूमी पादाक्रांत करीत होता तो युद्धनीतीमध्ये कुशल होता हिमवत् पर्वत रांगेतील एका शिखराजवळ तो पोहोचला तेव्हा हाती बाण घेऊन, वैशाख आसन धारण करून म्हणाला— 'या देशात वास्तव्य करणाऱ्या नाग-सुपर्णादिकानो, माझी आज्ञा चटकन् ऐका' आणि त्याने धनुष्य ओढून बाण सोडला तो बाण पाहून त्या हिमालयातील शिखरावर राहणारा यक्ष भरताजवळ हजर झाला आणि एक दिव्य औषधीमाला, दिव्य हरिचंदन इत्यादी अर्पण करून भरतचक्रीचा सत्कार केला त्याचे शासन मान्य केले आणि त्याची अनुज्ञा घेऊन तो परतला त्यानंतर

तो चक्री कैलास पर्वतावरील वृषभकूटाजवळ आला काकणी रत्नाने तेथे स्वत चे नाव— ' मी वृषभनाथाचा पुत्र भरत चक्रवर्ती होय. असे स्पष्टपणे कोरले त्या नावाचा पुकारा केला आणि तो वर्षाधिपती पुढे विजयार्थ पर्वताच्या वेदिकेकडे निघाला

## कुवलयमाला

सामाजिक आणि सांस्कृतिक अभ्यासाच्या दृष्टीने कुवलयमाला हा ग्रथही महान् आहे त्यात केवळ राजे–सामत इत्यादी श्रीमताचाच नव्हे तर समाजातील सामान्य लोकाचाही जीवनेतिहास मोठ्या प्रमाणात उपलब्ध आहे. त्यात विशेषत. पजाव, राजस्थान, माळवा व गुजरात या प्रदेशातील जीवन उत्तम रेखाटले आहे याचा कर्ता उद्योतनसूरी असून त्यांनी तो ग्रथ इ सन २१ मार्च, ७७९ मध्ये लिहून पुरा केला तेथेही या देशाच्या नामकरण घटनेचा स्पष्ट उल्लेख आहे त्यात म्हटले आहे की ऋषभपुत्र भरताच्या नावाचे स्मृतिचिन्ह म्हणून या षट्खडात्मक देशाचे नामकरण भरतवर्ष असे झाले आहे—

**जो सूसम-पढम-णरिंद-णियय-सुय-दिण्ण-णाम-चिंधालो ।**
**छक्खंड-भरह-सारो णासमवंती-जणवओ त्ति ॥**

– कुवलयमाला, पान ५०, ओळ २

( या अवसर्पिणीतील ) सुसम-दुसमा या ( तृतीय ) काळातील प्रथम नृपतीच्या भरत या स्वपुत्राच्या नावाचे स्मृतिचिन्ह ज्याला प्राप्त झाले आहे व जो सहा खण्डामध्ये विभागलेला आहे असा भरत नावाचा देश आहे त्यात अवती नावाचा प्रदेश सारश्रेष्ठ आहे—

## पुरुदेवचंपू

वृषभाच्या चरित्रावर आधारित ग्रथरचना विपुल आहे या सर्वांचा परामर्ष घेणे महाकठीण कर्म विविध प्रकारच्या साहित्य-स्वरूपामध्ये निरनिराळ्या काळात भरतवर्षातील बहुतेक सर्व प्रदेशात व तेथील लोकमान्य अशा सर्व भाषामध्ये ग्रथनिर्मिती चालूच आहे अशा साहित्यात पुरुदेवचपू या ग्रथाला स्वत चे असे खास महत्त्व आहे एक रसाळ आणि रजक काव्य म्हणून त्याची ख्याती पसरली आहे पुरुदेव हे जैन प्रणालीतील ऋषभदेवाचेच नाव आहे यामध्ये ऋषभचरित्र हाच विषय आहे त्यातही भरतवर्षाच्या नामकरण-घटनेचा स्पष्ट उल्लेख आहे

तन्नाम्ना भारतं वर्षमितीहासीज्जनास्पदम् ।
हिमाद्रेरासमुद्राच्च क्षेत्रं चक्रभृतामिदम् ।। ३२ ।।

— पुरुदेवचंपू, ६/३२

## जैन रामायण

त्याचप्रमाणे प जिनदास शास्त्री फडकुले याच्या १९६५ मध्ये सोलापूरहून प्रकाशित झालेल्या जैन रामायण या काव्यकृतीतही याच परपरागत नामकरणाच्या इतिहासाला पुष्टी देणाऱ्या ओळी आढळतात—

आदिप्रभु-प्रथमपुत्र जयास नाम ।
होते जगीं भरत जो धरि शांत धाम ।।
ज्याच्यामुळे भरत हे जगतास नाम ।
लाभे प्रसिद्ध करि कार्य सदा अकाम ।।

— जैन रामायण, पर्व ४/५६.

## भरताचा कुलधर्म

भरतचक्री केवळ युद्ध, दण्डनीती व राज्यकारभार यामध्येच रगला नाही तर प्रजेच्या कल्याणाकडेही त्याने लक्ष पुरविले त्यासाठी त्याना कुलाचार व अरिहताची पूजा इत्यादी पुण्यप्रद विधीचाही उपदेश केला त्यावरून तोही जैनधर्मीय व जिनानुयायीच होता हे सिद्ध होते षट्खड–दिग्विजयानेही तो उन्मत्त बनला नाही हे विशेष होय जिनपूजेची एकही सधी त्याने दवडविली नाही चक्ररत्नाच्या बळावर दिग्विजय साध्य केला परतु उत्तर सीमेवरून परत फिरताना कैलास पर्वतावर जाऊन भ. ऋषभजिनाचे दर्शन घेण्यास तो विसरला नाही या व अशा प्रकारच्या घटनाचा उल्लेख ठिकठिकाणी आढळतो—

कुलधर्मोऽयमित्येषाम् अर्हत्पूजादिवर्णनम् ।
तदा भरतराजर्षिः अन्ववोचदनुक्रमात् ।। २५ ।।
प्रोक्ता पूजार्हतामिज्जा सा चतुर्धा सदार्चनम् ।
चतुर्मुखमहः कल्पद्रुमश्चाष्टाह्निकोऽपि च ।। २६ ।।

— महापुराण पर्व, ३८/२५–२६

आर्हद्धर्म हा प्रजाजनांचा परपरागत कुलधर्म आहे असा विचार करून राजर्षी भरताने अर्हन्तपूजा इत्यादिक धर्माचाराचे अनुक्रमाने वर्णन केले.

अरिहंताची पूजा दररोज केली पाहिजे ती चार प्रकारची सांगितली आहे—
(१) सदार्चन, (२) चतुर्मुखपूजा, (३) कल्पद्रुमपूजा आणि (४) आष्टान्हिकपूजा.

> जिने यज्ञं करिष्याम इत्यधिवसिताः किल ।
> जित्वा दिशो जिनानिष्ट्वा निर्वृत्ता भरतादयः ॥ ७ ॥
>
> — प्रतिष्ठासारोद्धार, ७.

सर्व दिशा जिंकल्यावर आपण ऋषभजिनाची पूजा करावी, या विचाराने भरतादिक सर्वजण तेथे थावले आणि जिनेन्द्राची पूजा-अर्चा केल्यावर ते सर्वजण तेथून परतले

## भरतकुळातील क्षात्रधर्माची परंपरा

जैन राजे वर्णाने व वृत्तीने क्षत्रिय असले तरी त्यांची क्षात्रवृत्ती वेगळी आहे ( याच ग्रंथातील जैन क्षत्रियानुयोग पहा ). प्रवृत्तिमार्गावर विजय मिळवून निर्वृत्तिमार्गाचा अंगिकार करणे हा त्यांचा बाणा आहे भौतिक विजयापेक्षा त्यांना आध्यात्मिक विजय महत्त्वाचा वाटतो. दुसऱ्याला जिंकून मदोन्मत्त न होता स्वतःच्या मदादी आंतरिक शत्रूनाही जिंकल्याशिवाय त्यांचा विजय पूर्ण होत नसतो आणि क्षात्रवृत्ती पूर्णतेला पोहोचल्याशिवाय त्यांच्या जीवनाची पूर्ती होतच नाही अशा जीवनपूर्तीचा जो मार्ग ऋषभदेवांनी पूर्वीपासून आखून दिला आहे तो सर्वच जैन क्षत्रियांनी अत्यादराने चोखाळला आहे भरत हाही ऋषभपुत्र व जैन क्षत्रिय असल्याने त्यानेही त्याच मार्गाने आपले जीवन सार्थ केले

> आसि इहं पवरलक्खणसंजुत्तो उसहो नामं पढमराया, जेणिमा पुव्वि पया निम्मिया । .... तस्स पुत्तो आसि भरहो नामं पढमचक्कवट्टी चउदसरयणाहिवई, तेण इमं आययणं कारियं पडिमा थूभा य । सो य भयवं समउडकेवलनाणी सामण्णं पडिवज्जिऊण अंतगडो । तस्स य गुण-विणय-माहप्पसंजुत्तो रयणदेवयापरिहीणो सयमेव इंदेण रायाअहिसित्तो आइच्चजसो नामं सयलं भरहं भुत्तूण निक्खंतो ।
>
> — वसुदेवहिंडी, द्वि खं., पान ३०१.

येथे उत्तम लक्षणांनी युक्त असा ऋषभ नावाचा एक सर्वप्रथम राजा होऊन गेला येथील प्रजापालनाची संस्था त्यानीच निर्माण केली त्याच्या पुत्राचे नाव

भरत. तोच भरत पहिला चक्रवर्ती झाला तो चौदा रत्नाचा अधिपती होता त्यानेच हे अष्टापद ( कैलास ) पर्वतावरील मदिर, या प्रतिमा आणि हे स्तूप निर्माण केले मुकुट धारण करीत असूनही ( विशाल राज्याचा लाभ झाला असतानाही त्याचा त्याग करून ) समण धर्माचा अगिकार करून, केवलज्ञान झाल्यावर त्याने ससाराचाही अत केला, तो मुक्त झाला त्या भरताचा मुलगा आदित्ययश तोही आपल्या गुणानी व विनयामुळे श्रेष्ठ बनला प्रत्यक्ष इन्द्राने त्याचा भरतवर्षाच्या राज्यावर अभिषेक केला चौदा रत्नाच्या अधिष्ठित देवताची मदत नसतानाही त्याने सपूर्ण भारतावर राज्य केले शेवटी त्यानेही दीक्षा घेतली

अशी ही जैन क्षत्रियाची परपरा भ महावीरापर्यंत आणि तेथूनही पुढे अतूट चालत राहिली सर्व तीर्थंकरच नव्हे तर सारे शलाका पुरुष हे याच मालिकेतील रत्ने होत ज्या भरताच्या नावावरून या देशाला भरतवर्ष म्हणतात त्याच भरताच्या वशपरपरेतील शेवटचा शलाका पुरुष म्हणजे भ. महावीर होत ते अतिम तीर्थंकर असले तरी पूर्वजन्मी भरत या पहिल्या चक्रवर्तीचेच मरीची नावाचे पुत्र होते म्हणून ते चक्री भरताचे परपरागत उत्तम वारस होत. त्याचा जन्मही त्याच अखडित इक्ष्वाकू वशात झाला

**जज्ञे ज्ञातेक्ष्वाकुषु सिद्धार्थनरेन्द्रकुलदीपः ॥**

– तत्त्वार्थाधिगमसूत्र, सबधकारिका ११.

इक्ष्वाकू वशातील ' ज्ञात ' कुलामध्ये सिद्धार्थ नावाचा राजा होता त्याने कुलश्रेष्ठ महावीराला जन्म दिला

**सो भगवया आइतित्थगरेण उसहसामिणा दसारादिकरो**
**अपच्छिमतित्थयरो य आइट्ठो ॥**

– वसुदेवहिंडी, द्वि. ख , पा. ३१५.

( अनंतमती राणीच्या पोटी जन्मलेला भरतपुत्र मरीची ) हा पहिला नारायण द्विपृष्ठ आणि अतिम तीर्थंकर महावीर होणार आहे असे प्रथम तीर्थंकर भ ऋषभस्वामीने प्रतिपादन केले

## स्मृतिलक्षणरूप इतर स्थलाभिधाने

ज्याप्रमाणे भरतचक्रीवरून या देशाला भरतवर्ष हे नाव मिळाले त्याप्रमाणे प्रत्यक्ष भ ऋषभनाथ व इक्ष्वाकू वशातील इतर पुष्कळशा राजावरून या क्षेत्रातील कित्येक स्थळाना व पर्वतानाही स्मृतिलक्षणरूप अभिधाने प्राप्त झाली आहेत ( याच ग्रथातील ' स्थलनामकरण . एक दृष्टिक्षेप ' प्रकरण पहा )

गओ कमेणं चुल्लहिमवंतं वासहरपव्वय। . ततो उसहकूडपव्वयं
नियंयनामंचिधं काऊणं कओ पत्थाणो ।।

— वसुदेवहिंडी, द्वि खं, पान ३४१

ज्याप्रमाणे आगमामध्ये ( सूयगड, १/२, उत्तरज्झयण, ६/१७ ) अनेक ठिकाणी, भ महावीर हे वैशालीचे राजपुत्र असल्याने, त्याचा उल्लेख वेसालिय या उपाधीने केलेला आढळतो त्याचप्रमाणे कोशल देशाचे व कोशल नगरीचे प्रथमत युवराज आणि पुढे नृपती असल्याने भ ऋषभदेवाना कोसलिय आणि कोसल–णरणाह म्हटलेले आहे म्हणून ऋषभपुत्र भरताचा उल्लेख कोसल-णरणाह-पुत्त असाही आढळतो तसेच कोसला नगरीचा उल्लेख पढमपुरी पोराणा ( प्राचीन काळातील पहिली राजधानी ) असाही सापडतो

शिवाय विनीता, अयोध्या, साकेत, कोसल अशा रूपातराने या पहिल्या राजधानीच्या व त्यावरून त्या प्रांताच्याही। नावामध्ये झालेला बदल स्पष्ट दिसतो ऋषभदेवांच्या शंभर मुलापैकी भरत–बाहुबलीप्रमाणेच कोसल नावाचाही एक पुत्र होता ( परिशिष्ट ४ ) भारतातील काही प्रदेशाना या इतर ऋषभपुत्राचीही नावे मिळालेली आहेत बाहुबलीवरून बहलीदेश, कोसल राजपुत्रावरून त्याच्या नगरीला, प्रांताला व तेथील लोकानाही कोसला, कोसल व कोसलजन अशी नावे प्राप्त झाली असल्यास नवल नव्हे ! पढमपुरी असा स्पष्ट उल्लेख असल्याने ही कोसला नगरी दुसरी कोणतीही संभवत नाही

अत्थि भुयणे पयासो कोसल-णरणाह-पुत्त-गोत्तंको।
कोसल-जणो जणाण कोसल-जण-णिवह-पूरंतो ।।

— कुवलयमाला, पान ७२/३०

अवि कामिणियण-मुहयंद-चंदिमा-धुमिय-तुंग-धवलहरा ।
पढम-पुरी पोराणा पयडा अह कोसला णाम ।।

— कुवलयमाला, पान ७३/२



: ६ :

# एकमुखी पुरावा

पुराणे हि कथा दिव्या आदिवंशाश्च धीमताम् ।
कथ्यन्ते ये पुराऽस्माभिः श्रुतपूर्वाः पितुस्तव ॥

— महाभारत, आदिपर्व, ५/२

जैनेतर भारतीय साहित्यामधील

# ६ एकमुखी पुरावा

## भारतीय इतिहासाचा मूळारंभ

नाभिराज, ऋपभनाथ आणि भरतचक्री ह्या व्यक्ती इतक्या थोर आणि त्याच्या जीवनकालात घडलेल्या घटना इतक्या ठळक आहेत की कोणत्याही प्रकारच्या इतिवृत्तनिवेदनामध्ये त्याना फार मोठे आदराचे स्थान प्राप्त झाले आहे कोणताही ग्रथकार त्याचा योग्य तो आदर केल्याशिवाय राहात नाही त्या काळचा तोच सर्वप्रमुख व एकमेव इतिहास असल्याने तो कुठल्याही वृत्तान्तकथनातून वगळता आला नाही ती प्रणाली तोडता आली नसावी. कारण ती परपरा वगळणारा ग्रथकार स्वत च परपराभ्रप्ट होत असे आणि त्याला पाहिजे असलेली प्रतिण्ठाही मिळत नसे

कारण कोणतेही असले तरी सर्व पूर्वग्रथानी अक्षरबद्ध केलेला वृत्तान्त मात्र एकमुखी आहे, नि सदिग्ध आहे, स्पष्ट आहे मला वाटते एवढी सुसगती इतर कोणत्याही भारतीय घटनेबाबत टिकली नसावी स्वकीय, परकीय असे भेदाभेद निर्माण झाल्यावर, अशा झगड्यामुळे वैचारिक पातळी इतकी ढवळून निघते की स्वकीयाच्या घटनाही एकसारख्या नोदलेल्या आढळत नाहीत. स्वपथाभिनिवेश अगर इतराचा द्वेप किंवा निष्काळजीपणा अथवा प्रत्यक्ष घटनेचाच अनादर अशा कोणत्याही कारणाने इतिवृत्तामध्ये फरक आढळतोच फार मोठा फरकही प्रत्ययास येतो कालविपर्यास, स्थलविपर्यास, उद्दिष्टातील विसगती, व्यक्तिविपर्यय, व्यक्तीचे विपरिणमन, अनुल्लेख, विकृत उल्लेख, सत्यासत्याची भेसळ अशा नाना तऱ्हा पहावयास मिळतात ग्रथातील सपूर्ण आवाजच बदसूर व बेसूर असतो कुणाचा कशाशीही मेळ नसतो

अशा विषम प्रांगणात वाचकाला नीट नाचता येत नाही, किंवा अधिक धडपड केल्यास हातपाय मोडल्याशिवाय राहात नाहीत अशा पार्श्वभूमीवर केवळ या तीन व्यक्तींच्या घटनांचा मेळ सर्वच ग्रंथांत इतक्या मोठ्या प्रमाणात साधलेला पाहिल्यावर नवल वाटल्याशिवाय राहात नाही उपलब्ध असलेल्या सर्वच ग्रंथातील ही एकवाक्यता आज जवळ जवळ चार हजार वर्षे तरी संगतवारपणे अखंडित चालू आहे एवढे दीर्घकालीन एकमत म्हणजे या युगातील एक महान व अद्‌भुत घटना होय एवढे विशाल मतैक्य इतरत्र आढळत नाही असे म्हटल्यास सहजासहजी कुणास खरेही वाटणार नाही पण ही वस्तुस्थिती आहे तिचा आपण प्रत्यक्षच अनुभव घेऊ शकता

## वेदातील इतिहासारंभ

भारतातील वैदिक परंपरा थोर आहे त्याचे ग्रंथही फार महत्त्वाचे आहेत मानवी आयुष्यातील सर्वांत जुन्या घटना वेदग्रंथांतच आढळतात वेद सामान्यत धार्मिक ग्रंथ समजले जातात पण त्यात मानवी संस्कृतीचा अथवा संस्कृतिसंघर्षाचा इतिहासही विपुल प्रमाणात लिपिबद्ध झाला आहे एवढ्या मोठ्या प्रमाणातील वैचारिक क्रान्ती याहून दुसऱ्या कोणत्याही जुन्या साहित्यात लिपिबद्ध झालेली उपलब्ध होत नाही या अर्थाने वेद हे जगाचेच आद्य ग्रंथ आहेत परंपरेने, कालाने, धर्माने, वृत्तान्ताने आणि मान्यतेने थोर असलेल्या या वैदिक साहित्यापासूनच वरील देशाच्या नामकरण-घटनेची सुसंगती तपासून पाहू वेद हे आवासित आर्यांचे ग्रंथ आहेत हे लक्षात घेता त्यातील उल्लेख कोणत्या प्रकारचे, कोणत्या स्वरूपामध्ये, कोणत्या हेतूने प्रेरित झालेले आणि किती प्रमाणात आढळतील याची कल्पना येणे शक्य आहे परप्रान्तातील पुरावा थोडासाही असला तरी तो सर्व्या अर्थाने महत्त्वाचा असतो परप्रांत असल्याने असा पुरावा कदाचित उघड पण बहुधा हेराप्रमाणे निरनिराळ्या वेषात व विखुरलेल्या अवस्थेतच सापडतो हेराप्रमाणेच तो सापडतो यालाच महत्त्व आहे। असा बाहेरील पुरावा वादातीत असतो, अगदी महत्त्वाचा असतो म्हणून सर्वांना ग्राह्य ठरतो त्याच्या बाह्य वेषामध्ये शंका आली तर इतर पुराव्याच्या निकषावर त्याची परीक्षा घ्यावयाची असते तसेच वेदातील पुरावा अपुरा वाटला तर तो त्याच परंपरेतील स्मृतिग्रंथाशी व पुराणग्रंथाशी ताडून पाहता येतो आणि तेथे विसंगती न आढळता मूळ घटनेशी मेळ बसत असेल तर तो वृत्तांत पुराव्याच्या निकषावर टिकतो म्हणून ग्राह्य ठरतो

## ऋग्वेदात ऋषभनाथाची उपासना

ऋषभं मा समानानां सपत्नानां विषासहिम् ।
हंतारं शत्रूणां कृधि विराजं गोपतिं गवाम् ॥

ऋग्वेद, १०/१६६/१

वेदातील सर्वच भागाचा नि सदिग्ध अर्थ लागलेला नाही मतभेद होतातच तरी प्रा विरूपाक्ष वेरियर, वेदतीर्थ आणि एम् ए., यानी ऋग्वेदातील वरील ओळीचा जो अर्थ लावला तो असा—

" O Rudralike Divinity ! do thou produce amongst us, of high descent, a great god, like Rsabha Deva, by becoming Arhan (Which is the epithet of the first world Teacher), Let him become the distroyer of the enemies ! "

— जैन पथप्रकाश, ३/३/१०६

हे रुद्रसम देवा ! तू आमच्यामध्ये ऋषभासारखा अर्हत्स्वरूपी असा अेक उच्च आणि थोर देव निर्माण कर ( ऋषभ या पहिल्या तीर्थंकराची अर्हत् हे अेक गुणविशेषण आहे ) आणि तो आमच्या शत्रूचा सहारकर्ता ठरो

वेदातील ऋषभ किंवा वृषभ या शब्दाचा अर्थ बहुतेक वेळा बैल असा करतात पुष्कळ वेळा तो बरोबर असला तरी पण अशी काही स्थळे आहेत की त्या ठिकाणी बैल असा अर्थ करणे इष्ट नाही आणि त्यामुळे उदिष्टही साध्य होत नाही दैवताच्या प्रार्थनेमध्ये बैलाला कोणी आवाहन करीत नसतो ! मात्र पुष्कळ वेळा ऋषभदेवाची जागा वृषभाने घेतलेली आहे त्याचे कारण वृषभ हे पहिल्या तीर्थंकराचे लाछन आहे त्याचा प्रतिकात्मक उपयोग साहित्यात विपुल आढळतो ही गोष्ट ज्याच्या लक्षात येत नाही त्याचा गोंधळ होतो हे एक कारण शिवाय कृषिप्रधान सस्कृतीची सुरवात आपल्या राज्यकाळी आदिनाथ तीर्थंकरानीच केली

.कम्माणं तिण्णि वि पयाहियाए उवदिसइ त्ति ।

— आवश्यकचूर्णी (अभिधानराजेन्द्रकोश, पा ११२८)

प्रभुणा तु भगवता ऋषभस्वामिना सर्वाणि च कृष्यादीनि कर्माणि देशितानि ।

— आवश्यकनिर्युक्ति (मलयगिरि) प्रथम खड

त्यात सृष्टीचा नवा आविष्कार होता ती नवरचना होती त्या कृषिकार्यात वृषभाला मोठेच स्थान प्राप्त झाले कारण त्यावेळी कृषिकार्यात 'बैल' ही एकमेव शक्ती वापरली गेली या घटनेचे प्रतिबिंब त्या इतिवृत्तामध्ये उमटल्या-शिवाय कसे राहील ? अश्वशक्तीप्रमाणे वृषभ देखील शक्तीचे एक प्रतीक आहे ऋषभनाथही पहिला राजा असल्याने शत्रूनाशासाठी समर्थ होते अशा अनेक कारणामुळे ऋषभनाथ व वृषभ एकार्थवाची बनले असावेत ! पुढे त्याना केवलज्ञान

प्राप्त झाल्यावर हेच ऋषभनाथ इष्ट प्रार्थनेतही प्रधान दैवत ठरले त्याचा आदर भक्तिभावाने करण्यात आला ही अर्थसगती डॉ. वेबर साहेबानाही मान्य आहे–पहा Indian Antiquary, Vol XXX, P 280 याशिवाय वृष याचा अर्थ धर्म असाही असल्याने आणि धर्माचा वर्षाव केल्यामुळे (भागवतपुराण,१/१७/२२) ऋषभदेव व वृषभ याचे सानिध्य अकाटय ठरले आहे पण ज्याला ऐतिहासिक घटना ज्ञात आहेत त्याला सुसगती व विसगतीही तावडतोव समजते तो इतिहास इतर अनेक निकषावर अगोदरच पूर्णपणे उतरलेला असल्याने त्यात सभ्रम निर्माण होण्याचे कारणच उरत नाही मात्र झोपेचेच सोंग घ्यावयाचे असेल तर त्याला इलाज नाही!

**केशीसूक्त आणि ऋषभदेव**

ऋग्वेदातील काही भाग ( मडल १० / १३६ ) केशीसूक्त म्हणून प्रसिद्ध आहे यात १ ते ७ श्लोकापर्यंत केशी मुनीचे वर्णन आहे–

> " **केशी** मुनी विश्वाचा आधार आहे तो **विश्वज्ञानी** आहे त्याच्या सघातील मुनी **दिगबर** आहेत ते **तपश्चर्या** करीत विहार करतात त्यांची अवयवे कृश असतात. ते वायूप्रमाणे **मुक्तविहारी** आहेत सामान्य लोकाना केवळ त्याच्या देहाचे ज्ञान होते ते गगनविहारीही असतात ते **आत्मज्ञानी** असून अत्यत **मंगलमय** आहेत सर्व प्राणिमात्राचे **हितचितक** ( अहिसाव्रतधारी ) आहेत सर्व देवगण आणि मुनिगण त्याची स्तुती करतात पूर्वसमुद्रापासून अपरसमुद्रापर्यंत सर्वत्र त्याचा विहार चालू असतो अप्सरा, गधर्व आणि मृगगण याच्या मार्गाने विहार करणारा, ज्याचा जटासभार विखुरलेला आहे असा तो **केशी** मुनी **सर्वज्ञ** असून सर्व भूतमात्राशी मैत्रिभावच धारण करतो तो पाणी पितो तेव्हा वायू त्याच्यासाठी सर्व गोष्टी अनुकूल करतो "

हे वर्णन मुनिपर्यायामधील ऋषभनाथाचेच आहे हे वर्णन सामान्यत सर्वच **जैन मुनींना** लागू पडणारे आहे हे स्पष्ट आहे अशाच प्रकारचे दिगबरावस्थेमधील जैन मुनीचे वर्णन मज्झिमनिकाय – सुत्त ४०, भागवत पुराण – ५-६-१२, ५-३-२०, ५-६-२८ ते ३१ अशा बौद्ध व हिंदू ग्रथातही आढळते त्या ठिकाणी त्याना शरीरमात्र-परिग्रह, गगनपरिधान, अय अवतारो कैवल्योपशिक्षणार्थ, **श्रमणानां धर्मान् दर्शयितुकाम** अशा स्पष्ट शब्दात त्याचे गुणकीर्तन केलेले आहे

प्रत्यक्ष बुद्धानेही त्याना निर्ग्रंथ जैन मुनी असे स्पष्टपणे म्हटले आहे जैन मुनीचा हा आचार बौद्ध भिक्षूना व वैदिक ऋषीनाही अपेक्षित व प्रिय आहे **यावरून हेही सिद्ध होते की येथे वैदिक आर्य येण्याच्या अगोदर जैन धर्माचा आचार पाळणारे मुनी भारतात सर्वत्र विहार करीत होते**

वेदातील इतर भागामध्येही या प्रकारचे उल्लेख सापडतात **श्रमण (समण)**, अर्हत्, व्रात्य या पदांचा अर्थ उघडपणे **जैन मुनी** असाच आहे अशा परिसरातील **ऋषभ** शब्दाचा उल्लेख हा जैनाचे पहिले तीर्थंकर जे **ऋषभनाथ** त्याच्याशीच सबधित असतो ऋग्वेदातील काही सदेहपदाचा अर्थ **यजुर्वेदातील** व **अथर्ववेदातील** सदर्भामुळे स्पष्ट होतो आणि तेथेही काही सदेह शिल्लक उरलाच तर **पुराणातील** अधिक स्पष्टोक्तीमुळे सहजच त्याचे निरसन पूर्णपणे होते पुराणातील उल्लेख बोलके असून सुलभ व सुगम आहेत. प्राचीनतम इतिहासाच्या दृष्टीने पुराणाना किती महत्त्व आहे ते पूर्वीच्या प्रकरणात पाहिलेच आहे केवळ उत्तरकालीन रचना म्हणून त्याकडे दुर्लक्ष करता येत नाही त्याची प्रणाली पारपरिक आहे

## यजुर्वेद–सामवेद संदर्भ

ऋग्वेदातील ऋचाशिवाय सामवेदातील– १४२, १२३४, १३९५, १८४९ इत्यादी स्तवनेही लक्ष्य वेधून घेतल्याशिवाय राहात नाहीत विशेषत अ०९-कडिका २५, अ०२५/क०१९, अ०७/क०३८, अध्याय १८/क०२७/मत्र १ व अ०२५/क०१० या दृष्टीने विचार करण्यास योग्य ठरतात शिवाय शुक्ल-यजुर्वेदातील २३/१, १३/४, २३/६३, १०/१९, ७/३८/२ इत्यादी मत्रही पुष्टीदायक आहेत डॉ राधाकृष्णन्ही या विधानाला सहमत होतात ( Indian Philosophy, Vol. 1, P. 287 ) त्याचप्रमाणे कृष्णयजुर्वेदीय **तैत्तिरीय** सहिता-मधील पुढील भाग याबाबतीत मार्गदर्शन होण्यास उपयोगी आहे– १/४/१७, ५/७/२, प्रपा०४/अनु०५, प्र०५/अनु०४/विभा०३२, प्र०१/अनु०१ आणि अनु०३२, प्र०२/अनु०७ **या भागांमधील जैन मुनींची समणसस्कृती व त्या मुनींची स्तुती अक्षरश स्पष्ट आहे.**

## अथर्वामध्ये जीवित घटनांची नोद

अथर्ववेदामध्ये **ऋषभ** या जैन तीर्थंकराचा व इतराचा नुसता उल्लेखच नव्हे तर त्याच्या जीवनातील प्रमुख घडामोडी आणि त्याचा जीवनक्रमही नोदलेला आहे तो अभ्यासाच्या दृष्टीने महत्त्वाचा आहे त्यातील काही ओळी अशा आहेत की त्यावरून ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेदातील काही अस्पष्ट ओळीचा व पदाचाही अर्थ समजण्यास मदत होते कारण येथे पूर्वापर सदर्भ पाहता येतो मनोमन श्रद्धा सुसगत माडल्या आहेत या दृष्टीने ७/८५, ४/३८/५, ९/४/१ ते २४ आणि १५/३/१ ते ११ या विभागाकडे लक्ष पुरविणे हिताचे आहे विशेषत यातील–

वेद आस्तरणं ब्रह्मोपवर्हणम् ॥ ७ ॥
सामासाद उद्गीथोऽपश्रयः ॥ ८ ॥

– अथर्ववेद, १५/३/७ व ८

हे दोन मत्र इतर सर्व वैदिक स्तवनातील मूळ हेतू स्पष्ट करतात W D Whitney याच्या शब्दात– '(7) The Veda, The cushion (आस्तरण), The Brahma, The Pillow (उपवर्हण), (8) The Chant (सामन्), The Seat, The Udgitha, The Support ' अर्थात वेद म्हणजे आस्तरण, ब्रह्मा म्हणजे उशी, साम म्हणजे आसन आणि उद्गीथ म्हणजे आलंबन होय वेदातील ही रचना ऋषभादिक मुनीच्या स्तवनासाठी आहे सामान्यत हा पूर्ण १५ वा विभाग व विशेषत त्यातील सहावा पर्याय म्हणजे 'सर्व वैदिक दैवते व्रात्य मुनीची उपासना करतात' या तथ्यभूत विधानाचा पुरावा होय. व्रात्यमुनी सर्वात जास्त आदरणीय दैवत होय यातील १२ वा पर्याय याचा सबळ आधार होय या पधराव्या विभागातच असे काही सबळ पुरावे गावूत आहेत की त्यावरून हा व्रात्यमुनी म्हणजे ऋषभनाथ तीर्थंकरच होत यासबधी शका उरत नाही ऋषभनाथाचे पूर्वाश्रमीचे चरित्र व दीक्षेनतरचे मुनिचरित्र ज्यांना स्पष्टपणे माहीत नाही अशा ग्रिफिथसारख्या साहेबाला व्रात्यमुनीचे आकलनच झाले नाही म्हणून त्यावर एक टीप लिहून, 'व्रात्यासारख्या एका फिरस्त्या साधूचा एवढा गौरव का आढळतो, तो अतिशय गुणानी युक्त असूनही काही वेळा आहारासाठी का भटकतो हे कळत नाही' असे त्याला कबूल करावे लागले (ग्रिफिथचेच अथर्ववेद–भाषातर, दुसरा भाग, पान १९९) तो सपूर्ण वृत्तान्त भ ऋषभदेवांच्या जीवनाशी अगदी सुसगत आहे याचा एक अर्थ स्पष्ट आहे की– भ ऋषभदेव ही विभूती वेदपूर्वकालीन आहे आणि वैदिक सस्कृतीचे समणमुनीच्या सस्कृतीशी वैर निर्माण होण्याच्या अगोदरच या भागाचा वेदामध्ये समावेश झालेला आहे (व्रात्यमुनीचा इतिहास श्री. के पी. जयस्वाल यानी १९२९ सालच्या Modern Review मध्ये पान ४९९ वर दिलेला आहे.)

शिवाय या भागातील सर्व वृत्तान्त वायुपुराण इत्यादी पुराणकालीन ग्रथातही सगतवार सापडतो. अवैदिक ऋषींचा आदर तेथेही स्पष्ट दिसतो. विशेषत त्या पुराणातील पाशुपतयोगासबधीच्या दहाव्या अध्यायामध्ये अशा मुनीची उपासना करण्यासाठी आज्ञा दिली आहे अशा एका मुनीला दिलेला आहार शेकडो ब्राह्मण–भोजनांपेक्षा सहस्रपटीने पुण्यदायक आहे असे स्पष्ट सागितले आहे (पहा– कल्याण, ऑगस्ट १९३५, पान २३७ वरील श्री रामचंद्र दीक्षितार, एम ए याचा लेख)

## वैदिक साहित्यातील ऋषभवाचक संज्ञा

आणखी याच परपरेतील स्मृतिग्रंथ, महाभारत, वायुपुराण, विष्णुपुराण, भागवतपुराण, भगवद्गीता इत्यादी हिंदू साहित्यातही वरील समणमुनीचा व विशेषत वृषभदेवाचा जीवन वृत्तान्त आढळतो त्यातील काही ठळक उदाहरणे सहज देता येतील विष्णुपुराण, द्वितीयाश, अ०१/२७-२८ मध्ये तर ऋषभनाथ एकछत्री असे पहिलेच राजे होते व त्यानी नतर दिगबर दीक्षा धारण केली असा उल्लेख आहे या पहिल्या जैन तीर्थंकरांचा उल्लेख वैदिक साहित्यात निरनिराळ्या पदावलीत व सबोधनामध्ये स्वीकारलेला आढळतो–

(१) काश्यप– ऋषभाच्या तेजाला ( भामडलाला ) अनुसरून त्याला प्राप्त झालेले गुणविशेषण नतरच्या परपरेत मात्र ते गोत्राचे नाव ठरले

(२) इक्ष्वाकू– ऋषभाच्या वशाचे नाव

(३) हिरण्यगर्भ– ऋषभनाथ गर्भस्थ असताना गर्भकल्याणकाच्या महोत्सवाला अनुसरून इद्राच्या आज्ञेने नित्य सुवर्णवृष्टी होत असे, त्याला अनुसरून प्रशसार्थक विशेषण

(४) ब्रह्मा– मन्वतरकालीन परिवर्तनाच्या शेवटी कृतयुगाची रचना केली म्हणून निर्मितिदर्शक पदवी

(५) आदीश्वर
(६) आदिराज
(७) आदिदेव
} कृतयुगापूर्वी राज्यसस्था नव्हती कृतयुगारभीचा प्रथम राजा म्हणून ही सबोधने

(८) स्वयंभू कृतयुगापूर्वीच याचा जन्म झाला होता कृतयुगातील सृष्टी अजून पूर्ण झाली नव्हती कृतयुगातील लोकानी ऋषभाचा जन्मप्रसग पाहिलाच नव्हता शिवाय गुणानी व कर्मानीही ते स्वत परिपूर्ण होते म्हणून अवस्थादर्शक वर्णन

(९) विधाता– कृतयुगारभी सर्व लोकाच्यासाठी तीन प्रकारच्या जीवनोपायाचे विवरण व समाज व्यवस्था प्रथमत यानीच केली म्हणून तोच एकमेव विधायक कार्यकर्ता

(१०) विश्वकर्मन्– मानवी जीवनाला उपयोगी अशा स्थापत्यादिक सर्व शास्त्राचा, गणित – लिपी – सगीतादिक कलाचा उपयोग ऋषभानेच आपल्या प्रजेला शिकविला म्हणूनच तो विश्वकर्मा ठरला

(११) पितामह– भरतवर्षातील सर्व मानव भरतचक्रीची प्रजा बनल्याने भरताच्या वडीलाना साहजिकच सर्व लोक पितामह म्हणू लागले

### शुक्ल यजुर्वेद

ज्याप्रमाणे उत्तरज्झयण आगमामध्ये (जन्नइज्ज, १६)–

**णक्खत्ताण मुहं चंदो धम्माण कासवो मुहं ।**

अर्थात सर्व नक्षत्रसमूहांमध्ये चद्र जसा मुख्य आहे तसे ऋषभनाथ धर्मांचे मुख ( धर्मतीर्थाचे प्रवर्तन करण्यामध्ये प्रमुख ) आहेत असे विधान आहे, त्याच अर्थाचे विधान शुक्ल यजुर्वेदातही सापडते–

**स्तोकानामिदुं प्रति शूरं ह इन्द्रो वृषभायमाणो वृषभस्तुराषाट् घृतभ्रुषा मनसा मोदमानाः स्वाहा देवा अमृता मादयन्ताम् ॥२०/४६**

ज्याप्रमाणे चद्र हा सर्व नक्षत्रामध्ये इद्र (श्रेष्ठ) आहे त्याप्रमाणे सर्वसमर्थ असा वृषभनाथ जगातील सर्व धर्मप्रवर्तकांमध्ये ज्येष्ठ आहे. म्हणून देवता नेहमी त्याचेच आवाहन करतात आणि शुद्ध मनाने व आनदाने पूजा–सत्कार करतात.

### श्वेताश्वतर उपनिषद

श्वेताश्वतर उपनिषदामधील–

**यो ब्रह्माणं विदधाति पूर्वम्**
**यो वै वेदांश्च प्राहिणोति तस्मै ।**
**तं ह देवमात्मबुद्धिप्रकाशम्**
**मुमुक्षुर्वै शरणमहं प्रपद्ये ॥ – श्वे० ६/१८**

‘ जो विश्वाचा प्रथम विधाता आहे, जो सर्व ज्ञानाचा प्रवक्ता आहे त्याला मी माझ्या बुद्धीचा प्रकर्ष होण्यासाठी मोक्षाची अपेक्षा बाळगून शरण जातो ’ अशा ओळी उद्बोधक वाटतात

### भागवतपुराणात ऋषभांचा इतिहास

भागवतपुराण एक श्रेष्ठ धर्मग्रथ आहे याच्या पाचव्या स्कंधातील ३ ते ७ अध्यायामध्ये जैन तीर्थंकर ऋषभनाथांच्या जीवनातील काही ठळक प्रसंगाचे विवरण आहे. तेथे ऋषभांना अगर वृषभांना स्पष्टतया दिगंबर धर्मगुरु म्हटले आहे, प्रत्यक्ष परमात्मा विष्णूनेच दिगबरांच्या धर्माचा उपदेश करण्यासाठी नाभिराजाचा पुत्र म्हणून जन्म घेतला दिगबर मुनी उग्र तपश्चर्या करतात ते अतिशय ज्ञानी असतात कडक ब्रह्मचर्य व्रत पाळतात (ब्राह्मणोत्पत्तिमार्तण्ड, प्रकरण५८/श्लोक५९) विष्णूने दिगबर जैन धर्म विशद करण्यासाठी अवतार घेतला या विधानाचा दुसरा एक महत्वाचा अर्थ असा होतो की—

१) ऋषभापूर्वीही कधीकाळी जैन धर्म अस्तित्वात होता. जैनाच्या श्रद्धेप्रमाणेच नव्हे तर तर्कसिद्ध तत्त्वप्रणालीप्रमाणेही जैन धर्माला खरा आरभ नाहीच तीर्थंकर निरनिराळ्या कालखण्डात त्या धर्माचा उपदेश करतात आणि नवी तीर्थपरपरा चालवितात एवढेच त्याना विश्वगुरु मानतात, स्वभावत च जैन तत्त्वज्ञान एक शाश्वत तथ्य आहे. शिवाय विदेह क्षेत्रातील नित्य विहरमान तीर्थंकर जैन धर्माचा नित्य उपदेश करीत असतात

२) ऋषभाना येथे ८ वा अवतार मानले आहे नाभिराज इत्यादी पूर्वीचे ७ मनू लक्षात घेता ८ वा शलाका पुरुष असे म्हणण्यामधील आशय स्पष्ट कळतो ऋषभापूर्वीच्या युगाला मनुयुग म्हणतात. त्या काळची लोकस्थिती वेगळी होती कृतयुगाची सृष्टी मात्र ऋषभाने केली. राज्यसस्थेचा उदय याच काळी झाला म्हणून तो जसा आठवा मनू तसा पहिला राजा म्हणून प्रसिद्ध आहे त्या आतर-कालामध्ये त्याची आरभीची कामगिरी मनूप्रमाणे होती जैन प्रणालीप्रमाणे देखील ऋषभाला नाभीनतरचा मनू, गृहस्थाश्रमीचा पहिला राजा आणि दीक्षे-नतरचा पहिला तीर्थंकर अशा तीन प्रकारचे व्यक्तिमत्त्व लाभलेले आहेच हा युगादिकालीन महत्त्वाचा इतिहास दोन्ही पक्षी समान आढळतो या सुसंगतीला आणि एकमुखी मान्यतेला फार मोठा अर्थ आहे।

## वातरशना मुनी व समण परंपरा

३) भागवत पुराणात आढळणारी तिसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे वेदातील 'वातरशना' मुनीसबधीचे स्पष्टीकरण वेदातील वातरशना व त्यासमान काही पदाचा अर्थ तेथे अनुमानानेच लावावा लागतो त्यामुळे पुष्कळ वेळा तर्काला जास्त वाव मिळतो मात्र भागवत स्कध ५ मधील तिसऱ्या अध्यायामध्ये वातरशना मुनी म्हणजे समण परपरेतीलच मुनी होत असा स्पष्ट उल्लेख आहे

...वातरशनानां श्रमणानाम् ऋषीणां
ऊर्ध्वमथ्निनां शुक्लया तन्वावततार ॥ २० ॥

— भागवत, ५/३/२०

समणऋषी व वातरशना मुनी एकच असल्याचा हा स्पष्ट उल्लेख वेदातील कित्येक पदाचा अर्थ स्पष्ट समजण्यास मदत करतो त्यावरुन वेदातील कित्येक ओळीमध्ये जैन तीर्थंकरासबधी कसा व किती आदरभाव व्यक्त केला आहे याची खात्री पटते शिवाय या भागवतात भ ऋषभनाथांना भगवन्, देव, महामुनि, योगेश्वरः, पुराणपुरुष, महायोगी, राजर्षि, शरीरमात्रपरिग्रह, गगनपरिधानः, प्रेयव्रत, आद्यपुरुषः, आय, सकलवेदलोकदेवब्राह्मणगणानां परमगुरु इ इ, महान आदर-दर्शक पदानी आळविले आहे या सर्व पदावलीमध्ये जसा आदरभाव भरलेला

आहे तसेच त्याचे जीवनचरित्र, जीवनातील विशिष्ट घटना, त्याचा धर्ममार्ग, त्याची कर्तव्ये, त्यांचे शिष्यगण, त्याचा काल, त्याचे नृपतित्व, त्याची व्रते इत्यादी अनेक बाबींवरही स्पष्ट प्रकाश पडतो

४) या सर्वापेक्षा जास्त महत्वाचा मुद्दा म्हणजे आत्मविद्या–प्रणेताराचा प्रश्न होय. वैदिक आर्य मूलत आध्यात्मवादी नव्हेतच वेदातील त्यांची उपासना निश्चितपणे आध्यात्म-विरहित आहे विदेह व मगध येथील त्यांच्या अनतरकालीन वास्तव्यात तेथील मूळच्या समण सस्कृतीपासून आत्मविद्या आत्मसात करण्याचा त्यानी प्रयत्न केला त्यांच्या आध्यात्मिक अनुचिंतनाचे अधिष्ठान विदेहातील क्षात्रवशी जनकराजालाच मिळालेले आहे यावरूनही हे विधान सत्य ठरते. शिवाय आत्मविद्येमध्ये वैदिक ऋषी नव्हे तर समण-मुनीच पारगत होते या विधानाला भागवतपुराणासारख्या सर्व प्रमाणभूत ग्रथाचीही पवित्र साक्ष आहे. मुनी, समण, वातरशना, व्रात्य ही सर्व पदे एकार्थवाची आहेत एवढेच नव्हे तर आत्मविद्येचे नेतृत्वही याच परपरेतील मुनीकडे जाते हे सर्व मुनी ऋषभाच्या कुळातील ज्ञानदीप होते ('ऋषभकुळी कुळदीप ।'-एकनाथी भागवत, अ०२, मराठी पद्य १७२) ते सर्व आध्यात्मविद्येत विशारद असल्याने सर्वजण त्याची प्रशसा करतात आत्मानुभवातील परिपक्वता हेच त्यांचे खास वैशिष्टच. याच आत्मानुभूतीरूप सम्यक्त्वाच्या प्रभावाने मरणाचे भय नष्ट होते. या समण मुनीच्या केवळ स्मरणाने ससारावस्था सपते आणि भाविकाना निश्चितपणे मुक्ती मिळते ही ऋषभप्रणीत आत्मविद्येची परपरा वेदपूर्वकालीनच नव्हे तर त्याहीपेक्षा फारच प्राचीन आहे सर्व आत्मवेदी मुनी याच ऋषभ–भरत–सस्कृतीचे पाईक आहेत त्याचे तीर्थ एक आहे त्याचे तीर्थानुष्ठानही समानच आहे या प्रकारच्या विधानाला श्रीमद् भागवतपुराणातील एकाच श्लोकाची साक्ष पुरेशी आहे–

नवाभवन्महाभागा मुनयो ह्यर्थशंसिनः ।
श्रमणा वातरशना आत्मविद्या-विशारदाः ॥
— भागवतपुराण, ५/११/२०

या श्लोकावरील एकनाथी टीकाही तितकीच प्रत्ययात्मक व सुस्पष्ट आहे–

आत्माभ्यासीं परिश्रम । करून निरसिले कर्माकर्म ॥
यालागीं ते अकृताश्रम । निजनिभ्रम स्वयें जाहले ॥ १७३ ॥
शाद्बबोधें सदोदित । ब्रह्मज्ञान - पारंगत ॥
शिष्य - प्रबोधीं समर्थ । परमाद्‌भुत अतिदक्ष ॥ १७४ ॥
ते ब्रह्मविद्येचे चालते डिंब । त्याचे अवेव ते ब्रह्मकोंब ॥
आत्मविद्येचे पूर्ण बिंब । स्वयें भस्वयं परब्रह्म ॥ १७५ ॥

ज्यांचे नाम ऐकतां । कांपत काळ पळे मागुता ॥
संसार नुघवी माथा । नाम स्मरतां जयांचें ॥ १८० ॥

— एकनाथी भागवत, २/१७३ ते १७५ व १८०.

आत्मविद्या किंवा ब्रह्मज्ञान तर ऋषभसंस्कृतीमधील मूळ प्रेरणातत्त्व होय समस्त जीवन-व्यापारातील त्याच्या सर्वंकश अवगाहनतेची संवेदना दबून राहण्यासारखी नसल्याने ऋषभ-संस्कृतीतील आत्मज्ञानाचे स्थान आमूलाग्र प्रकाशमय आहे भगवान ऋषभदेव आणि इतर सर्व तीर्थंकर यांची दिव्यध्वनी आणि त्याच परंपरेतील अखिल श्रुतागम अध्यात्मसिद्धान्ताने केवळ भारावून गेला आहे म्हणून जैनागमामध्ये ऋषभत्त्व आणि ब्रह्मत्त्व एकाकार आढळतात. अशा एकस्वरूपी एकात्मतेमुळे ऋषभसंस्कृतीतील महत्त्वाच्या सर्वच तथ्यांना ब्रह्म शब्द वापरण्याची परंपरा जैन साहित्यात निर्माण झाली आहे—

आत्मनि मोक्षे ज्ञाने वृत्ते ताते च भरतराजस्य ।
ब्रह्मेति गी प्रगीता न चापरो विद्यते ब्रह्मा ॥

— यशस्तिलकचंपू, आश्वास ६८, पान २९९.

अर्थात् आत्मा, मोक्ष, केवलज्ञान, यथाख्यात चरित्र आणि भरतचक्रीचे पिता या सर्वांसाठी ब्रह्म ही संज्ञा प्रख्यात झाली आहे याशिवाय वेगळा असा ब्रह्मा मुळीच विद्यमान नाही

भरतपिता ऋषभदेव म्हणजेच ब्रह्म अशी जैनांची पक्की खात्री आहे

अशा प्रकारची सार्वत्रिक सुसंगती, जैन-जैनेतर परंपरेतील संस्कृत, प्राकृत, मराठी इत्यादी सारस्वताच्या सर्व प्रांगणामध्ये अखंडित आहे ऋषभ, भरत, प्रथम पार्थिव, तीर्थंकर, प्रजापती आणि विश्वगुरु या अर्थांच्या सर्व पदावलीचा संबंध एकत्र गुंफविणारी कुवलयमालेतील पुढील साक्ष तुष्टीप्रद ठरेल ।

आसि किर एत्थ पढम-पत्थिवो कय-धम्माधम्म-ववत्थायारो भयवं पयावई। तेण किर भरह-णरिंद-पमुहस्स णियय-पुत्त-सयस्स साहिओ एस कलाकलावो॥

— कुवलयमाला, पा २१/२४-२५

यावरून ऋषभनाथ म्हणजेच पहिला राजा, आत्मविद्येचा प्रणेता, पहिला तीर्थंकर, प्रजापती, भगवान, भरतादिक शंभर पुत्रांचे जनक आणि कृतयुगारंभी योगक्षेमानुयोगाच्या सर्व कला शिकविणारे विश्वगुरु होत । या सर्व पदावलीतून

समण–सस्कृतीचा एकसंबी प्रवाह स्पष्टतया प्रतिभासित झाल्याशिवाय राहात नाही

## परंपरेतील विश्वसनीयता

अशाप्रकारे कृतयुगाचा आरभकाल, नाभिराज, ऋषभदेव व भरतचक्री याचे व्यक्तिमत्व व त्याची थोर कामगिरी, त्याचा जीवनविषयक दृष्टिकोन इत्यादी मानवी मनाच्या व सस्कृतीच्या क्षेत्रातील महत्त्वाच्या बाबीवर जैनाचे व या वैदिक परपरेतील लेखकाचे किती एकमत आहे हे पाहिल्यावर आश्चर्य वाटल्याशिवाय राहात नाही अशा स्वक्षेत्रातील व परक्षेत्रातील सुसगत पुराव्या-वरून या तीन व्यक्तीच्या व त्याच्या परपरेतील इतर व्यक्तीच्या जीवनातील महत्त्वाच्या घटना आणि एकदर लोकाची सस्कृती यासबधीच्या इतिहासावर विश्वास ठेवण्याशिवाय सध्या तरी दुसरा मार्ग नाही या एकनिष्ठतेमुळेच या देशाच्या नामकरणासबधीही जो उल्लेख आढळतो तोही सर्वत्र सुसगत व एक-स्वरूपीच आहे त्यातून इच्छेनुसार पळवाट काढण्याचा जे कोणी प्रयत्न करतात त्याना आजपर्यंत तरी यश आलेले नाही

बहुतेक सर्व पुराणाचे आजचे स्वरूप इ सन ५०० वर्षांच्या पूर्वीच निश्चित झालेले आहे काही पुराणाची रचना त्याहून उशीराही झालेली आहे या ग्रथाचे स्वरूप इतिवृत्तापेक्षा पुराणाप्रमाणेच असले तरी त्यातील इतिवृत्तात्मक भागही टाकाव ठरत नाही त्याचा इतिहासाकरिता कसा उपयोग करून घ्यावा याचे विवेचन पूर्वीच्या इतिहास–प्रकरणामध्ये केलेले आहेच केवळ आपल्या देशाच्या नामकरणासबधीच नव्हे तर इतर अनेक घटनाचा अगदी सुसगत वृत्तात सहजतया मिळतो प्राचीन जगासबधीच्या आणि आपल्या देशासबधीच्या भौगोलिक ज्ञानाच्या बाबतीत त्या सर्व पुराणामध्ये इतकी सुसगत एकवाक्यता आहे की कोणाही वाचकाला अचबा वाटल्याशिवाय राहात नाही. ते ज्ञान आजच्यासारखे शास्त्रशुद्ध व प्रयोगसिद्ध नसेल ! पण त्या निरनिराळ्या काळातील सर्व लेखकासमोर एखादी विश्वसनीय परपरा निश्चितपणे विद्यमान होती ही गोष्ट मान्य करण्याशिवाय गत्यतरच उरत नाही शिवाय या पुराणातील काही भाग इ सनपूर्व ६०० वर्षाइतका किंवा त्याहूनही जास्त प्राचीन आहे यासबधी मुळीच शका बाळगता येत नाही

६ व्या शतकातील बाणभट्टाने आपल्या 'कादबरी' ग्रथात हेमकूट पर्वताच्या स्थानासबधी विवरण देत असताना देशाचे नाव भारतवर्ष आहे असे विधान दोन वेळा केले आहे—

> इतश्च नातिदूरे तस्यास्माद् भारतवर्षादुत्तरेणानन्तरे किंपुरुषनाम्नि वर्षे वर्षपर्वतो हेमकूटो नाम निवास ।

## भौगोलिक सहमत

पृथ्वीचा आकार कमळाप्रमाणे किंवा पुष्कराप्रमाणे आहे असे विधान करण्यात मर्व पुराणग्रंथ सामान्यत सहमत असल्याचे दिसतात—

> चतुर्महाद्वीपवती सेयमुर्वी प्रकीर्तिता ॥ ८३ ॥
> चत्वारो नैकवर्णाढ्या महाद्वीपा. परिश्रुताः ॥ ८४ ॥
> भद्रश्च भरताश्चैव केतुमालाश्च पश्चिमाः ।
> उत्तराः कुरवश्चैव कृतपुण्यप्रतिश्रयाः ॥ ८५ ॥
>
> – वायुपुराण, अ. ४१/८३ ते ८५

अर्थात् या खण्डप्राय देशाचे (१) भद्र, (२) भरत, (३) केतुमाल आणि (४) उत्तरकुरू असे चार विभाग असून त्याना महाद्वीप म्हणतात, असा वायुपुराणात उल्लेख आहे याठिकाणी उर्वी या पदाचा उपयोग बृहद्भरतद्वीप या अर्थाने केलेला असावा असे दिसते उर्वी याचा अर्थ सपूर्ण जग असा घेतलेला दिसत नाही

> भारतस्यास्य वर्षस्य नवभेदान्निबोधत ॥ ७ ॥
> इन्द्रद्वीपः कशेरुश्च ताम्रपर्णो गभस्तिमान् ।
> नागद्वीपस्तथा सौम्यो गन्धर्वस्त्वथ वारुणः ॥ ८ ॥
> अयं तु नवमस्तेषां द्वीपः सागरसंवृतः ।
> योजनानां सहस्रं तु द्वीपोऽयं दक्षिणोत्तरः ॥ ९ ॥
>
> – मस्त्यपुराण, अध्याय ११४, श्लोक ७ ते ९

> उत्तरं च समुद्रस्य हिमवद्दक्षिणं च यत् ॥ ७५ ॥
> वर्षं यद्भारतं नाम यत्रेयं भारती प्रजा ।
> भारतस्यास्य वर्षस्य नव भेदाः प्रकीर्तिताः ।
> इन्द्रद्वीपः कशेरुश्च ताम्रवर्णो गभस्तिमान् ।
> नागद्वीपस्तथा सौम्यो गन्धर्वस्त्वथ वारुणः ॥
> अयं तु नवमस्तेषां द्वीपः सागरसंवृतः ।
> योजनानां सहस्रं तु द्वीपोऽयं दक्षिणोत्तरम् ॥ ८० ॥
>
> – वायुपुराण, अ ४५/७५ ते ८०.

> श्रृणुध्वं भारतं वर्षं नवभेदेन भो द्विजाः ।
> समुद्रान्तरिता ज्ञेयास्ते समाश्च परस्परम् ॥ २४ ॥

इन्द्रद्वीपः कशेरुश्च ताम्रपर्णो गभस्तिमान् ।
नागद्वीपस्तथा सौम्यो गन्धर्वस्त्वथ वारुण ।
पृथिव्यां भारतं वर्षं कर्मभूमिरुदाहृता ॥
निवासं भारते वर्षे आकाङ्क्षन्ति सदा सुराः ॥
न भारतसम वर्षं पृथिव्यामस्ति भो द्विजाः ॥ ७२ ॥

याशिवाय ७५ व ७८ श्लोक देखील लक्षणीय आहेत

— ब्रह्मपुराण, अध्याय २७

मत्स्य, वायु आणि ब्रह्म इत्यादी पुराणामध्ये विशाल भारतवर्षाचे (१) इन्द्रद्वीप, (२) कशेरु, (३) ताम्रपर्ण, (४) गभस्तिमान्, (५) नागद्वीप, (६) सौम्य, (७) गन्धर्व, (८) वरुण आणि (९) हा भारतखण्ड असे ९ भूविभाग सांगितले आहेत

द्वीपो ह्युपनिविष्टोऽयं म्लेच्छैरन्तेषु सर्वशः ।
यवनाश्च किराताश्च तस्यान्ते पूर्वपश्चिमे ॥
आयतस्तु कुमारीतो गंगायाः प्रवहावधिः ।
तिर्यगूर्ध्वं तु विस्तीर्णः सहस्राणि दशैव तु ॥

— मत्स्यपुराण, अ ११४.

—(B O R Annals, Vol 36 (1955) PP 114 to 118)

आणि या नवव्या खंडविभागाच्या सर्व सीमा म्लेच्छानी व्यापलेल्या आहेत पूर्व–पश्चिमेच्या सीमेला यवन आणि किरात आहेत ह्याचा विस्तार दक्षिणेकडील कन्याकुमारीपासून उत्तरेला हिमालयापर्यंत (गंगेच्या उगमापर्यंत) १० हजार (योजन) आहे या प्राकृतिक विवरणावरून हे सर्व वर्णन याच भारताचे आहे हे ओळखण्यास कोणतीच अडचण उरत नाही आणि मत्स्यपुराणातील—

इह स्वर्गापवर्गार्थं प्रवृत्तिरिह मानुषे ॥ १४ ॥
यस्त्वयं मानवो द्वीपस्तिर्यग्यामः प्रकीर्तितः ।
य एवं जयते कृत्स्नं स सम्राडिति कीर्तितः ॥ १५ ॥

— मत्स्यपुराण, अ ११४/१४-१५

या ओळीवरून या भरतवर्षाला मनूचा द्वीप किंवा मानव द्वीप असेही म्हणतात

सर्वच मानवी जीवांना भारतवर्षाचे रहिवासी म्हटले आहे त्यावरून मूळ कल्पनेप्रमाणे भरतवर्षाचा विस्तार उत्तरेला हिमालयापलीकडेही असून त्यात

नऊही द्वीपाचा समावेश होत असे. पण नतरच्या काळी तो विस्तार साधारणपणे विभाजनापूर्वीच्या आपल्या देशाच्या सीमेएवढा मर्यादित झाला भरताला मनू म्हणून वाखाणण्याच्या एका निश्चित भूमिकेवर त्याच्या वर्षाला मनूचा वर्ष या अर्थाने मानववर्ष किंवा मानवद्वीप असेही म्हणतात

## साहित्यिक प्राचीनता–

वैदिक परपरेतील हे सर्व साहित्य प्राचीन आहे. त्याची सध्य स्थितीतील ग्रथरूप रचना, इतर सर्व भारतीय ग्रथाप्रमाणेच, जितकी प्राचीन आहे त्यापेक्षा त्यातील वृत्तातांची परपरा अधिक प्राचीन आहे ही सर्व परपरा वैदिक आर्यांच्या आगमनकालाइतकीच जुनी आहे पण त्यामध्ये कालमानानुसार नवी वाढ, वदल, पुनर्मांडणी, नवा विषय अन्तर्भूत करणे इत्यादी प्रक्रिया वारवार होत असाव्यात त्यामुळे आजमितीला त्याचा काल निश्चित करणे कठिण आहे सर्वात जुना ग्रथ ऋग्वेद होय मॅक्समूलरच्या मते त्याचा काल इ सनपूर्व १२०० वर्षांचा आहे नतरचा काल सामान्यत स्मृतिग्रथाचा. पुराणे त्या मानाने नतरचेच आहेत पण नारदपुराण, कूर्मपुराण, अग्निपुराण, मत्स्यपुराण, ब्रह्माण्डपुराण इत्यादी काही महत्त्वाची पुराणे व त्यातील काही भाग इ सनाच्याही पूर्वीचा आहे भागवत पुराणही महत्त्वाचा ग्रथ असून त्यातील विषयही अतिप्राचीन म्हणून मान्यता पावलेला आहे या सर्व ग्रंथात युगादी कालाचा परपरागत इतिहास जतन करून ठेवलेला आहे. आपल्या देशाच्या नामकरणावावतीत पुराणादिक सर्व ग्रथाचे एकमुखी विधान कौतुकास्पद आहे––

## अग्निपुराण

अग्निपुराण हा एक प्राचीन ग्रथ आहे त्याला भारतीय विद्यासमूहाचा कोष म्हणून मान्यता आहे तो एक विशालकाय ग्रथ असून त्यात केवळ अध्यायाची सख्या ३८३ आहे त्यात नानाप्रकारच्या विषयाचा समावेश आहे धर्म, ज्योतिष, राजनीती, आयुर्वेद, अलकार, छद, व्याकरण, योग, वेदान्त इत्यादी विषयावरोवरच प्राचीनतम इतिहास किंवा इतिहाससम वृत्तात मोठ्या प्रमाणात सकलित झालेला आहे यासवधी 'आग्नेये हि पुराणेऽस्मिन् सर्वा विद्या. प्रदर्शिता. ।' हे विधान अक्षरश सत्य आहे यातही भरतवर्षाच्या नामाभिधानासवधी स्पष्ट विधान आहे त्यामुळे सवधित भरत हा कोण व कोणत्या वश परपरेतला यासवधी कोणतीही शका उरत नाही नाभिराज–वृषभदेव–भरतचक्री ही वशावली सूर्य प्रकाशाइतकी स्पष्ट आहे त्यात नाभिराजकालीन कृतयुगापूर्वीचाही मानवी जीवनक्रम पहावयास मिळतो आणि भरतानेही वडिलाप्रमाणेच आपल्या मुलाला राज्य देऊन राज्य-कालानतर मुनिधर्माचे पालन केले अशा प्रकारे त्याच्या चार पिढ्याचा उल्लेख सलग आढळतो––

जरामृत्युभयं नास्ति धर्माधर्मौ युगादिकम् ।
नाधमं मध्यमं तुल्या हिमादेशात्तु नाभित. ।। १० ।।
ऋषभो मरुदेव्यां च ऋषभाद् भरतोऽभवत् ।
ऋषभोऽदात् श्रीः पुत्रे शालग्रामे हरिं गतः ।। ११ ।।
भरताद् भारतं वर्षं भरतात्सुमतिस्त्वभूत् ।
भरतो दत्तलक्ष्मीकः शालग्रामे हरिं गतः ।। १२ ।।

— अग्निपुराण, अध्याय १०८/१० ते १२

कृतयुगाच्या अगोदर हिमालयापर्यंत पसरलेल्या नाभिराजाच्या राज्यात म्हातारपणाचे व मरणाचे भय नव्हते धर्म व अधर्म असा कोणताही भेद नव्हता अधर्म घडतच नव्हता जघन्य असे काही नव्हते मध्यमही नव्हते सर्व काही उत्तमच होते नाभिराजाला मरुदेवीपासून ऋषभ नावाचा मुलगा झाला नतर त्या ऋषभाला भरत नावाचा मुलगा झाला ऋषभाने राज्यलक्ष्मी भरताला दिली आणि त्याने मुनिधर्म स्वीकारला याच भरत राजामुळे त्या नाभीच्या वर्षाला ( अजनाभवर्षाला ) भारतवर्ष असे नाव पडले. भरत राजाला सुमती मुलगा झाला राज्यलक्ष्मी आपल्या मुलाला दिल्यावर राजर्षी भरतानेही मुनिधर्म ( सन्यासाश्रम ) स्वीकारला

### मार्कण्डेयपुराण

मार्कण्डेयपुराणामध्येही या वर्षाच्या नामकरणाचा इतिहास आढळतो तोही वरील विधानाशी अत्यत सुसगत आहे या ग्रथाची रचना मार्कण्डेय ऋषींनी केली आहे शंकराचार्यांनी आपल्या ' वेदान्तसूत्रभाष्य ' या प्रसिद्ध ग्रथात यातील दोन श्लोकाचे अवतरण घेतलेले आहे यावरून हा ग्रथ आठव्या शतकाच्याही पूर्वीचा आहे हे निश्चित पाश्चात्य विद्वानही याला प्राचीन मानतात पार्जिटर साहेबाने इग्रजी भाषेत याचा अनुवाद केला आहे सुरवातीच्या काही अध्यायाचा जर्मन भाषेतही अनुवाद झाला आहे याला विशाल प्रमाणात लोकप्रियता लाभली आहे यातील एक भाग ' दुर्गासप्तशती ' नावाने प्रसिद्ध आहे यात १३८ अध्याय असून श्लोकसख्या ९००० आहे यातील भरताच्या शभर भावाचाही उल्लेख बरोबर असून ऋषभाची मुनिदीक्षा तपश्चर्यात्मक होती असे स्पष्ट सुचविले आहे—

स्वायंभुवेऽन्तरे पूर्वमाद्ये त्रेतायुगे तथा ।
प्रियव्रतस्य पुत्रैस्तैः पौत्रैः स्वायंभुवस्य च ।। ३२ ।।
आग्नीध्राय पिता पूर्वं जम्बूद्वीपं ददौ द्विज ।। ३३ ।।
आग्नीध्रसूनोर्नाभेस्तु ऋषभोऽभूत् सुतो द्विज ।। ३९ ।।

ऋषभाद्भरतो जज्ञे वीरः पुत्रशताद्वरः ।
सोऽभिषिच्यर्षभः पुत्रं महाप्रावाज्यमास्थितः ।। ४० ।।
तपस्तेपे महाभागः पुलहाश्रमसंश्रयः ।
हिमाह्वं दक्षिणं वर्षं भरताय पिता ददौ ।। ४१ ।।
तस्मात्तु भारतं वर्षं तस्य नाम्ना महात्मनः ।। ४२ ।।

— मार्कण्डेयपुराण, अध्याय ५०/३२ ते ४२

हे द्विजानो ! त्रेतायुगाच्या पूर्वकाळाच्या आरभी स्वायंभुवानतर प्रियव्रताच्या पुत्र-पौत्रापैकी आग्नीध्राला त्याच्या पित्याने जवूद्वीपाचे राज्य दिले होते आग्नीध्राचा मुलगा नाभी आणि नाभीला ऋषभ नावाचा मुलगा झाला ऋषभाच्या पोटी भरत जन्मला तो भरत मोठा वीर असून ऋषभाच्या शभर मुलामध्ये ज्येष्ठ होता. ऋषभ राजाने आपला पुत्र भरत याला राज्याभिषेक केला नतर त्याने महान प्रव्रज्यावस्था स्वीकारली पुलहाश्रमामध्ये राहून त्यानी तपश्चर्या केली. ( जवूद्वीपाच्या ) दक्षिणेकडील ज्या हिमवर्षाचे राज्य भरताला त्याच्या पित्याने दिले त्या वर्षाला भरतवर्ष असे नवे नाव त्या भरताच्या नावाच्या मोठेपणामुळेच लाभले आहे

या मार्कण्डेय पुराणामध्ये प्रियव्रत मनूने जवूद्वीपाचे राज्य आग्नीध्राला कसे दिले ते स्पष्टपणे सागितले आहे सामान्यपणे आशिया खण्डाच्या दक्षिण-पूर्वार्धालाच जवूद्वीप मानतात वरील नव विभागावरून समजते की भरतखण्ड हा भारतापेक्षा वेगळा व मोठा असावा कारण भरतखण्डाचेच ९ विभाग असून त्यापैकी ९ व्या विभागाचे नाव भरत असे आहे एखादे धार्मिक पूजा-विधान करताना—

' अद्य श्रीब्रह्मणो द्वितीयपरार्धे श्रीश्वेतवाराहकल्पे वैवस्वतमन्वन्तरे अष्टाविंशतितमे कलियुगे कलिप्रथमचरणे भूर्लोके भरतखण्डे जम्बूद्वीपे दण्डकारण्ये देशे ,

इत्यादी जो नेहमीचा सकल्पमंत्र म्हणतात त्यावरून जवूद्वीप हा भरत-खण्डाचाच एक विभाग मानला आहे परतु प्रसिद्ध ९ द्वीपामध्ये जम्बूद्वीपाचे नाव अतर्भूत नाही यावरून आग्नीध्र याला मिळालेल्या जंवूद्वीपाची व्याप्ती फार मोठी असावी असे दिसते आणि त्यापैकी फक्त दक्षिणेकडच्या हिमवर्षाचेच राज्य ऋषभाने भरताला दिले असे ठरते पण इतर सर्व उल्लेख इतके स्पष्ट आहेत की भरताला मिळालेल्या भूभागासबधी कोणताही संशय उरत नाही भूगोलज्ञानासबधीचा असा हा गोधळ जैन पुराणामध्ये कोठेही नाही आणि

त्याच्या मूळ श्रद्धेप्रमाणे जबूद्वीपाचे भरतक्षेत्रापासून ऐरावतक्षेत्रापर्यंत ७ क्षेत्रविभाग असून ६ वर्षधर पर्वतामुळे ते एकमेकापासून विभक्त आहेत. चक्रवर्तीही वर्षधर पर्वत ओलाडत नसतो त्यामुळे सपूर्ण जबूद्वीपाचे एक राज्य करतनेतही उतरत नाही याच जबूद्वीपात भरतक्षेत्र आहे यात मात्र शका नाही या भरतक्षेत्रापैकी काही विभागाचेच राज्य भरताला वडिलाच्याकडून मिळाले असले तरी स्वत भरताने दिग्विजय करून फार मोठ्या प्रमाणात पृथ्वी पादाक्रान्त केली आणि तो सार्वभौम चक्रवर्ती झाला

मात्र आग्नीध्राचा मुलगा नाभी, त्याचा मुलगा ऋषभ आणि भरत हा याच ऋषभाचा पुत्र असून ऋषभानेच भरताला हिमवर्षाचे राज्य दिले आणि त्याच हिमवर्षाचे नाव भरताच्या नावावरून पुढे भारतवर्ष असे प्रख्यात झाले हा ऐतिहासिक वृत्तात मात्र सशयातीत आणि सुस्पष्ट आहे या मुख्य घटनाना बाकीच्या सर्व पुराणादिक ग्रथाची साक्ष आहे आणि इतर प्राचीन ग्रथामध्येही या वृत्तान्ताला पुष्टी मिळते

## ब्रह्माण्डपुराण

'भूगोल' विषयाच्या दृष्टीने ब्रह्माण्डपुराण एक महत्त्वाचा ग्रथ आहे यामध्ये द्वीप, नद्या, पर्वत आणि नक्षत्र याचे रोचक वर्णन आहे. यातील विषय वायूने व्यासांना सागितलेला आहे म्हणून याला 'वायवीय ब्रह्माण्डपुराण' असेही नाव आहे हा ग्रथ ब्राह्मणानी इ सन पाचव्या शतकामध्ये जावा द्वीपात नेला तेथील प्राचीन भाषेत याचे रूपातर झालेले आढळते अर्थातच तो मूळ ग्रथ यापेक्षाही प्राचीन असलाच पाहिजे यातील तिसऱ्या पादामध्ये भरतवर्षातील प्रसिद्ध क्षात्रवशाचे वर्णन सापडते. भरतवर्षाच्या नामकरण-वृत्तान्ताशिवाय येथे ऋषभनाथ हे सर्वश्रेष्ठ सार्वभौम राजे होते आणि ते सर्व क्षत्रियाचे पूर्वज म्हणजेच कृतयुगातील पहिलेच नृपती होते असाही स्पष्ट उल्लेख आहे—

नाभिस्त्वजनयत् पुत्रं मरुदेव्यां महाद्युतिम् ।
रिषभं पार्थिवश्रेष्ठं सर्वक्षत्रस्य पूर्वजम् ।। ५९ ।।
रिषभाद् भरतो जज्ञे वीरः पुत्रशताग्रजः ।
सोऽभिषिच्यर्षभः पुत्रं महाप्राव्राज्यमास्थितः ।। ६० ।।
हिमाह्वं दक्षिणं वर्षं भरताय न्यवेदयत् ।
तस्मात्तु भारतं वर्षं तस्य नाम्ना विदुर्बुधाः ।। ६१ ।।

— ब्रह्माण्डपुराण, पूर्वार्ध २, अ १४/५९ ते ६१.

नाभीपासून मरुदेवीला महातेजस्वी असा ऋषभ नावाचा मुलगा जन्मला तो सर्व राजामध्ये श्रेष्ठ होता तोच सर्व क्षत्रियाचा पूर्वज होय त्या ऋषभाला भरत नावाचा पुत्र जन्मला तो वीर होता. ऋषभाच्या सर्व शभर पुत्रामध्ये ज्येष्ठ होता त्या भरत पुत्राला राज्याभिषेक करून तो ऋषभनाथ महान तपश्चर्येमध्ये स्थिर झाला त्यानेच हिमालय नावाच्या पर्वताच्या दक्षिणेकडील वर्ष भरताला दिला होता त्याच भरताच्या नावावरून त्या हिमवर्षाला भारतवर्ष असे नाव प्राप्त झाले असे विद्वान् लोक सागतात

## नारदपुराण

नारदपुराणामध्येही भरताला ऋषभपुत्रच म्हटले आहे आणि याच भरताच्या नावावरून या खण्डप्राय देशाला भरतवर्ष असे नाव पडले अशी स्पष्ट ग्वाही दिली आहे याच ग्रथाची बृहद्नारदीय अशी ख्याती आहे १२ व्या शतकातील वल्लालसेन याने आपल्या दानसागर नावाच्या ग्रथात या पुराणातील श्लोक उद्धृत केले आहेत शिवाय अकराव्या शतकातील प्रसिद्ध प्रवासी अल्बेरुणी याने आपल्या यात्राविवरणामध्ये या पुराणाचा उल्लेख केला आहे तेव्हा हा ग्रथ याहीपेक्षा जास्त प्राचीन ठरतो विष्णुभक्ती हा या ग्रथाचा मुख्य विषय आहे यात भरताला जे राज्य मिळाले ते पितामह नाभीपासून पिता ऋषभ राजाला आणि ऋषभापासून भरताला अशा क्रमागत वशपरपरेनेच मिळाले होते असे स्पष्ट विधान आहे म्हणजे नाभी-ऋषभ-भरत ही अतूट परपरा येथेही मान्य आहे शिवाय भरताचा प्रजापालनाचा विशिष्ट मार्ग व राजधर्मही सागितला आहे भरताचा कुलधर्म सागताना आत्मोद्धारासाठी त्यानेही मुनि-धर्माचा अगीकार केला होता हे स्पष्ट केले आहे—

**आसीत् पुरा मुनिश्रेष्ठः भरतो नाम भूपतिः ।**
**आर्षभो यस्य नाम्नेदं भरतखण्डमुच्यते ।। ५ ।।**
**स राजा प्राप्तराज्यस्तु पितृपितामहक्रमात् ।**
**पालयामास धर्मेण पितृवदजनयत् प्रजाः ।। ६ ।।**

— नारदपुराण, पूर्वखण्ड, अध्याय ४८/५ व ६

पूर्वकाळी भरत नावाचा राजा होऊन गेला तो मुनीमध्येही श्रेष्ठ पदास चढला तो ऋषभाचा पुत्र होता त्या नावामुळेच या विशाल देशाला भरतखण्ड असे नाव पडले वडील व आजोबा याच्या परपरेतून चालत आलेले राज्य त्याला मिळाल्यावर त्याने प्रजेचे पालन न्यायाने केले तो प्रजेला पित्याप्रमाणे वाटत होता

## लिंगपुराण

लिंगपुराण शिवत्वाची मीमांसा करणारा एक महत्त्वाचा ग्रंथ आहे त्या विशाल ग्रंथात १६३ अध्याय असून श्लोकसंख्या ११००० आहे त्यात भगवान शंकराच्या ३८ अवताराचे विवरण आहे. शैव व्रते आणि शैव तीर्थक्षेत्रे या संदर्भातील वर्णन व विवेचन मोठ्या विस्ताराने केलेले आहे तेथेही भरतवर्षाच्या नामकरणासंबंधी नेहमीसारखेच सुसंगत विधान असून त्याशिवाय ऋषभाच्या मुनिधर्मावर चांगला प्रकाश टाकला आहे त्याचा आचारमार्ग, साधुवेष, इंद्रिय-संयमनाचा प्रयत्न, वैराग्यभावाचे अधिष्ठान, खडतर तपश्चर्या, वासना-विरहित अवस्था आणि ज्ञानमय आत्मधर्म इत्यादी विचारात्मक आणि आचारात्मक विषयावर विचार करण्यासारखी विधाने आढळतात

नाभेर्निसर्गं वक्ष्यामि हिमाङ्केऽस्मिन्निबोधत ।
नाभिस्त्वजनयत् पुत्रं मरुदेव्यां महामतिः ॥ १९ ॥
ऋषभं पार्थिवश्रेष्ठं सर्वक्षत्रस्य पूजितम् ।
ऋषभाद् भरतो जज्ञे वीरः पुत्रशताग्रजः ॥ २० ॥
सोऽभिषिच्याथ ऋषभो भरतं पुत्रवत्सलः ।
ज्ञानवैराग्यमाश्रित्य जित्वेन्द्रियमहोरगान् ॥ २१ ॥
सर्वात्मनात्मनिस्थाप्य परमात्मानमीश्वरम् ।
नग्नोऽजटी निराहारोऽचीरीध्वान्तगतो हि सः ॥ २२ ॥
निराशस्त्यक्तसंदेहः शैवमाप परं पदम् ।
हिमाद्रेर्दक्षिणं वर्षं भरताय न्यवेदयत् ॥ २३ ॥
तस्मात्तु भारतं वर्षं तस्य नाम्ना विदुर्बुधा. ।

— लिंगपुराण, ४७, १९ ते २४.

या हिमवर्षातील नाभिराजाची वंशावळ सांगतो ती समजून घ्या :—

महान बुद्धिवंत नाभिराजाला मरुदेवीपासून ऋषभ नावाचा पुत्र जन्मला. तो ऋषभ सर्व भूपतीमध्ये श्रेष्ठ होता सर्व क्षत्रिय त्याला पूजनीय मानीत असत. त्या ऋषभराजापासून भरताचा जन्म झाला तो मोठा वीर असून ऋषभाच्या शंभर पुत्रामध्ये ज्येष्ठ होता त्या पुत्रवत्सल ऋषभाने भरताचा राज्याभिषेक केला त्याला ज्ञानप्राप्ती झाल्याने आपल्या वैराग्य भावनेला अनुसरून त्याने इन्द्रियरूपी महासर्पांना जिंकले आणि सर्व अर्थाने आपल्या शुद्ध आणि समर्थ आत्मतत्त्वाची आपल्यामध्येच स्थापना करून शाश्वत सुखाची परमावस्था प्राप्त करून घेतली. ते महामुनी ऋषभनाथ दिगंबर होते त्याने केशलोच केला होता,

आहाराचाही त्याग केला होता, वस्त्राचाही परिहार केला होता. त्याचा तमोगुण नष्ट झाला होता त्याच्या सर्व वासना निरस्त झाल्या होत्या त्याला सशयातीत शुद्ध ज्ञानाची प्राप्ती झाली होती तो मंगलमय झाला होता याच थोर ऋषभाने हिमालय पर्वताच्या दक्षिणेकडील वर्ष भरताला दिला होता. त्याच भरताच्या नावावरून या देशाला भारतवर्ष असे नाव पडले असे ज्ञानीजन सागतात.

## स्कंदपुराण

स्कंदपुराण एक भीमकाय रचना आहे याच्या सहा सहिता असून एकूण श्लोकसख्या ८१००० आहे यात एके ठिकाणी जगन्नाथ मदिराचे वर्णन आहे. याच आधारावर काही पाश्चात्य विद्वान याचा काल तेरावे शतक मानतात परतु याची एक पाण्डुलिपी कलकत्ता येथे सापडली असून त्याचा काल इ सन १००८ असा दिला आहे याशिवाय नेपाळच्या सरकारी ग्रथालयात एक प्रत सुरक्षित आहे ती प्रत कलकत्ता येथील प्रतीपेक्षाही प्राचीन असून त्याचा लेखनकाल ७ वे शतक आहे डॉ. हरप्रसाद शास्त्रीने तेथील सूचीमध्ये तसा स्पष्ट उल्लेख करून ठेवला आहे त्यातही भरतक्षेत्राच्या नामाभिधानाचा प्रसग वर्णिलेला आहे—

**नाभेः पुत्रश्च ऋषभः ऋषभाद्भरतोऽभवत् ।**
**तस्य नाम्ना त्विदं वर्षं भारतं चेति कीर्त्यते ।।**

— स्कन्दपुराण, माहेश्वरखंडस्थ कौमारखण्ड अ० ३७/५७

नाभिराजाचा पुत्र ऋषभनाथ होय या ऋषभापासून भरताचा जन्म झाला त्या भरतराजाच्या नावामुळेच या वर्षाची भारत अशी कीर्ती पसरली

## शिवपुराण

शकराशी सबधित असलेल्या सर्व पुराणामध्ये शिवपुराणाला मोठ्या मानाचे स्थान आहे त्यामध्ये शाकरमताची प्रतिष्ठा प्रस्थापित केली आहे शिव देवता वैदिक आर्यांच्या परपरेतील आहे किंवा आर्येतर परपरेतील आहे यावर विवेचन केलेले आहे दहाव्या सहितेमधील मुनि-पत्नीच्या कथानकामुळे या प्रश्नावर चागला प्रकाश पडला आहे या पुराणात २४००० श्लोक आहेत शैव दर्शनातील तत्त्वाची माडणी चागल्या पद्धतीने केली आहे शिव व पार्वती याच्या सबधीच्या कथा मधून मधून सर्वत्र विखुरलेल्या आहेत

शिवपुराणात वैदिकेतर परंपरेचा आदर मोठ्या प्रमाणात आढळतो यातील २१ व्या अध्यायातील २५ ते ३९ श्लोकामध्ये याचे स्पष्ट प्रत्यतर आल्याशिवाय राहात नाही या समूहातील काही श्लोकामध्ये (२५, २६ व २९) जैन मुनींचे वर्णन देऊन पुढे श्लोक क्रमाक २९ ते ३९ पर्यंत त्या मुनीचा प्रभाव

व्यक्त करून दर्शकाच्या मनातील प्रतिक्रिया स्पष्ट केली आहे त्या मुनींचे रूप श्रेष्ठ असल्याने त्याच्या नावाला पूजनीय मानले आहे–

आदिरूपं च तन्नाम पूज्यत्वात्पूज्य उच्यते ॥ २९ ॥

ते स्वयंभू असून ऋषी, यती, आचार्य व उपाध्याय असे त्यांचे प्रकार आहेत (२९) ही सर्व नावे शुभ असून सर्वांना ग्राह्य आहेत (३०). अरिहंत हे नाव पापनाशक आहे ते सर्व लोकांना सुखकारक आहे (३१). जे जे त्यांच्याजवळ गेले त्या सर्वांनी त्याच्याजवळ दीक्षा घेतली. मोह व मायाजालामध्ये जे जे गुतलेले आहेत ते ते त्या मुनींचे दर्शन घेताच त्यांचा धर्म स्वीकारतात(३४). नारदानेही त्यांच्यासमोर जाताच त्याची दीक्षा घेतली आणि राजाकडे जाऊन घडलेला सर्व वृत्तान्त सागितला (३५-३६).– यतिधर्म पाळण्यात परायण असलेला एक साधू आला आहे. आम्ही पुष्कळ धर्म पाहिलेत पण त्यापैकी एकही त्यांच्या धर्मासारखा नाही (३७). तो धर्म सनातन आहे हे पाहून आम्ही ती दीक्षा घेतली आहे––

दृष्टाश्च बहवो धर्मा नैतेन सदृशाः पुनः ॥ ३७ ॥
वयं च दीक्षितास्तत्र दृष्ट्वा धर्मं सनातनम् ॥ ३८ ॥

तेव्हा तुझी इच्छा असेल तर आता तूही त्याच्याजवळ दीक्षा घ्यावीस (३८) असे नारदाचे वचन ऐकून राजा तेथे गेला आणि म्हणाला–– नारदाने दीक्षा घेतली आहे म्हणून आम्हीही ती घेऊ (३९).

अशा या महान् पुराणतही भरतवर्षाच्या नामकरणासंबधीचा वृत्तान्त नोंदविलेला आहे––

नाभेः पुत्रश्च वृषभो वृषभाद्भरतोऽभवत् ।
तस्य नाम्ना त्विदं वर्षं भारतं चेति कीर्त्यते ॥

– शिवपुराण, अध्याय ३७/५७

नाभिराजाचा मुलगा वृषभ आणि वृषभनाथाचा मुलगा भरत या नावाचा होता त्या भरताच्याच नावावरून या विशाल देशाला भारत अशी प्रसिद्धी मिळाली.

**वायुपुराण**

वायुपुराण देखील लिंगपुराणाप्रमाणे एक प्रसिद्ध ग्रंथ आहे यातही ऋषभाच्या धर्माचारावर व त्यातील तत्त्वविचारावर मोठा प्रखर प्रकाश टाकला आहे शिवत्वाची कल्पना जैनाच्या मोक्षसुखाशी मेळ खाते येथे ऋषभनाथ,

त्याची मुनिपरंपरा व त्याचा धर्माचार यांचा उल्लेख मोठ्या आदराने केलेला आहे. या ग्रंथात नाभि-ऋषभ-भरत ही वंशपरंपरा आणि भारताच्या नामकरण घटनेचा जो इतिहास आढळतो तो पारंपरिक प्रणालीला दृढता आणणारा आहे—

नाभिस्तु जनयत्पुत्रं मरुदेव्यां महाद्युतिः ।
ऋषभं पार्थिवश्रेष्ठं सर्वक्षत्रस्य पूर्वजम् ।। ५० ।।
ऋषभात् भरतो जज्ञे वीर पुत्रशताग्रजः ।
सोऽभिषिच्याथ भरतं पुत्रं प्राव्राज्यमास्थितः ।। ५१ ।।
हिमाह्वं दक्षिणं वर्षं भरताय न्यवेदयत् ।
तस्माद्भारतं वर्षं तस्य नाम्ना विदुर्बुधाः ।। ५२ ।।

— वायुपुराण, पूर्वार्धं, अध्याय ३३/५०-५२

महातेजस्वी नाभिराजाला मरुदेवीपासून एक मुलगा झाला त्याचे नाव ऋषभ. तो सर्व क्षत्रियांचा पूर्वज असून सर्वश्रेष्ठ राजा होता ऋषभदेवापासून भरताचा जन्म झाला तो वीरवर भरत ऋषभाच्या सर्व शंभर पुत्रामध्ये ज्येष्ठ होता नतर या भरत राजकुमाराला राज्याभिषेक करून ऋषभदेवाने प्रव्रज्या घेतली ऋषभाने हिमालयाच्या दक्षिणेकडील वर्ष भरताला दिला होता त्या भरत राजाच्या नावावरूनच या वर्षाला भारतवर्ष असे नाव पडले असे विद्वान लोक सागतात

## कूर्मपुराण

कूर्मपुराणातही हीच परपरा मान्य केली आहे या वर्षाचे अधिपत्य नाभिराज-ऋषभदेव-भरतचक्री याच क्रमाने चालत आलेले आहे. या संदर्भात शकुंतलापुत्र भरत किंवा दुसऱ्या कोणत्याही इतर भरत राजाची अगर वंशाची कल्पना कोठेही रूढ झालेली मुळीच आढळत नाही तशी वस्तुस्थितीच संभवत नाही. घटनाचक्र एकच आहे ते सर्वांना ज्ञात असून सर्वत्र विख्यात आहे सर्व ज्ञात्याना मान्य आहे त्या बाबतीत शंका, संशय, वितर्क करण्यातच मग्न असणाऱ्या अस्थिर मनाला आणि वक्र बुद्धीला स्थानच उरत नाही हा वृत्तान्त प्राचीनच नव्हे तर सनातन आहे याला कूर्मपुराणाचीही साक्ष आहे—

हिमाह्वयं तु यद्वर्षं नाभेरासीन्महात्मनः ।। ३७ ।।
तस्यर्षभोऽभवत्पुत्रो मरुदेव्यां महाद्युतिः ।
ऋषभाद्भरतो जज्ञे वीरः पुत्रशताग्रजः ।। ३८ ।।

— कूर्मपुराण, अध्याय ६१/३७-३८

या हिमवर्षाचा अधिपती महात्मा नाभिराज होता त्याला मरुदेवी-पासून महातेजस्वी असा ऋषभ नावाचा मुलगा झाला त्या ऋषभदेवाला शभर मुले जन्मली त्या सर्वामध्ये भरत हा ज्येष्ठ असून मोठा वीर पुरुष होता

## वराहपुराण

वराहपुराणातही याच अर्थाचा उल्लेख असून तेथेही ऐतिहासिक वृत्तान्ताची तीच परपरा आढळते तेव्हा या सर्वच हिन्दू पुराणामध्ये भरताच्या वशपरपरेबद्दल सर्वत्र निश्चितपणे एकवाक्यताच अनुभवास येते—

" नाभिर्मरुदेव्यां पुत्रमजनयत् ऋषभनामानम् ।
तस्य भरतः पुत्रश्च तावदग्रजः ।
तस्य भरतस्य पिता ऋषभः हिमाद्रेः दक्षिणं वर्षं महद् भारतं नाम शशास ।"

— वराहपुराण, अध्याय ७४.

ज्याचे आई-वडील मरुदेवी व नाभिराज असून ज्याला शंभर मुले जन्मली, ज्याचा ज्येष्ठ पुत्र भरत होता त्या ऋषभाने हिमालयाच्या दक्षिणेकडे असलेल्या विशाल भारतवर्षावरच पूर्वी राज्य केले होते

## हिन्दू पुराणामधील ऋषभकालीन इतिहास

वरील सर्व हिन्दू पुराणांमध्ये खोलवर धुडत गेल्यास अशा प्रकारची आणखी किती तरी अवतरणे आढळण्याची शक्यता आहे पार ऋग्वेदापासून आरंभ करून पुराणकालीन साहित्यापर्यंत सर्वत्र सर्व कालामध्ये निर्माण झालेल्या सर्व प्रकारच्या ग्रंथामध्ये हा वरील आदिकालाचा इतिहास कोणत्याही प्रकारे न बदलता तसाच अंगीकारला आहे या मनोवृत्तीच्या पाठीमागे निश्चित अशी काही विशिष्ट भूमिका आहे ती पूर्वजानी पुनीत समजून साभाळून ठेवलेली आहे कालदोषामुळे अलीकडील काही थोड्या हिंदूच्या मनात या सनातन परपरेबद्दल किंतू निर्माण झाला त्याची मने परपरा-भ्रष्ट झाली. म्हणून त्यानी परपरागत इतिहासाचा विपर्यास करण्याचे चग बावले आणि साहित्याच्या प्रांगणात थोडासा धुडगूस घातला त्यामुळे प्राजळ वाचकाची मने विथरून किंवा विघडून जाण्याची शक्यता निर्माण झाली तो अनवस्था प्रसंग ओढवू नये आणि ज्याना खऱ्या इतिहासाची जिज्ञासा आहे त्याच्या वाचण्यात मदत व्हावी यासाठी ही सर्व माहिती येथे सकलितरीत्या पुरविण्याचा प्रयत्न केला आहे

## भागवतपुराणाचे महत्त्व

ऋषभाचे पूर्वज, ऋषभाचा जन्म, त्याची पार्श्वभूमी, जीवित कार्यातील हेतू, ऋषभाची मुले, ज्येष्ठ मुलाचा राज्याभिषेक, गृहस्थधर्माचा उपदेश, परपरागत वर्षाच्या नामकरणाचा इतिहास, त्या वर्षाची पारपरिक नावे, ऋषभाची प्रव्रज्या, जैन धर्म प्रवर्तन, मुनिविहार, तपश्चर्येची पूर्ती, निर्वाणप्राप्ती इत्यादी सर्व महत्त्वाची जीवित-घटना एका भागवत पुराणामध्येच वाचण्यास मिळू शकतात या पुराणातील ऋषभचरित्राला बाकीच्या सर्व पुराणांची प्रामाणिक साक्ष आहे आणि इतर पुराणामध्ये जे त्रोटकपणे सागितले आहे त्याची येथे पूर्ती केली आहे बाहेरील सर्व पारपरिक विधानाला येथे पुष्टी आहे कदाचित् दुसरीकडे काही विसगतीचा आभास निर्माण होण्यासारखी स्थिती असेल तर येथे त्याचा निरास केलेला आढळेल म्हणून भागवत पुराणाकडे शेवटी वाचकाचे लक्ष वेधून घेऊन या अवतरणाच्या साक्षी आवरत्या घेतो

श्रीमद् भागवत भक्तिमार्गावरील एक प्रमुख ग्रथ आहे त्यातील भक्तीचा प्रवाह म्हणजे सुरसरिता गगाच होय भागवताला श्री वल्लभचार्यांनी 'महर्षि व्यासाची समाधिभाषा' असे सबोधिले आहे कारण समाधि अवस्थेच्या अनुभूतीनतरच व्यास ऋषीनी भागवतातील तथ्याचे विवेचन व विवरण केले आहे या पुराणाचा प्रभाव सर्वगामी आहे रामानुजाचार्य, वल्लभाचार्य, मध्वाचार्य, निम्बार्काचार्य, चैतन्यमहाप्रभू इत्यादी आचार्यांच्या भक्तिसाधनेचा मूलाधार भागवतच होय

'तत्र ज्ञानविरागभक्तिसहितं नैष्कर्म्यमाविष्कृतम् ।'

या पदावलीतील वर्णन भागवत पुराणाच्या बाबतीत पूर्णपणे अन्वर्थक आहे. म्हणून याची महिमा मोठी आहे

## आठवा अवतार

या भागवताच्या पाचव्या स्कधातील ३ ते ७ अध्यायामध्ये ऋषभावताराचे वर्णन आले आहे तेथे भागवतकाराने हा ऋषभावतार करुणामय, तृष्णादिक दोषरहित, ध्यानमुद्राधारी असून सर्व आश्रमावस्थेतील लोकाना पूजनीय आहे असे म्हटले आहे अर्हत राजा त्याचा अनुयायी होऊन ऋषभाच्या आज्ञेला अनुसरूनच राज्यकारभार करील ऋषभ हा विष्णूचा ८ वा अवतार आहे आत्मज्ञानी, उग्र तपस्वी व ब्रह्मचारी अशा दिगबर जैन मुनींचा धर्म स्पष्ट करून सागण्यासाठी प्रत्यक्ष विष्णूने नाभिपत्नी मरुदेवीच्या पोटी स्वत जन्म घेतला तोच प्रथम जैन तीर्थंकर ऋषभनाथ होय.

कुलकर किंवा मनूंच्या सख्येबाबत जैन साहित्यामध्ये देखील हिंदू साहित्या-प्रमाणेच दोन वेगवेगळ्या परपरा रुढ आहेत जरी पाचवे उपाग 'जंबूदीवपण्णत्ति' या आगम ग्रथातील १४ मनूंची परंपरा अधिक रुढ असली तरी प्रसिद्ध आगम स्थानांग या अंगग्रंथामध्ये विमलवाहनापासून नाभिपर्यंत ७ च मुख्य मनू मानले आहेत आणि ऋषभाने तीर्थंकरपूर्व अवस्थेमध्ये मनूची भूमिका पार पाडली होती म्हणून उपचाराने त्यानाही मनू म्हणून मान्यता मिळालेली आहे कधी कधी तर असा उपचार ऋषभपुत्र भरताच्या बाबतीतही पाळतात ! म्हणजे नाभी हा ७ वा मनू असल्याने त्यानतरचा ऋषभ हा ८ वा महापुरुष अथवा मनू होय ही जैन कल्पना व भागवतातील ८ व्या अवताराची कल्पना किती सुसगतपणे मेळ खाते ते लक्षात घेण्यासारखे आहे शिवाय ऋषभाचे आई-वडील, त्याचे शभर पुत्र, त्यामध्ये ज्येष्ठपुत्र भरत, भरताचा राज्याभिषेक, इतर पुत्राना ऋषभाचा उपदेश, समणमार्गी मुनीचा धर्म, ऋषभाविषयी पूज्यभाव, प्रव्रज्येनतर धर्मचक्र-परिवर्तन, ऋषभाना अनुलक्षून वापरलेली निरनिराळी गुण विशेषणे इत्यादी सर्वच गोष्टीमध्ये सुसबद्ध एकवाक्यता आहे ! अशा ह्या महान पुराणतही भरतचक्रीची पूर्ण वशावळी देऊन या देशाच्या नामकरणाचे मूळ उगमस्थान सागितले आहे—

**इति निशामयन्त्या मरुदेव्याः पतिमभिधाय अन्तर्दधे भगवान् ॥ १९ ॥ बर्हिषि तस्मिन्नेव विष्णुदत्तभगवान् परमर्षिभिः प्रसादितो नाभेः प्रियचकीर्षया तदवरोधायने मरुदेव्यां धर्मान् दर्शयितुकामो वातरशनानां श्रमणानां ऋषीणाम् ऊर्ध्वमन्थिनां शुक्लया तन्वावततार ॥ २० ॥**

— भागवतपुराण, स्कंध ५, अध्याय ४/१९-२०.

हे ऐकत असणाऱ्या मरुदेवीच्या पतीला ( नाभिराजाला ) लक्ष्य ठरवून भगवान विष्णू अतर्धान पावले आणि त्याचवेळी श्रेष्ठ ऋषीवर प्रसन्न झालेल्या भगवान विष्णूने, नाभिराजाचे प्रिय करण्याच्या इच्छेने, केवळ मोक्षाचेच ध्येय बाळगणाऱ्या वातरशना ( दिगबर ) समण मुनींचा धर्म सागण्यासाठी, त्या विनतीप्रमाणे मरुदेवीच्या पोटी स्वत शुभ जन्म घेतला

**गृहमेधिनां धर्माननुशिक्षमाणो ...... आत्मजानामात्मसमानानां शतं जनयामास ॥ ८ ॥ येषां खलु महायोगी भरतो ज्येष्ठः श्रेष्ठगुणः आसीत् येनेदं भारतमिति व्यपदिशन्ति ॥ ९ ॥**

— श्रीमद्भागवत, पचमस्कंध, अध्याय ४/८-९

गृहस्थाचा धर्माचार शिकविणाऱ्या ऋषभाने आपल्यासारख्याच शभर मुलाना जन्म दिला त्या सर्वांमध्ये भरत हा वयाने ज्येष्ठ होता तो गुणानी श्रेष्ठ होता महान योगीही झाला होता त्या भरतराजावरूनच या देशाला भारत म्हणून ओळखतात.

..अजनाभं नाम एतद् वर्ष भारतमिति यतः आरभ्य व्यपदिशन्ति।
— भागवत, ५/७/३.

पूर्वी अजनाभ असे नाव असलेल्या या वर्षाला (क्षेत्राला) भरतकाळापासूनच भारत असे म्हणतात.

दिगंबराणां तपस्विनां ज्ञानिनां नैष्ठिकब्रह्मचारिणां धर्मान् दर्शयितुं नाभिराज्ञो गृहे ऋषभनाम्नावतारं गृहीत्वा भरतश्रेष्ठान् शतपुत्रान् अन्यान् च सन्मार्गं उपदिश्य ब्रह्मावर्तात् प्रवव्राज ॥ ५९ ॥

— भागवत, पचमस्कध, ब्राह्मणोत्पत्तिमार्तण्ड, प्रकरण ५८

तपस्वी, ज्ञानी, निष्ठावन्त ब्रह्मचारी अशा दिगबराचा धर्म प्रगटपणे आचरून दाखविण्यासाठी नाभिराजाच्या घरी 'ऋषभ' नावाने विष्णूने अवतार घेतला. ज्येष्ठ पुत्र भरत इत्यादी आपल्या शभर मुलाना आणि दुसऱ्यानाही सन्मार्गाचा उपदेश देऊन, ब्रह्मावर्तापासून बाहेर पडून ऋषभाने प्रव्रज्या घेतली

......स्वतनयशतज्येष्ठं ... भरतं धरणिपालनायाभिषिच्य स्वयं ......प्रवव्राज ।

( ५/५/२८ )

पृथ्वीचे पालन करण्यासाठी स्वतःच्या शंभर मुलांपैकी ज्येष्ठ पुत्र भरताला राज्याभिषेक करून ऋषभदेवांनी स्वत दीक्षा घेतली.

.......पृथिवीमेकचरः परिबभ्राम ।

( ५/५/३० )

आणि संपूर्ण पृथ्वीभर एकाकी विहार केला.

... चचार धर्मं यदकर्महेतुम् ।

( ५/६/१४ )

(अष्ट) कर्मांचा नाश करण्यासाठीच धर्माचा आचार केला.

## ऋषभाचा स्वपुत्रांना धर्मोपदेश

स कदाचिदटमानो भगवानृषभो ब्रह्मावर्तगतो ब्रह्मर्षिप्रवरसभायां प्रजानां निशामयन्तीनामात्मजानवदितात्मनः प्रश्रयप्रणयभर सुयंत्रितान् अपि उपशिक्षयन् इति होवाच ।

( ५/४/१९ )

विहार करीत करीत एकदा ते भगवान ऋषभनाथ ब्रह्मावर्तामध्ये गेले तेथे मोठमोठ्या ब्रह्मर्षींच्या सभेमध्ये सर्व प्रजेच्या समक्ष स्वत च्या पुत्रांना उपदेश केला प्रेमभराने आपल्याकडे आलेल्या आणि आज्ञाकारी असलेल्या आपल्या मुलाना योग्य मार्गदर्शन करण्यासाठी पुढीलप्रमाणे म्हणाले—

पराभवस्तावदबोधजातो यावन्न जिज्ञासत आत्मतत्त्वम् ।
यावत्क्रियास्तावदिदं मनो वै कर्मात्मकं येन शरीरबंधः ।। ५ ।।
तस्माद् भवन्तो हृदयेन जाताः सर्वे महीयांसममुं सनाभम् ।
अक्लिष्टबुद्ध्या भरतं भजध्वं शुश्रूषणं तद्भरणं प्रजानाम् ।। २० ।।
शमो दमः सत्यमनुग्रहश्च तपस्तितिक्षाऽनुभवश्च यत्र ।।२४।। इ. इ.

— भागवत, ५/५/५, २० व २४.

पराभवाची कल्पना बोधीच्या ( भेदविज्ञानाच्या ) अभावी निर्माण होते जोपर्यंत आत्मतत्त्वाचे ज्ञान होत नाही तोपर्यंत अबोध अवस्था नष्ट होत नाही. जोपर्यंत मन, वचन व काय या मार्गांनी क्रियाचे अस्तित्व शिल्लक असते तोपर्यंत मन कर्ममयच राहते आणि त्यामुळे ( नामकर्मामुळे ) पुन पुनः शरीराची रचना होत राहते (५) ( हा आध्यात्म मार्ग नको असेल तर ) . .मुलानो, तुम्ही सर्वजण मला सारखेच प्रिय आहात आणि तो भरत तर तुम्हा सर्वामध्ये मोठा भाऊ आहे म्हणून मनातील सक्लिष्ट भाव ( वैर-ईर्ष्यादिक ) सोडून देऊन ( माझ्या पश्चात ) भरताला शरण जा. प्रजेची शुश्रुषा करणे व त्याचे पालन-पोषण करणे हा त्याचा धर्मच असल्याने भरत हे त्याचे नाव अर्थपूर्ण आहे (२०) . . ( मात्र आत्मकल्याणाचा हा मार्ग स्वीकारावयाचा असेल तर ) या जीवनक्रमामध्ये शाती, सयम, सत्य, दया, तप आणि क्षमाभाव या गुणाची अनुभूती लाभेल ! (२४) इ इ

या पाचव्या अध्यायामध्ये "स्वपुत्रेभ्यो मोक्षधर्मोपदेश" या सदराखाली ऋषभदेवानी स्वत च्याच मुलाना हा जो उपदेश दिला आहे तो निरखून पाहिल्यावर-

(१) ज्येष्ठपुत्र भरताचा व इतर सर्व भावाचा, पैतृक राज्याच्या वारसाहक्काच्या सदर्भात जो सघर्ष निर्माण झाला होता त्या उद्बोधक आणि परिवर्तनात्मक

प्रकरणावर तसेच त्या घटनेसबधी निकालात्मक व मार्गदर्शनात्मक दृष्टिकोनावर जसा, तसाच,

(२) जैन मुनीच्या आचार धर्मावर आणि त्या आचारामागील दार्शनिक विचारावर मोठा उद्‌बोधक प्रकाश पडतो जैन तपाचार आणि वैदिक क्रिया यामध्ये महदंतर असतानाही हा भाग तेथे सुरक्षित आहे हे नवल होय

(३) या शिवाय आणखी एक महत्त्वाचा मुद्दा स्पष्टपणे माडण्यात आला आहे— जैनाचा वीतरागप्रणित कर्मसिद्धान्त आणि वेदविहित कर्म एकस्वरूपी नव्हेत. मन-वचन-कायेच्या द्वारे आत्मप्रदेशामध्ये जे परिस्पंदन निर्माण होते त्यामुळे आत्म्याला कार्माण-वर्गणाचा बध होतो आणि त्या कर्मामुळेच देहधारणा संभवते हा जैन दृष्टिकोणही येथे स्पष्ट झाला आहे. शरीराची निष्पत्ती हे नामकर्माचेच कार्य आहे.

अशा रीतीने नाभिराज-ऋषभदेव-भरतचक्री ही परपरा त्या तीन पुरुष-श्रेष्ठाच्या आयुष्यातील सर्व प्रमुख घटनासह पूर्वापार सुसगती साभाळून या महान भागवत पुराणात अनेक वेळा अनेक पद्धतीने, गद्य-पद्य अशा दोन्ही प्रकारात नोदलेली आहे (५/४/९ व ५/७/३) तेथे अगदी स्पष्ट शब्दात या वर्षाच्या नामकरणाचा इतिहास दिला आहे वर्षधर भरताची पूर्वापर परपरा दिली आहे त्यामुळे भरत या नावासबधाने सभ्रम निर्माण होण्यास वाव मुळातच नाही जशी भरताची वंशपरंपरा सुसबद्ध आहे तसाच या वर्षाचा नामानुक्रमही कालानुसार व घटनानुसार सागितलेला आहे हिमवर्ष – नाभिवर्ष – भरतवर्ष ही त्या नामानुक्रमाची वाटचाल आहे पुष्कळ वेळा भरताचा उल्लेख नाभि-ऋषभाच्या पारपरिक सबधाशिवाय येतो किंवा तो मनू अशा गुणविशेषणासह येतो. तेव्हा भरत हा मनू होता किंवा मनूला भरत ही पदवी असावी यासंबधी मनात भ्रम निर्माण होतो पण हे सर्व भ्रमांश काढून टाकण्यास भागवताची मदत मोलाची ठरते. प्रजेच्या भरण-पोषणामुळे ऋषभपुत्र भरताचे नाव अन्वर्थक आहे (५/५/२०) म्हणजे भरत हे मनूचे विशेषण नसून भरतानेच मनूचे कार्य केले आहे. ज्या भरतामुळे पूर्वीच्या नाभिवर्षाला भरतवर्ष असे नवे नाव मिळाले (५/७/३) तो भरत ऋषभपुत्रच आहे आणि तो ऋषभदेव आद्य जैन तीर्थंकरच आहे केवल ज्ञानाची प्राप्ती झाल्यावर तो ऋषभनाथ नारायण पदाला पोहोचला—

ॐ नमो भगवते उपशमशीलाय उपरतात्म्याय
नमो अकिञ्चनवित्ताय ऋषिऋषभाय नरनारायणाय
परमहंसपरमगुरवे आत्मारामाधिपतये नमो नमः ॥

— भागवतपुराण, ५/१९/११.

नारायण पदाला ( वीतराग ) प्राप्त झालेल्या ऋषभनाथाचा भरतवर्षी हा परमभक्त होता म्हणूनच त्याला 'नारायणपरायण' असे संबोधतात—

तेषां वै भरतो ज्येष्ठो नरनारायणपरायणः ।
विख्यातं वर्षमेतद् यन्नाम्ना भारतमुत्तमम् ॥
— भागवतपुराण, ११/२/१७.

त्या सर्वांमध्ये ( सर्व ऋषभपुत्रांमध्ये ) भरत ज्येष्ठ होता तो नारायण भक्त होता ऋषभच नारायण होत ( भागवत पु ५/१९/११ आणि ५/४/३ ) त्या भरताच्याच नावाने या उत्तम वर्षाचे नाव भारत असे विख्यात झाले. याचा अर्थ ऋषभनाथ जैनांचे प्रथम तीर्थंकर होते आणि भागवत (भगवानाचे अनुयायी) लोक त्यांना आराध्य देवता मानतात, विष्णूचा ( ८ वा ) अवतार समजतात. ऋषभ आणि भरत दोघेही मनूच्या परंपरेतील वंशज होत सर्व संप्रदायामधील सर्वच लोक त्याचा आदर करीत असत म्हणून एकनाथ, सूरसागर इत्यादी अनंतरकालीन भगवद्भक्तामध्येही त्याच्याविषयी आदर टिकून राहिला आहे.

## भरताचे मंगलस्मरण

ही इतिहासाची परंपरा अव्याहत चालत आली आहे. अर्धमागधी-आर्द-संस्कृत-प्राकृत भाषेतील ग्रंथाच्या पाठोपाठ प्रादेशिक भाषेतील ग्रंथरचनेतही हा ओघ जिवंत राहिला आहे एकनाथी भागवतातील पुढील ओळी या दृष्टीने उद्बोधक वाटतील त्यामध्ये भरताची कीर्ती नुसती विशालच नव्हे तर परम पवित्र मानली आहे त्यामुळे सिद्धीसाठी सर्व शुभ कर्माच्या आरंभी त्याचे नामस्मरण करण्याची विज्ञापना आहे—

जो ज्येष्ठपुत्र भरत जाण । तो नरनारायणपरायण ।
अद्यापि भरतवर्ष उच्चारण । त्याचेनि नांवे जाण विख्यात ॥ १३७ ॥
ऐसा तो ऋषभाचा पुत्र । जयासी नांव भरत ।
ज्याच्या नामाची कीर्ति विचित्र । परम पवित्र जगामाजी ॥ १४५ ॥
तो भरतु राहिला ये भूमिकेसी । म्हणौनि भरतवर्ष म्हणती यासी ।
सकळ कर्मारंभी करिता संकल्पासी । ज्याचिया नामासी स्मरताती ॥ १४६ ॥
नामें ख्याती केली उदंड । यालागीं त्याते म्हणती भरतखंड ।
आणीकही प्रताप प्रचंड । त्याचा वितंड तो ऐका ॥ १४८ ॥

— सार्थ एकनाथी भागवत, अध्याय २,
मराठी पद्य १३७/१४५/१४६ व १४८

## सूरसागर

हिंदी काव्यामध्ये सूरदासांची ख्याती मोठी आहे त्याचा सूरसागर नावाचा ग्रथ प्रसिद्ध आहे. त्याच्यावर श्रीमद् भागवताचा प्रभाव पडलेला आहे यातील पाचव्या स्कधामध्ये ऋषभावतार हा प्रसग हाताळला आहे त्यातील ऋषभ-परपरा व भरत-प्रशस्ती रसाळ असून सर्वमान्य इतिहासाला प्रमाणभूत आहे—

> बहुरो रिषभ बडे जब भये। नाभि राज दे वन को गये।
> रिषभ राज परजा सुख पायो। जस ताको सब जग में छायो॥
> रिषभ देव जब बन को गये। नवसुत नवौ खण्ड नृप भये।
> भरत सो भरत खण्ड को राव। करे सदा ही धर्म अरु न्याव॥
>
> —सूरसागर, पचमस्कंध, पान १५०-५१.

यानतर ऋषभनाथ जेव्हा मोठे झाले तेव्हा नाभिराजाने त्याना राज्य दिले आणि स्वत वानप्रस्थाश्रम स्वीकारला ऋषभ राजाची प्रजा सुखी झाली. त्याची कीर्ती जगभर पसरली जेव्हा ऋषभदेवानी दीक्षा घेतली तेव्हा त्याची ९ मुले भरत क्षेत्रातील ९ खण्डाचे राजे बनले त्याच्यातील जो ज्येष्ठ भरत होता तो भरतखण्डाचा अधिपती झाला. त्याने धर्माने आणि न्यायाने चिरकाल राज्य केले

## मत्स्य-वायुपुराण-परामर्श

मत्स्यपुराणही प्राचीन इतिहासाच्या अभ्यासासाठी एक महत्त्वाचा ग्रथ आहे त्यामधील २९१ अध्यायामध्ये पधरा हजार श्लोक आहेत या ग्रथाच्या प्रारभिक भागामध्ये मनू आणि मन्वन्तरासबधीचे वर्णन विस्तारपूर्वक दिले आहे ५३ व्या अध्यायामध्ये सर्व पुराणातील विषयाची अनुक्रमणिका दिली आहे हे याचे एक आगळे वैशिष्ठ्य होय. यावरून हा ग्रथ सर्व पुराणामध्ये अर्वाचीन असावा शिवाय ऋषींचे वश, राजधर्म व राजनीतीच्या सिद्धान्ताचे विवेचन आणि प्रतिमा-लक्षण या विषयाचे विवरण हे या ग्रथाचे महत्त्व वाढविण्यास पुरेसे आहेत

याही पुराणात आपल्या देशाचे नाव भरतावरूनच पडले आहे हे पारपरिक सत्य स्पष्टपणे शब्दाकित केले आहे तरी पण येथे नाभिराज-ऋषभदेव-भरतचक्री ही अनुबद्ध वशपरपरा व्यक्त केली नसून भरताचा परिचय मात्र मनू या सज्ञेत करून दिलेला आहे भरत या शब्दाची निरुक्ती जशी भागवत, महापुराणादिक इतर बहुतेक सर्व ग्रथात दिली आहे तशीच याही ठिकाणी मान्य केली आहे त्यामुळे सर्व मानवाचा आद्यजनक जो स्वायंभुव मनू होऊन गेला त्याच्या प्रजापालनाच्या—भरणपोषणाच्या कर्तव्यावरून त्यालाच भरत हे गुणविशेषण प्राप्त झाले आणि त्या पदवीवरूनच या आपल्या वर्षप्राय देशाला भारत अशी प्रसिद्धी

प्राप्त झाली असा प्रथमदर्शनी तरी भास होतो शिवाय वायुपुराणातही त्याच ओळी आढळतात—

> भरणात् प्रजनाच्चैव मनुर्भरत उच्यते ॥ ५ ॥
> निरुक्तवचनैश्चैव वर्षं तद् भारतं स्मृतम् ॥ ६ ॥
>
> — मत्स्यपुराण, अध्याय ११४/५ व ६ आणि
> — वायुपुराण, अध्याय ४५/श्लोक ७६.

प्रजेच्या भरण-पोषणाचे कर्तव्य बजावल्याने त्या मनूला भरत ही संज्ञा प्राप्त झाली आणि त्याच्या राज्य-प्रदेशाला त्या भरत शब्दावरून भारत अशी प्रसिद्धी मिळाली

या ठिकाणी आद्य मनूचे नाव भरत असे पडले असे जे विधान आहे ते उत्सूत्र आहे कारण—

(१) बाकीची सर्व पुराणे आणि इतर सर्व ग्रंथही भरताला आद्य मनू मानीत नाहीत मनूची ( कुलकराची ) यादी सात आणि चौदा या दोन संख्येत रेंगाळत असली तरी त्यातील नामावली सुनिश्चित आहे हिंदू, जैन किंवा इतर कोणतीही परंपरा भरताला आद्य मनू किंवा आद्य मनूला भरत मानीत नाही. तेव्हा केवळ मत्स्यपुराणच तसे मानेल असे वाटत नाही प्राचीन परंपरेप्रमाणे पहिल्या मनूचे नाव आहे स्वायंभुव. त्या स्वायंभुव मनूलाच भरण-पोषणाच्या कर्तव्यामुळे भरत ही संज्ञा प्राप्त झाली असेल आणि त्यामुळेच आपला देश भारत नावाने प्रख्यात झाला असेल तर त्याच देशाची अजनाभवर्ष, ऋषभवर्ष अशी पूर्वीची नावे आढळतात ती आढळणे तर्कसंगत कदापि ठरू शकत नाही आणि ती स्पष्टपणे नाभिराज व ऋषभदेव या पितापुत्र राजांच्या नावांच्या स्मृतीदाखल रूढ झाली आहेत याबद्दलचा इतिहास स्पष्ट आहे. मग ही नवी नावे रूढ झाल्यावर त्यापूर्वीचे भारत हे जुने नाव लुप्त होऊन गेले असते. पण तसे झालेले नाही. भरतवर्ष किंवा भारत हे नाव त्या परंपरेतील आद्य नव्हे तर अंतिम असल्यानेच आजही ते विद्यमान आहे

(२) शिवाय इतर सर्व ग्रंथाप्रमाणे मनूच्या काळी या वर्षाला मानववर्ष किंवा मनूचा वर्ष हे नाव पडले होते, भरत असे मुळीच नव्हे

(३) कुलकर-कर्तव्य पार पाडणारे अनेक मनू होऊन गेले आहेत स्वायंभुव आद्य असले तरी एकमेव नव्हेत. त्या सर्वांनीच प्रजेची चिंता वाहिलेली आहे विशेषत. आद्य मनूच्या काळी अन्नाची समस्या निर्माणच झाली नव्हती त्या कालपरिवर्तनाच्या प्रथम चरणात अन्नेतर समस्याच अगोदर निर्माण झाल्या.

तेव्हा भरण-पोषण हे आद्य मनूचे महत्त्वाचे कार्य होऊच शकत नाही मनूची अनेक कार्ये स्पष्टपणे नोंदलेली आहेत त्यामध्ये भरण-पोषणाचा संकेत कोठेही आढळत नाही ही भरण-पोषणाची समस्या मनूयुगानंतरच भरतचक्रीच्या वेळी निर्माण झाली. ऋषभपुत्र भरतानेच ती सोडविली. त्यानेच प्राचीन मनूची आणि नवीन प्रजापाल नृपतीची अशी दोन्ही प्रकारची जबाबदारी पार पाडली म्हणून हा ऋषभपुत्र भरतच चक्रवर्ती राजा आणि मनू म्हणूनही प्रसिद्ध आहे. इतर सर्व साहित्यिक पुराव्यावरून भरणात् इत्यादी कामगिरीमुळे ज्याचे भरत हे नाव सार्थ ठरले तो ऋषभपुत्रच होय दुसरा कोणीही नव्हे !

प्राचीन परंपरेप्रमाणे प्रत्येक मन्वन्तरातील मनूची कर्तव्ये वैशिष्टयपूर्ण होती ती त्या त्या ठिकाणी स्पष्ट केली आहेत उदाहरणार्थ नाभिराजाने या जगात प्रथमच नालकर्म प्रचलित केले, इत्यादी ती कर्तव्ये भरण-पोषणासारखी लौकिक व सामान्य नव्हती सर्वच राजाचे प्रजापालन हे सामान्य कर्तव्य असते मनू हे केवळ राजे नसून कुलकर होते त्यांचे व्यक्तिमत्त्व फार वेगळे होते. म्हणूनच त्यांची गणना राजापेक्षा वेगळी केलेली आढळते यासाठी एखाद्या मनूला मुद्दाम भरत संज्ञा बहाल करण्यात कोणताच हेतू सिद्ध होत नाही उलट ती संज्ञा ऋषभपुत्रालाच साजेलशी आहे. नाभिराज हे शेवटचे मनू त्याचा पुत्र ऋषभ हा प्राचीन मनू आणि लौकिक राजा यामधील दुवा त्याने राज्याची प्राकृतिक रचना निर्माण केली म्हणून तो पहिला राज्यविधाता आणि सध्याच्या रूढ जगाप्रमाणे ऋषभाचा मुलगा भरत हाच पहिला प्रजापाल व भरण-पोषणास जबाबदार असा राजा त्याच्यापासूनच खऱ्या अर्थाने भरण-पोषणाला सुरवात झाली म्हणून तो पहिला गुणानुरूप भरत राजा ही त्याची भूमिका ओळखूनच ऋषभाने जाणून बुजून त्याचे नाव भरत असे ठेवले (महापुराण, १५/१५८ इ ) शिवाय तो ऋषभपुत्र भरत जसा चक्रवर्ती होता तसा मनू देखील होता ( महापुराण, ३/२३२ ) या व अशा उल्लेखावरून 'मनुर्भरत उच्यते' या पदाचा अर्थ 'मनूला भरत असे म्हणतात' यापेक्षा 'भरताला ( ऋषभपुत्राला ) मनू म्हणतात' असा करणे चूक नव्हे हाच अर्थ सुसंगत असून पारंपरिक इतिहासाच्या चौकटीत व्यवस्थित बसतो हाच अर्थ ऐतिहासिक सत्याला अनुरूप आहे या अर्थाला व्याकरणाचीही हरकत नाही कारण दोन्ही पदांची विभक्ती व कारकार्थ एकच आहे म्हणून वरील ओळीचा-

> 'प्रजेच्या भरण--पोषणाचे कर्तव्य पार पाडल्यामुळे आणि तो सर्वांचा जनक (पालक) बनल्यामुळे भरत चक्रवर्तीला मनू असेही म्हणतात (५). आणि नाम--निरुक्तीप्रमाणे त्या चक्रवर्तीच्या वर्षाला भारत असे म्हणतात (६).'

असा अर्थ इतिहासाला सुसगत व व्याकरण-शुद्ध वाटतो कारण भरतकाळी कालपरिवर्तन मोठ्या प्रमाणात झाले सृष्टीमध्ये स्थित्यंतर घडले म्हणून भरत राजाला मनूप्रमाणेही कार्य करावे लागले लोकाच्या जीवनाच्या स्थैर्यासाठी त्याला काही नवी व्यवस्था चालू करावी लागली. त्याने दण्डनीती मुधारून ती कालानुकूल केली तुरंगवास व छविच्छेदादी देहदण्ड नव्याने रूढ केले अशा कर्तव्यावरून प्रजापालन व भरण–पोषणाचे कार्य सिद्ध होते तरीही तो आद्य मनू नव्हे. तो अतिम मनू नमीचा नातू व ऋषभाचा पुत्र आहे त्याच्या श्रेष्ठ व उपयुक्त कामगिरीला स्मरून लोकानी या देशाचे अजनाभवर्ष (नाभिवर्ष) हे पूर्वनाव बदलून भरतवर्ष (भारत) असे नवे नाव रूढ केले म्हणून मत्स्यपुराणातील भरत हा आद्य मनू मुळीच नव्हे.

## भरत–स्वयंभुव विमर्श

भरतालाही उपचाराने १६ वा मनू म्हणतात हे मात्र खरे भागवनादिक हिंदू ग्रथाप्रमाणेच जिनसेन आचार्यांच्या विधानामध्येही भरत या नामधेयाची निरुक्ती दिली आहे

**प्रमोदभरतः प्रेमनिर्भरा बंधुता तदा**

— महापुराण १५/१०८ इ.

भागवतामध्ये प्रत्यक्ष पिता ऋषभाच्या तोडी भरतासबधी 'शुश्रूषणं तद्भरणं प्रजानाम्' (५/५/२०) असा स्पष्ट उल्लेख आहे तेथे या भरताची वंशावळही सुनिश्चित आहे तो आद्य मनूही नव्हे व इतर कोणी दुसरा भरतही नव्हे याला तेथे प्रमाणभूत साक्ष आहे तेथेच ५/७/३ मध्ये पूर्वी जे अजनाभ असे या वर्षाचे नाव होते तेच नाव बदलून ऋषभपुत्र भरताच्या कीर्तीमुळे भरतवर्ष असे नवे नाव रूढ झाले असे स्पष्ट विधान करून कोणत्याहि सशयाला मुळीच वाव ठेवलेला नाही. एकूण हा वृत्तान्त सर्वांनाच सम्मत आहे यावद्दल दुमत कोठेच नाही.

या मत्स्यपुराणात भरताला ऋषभपुत्र असे उघड म्हटले नाही एवढेच. पण तेवढ्याने काहीही विघडत नाही तेथे त्याला फक्त मनू म्हटले आहे आणि ते सर्वांनाच मान्य आहे फक्त मनूचा अर्थ आद्य मनू असा घेऊ नये म्हणजे विसगती निर्माण होत नाही मनूंच्या सख्येबावत मुळातच निश्चित असे एकमुखी विधान सापडत नाही त्याची सख्या, नामावली, कालानुक्रम, कर्तव्य इत्यादी बाबतीत पुष्कळ ठिकाणी विविधताच आढळते म्हणूनच पुराणातील सुसगती तेवढीच स्वीकार्य ठरते कारण मत्स्यपुराणातही मनूच्या नावामध्ये सुसंगती आढळत

नाहीच म्हणून मनुर्भरत उच्यते या विधानातील मनूला आद्य मनू स्वयभुवच असे म्हणणे सुसगत ठरत नाही. तसा कोणताही आधार येथेही सापडत नाही आणि दुसरीकडेही नाही उलट दुसरीकडे सर्वत्र त्याचा परिहारच केलेला आढळतो-

(१) भागवतामध्ये (५/५/२०) भरणं प्रजानाम् हे पद ऋषभपुत्र भरतालाच अनुलक्षुन वापरलेले आहे, आद्य मनू स्वयभूवाला उद्देशून नव्हे

(२) भागवतातील ५/४/३ आणि ५/७/३ मध्ये या आपल्या वर्षाचे नाव पूर्वी अजनाभवर्ष होते पण ऋषभपुत्र भरताच्या नावामुळेच त्याचे भारत असे नामातर झाले असे स्पष्ट म्हटले आहे. म्हणजे हा नामातराचा कालखण्ड आद्य मनू स्वायभुव याच्या काळचा मुळीच होऊ शकत नाही

(३) मार्कण्डेय पुराण अध्याय ५० मधील ३२ ते ४२ श्लोकामध्ये स्वायभुव मनूपासून अतूट वशावळ दिली आहे ती स्वायभुव-प्रियव्रत-आग्नीध्र-नाभिराज-ऋषभदेव - भरतचक्री - अशी स्पष्ट आणि क्रमवद्ध असल्याने स्वायभुव आणि भरत या अगदी वेगवेगळ्या व्यक्ती ठरतात आणि त्याच्यामध्ये ५/६ पिढ्याचे अतर असल्याने दोघाचा कालखड एक असणे शक्य नाही.

(४) नारदपुराण, पूर्वखड, अध्याय ४८ मधील ५ व्या श्लोकात 'आर्षभो यस्य नाम्नेद भरतखण्डमुच्यते' अर्थात ज्या भरताच्या नावाने या वर्षक्षेत्राला भरतखण्ड असे म्हणतात तो भरत ऋषभाचा पुत्र (आर्षभ) होय असे स्पष्टातिस्पष्ट विधान आहे

(५) आणि नारदपुराणातील त्यापुढच्याच श्लोकात 'स राजा प्राप्तराज्यस्तु पितृपितामह क्रमात् ।' भरताला जे राज्य मिळाले ते आजोबा व वडील याच्या कडून क्रमश वशपरपरेने चालत आले होते असा उल्लेख आहे. स्वायंभुव या आद्य मनूला अशी पूर्वजाची मोठी परपरा कोठून असणार ?

(६) वराहपुराण अध्याय ७४ मध्येही तस्य भरतस्य पिता ऋषभ ॥' या पदावलीमध्ये वर्षाधिपती भरताचे वडील ऋषभ यांनी याच नाभिवर्षावर भरतापूर्वी राज्य केले होते असे म्हटले आहे आणि ऋषभकाळ हा स्वायभुव मनूच्याही पूर्वीचा ठरू शकत नाही

(७) भरतपुत्राचे नाव सुमती किंवा अर्ककिर्ती असे विधान असल्यानेही भरत हा आद्य स्वायभुव मनू ठरू शकत नाही. कारण स्वायभुव मनूच्या मुलाचे नाव प्रियव्रत असे आहे हे नियत आहे

(८) श्रीमद्विष्णुपुराण, दुसरा भाग, अध्याय १ मधील २७ ते २९ या श्लोकामध्येही याच मताला पुष्टी मिळते

## बलदेव उपाध्यायांचा निष्कर्ष

मत्स्य - वायुपुराणातील या विधानाचा परामर्ष घेताना आचार्य बलदेव उपाध्याय आपल्या पुराणविमर्श या ग्रंथातील सातव्या परिच्छेदामध्ये म्हणतात–

> "प्रतीत होता है कि यह प्राचीन निरुक्ति के ऊपर किसी अवांतर युग की निरुक्ती का आरोप है। प्राचीन निरुक्ति के अनुसार स्वायंभुव मनु के पुत्र थे प्रियव्रत, जिनके पुत्र थे नाभि। नाभि के पुत्र थे ऋषभ, जिनके एक शत पुत्रो मे से ज्येष्ठ पुत्र भरत ने पिता का राजसिंहासन प्राप्त किया और इन्ही राजा भरत के नाम पर यह देश अजनाभ से परिवर्तित हो कर भारत वर्ष कहलाने लगा। जो लोग दुष्यन्त के पुत्र भरत के नाम पर यह नामकरण मानते हैं, वे परंपरा विरोधी होने से अप्रमाण हैं॥

यावरून हेच सिद्ध होते की नामकरणस्वामी भरत हा आद्य मनू स्वायंभुव नव्हे तर तो ऋषभपुत्रच आहे या देशाचे आजचे नामकरण दुसऱ्या कोणत्याही भरताच्या नावाने झालेले नाही ऋषभपुत्रच प्रजेच्या भरण–पोषणाच्या संदर्भात खरे भरत ठरतात (महापुराण, १५/१५७ व २२२ हरिवंशपुराण, ९/२१) ही भरत नावाची निरुक्ती जैन व अजैन अशा सर्व साहित्यात सगतवार सापडते स्वायंभुव मनूला कोठेही भरत म्हटलेले नाही महापुराणातील प्रमोदभरत प्रेमनिभरा वंधुता तदा। (१५/१५८) अशा उल्लेखावरूनही याच परपरेचे प्रामाण्य सिद्ध होते

## ब्रह्मपुराणाचे परीक्षण

तथापि ब्रह्मपुराणात एके ठिकाणी मात्र असा एक उल्लेख आहे की त्यावरून भरतवर्षाचे नाव दुष्यंताचा उत्तराधिकारी (शकुंतलापुत्र सर्वदमन) जो भरत त्याच्या नावावरून रूढ झाले असा अर्थ लावण्याचा काहीजण प्रयत्न करतात पण तोही उल्लेख पुराव्याच्या, सुसंगतपणाच्या आणि साहित्याच्या साक्षीच्या इतर निकषावर टिकत नाही

> दुष्यन्तस्य तु दायादो भरतो नाम वीर्यवान्
> स सर्वदमनो नाम नागायुतबलो महान्।
> चक्रवर्ती सुतो जज्ञे दुष्यन्तस्य महात्मनः
> शकुंतलायां भरतो यस्य नाम्ना तु भारताः॥

— ब्रह्मपुराण,
(B O R Annals, vol 36 (1955), PP 114 to 118)

राजा दुष्यन्ताला शकुंतलेपासून भरत नावाचा मुलगा जन्मला तो चक्रवर्ती झाला तो भरत दुष्यन्ताचा उत्तराधिकारी असून त्याला हत्तीचे बल प्राप्त झाले होते त्याच्या नावामुळे त्याच्या कुळातील लोकाना भरतवंशीय असे नाव रूढ झाले

(१) या ठिकाणी 'यस्य नाम्ना तु भारता.' या चरणातील भारता या पदाचा अर्थ निश्चितपणे भरतदेश असा करणे कठीण आहे. अनेकवचनी कुलनावे देशवाचक असू शकतात मात्र एवढ्याच सुताने येथे तरी स्वर्ग चढता येत नाही येथे त्या पदाचा अर्थ भरताचे वशज एवढाच आहे कारण अशा वशवाचक अर्थालाच सर्वत्र पुष्टी मिळते. (महाभारत, आदिपर्व, अध्याय अ०२/६७, ७४, ९६, ९७ इ) आणि इतरत्र एखाद्या पुराणातही त्या पदाचा अर्थ देशवाचक होत असलेला कोठेही आढळत नाही तसा अर्थ लावल्यास तो सुसगत ठरत नाही भरतवर्षाच्या अभिप्रायाने 'भारताः' असे कोठेही म्हटलेले आढळत नाही म्हणून फक्त याच ठिकाणी त्याचा अर्थ भरतदेश किंवा भरतवशीयाचा देश असा का व कोणत्या आधारे करावा हे समजत नाही. तसा पूर्व संदर्भही नाही येथे देशाच्या नामकरणाचा विषयही प्रस्तुत नाही परपरागत राज्यवितरणाचा कालानुक्रमही नाही येथे फक्त दुष्यन्तपुत्र भरत आणि त्याच्या वशजाचेच कथन आहे

(२) उलट प्रसिद्ध महाभारत या ग्रथामधील विधानाप्रमाणे सर्वत्रच शकुतलापुत्र सर्वदमनाचे नाव एका प्रसगाने भरत असे रूढ झाले आणि पुढे त्याच्या नावावरून त्याच्या पूर्वीच्या पुरुवंशाला भारतवंश आणि त्या कुळातील लोकानाच भारत असे नाव पडले महाभारतात 'हे भारत!' असे सबोधन मुख्यत सर्व पाण्डवाना आणि त्या वशशाखेतील इतर अनेकाना व्यक्तिश सबोधन करताना वापरलेले आहे भारतातील सर्व रहिवासीजनाना, दुष्यन्ताच्या वशजाशिवाय इतराना किंवा भरतवर्षाला उद्देशून एकदाही भारता हे पद वापरलेले आढळत नाही या देशात शकुतलापुत्र भरत याच्या वशजाशिवाय समकालीन असे इतर अनेक थोर वश विद्यमान असल्याचा पुरावा त्याच ग्रथात अनेक ठिकाणी उपलब्ध आहे मात्र तेथे एकाही ठिकाणी दुष्यन्तपुत्र भरताच्या नावावरून या देशाचे नवे नामकरण झाले असा उल्लेख सापडत नाही त्या नामकरणाच्या पूर्वीच्या देश-नामाचा पत्ता नाही भरतापूर्वी दुष्यन्त स्वत कोणत्या देशात राहात होता अशा सहज व स्वाभाविक प्रश्नाचेही उत्तर सापडत नाही वर्षनामकरणाच्या सदर्भात दुष्यंतपुत्र भरतासंबधीचे विधान वस्तुस्थितीला धरून नसल्याने त्याला त्याच ग्रंथात अगर दुसऱ्या कोणत्याही ग्रथात पुष्टी मिळत नाही.

(३) मात्र जैन, वैदिक, वैष्णव, शैव अशा प्रणालीतील आर्ष, अर्धमागधी, संस्कृत, प्राकृत, मराठी, हिंदी, कन्नड इत्यादी भाषेतील सर्वच ग्रथात सुस्पष्ट आणि सुसगत अशी कित्येक विधाने उपलब्ध असून त्या सर्व ठिकाणी भरतवर्षाच्या

नामकरणाच्या संदर्भात ऋषभपुत्र भरताचाच पाठपुरावा केलेला आहे. आणि त्या सर्व विविध ग्रंथातील सुसवादित्व विस्मयजनक शास्त्रशुद्ध आहे !

(४) दुष्यन्ताच्या सर्वदमन नावाच्या मूलाला भरत असे नाव पडले असले तरी तो प्रजेचे भरण–पोषण करणारा या अर्थाने मुळीच नव्हे उलट त्या सर्वदमनाचे व त्याच्या आईचे ( शकुतला ) भरण–पोषण करण्याचे कर्तव्य दुष्यन्त राजाने विशिष्ट प्रसंगी स्वीकारले आणि त्या प्रसगाच्या निमित्ताने सर्वदमनाचे नाव भरत असे पडलेले आहे (महाभारत, आदि ७५, श्लोक ११ ते १५). तेव्हा भरणात् प्रजानाञ्च । ही निरुक्ती दुष्यन्तपुत्र भरताच्या बाबतीत शास्त्रशुद्ध वाटत नाही त्या नामकरणप्रसगी तो भरण-पोषण-कर्ता नसून त्याच्याच भरण-पोषणाची सोय झाली असल्याने तो पोषक नव्हे तर पोषित व भर्तव्यच ठरतो

(५) शिवाय ऋषभपुत्र भरताचा उल्लेख पदोपदी पढमचक्कवट्टी असा आढळतो प्रथम चक्रवर्ती या विधानाबाबतीत कोठेच दुमत किंवा विसवाद नाही ते सार्वत्रिक सत्य आहे. मात्र दुष्यन्तपुत्र भरत सम्राट असला तरी त्याला प्रथम चक्रवर्ती असे कोठेही म्हटलेले नाही. त्याचेच अनेक पूर्वज प्रसिद्ध आणि सबल सम्राट होते त्या सर्वापेक्षा त्याचे कोणतेही वैशिष्ट्य नोंदलेले नाही. नहुष, ययाति, जनमेजय, अयुतनायी, पुरु, दक्ष, दुष्यत असे किती तरी पराक्रमी राजे पूर्वकाळी या भूमीवरचे सम्राट होते पण त्यांपैकी कोणाचेही नाव या वर्षाला प्राप्त झालेले नाही मात्र नाभि-ऋषभ-भरत ही क्षत्रिय परंपरा आणि हिमवर्ष–नाभिवर्ष–( भगवान वर्ष )–भरतवर्ष ही देशाच्या नामकरणाची परंपरा सर्वत्र सुसंगत आहे !

(६) उलट चक्रित्वाच्या दृष्टीनेही सर्वदमनाची बाजू असावी तितकी समर्थनीय नाही–

> यस्त्वयं मानवो द्वीपस्तिर्यग्यामः प्रकीर्तितः ।
> य एनं जयते कृत्स्नं स सम्राडिति कीर्तितः ॥
>
> — मत्स्यपुराण, अ० ११४, श्लो. १५.

ही हिंदू पुराणातील एकछत्री अधिराजाची किंवा सम्राटाची व्याख्या अथवा परपरागत जैन धारणेतील चक्ररत्नप्रभृती समस्त १४ रत्नाची व ९ निधीची सप्राप्ती, शिवाय प्रत्यक्षात षट्खंडात्मक सर्व क्षेत्रविभागावरील सपूर्ण आधिपत्य यापैकी कोणतीहि एखादी बाबसुद्धा दुष्यन्तपुत्र भरताला अगर अन्य कोणत्याहि भरताला लागू होत नाही म्हणून केवळ अश्वमेघाच्या सकल्पनेच्या बळावर ऋषभ-पुत्र भरताशिवाय अन्य कोणत्याहि भरतराजाला वर्षाधिपती मानण्यासारखी स्थिती नाही. अशा प्रसगी त्यांपैकी कोणालाहि या वर्षक्षेत्राच्या नामकरणाचा अधिष्ठाता

कल्पणे दूरान्वयानेही सभवत नाही शिवाय अश्वमेधादी यज्ञप्रकाराची सभावनाच मुळी पश्चातकालीन आहे

## दोन भरतांचा कालानुक्रम

आणि वशाच्या व कालखण्डाच्या दृष्टीने तर दुष्यंतपुत्र भरतापेक्षा ऋषभपुत्र भरत फारच पुरातन आहे. स्वायंभुव -> प्रियव्रत -> आग्नीध्र -> नाभि-> ऋषभ-> भरत या मार्कण्डेय पुराणाच्या वशावळीला अनुसरून भरतचक्री केवळ ५ वा वंशज ठरतो तर दुसऱ्या परपरेप्रमाणे नाभी हा शेवटचा मनू आणि ऋषभेय भरत हा फक्त दुसरा वशज ठरतो उलटपक्षी दुष्यतपुत्र भरत हा आद्य मनूपासूनच नव्हे तर केवळ पुरुवशानतरचाच कमीत कमी १९ वा वशज ठरतो (आदिपर्व९५) आद्य मनूपासून गणना केली तर तो त्याहून कितीतरी दूरचा ठरतो. कारण मनुवश आणि पुरुवश यामध्ये दुसरे कित्येक वश होऊन गेलेले आहेत. सर्वदमन, त्याचे वडील दुष्यत आणि त्याचे सर्व पूर्वज भरतवर्षातच राहात होते त्यामध्ये काही सम्राटही होते यावरून दुष्यतपुत्र हा कालगणनेनुसार फारच पश्चात्कालीन ठरतो त्याच्या वशातील कोणत्याही पुरुषाच्या नावाने या देशाने स्मृतिचिन्ह धारण केलेले नाही.

वायुपुराणामध्ये (अ०४५, श्लोक ७५) वर्षं यद्भारत नाम यत्रेयं भारती प्रजा। असे विधान भारतातील लोकाना उद्देशून केले आहे यातील भारती हे पद 'भारतातील' एवढयाच अर्थाने वापरलेले आहे केवळ दुष्यन्तपुत्र भरताच्या वंशातील लोक असा अर्थ घेण्यात औचित्याचा भग होतो १७ व्या शतकात होऊन गेलेल्या बनारसीदास या प्रसिद्ध हिंदी कवीने आपल्या बनारसी विलास या सुरस काव्यामध्ये केलेल्या पुढील विधानामुळे वाचकाच्या मनात कोणताहि सदेह शिल्लक उरणार नाही अशी खात्री आहे–

भरतखण्ड के प्राणी जे ते। प्रजा भरत राजा की ते ते।
भरत नरेश ऋषभ की शाखा। ताते लोग पितामह भाखा ॥

— बनारसी विलास, ३८

ऋग्वेदामध्येही या देशातील लोकासबधी विधाने आहेत–

विश्वामित्रस्य रक्षति ब्रह्मेदं भारतं जनम् ॥

— ऋग्वेद, ३/१३/१३

भरतवशातील लोकाचे (भारत जनम्) रक्षण विश्वामित्र करतो असे स्पष्ट विधान आहे, पण विश्वामित्र हा सपूर्ण भरतवर्षाचा मोठा प्रसिद्ध लोकपाल राजा होता असे विधान कोठेच नाही मात्र त्याची राजर्षी म्हणून खूप मोठी प्रसिद्धी आहे म्हणून वशिष्ट ऋषी ज्या अर्थाने रघुवशाचे हितेच्छू पालक होते केवळ त्याच

अर्थाने विश्वामित्र ऋषी भारतातील सर्व लोकांचे हितेच्छू पालक होते एवढाच अर्थ घ्यावयाचा

## भगवान वर्ष – ऋषभवर्ष

एकदरीत ब्रह्मपुराण, वायुपुराण आणि ऋग्वेदादी ग्रथातील **भारतं जनम्** या पदाच्या अर्थामध्ये जो सदेह निर्माण केला जात असतो त्याचा पूर्ण परिहार महाभारतातीलच अनेक ठिकाणच्या विधानामुळे होतो याचे अवलोकन या पूर्वीच केले आहे भरतवर्षाच्या नामकरणाच्या परपरेतील आणखी एक दुवा **भागवत** पुराणामध्ये मिळतो–

> **तस्य हीन्द्रः स्पर्धमानो भगवान्वर्षे न ववर्ष,**
> **तदवधार्य भगवानृषभदेवो योगेश्वरः प्रहस्य**
> **आत्मयोगमायया स्ववर्षं अजनाभं नामाभ्यवर्षत् ।**
>
> – भागवतपुराण, ५/४/३.

भगवान् ऋषभदेवाशी स्पर्धा करणाऱ्या इंद्राने ऋषभवर्षामध्ये पाऊस पाडला नाही हे लक्षात घेऊन योगसामर्थ्यामध्ये सर्वश्रेष्ठ असणाऱ्या भगवान ऋषभदेवानी हसून आपल्या यौगिक सामर्थ्याच्या बळावर स्वतःच्या अजनाभ नावाच्या वर्षावर पाऊस पाडला

येथे पूर्वीच्या अजनाभ ( नाभिवर्ष ) वर्षाला **भगवानवर्ष** असे स्पष्ट म्हटले आहे भगवान म्हणजेच ऋषभदेव हेही उघड आहे आणि ऋषभपुत्र भरताच्या कीर्तीमुळे त्याच वर्षाचे नामांतर भरतवर्ष असे झाले ही देखील वस्तुस्थिती आहे नाभिराज आणि भरत याच्या आतरकालामध्ये ऋषभ राजाची कारकीर्द असून ते अत्यत कुशल अने प्रजापाल म्हणून प्रख्यात झाल्याने मध्यतरी ऋषभदेवांच्या नावानेही हा भूप्रदेश विश्रुत झाला होता असे दिससे जेव्हा ऋषभाना राज्य मिळाले तेव्हा त्या वर्षाचे नाव अजनाभवर्ष किंवा **नाभिवर्ष** असे होते ऋषभाच्या प्रभावामुळे लोक त्या वर्षाला ऋषभवर्ष म्हणण्याच्या बेतात होते पण ते नाव मोठ्या प्रमाणात रुढ झाले नाही. कारण ऋषभांच्या राज्यकालामध्ये नाभिराज जिवंत होते आणि त्याच्या जीवनकालानतर लगेच तो वर्ष भरताला देऊन ऋषभाने दीक्षा घेतली त्यामुळे ऋषभवर्ष हे नाव पूर्णपणे रुढ होण्यास पुरेसा काळ मिळालाच नाही पुढे भरताच्या चक्रवर्ती–पदामुळे या वर्षाला थेट **भरतवर्ष** असे नाव प्रचारात येऊन तेच प्ररुढ झाले म्हणून हिमवर्ष –> अजनाभवर्ष (नाभिवर्ष) –> ऋषभवर्ष (भगवान वर्ष) –> भरतवर्ष ही परपरा सुसगत आणि कालानुक्रमाला अनुसरून योग्य ठरते.

## अजनाभवर्ष

ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलातील ( ८२/६ ) अजभ्य नाभौ या पदामध्येही अजनाभवर्षाचा संकेत निश्चितपणे अनुस्यूत असलेला आढळतो मात्र ऋग्वेदामध्येच भारत नावाच्या एका मोठ्या वंशाचा उल्लेख वरचेवर आढळतो ब्राह्मणग्रंथामध्येही भारतवंशीयांचा संदर्भ आढळतो. यज्ञप्रसंगी एष वो भरता राजा असा संबोधनात्मक उल्लेख भारतवंशीयांना उद्देशून केलेला आढळतो तो वंश मात्र शकुंतला पुत्र भरतानंतर त्याच्याच नावाने रूढ झाला होता आणि तो महाभारतकाळी देखील विद्यमान होता हा भारतवंश पुरुवंशानंतर दीर्घकालाने प्रसिद्धीस आला असल्याने तो ऋषभपुत्र भरताच्या कालापेक्षा फारच अर्वाचीन कसा ठरतो हे नुकतेच पाहिले आहे

## देश-नामकरणाची परंपरा

या निरनिराळ्या उल्लेखाच्या इतिहासावरून आपल्या देशाचे नाव शेवटी भरतवर्ष असेच निश्चितपणे स्वीकारण्यात आले ते का, कसे आणि त्या पाठीमागे कोणत्या घटना घडल्या आहेत यासंबंधी काही सगतवार विचारधारा आपण तयार करू शकतो–

(१) या भूक्षेत्राला एक विजय किंवा एकचक्री राज्य या विशिष्ट पारंपरिक अर्थाने 'वर्ष' शब्द वापरण्याची एक खास परंपरा पूर्वकालापासून प्रचलित आहे यात एका खास जैन संस्कृतीचे दर्शन होते

(२) जंबू द्वीपातील या दक्षिणेकडील वर्षाला उद्देशून जी नावे साहित्यात नोंदलेली आढळतात ती मुख्यत. भौतिक आणि व्यक्तिवाचक अशी दोन प्रकारची आहेत. आपणास उपलब्ध असलेले पहिले नाव हिमवर्ष ( हैमवत ) हे बहुतेक सीमादर्शक असे भौतिक किंवा प्राकृतिक नाव, या वर्षाची मर्यादा आखणारा मानदण्ड असा जो आजचा हिमालय किंवा पूर्वीचा हैमवत नावाचा महापर्वत आहे, त्याच्यावरूनच प्रचलित झाले असावे कारण त्या पर्वताचे नाव पवित्र असून ते अविस्मरणीय आहे.

(३) पुढे सत्ययुगाची किंवा भोगभूमीची स्थिती पालटू लागल्यावर मन्वंतराच्या संधिकालामध्ये मनूच्या विशिष्ट व्यक्तिमत्त्वामुळे व सामाजिक जीवनातील त्याच्या स्थानामुळे या वर्षाला मनूचा वर्ष किंवा त्याच अर्थाने मानव वर्ष असे ही म्हणत असावेत पुष्कळजण या नामकरणाचा संबंध फक्त पहिल्या मनूशीच लावतात पण त्यात तशी निश्चिती नाहीच हे नाव पद-विवरणात्मक आहे तरी पण यासंबंधी मोठ्या प्रमाणात उल्लेख उपलब्ध नाहीत

(४) हळू हळू मन्वतराचाही काळ मागे सरला कृतयुगाची पहाट होऊ लागली सधिकालाचा शेवट समीप आला असताना नाभिराज सामाजिक जीवनामध्ये अति थोर पदाला चढले मनूच्या मालिकेतील तो अतिम मणी. तत्कालीन सामाजिक जीवनामध्ये त्याचे कार्य युगप्रवर्तक ठरले व्यक्तित्वाचा एक उच्चतम बिंदू त्याने मानवी जीवनात प्रथमच गाठला म्हणून या वर्पाला **व्यक्ति-वाचक** असे पहिलेच नाव मिळाले ते याच थोर विभूतीवरून. त्याच्यावरून या वर्पाची ख्याती **नाभिवर्ष** म्हणून पसरली

त्या नाभिराजाला मात्र जन्मत. नाळ नव्हती. अर्भकाना जन्मत नाळ दिसू लागली ती नाभिराजाच्या प्रजेपासून पुढच्या काळातच. त्याचे हे त्या काळातील वैशिष्टच लक्षात घेऊन नाभिराजाची प्रजा त्याना **अजनाभ** ( जन्मवेळी नाळ नसलेला ) म्हणून ओळखू लागली. तेच नाव अधिक प्रसिद्ध झाल्यावर त्याच्या वर्पाला ( या क्षेत्राला ) **अजनाभवर्ष** अशी सज्ञा प्राप्त झाली आणि ती दीर्घकाळ प्रचलित राहिली. **हेच व्यक्तिवाचक असे पहिले नामकरण.**

(५) **ऋषभ** हे **अजनाभप्रसिद्ध नाभिराजाचे** पुत्र मन्वन्तराचा अत व कृतयुगाचा आरभ. या सविकालातील समाजधुरिणत्वाचा एक महत्वाचा दुवा. राज्यसस्थेच्या अगोपगाची प्रथम रचना यानीच केली. **युगादिराज** ही याची प्रथम प्रसिद्धी. पण याच्या राज्यकालामध्ये नाभिराज विद्यमान होते त्यामुळे ऋषभांच्या उत्कर्पकाळी देखील पूर्वीचे **नाभिवर्ष** किंवा **अजनाभवर्ष** हेच नाव प्रचलित राहिले. तरी पण **ऋषभाचा वर्ष** किंवा **भगवान्वर्ष** अशी आदरवाचक नावे साहित्यात आढळतातही परतु या भूमीला **ऋषभवर्ष** अशी फार मोठी प्रसिद्धी मिळण्यास वावच मिळाला नाही हे खरे पुढे धर्मचक्र परिवर्तन करून तीर्थाची स्थापना करण्यासाठी राज्यत्याग करून, ज्येष्ठपुत्र भरताला राज्याभिपेक करून, भगवान ऋपभनाथ तपश्चर्येसाठी निघून गेले. **तेच जैनांचे पहिले तिर्यंकर** होत. त्याचे नाव लौकिक बाबीसाठी वापरणे कदाचित् लोकानाही गैर वाटले असावे किंवा तसे करणे भगवताना आवडणार नाही असे वाटले असेल, म्हणून ऋपभवर्ष हे नाव मोठ्या प्रमाणात प्रचलित झाले नाही.

(६) जेव्हा भगवान ऋषभदेव तीर्थंकराना केवलज्ञानाची प्राप्ती झाली त्याचवेळी भरतराजालाही चक्ररत्नाची प्राप्ती झाली पुढे त्यानी पट्खण्ड भूमी पादाक्रात केली तो वर्पाविपती झाला तो या भूमीवरचा **प्रथम चक्रवर्ती.** त्याच्या कारकीर्दीत राज्यसस्थेत व कारभारात मोठी स्थित्यतरे घडून आली. दण्डशासनाला नवे वळण मिळाले. त्याच्या कर्तबगारीला स्मरून लोकानी नाभिवर्पाला नव्याने भरतवर्ष असे गौरविले त्याच **घटनेची स्मृती** आजही अक्षुण्ण असून **भरताच्या नावाची कीर्ती भरतवर्ष अशा अक्षरामध्ये अक्षरत्व पावली आहे.**

(७) हिमवर्ष (हैमवत)-> मनूचा वर्ष-> नाभिवर्ष (अजनाभवर्ष)-> भगवानाचा वर्ष ( ऋषभवर्ष )-> भरतवर्ष ही नामकरणाची परपरा सर्वांना सम्मत आहे मनू नाभिराज हे तीर्थंकरजनक, नाभेय ऋषभनाथ हे जैनांचे आद्य तीर्थंकर आणि ऋषभेय भरत हे ऋषभाचे प्रथम पुत्र, प्रथम चक्रवर्ती, ऋषभनाथ तीर्थंकराचे प्रमुख अनुयायी आणि जिनदीक्षा घेऊन ऋषभाच्या पाठोपाठ मोक्षाला जाणारेही पहिलेच चक्रधर राजे आणि या वर्षाचे नामस्मृति-लक्षणात्मक नित्य नवे असे शाश्वत नामकरण घडविणारे पहिले वर्षाधिपती. अशा रीतीने या नामकरण परंपरेतील सर्व तीनच्या तीन विभूती जैन सस्कृतीशी सबधित असल्याने आणि तो सबंध अकाट्य व अतूट असल्याने या वर्षाचे सध्य कालीन भरतवर्ष किंवा भारत हे नामकरण जैन परपरेतूनच निष्पन्न झाले आहे ही बाब सदेहातीत सिद्ध होते सर्वभाषेतील सर्व प्रमुख ग्रथामध्ये या इतिवृत्ताला पूर्ण मान्यता लाभलेली आहे तर्कशुद्ध पुराव्यानी परिपुष्ट असल्याने हा नामकरणाच्या परपरेचा प्रश्न वादातीत आहे!

(८) हेच ऋषभपुत्र भरतचक्री आद्य भारत होत दुष्यन्तपुत्र भरत हा कालक्रमाने फारच नतरचा ऋषभेय भरत हा मनू नतरच्या केवळ दुसऱ्याच पीढीत जन्मला आणि ज्ञात विश्वातील पहिला चक्रवर्ती झाला तर दुष्यतादिक कित्येक सम्राट व कित्येक वश शकुतलापुत्र भरतापूर्वी या क्षेत्राचे प्रशासन करीत होते भरत-वश तर उघडपणे दुष्यन्तपुत्र भरतानतरचाच तो वश प्रसिद्ध असला तरी वर्षव्यापी कधीच नव्हता त्याहीपेक्षा मोठे वश पूर्वकाळी व त्याकाळीही या वर्षात नादत होते.

(९) परतु नतरच्या काळी, एका जैन राजाला व जिनपरपरेला एवढी मोठी प्रतिष्ठा प्राप्त झालेली पाहून मत्सर वाटल्याने कोणी तरी एका व्यक्तीने दुसऱ्या एका 'भरत' राजाची कल्पना उचलून धरली असावी. जो चक्रवर्ती (सम्राट) पदाला चढला होता, ज्याने अनेक अश्वमेध निर्विघ्नपणे पार पाडले होते असा एक अन्य भरत राजा शोधला व त्याचे नाव प्रस्तुत प्रकरणी घुसडविण्याचा अपुरा प्रयत्न केला असावा आणखी दुसऱ्यानी 'भरत' शब्दाचा अर्थ बदलून आद्य मनूविषयी सभ्रम निर्माण केलेला दिसतो त्यामुळे काही वेदनिष्ठ जैनद्वेष्टयाना तेवढेच फावले पण असा एखादा अर्वा-मुर्वा उल्लेख सोडला तर बहुमत्स्यच नव्हे तर बहुतेक सर्व हिंदू पुराणातील इतरही साहित्यातील सर्व विधाने निरपवादपणे एकस्वरूपीच आढळतात त्यात थोडीही विसगती नाही अशा सर्वव्यापी साहित्य-परंपरेमध्ये या वर्षाच्या नामकरणाच्या सदर्भात ऋषभपुत्र भरतचक्रीचाच पुरस्कार सर्वत्र केलेला आहे. दुष्यन्तपुत्र भरताचे या वर्षाच्या नावावरील

स्वामित्व कोणत्याही ग्रथाला मान्य नाही त्यामागे कोणतीही सुसगत परपरा नाही ते सर्व पूर्वकालीन भारतातच राहात होते

(१०) या सदर्भात चिकित्सापद्धतीने उपलब्ध असलेल्या सर्व साहित्याचे आलोचन करून ज्यानी ज्यानी आपापली निर्णायक मते सादर केली अशा डॉ. जयस्वाल, आचार्य बलदेव उपाध्याय, डॉ. अवधविहारीलाल अवस्थी, डॉ पी सी रायचौधरी, डॉ. मगलदेव शास्त्री, डॉ. वासुदेवशरण अग्रवाल, डॉ. प्रेमसागर जैन, प्रि. आर् डी. करमरकर इत्यादी सर्व जैन व अजैन मान्यवर पडितानी आपल्या देशाच्या नावावरील स्वामित्व ऋषभपुत्र भरतचक्रीचेच आहे हे नि सदिग्धपणे मान्य केले आहे यासबधी योग्य असे सदर्भ त्या त्या मुद्याच्या विवेचन प्रसगी याच पुस्तकात दिलेले आहेत

(११) याच विषयावर सशोधनप्रसिद्ध प्रि. आर. डी. करमरकर यानी The Original name of India या विषयावर अेक शोधनिबध लिहून तो लखनौ येथील प्राच्यविद्या परिषदेच्या अधिवेशनामध्ये इ स. १९५१ साली वाचला होता तोच इग्रजी लेख नतर इ सन १९५५ साली भाण्डारकर प्राच्यविद्या सशोधन मंदिरातर्फे प्रकाशित होणाऱ्या वार्षिक वृत्तांताच्या ३६ व्या खण्डातील पहिल्या–दुसऱ्या भागामध्ये पन ११४ ते ११८ वर छापून प्रसिद्ध झाला आहे. त्यामधील आपले निर्णायक मत प्रस्तुत करताना आपल्या निर्णयातील ५ व्या व ६ व्या मुद्यामध्ये ते म्हणतात–

## प्रि. करमरकरांचे मत

(5) ..... (After Ṛṣabha) ... Bharata ruled for a very long time in an exemplary manner This memorable event was immortalised by the country being called after Bharata One would have expected the country to be called Ṛṣabhavarṣa, but presumably Rishabha would not consent to that Rishabha is a great Tirthankara of the Jains and it seems beyond question **that it is after a Jain prophet that India got her original name.**

(6) Later on, some one, not liking the idea of a jain ruler being so exalted, **hit upon another Bharata** who was also a chakravartin, who had performed a number of Asvamedhahs **But the majority of the puranas have not accepted this claim of Bharata — the son of Duṣyanta.**

– B. O R Institute Annals, volume 36 (1955) page 118 etc.

## सार्वत्रिक सुसंगती

या ग्रथातील मागील प्रकरणात या वर्षाच्या नावाचा उपोद्घात करणारे व परपरेतील सुसगती सिद्ध करणारे जैन साहित्यातील काही उतारे देऊन येथे त्याला पुष्टी देण्यासाठी जैनेतर ग्रथातील काही अवतरणे वाचकासमोर सादर केली आहेत. याशिवायही सर्वच जैन परपरेत व इतरत्रही आपल्या देशाच्या नामकरणाचा इतिहास एकमुखीच आहे त्याचप्रमाणे काही आरण्यक ग्रथ शिवपुराणातील आणखी काही विधाने, अग्निपुराण १०८/११–१२, नागपुराण, श्रीमालपुराण, मनुस्मृति अशा इतर ग्रथातही भरत वर्षाच्या नामकरणासबधी आणि त्याच्या जैन परपरेसबधी एकवाक्यता आढळते ही सार्वत्रिक सुसगती विस्मयजनक आहे ज्या भरत राजाच्या नावावरून या देशाला भरतवर्ष किंवा भारत म्हणतात तो भरतचक्री जैन तीर्थंकर ऋषभनाथांचाच ज्येष्ठ पुत्र होय या इतिवृत्तामध्ये तिळमात्र शका उरण्याचे कारण नाही त्याची वाशिक परपरा मनू नाभिराज – तीर्थंकर ऋषभराज – चक्रवर्ती भरतराज अशीच आहे प्राचीन भारतीय साहित्यातील सर्व प्रवाह या विधानाशी सहमत आहेत हे वरील विवेचनावरून सर्वांच्या लक्षात येईलच



: ७ :

# नाभिवर्ष

प्रजानां हितकृद्भूत्वा भोगभूमिस्थितिच्युतौ ।
नाभिराजस्तदोद्भूतो भेजे कल्पतरुस्थितम् ॥

— महापुराण, ३/२०६.

# ७ : नाभि-वर्ष

## युगारंभाचा इतिहास

ह्या आपल्या भरतवर्षाचे नाव जर ऋषभपुत्र भरत चक्रवर्तीच्या नावावरून प्रचलित झाले आहे तर भरतचक्रीचा उदय होण्यापूर्वी या वर्षाचे नाव काय होते असा प्रश्न सहजच निर्माण होतो हा प्रश्न तर्कसंगत असल्याने त्याचाही विचार करणे क्रमप्राप्त आहे महापुराणासारख्या प्रख्यात जैन इतिहास ग्रथात आणि ऋग्वेदापासून पुराणापर्यंतच्या हिंदू इतिवृत्त ग्रथात या सदर्भात काही प्रमाणभूत उल्लेख मिळतात जिनसेनकृत महापुराण तर जैनाचा ज्ञानकोष आहे त्यात युगारभकालीन इतिहास जपून ठेवलेला आहे

भगवन् भारते वर्षे भोगभूमिस्थितिच्युतौ ॥<br>
कर्मभूमिव्यवस्थायां प्रसृतायां यथायथम् ॥ ३ ॥

तथा कुलधरोत्पत्तिः त्वया प्रागेव वर्णिता ॥<br>
नाभिराजश्च तत्रान्त्यो विश्वक्षत्रगणाग्रणीः ॥ ४ ॥

स एष धर्मसर्गस्य सूत्रधारं महाधियम् ॥<br>
इक्ष्वाकुज्येष्ठमृषभं क्वाश्रमे समजीजनत् ॥ ५ ॥

इह जम्बूमतिद्वीपे भारते खचराचलात् ॥<br>
दक्षिणे मध्यमे खण्डे कालसंधौ पुरोहिते ॥ ८ ॥

पूर्वोक्तकुलकृत्स्वन्त्यो नाभिराजोऽग्रिमोऽप्यभूत् ॥ ९ ॥

अर्थाने त्याचा राज्याभिषेक झाला नव्हता व त्यानी स्वत चे सैन्यही निर्माण केले नव्हते दण्डपरिवर्तनासाठी त्याना तशी आवश्यकताही भासली नव्हती पण शेवटी शेवटी प्रजेच्या परस्पर विरोधी वर्तनामुळे जेव्हा तशी गरज निर्माण झाली तेव्हा काळाला अनुसरून अतीव योग्य अशा आपल्या ज्येष्ठ मुलाला त्यानी लोकाकडून राज्याभिषेक करविला. आणि आतापर्यंत व्यक्तिमूलकच असलेल्या शासनाला प्रथमच सस्थास्वरूप बनविले 'दुर्बलानां बलं राजा' या मन्त्राने त्या सस्थेत पचप्राणाची प्रतिष्ठा केली या सास्कृतिक स्थित्यतराला ऐतिहासिक महत्त्व प्राप्त करून देणारे ऋषभनाथ पहिले अभिषिक्त व प्रशासक बनले नाभिराज स्वत राज्यप्रमुख नसले तरी ते राज्यसस्थेचे जनक मात्र खासच आहेत त्यांच्या जीवन कालातच हा मोठा नवीन बदल घडून आला ते स्वत अतिम कुलकर असूनही आदिराज ऋषभाचेच नव्हे तर या कृतयुगातील आदिम राज्यसंस्थेचेही आदिजनक तेच आहेत ते जरी नव्या दण्डनीतीचे व नव्या राज्यव्यवस्थेचे प्रत्यक्ष शिल्पकार नसले तरी त्या शासन सस्थेचा पाया त्यानीच रचला आहे अशा महान कर्तबगारीमुळे आदिराज ऋषभाच्या कारकीर्दीतसुद्धा या भूमीला नाभिवर्ष हेच नाव प्रवर्तमान राहिले

ऋषभांनी दण्डनीती बदलली त्यात नवी भर घातली दण्डनीती नाभिकाली तीन प्रकारचीच होती ती त्यानी पाच प्रकारची केली आपल्या क्षत्रिय प्रजेचे भोग, उग्र, राजन्य व नाग असे चार वर्ग पाडून त्याच्याकडून राज्यव्यवस्था व समाजव्यवस्था सुरळीत पाळून घेतली पण या कालखडामध्ये नाभिराजही विद्यमान होते पूर्वी ते सर्वप्रमुख कुलपुरुष होते. आता ते भोग या उच्च व ज्येष्ठ वर्गियाचे अध्वर्यू झाले त्यामुळे या वर्षाचे नाव नाभिवर्ष हेच नाव प्रचारात रूढ राहिले. पुढे नवा बदल भरताच्या राज्यकाळीच घडून आला त्याने ऋषभप्रणीत पाच प्रकारची दण्डनीती परिपुष्ट करून ती सात प्रकारची केली आणि चक्ररत्नाची प्राप्ती झाल्यावर दिग्विजयपूर्वक सर्व वर्षान्त भूमी पादाक्रात केली. अशा कित्येक नव्या घटना भरतयुगातच घडल्या म्हणून त्याच्याच काळी या भूमीचे पुन भारत-वर्ष असे नवे नामकरण झाले केवलज्ञान प्राप्त झाल्याने त्यावेळी ऋषभनाथ धर्मतीर्थाचे प्रवर्तन करीत होते. त्या क्षेत्रातही त्याचे स्थान सर्वश्रेष्ठ व सर्वप्रथम असेच राहिले आदिनाथ आणि आदिमत्व एकरूपच होत राहतात ! !

## अभीष्टफलदायी क्षत्रियता

नाभीचा काल दोन युगातील सक्रान्तिकाल होता त्याच्या कुलकर कार्याला आरभ झाला तेव्हा या क्षेत्रातील व्यवस्था भोगभूमीच्या अतिम अवस्थेसारखी होती मानवामध्ये जीवनाचा झगडा निर्माण होत होता परतु अपराधी मनोवृत्ती

अजून पोसवली नव्हती उपजीविका कष्टप्रधान होत होती पण परस्पर सद्भाव नष्ट झाला नव्हता. परंतु त्याच्या जीवनकालामध्ये **भोगभूमी** निष्प्रभ झाली उपजीविकेचा प्रश्न निर्माण झाला विकारी मनोवृत्ती लोकाच्या अंगी वाढू पहात होती **कर्मभूमीची** व्यवस्था सुरू होण्यास काल अनुकूल होत होता नवे प्रश्न निर्माण झाले ते सोडविण्याचा मार्ग शोधावा लागला **दुर्बलाना सरक्षण देण्याची गरज भासली. ते स्वतः लोकत्राता बनले** त्राणक्षम **लोकाना क्षत्रिय म्हणण्यात येऊ लागले.** दु खिताना त्राता मिळाला त्याचाही निर्वाह होऊ लागला नाभी हा ज्येष्ठ त्राता असल्याने ते क्षत्रियप्रमुख बनले नाभी आणि क्षत्रिय हे दोन शब्द एकार्थवाची बनले तोच अर्थ प्रचलित झाला **अमरकोषात ' क्षत्रिये नाभि· '** असे विधान आहे **अभिधान–चिंतामणीतही ' नाभिश्च क्षत्रिये '** असे म्हटले आहे त्याने आपल्या पुरुषार्थाच्या जोरावर न्याय स्थापण्याचा प्रयोग केला महापुराणात उल्लेख आहे की–

**शशीव स कलाधारः तेजस्वी भानुमानिव ॥**
**प्रभुः शक्र इवाभीष्टफलदः कल्पशाखिवत् ॥ ११ ॥**

– महापुराण, १२/११.

पूर्ण चन्द्राप्रमाणे ते सर्व कलाचे धारक होते त्याचा पराक्रम सूर्याप्रमाणे सर्वगामी होता ते इन्द्राप्रमाणे वैभवसपन्न होते आणि कल्पवृक्षाप्रमाणे सर्वांच्या मनोरथाची पूर्ती करीत होते त्यामुळे त्याना युगप्रवर्तन पूर्णपणे साधले आजकालच्या विध्वसक घडामोडीही त्याची कीर्ती नष्ट करू शकत नाहीत कालचक्राच्या नाभीवरील त्याचे सुस्थिर नाव अविनाशी आहे त्या युगाच्या सर्व घटनाचक्रामध्ये ते केन्द्रस्थानी अविचल राहिले त्याचे नाव अक्षर झाले आहे त्याला क्षती नाही भारतीय परपरेतच नव्हे तर बाहेरही ते चिरजीवी झाले आहेत सस्कृतमध्ये **नाभि,** प्राकृतमध्ये **णाभि** तर अरबीमध्ये **नबी** या स्वरूपात त्याचे नाव प्रचलित आहे नबीचा अर्थ आहे–देवदूत, पैगबर, रसूल ! त्या शब्दाचे उदात्तीकरणच झाले आहे

## पहिले व्यक्तित्ववाचक नामकरण

सक्रमण युगातील त्याचे कार्य क्षेत्रव्यापी झाल्याने या क्षेत्राला व्यक्तिमत्व लाभले. म्हणून पूर्वीचे विभागदर्शक **हिमवर्ष** हे भौतिक नाव बदलून या खण्डाचे नवे व्यक्तिनिष्ठ नाव **नाभिखण्ड** असे प्रवर्तित झाले हा वर्ष नव्याने **नाभिवर्ष** बनला नाभिराजाचे दुसरे गुणविशेषात्मक नाव **अजनाभ** असे असल्याने या वर्षाला **अजनाभवर्ष** असेही म्हणू लागले त्यानी प्रसूतिक्रियेतील नाळ कापण्याची विद्या

स नाभिर्भाविनां राज्ञां सनाभिः स्वगुणांशुभिः ।
भास्वानिव बभौ लोके भास्वन्मौलिर्महाद्युतिः ॥ १० ॥

— महापुराण, १२/३ ते १०.

पूर्वकाली कृतयुगाला प्रारभ होण्याच्या अगोदर या भूमीवर धर्म—अधर्म—व्यवस्था—रहित अशी भोगभूमी होती ती अवस्था कालप्रभावाने सपत आली असताना आणि कर्मभूमीची व्यवस्था प्रस्तुत होण्याचा योग आला असताना त्या मध्यतरीच्या सधिकालामध्ये कुलधराची उत्पत्ती झाली त्या कुलधरापैकी नाभिराज हा अतिम कुलकर होय तोच क्षेत्रातील प्रशासन व्यवस्था पाहणाऱ्या सर्व क्षत्रियाचा प्रणेता होय कृतयुगातील धर्मव्यवस्थेचा सूत्रधार, महाबुद्धिमान, इक्ष्वाकू वशाचा कारक अशा ऋषभनाथाना त्यानेच जन्म दिला युगपरिवर्तनाच्या सधिकालामध्ये तोच नाभिराज या जंबू द्वीपातील आपल्या भरत क्षेत्राच्या मध्यभागी वसलेल्या अयोध्येत प्रजापालन करीत होता तो या क्षेत्रात पुढे होणाऱ्या सर्व राजमडलाच्या केन्द्रस्थानी आत्मप्रभेने प्रकाशत होता सर्व विश्वावर प्रकाश पाडणाऱ्या किरणाच्या केन्द्रस्थानी जसा महातेजस्वी सूर्य हा अधिष्ठाता असतो तसे या क्षेत्राला नाभिराजाचे अधिष्ठान प्राप्त झाले होते.

### नाभिकालीन लोकस्थिती

त्या नाभियुगाच्या शेवटच्या चरणामध्ये आणि सपूर्ण कृतयुगाच्या सृष्टीमध्य ऋषभदेवाचे कर्तृत्व महान असले तरी नाभिराजालाही त्या प्रक्रियेमध्ये ज्येष्ठत्वाची जबाबदारी अगीकारावी लागली. मात्रजेव्हा नाभिराजाचा उदय झाला होता तो काल तर कर्मभूमीपेक्षा भोगभूमीच्या प्रभावाने प्रेरित होता कृतयुगातील हीयमानता त्यावेळी प्रादुर्भूत नव्हती त्यावर भोगभूमीची छायाच अधिक असल्याने लोकस्थिती वेगळी होती त्या अवस्थेचे वर्णन महापुराणात पुढीलप्रमाणे केले आहे—

यद्भुवां न जरातङ्का न वियोगो न शोचनम् ॥
नानिष्टसम्प्रयोगश्च न चिन्ता दैन्यमेव च ॥ ७३ ॥
न यत्र विरहोन्मादो न यत्र मदनज्वरः ॥
न यत्र खण्डना भोगे सुखं यत्र निरंतरम् ॥ ७५ ॥
न विषादो भयं ग्लानिः नारुचिः कुपितञ्च न ॥
न कार्पण्यमनाचारो न बली यत्र नाबलः ॥ ७६ ॥
यत्र पुण्योदयान्नित्यं रम्यन्ते नराः सुखम् ॥ ७७ ॥
सुखं यत्रातिशेते तां चक्रिणो भोगसम्पदम् ॥ ७८ ॥

**यत्र दीर्घायुषां नृणां नाकाण्डे मृत्युसंभवः ।।**
**निरुपद्रवमायुः स्वं जीवन्त्युक्तप्रमाणकम् ।। ७९ ।।**
**सर्वेऽपि समसंभोगाः सर्वे समसुखोदयाः ।।**
**सर्वे सर्वर्तुजान् भोगान् यत्र विन्दन्त्यनामयाः ।। ८० ।।**

– महापुराण, पर्व ९/७३ ते ८०

या काळात जन्मलेल्या जीवाना म्हातारपणाची व रोगाची पीडा नसते आणि वियोग,शोक, अनिष्ट–सयोग, चिता, दैन्य याचाही त्रास होत नाही (७३) तसेच वियोगोन्माद, मदनवाधा, भोगोपभोगामधील व्यत्यय या आपत्तीही नसल्याने येथील सुखी आयुष्यात खण्ड पडत नाही (७५) येथे विषाद नाही, भीती नाही, थकवा नाही, अस्वास्थ्य नाही, कलह नाही, दैन्य नाही, अनाचारही नाही आणि येथे कोणी बलात्कारी नाही किंवा कोणी दुबळाही नाही (७६). येथील लोक पुण्ययोगामुळे सदैव सुखक्रीडा करीत राहतात (७७) त्यामुळे येथील लोक चक्रवर्तीच्या भोगसपदेला ही मागे टाकतात (७८) ते सर्व दीर्घायुषी असून त्याना अकालमृत्यू शिवत नाही त्याचा जीवनक्रम निरुपद्रवी असून ते सर्वजण आयुष्यभर सुखाने जगतात (७९). सर्वजण मिळून समभावाने भोग घेतात सुखाची प्राप्ती सर्वांना समानच असते आणि सर्वजण सदैव निरामय राहून सर्व ऋतुमानातील भोग सुखाने भोगतात (८०)

## प्रजापालनाचा आरंभ

मात्र कालदशेच्या हीयमानतेमुळे ही अवस्था नाभिराजाच्या हयातीतच सपुष्टात आली प्रजेची व्याकुलता वाढतच राहिली त्यामुळे नाभिराजाचा प्रजापालनात्मक भार वाढतच गेला ते अनभिषिक्त असले तरी क्षत्रियाग्रणी असल्याने त्यानीच प्रजापालनाची जबाबदारी अगीकारली भोगभूमीच्या हीयमान अवस्थेत प्रजापालनाचा आरभ प्रजेच्या जन्मापासूनच होत असतो कालपरिवर्तनामुळे जन्मापासूनच काही अडचणी निर्माण होत होत्या त्यामध्ये पहिली अडचण अर्भकाची नाळ कापण्यासबधीची ती नभीनी दूर केली (**तिलोयपण्णत्ति, ४/४९/६**). म्हणून ते आयुरारोग्य प्रदान करणारे प्रथम वैद्य होत प्रजापालन करणाऱ्याला आवश्यक अशा सर्व गुणानी ते मडित होते दीर्घायुष्य, समुन्नत शरीर, अप्रतिम रूप–सौंदर्य, अप्रतिहत बल–विक्रम आणि पूर्ण विकसित कला–विज्ञान–चातुर्य, यामुळे ते त्या काळी सर्वश्रेष्ठ मानव ठरले ( **महापुराण, १२/९** ) भागवतकारानीही त्याना असेच श्रेष्ठतम मानले आहे ( **भागवत, ११/२/१५** ) नाभिराजे मनाने उदात्त आणि ऐश्वर्याने उदार असल्याने ते श्रेष्ठ कुलकर बनले. लौकिक

प्रकट केली. पण ते स्वत. ज्या भोगभूमीच्या अवस्थेत जन्मले त्याच्या प्रभावाने जन्मत त्याना नाळ नव्हतीच ते निसर्गत च अजनाभ ( नाळ रहित ) होते

स्कंदपुराणामधील–

हिमाद्रिजलधेरन्तर्नाभिखण्डमितिस्मृतम् । (१/२/३७/५५).

या चरणामध्ये नाभिखण्ड या नावाचा स्पष्ट उल्लेख आहे या पदाचे विश्लेषण करीत असताना 'प्राचीन भारतका भौगोलिक स्वरूप' या आपल्या ग्रथात डॉ अवधविहारीलाल अवस्थी म्हणतात–

> " सप्त द्वीपो वाली पृथिवी मे **जम्बूद्वीप** अत्यत प्रसिद्ध भूखण्ड था। आद्य प्रजापति मनु **स्वायम्भुव** के पुत्र **प्रियव्रत** दस राजकुमारो के पिता थे। उनमे तीन तो सन्यासी हो गये थे और सात पुत्रोने सात महाद्वीपो मे आधिपत्य प्राप्त किया। ज्येष्ठ **आग्नीध्र जम्बूद्वीप** के राजा हुए। उनके नौ लडके जम्बूद्वीप के स्वामी वने। जम्बूद्वीप के नौ वर्षों में से हिमालय और समुद्र के वीच मे स्थित भूखण्ड को, **आग्नीध्र** के पुत्र **नाभि के नाम** पर ही **नाभिखण्ड कहा गया** "।

'मार्कण्डेयपुराण : सांस्कृतिक अध्ययन' या आपल्या पुस्तकातील पान १३८ वर पदटिप्पण १ मध्ये डॉ वासुदेवशरण अग्रवाल म्हणतात–

> " **स्वायम्भुव** मनु के **प्रियव्रत**, प्रियव्रत के पुत्र **नाभि**, नाभि के **ऋषभ** और ऋषभदेव के सौ पुत्र हुए, जिनमे **भरत** ज्येष्ठ थे। **यही नाभि 'अजनाभ भी' कहलाते थे**, जो अत्यंत प्रतापी थे और **जिनके नाम पर यह देश 'अजनाभवर्ष'** कहलाता था।"

श्रीमद् भागवत पुराणामध्ये (५/७/३) हीच विधाने परिपुष्ट केली आहेत

**अजनाभं नामैतद्वर्षं भारतमिति यतः आरभ्य व्यपदिशन्ति ॥**

पूर्वीच्या अजनाभ–वर्षालाच येथून पुढे 'भारत' असे म्हणू लागले या वालबोध विधानात केवळ पूर्व विधानाला फक्त साक्षच नसून ती सपूर्ण वर्षनामकरण परपराच मान्य केली आहे त्यामुळे त्या परंपरेचे सातत्य अधिक परिपुष्ट व समर्थनीय ठरते आणि याच पुराणातील दुसऱ्या अनेक विधानामुळे याला चागलीच पुष्टी मिळते भागवतातील ५/४/२ विधानामध्ये तर ऋषभाला ज्या वर्षाचे राज्य मिळाले त्याचे नाव अजनाभवर्ष होते असा स्पष्ट उल्लेख आहे. शिवाय–

'अजभ्य नाभौ' या ऋग्वेदातील (१०/८२/६) पदामध्ये देखील निश्चितपणे अजनाभ–वर्षाच्या नावाचा संकेत आहे

नाभिवर्ष या नावाच्या अगोदर या भूमीचे नाव हिमवर्ष होते व नतर ते नाभिवर्ष झाले याचे ज्ञान विष्णुपुराणातील खालील ओळीवरून तर अधिकच स्पष्ट होते याला पुन मार्कण्डेय पुराण, अग्निपुराण इ ग्रथाचीही साक्ष असल्याचे स्पष्टपणे आढळते या सर्व विवरणामध्ये हिमवर्षापासून भरतवर्षा–पर्यंत या क्षेत्राची नामप्रणाली आणि नाभिराजापासून भरतचक्रीपर्यंत पृथ्वीपतींची शासनप्रणाली अगदी अक्षुण्ण असल्याचे स्पष्टपणे दृगोचर होते. या इतिहासाला प्राचीन साहित्यात सर्वत्र पुष्टी मिळते या सदर्भातील सर्वच पूर्वसूरीची साक्ष सुसगत व अनुकूल आहे–

> हिमाह्वं यस्य वै वर्षं नाभेरासीन्महात्मनः ।। २७ ।।
> तस्यर्षभोऽभवत् पुत्रो मरुदेव्यां महाद्युतिः ।।
> ऋषभाद्भरतो जज्ञे ज्येष्ठः पुत्रशतस्य सः ।। २८ ।।
> कृत्वा राज्यं स धर्मेण तथेष्ट्वा विविधान्मखान् ।।
> अभिषिच्य सुतं ज्येष्ठ भरतं पृथिवीपतिः ।। २९ ।।
>
> – विष्णुपुराण, भाग २, अध्याय १/२७-२९

महात्मा नाभीच्या वर्षाचे पूर्ववर्ती नाव हिमाह्व (हिमवर्ष) होते. नाभीला मरुदेवीपासून महातेजस्वी पुत्र झाला त्याचे नाव ऋषभ ऋषभाला शभर पुत्र झाले त्यात भरत हा ज्येष्ठ होता ऋषभाने राज्यकारभार धर्माने केला विविध प्रकारचे पूजामहोत्सव केले आणि शेवटी ज्येष्ठ पुत्र भरताला त्याने राज्याभिषेक केला

मार्कण्डेयपुराणामधील अध्याय ५० श्लोक ३४ ते ४२ पर्यंत हाच इतिहास सविस्तर दिला आहे नाभिपिता आग्नीध्रापर्यंत पूर्वकालीन मनूचे राज्य सपूर्ण जबूद्वीपावर असे पैकी नाभीला फक्त हिमवर्षाचे राज्य मिळाले आणि नाभीपासून भरतापर्यंतच्या परपरेत शासकाच्या कीर्तीला अनुसरून अखेर भरतवर्षापर्यंतचे नामातर कसे घडून आले हे एका परिच्छेदात सागून टाकले आहे हाच वृत्तात अग्निपुराणातील, अध्याय १०८, श्लोक ५ ते १२ मध्येही अगदी जशाचा तसा आढळतो

## नाभिराजाचे व्यक्तिमत्व

नाभिराज एक श्रेष्ठ कुलकर होते पण त्याचा काल होता वेगवान परिवर्तनाचा मनुयुगाचा अत व कृतयुगाचा आरभ असा तो एक महान् सधिकाल

होता पूर्वस्थिती च्युत होत होती व नवी अवस्था अद्याप प्राप्त झाली नव्हती त्यामुळे सामान्य लोक हवालदिल झाले होते त्याना स्थैर्य प्रप्त करून देणे ही गोष्ट काही साधी नव्हती. अशावेळी त्यानी योग्य ती कामगिरी बजावली म्हणून त्याच्या नावाची कीर्ती या भूमीशी एकरूप झाली आहे पहिल्या प्रथमच या भूमीला व्यक्तित्ववाचक नाव प्राप्त झाले. ही एक अभिनव घटना नाभीच्या व्यक्तित्वाच्या जोरावरच घडून आली याचा परिचय करून देताना महापुराणकार म्हणतात—

तदनंतरमेवाभून्नाभिः कुलधरः सुधीः ॥
युगादिपुरुषैः पुर्वैरुद्गूढां धुरमुद्वहन् ॥ १५२ ॥
युगमुख्यमुपासीना नाभिं मनुमपश्चिमम् ॥ १९२ ॥
इत्याद्युपायकथनैः प्रीताः सत्कृत्य तं मनुम् ॥
भेजुस्तद्दर्शितां वृत्तिं प्रजाः कालोचितां तदा ॥ २०५ ॥
प्रजानां हितकृद्भूत्वा भोगभूमिस्थितिच्युतौ ॥
नाभिराजस्तदोद्भूतो भेजे कल्पतरुस्थितम् ॥ २०६ ॥
प्रजानां जीवनोपायमननान्मनवो मताः ॥
आर्याणां कुलसंस्त्यायकृतेः कुलकरा इमे ॥ २११ ॥
कुलानां धारणादेते मताः कुलधरा इति ॥
युगादिपुरुषाः प्रोक्ता युगादौ प्रभविष्णवः ॥ २१२ ॥

— महापुराण, पर्व ३.

तेरा कुलकरानतर क्रमाने नाभिराज या कुलकराचा अवतार झाला ते फार बुद्धिमान होते त्याच्या पूर्ववर्ती श्रेष्ठ कुलकरानी लोकव्यवस्थेची जी धुरा आजपर्यंत वाहिली होती ती त्याने स्वत अगीकारली ‥ ‥ त्यावेळी लोकाची आहार सज्ञा अत्यंत तीव्र झाल्याने ते भुकेने व्याकूळ झाले जीवनोपाया-मवधी सशय निर्माण झाल्याने त्याची मने व्याकूळ झाली त्यामुळे ते सर्व युगपुरुष नाभीकडे आले नाभी अपश्चिम मनू होते ‥‥‥ त्या सर्व लोकानी युगप्रमुखा-जवळ आपली अडचण सागितली. ‥ ‧ नाभीने उपाय सागितल्यावर ते खूष झाले त्यानी मनूचा सत्कार केला. नाभीने सागितलेली कालोचित अशी जीवनवृत्ती त्यानी स्वीकारली ज्या विशिष्ट प्रमगी नैसर्गिक कल्पवृक्ष स्वतः निरुपयोगी ठरले तेव्हा नाभीने मात्र स्वत च एका अद्भुत कल्पवृक्षाचे स्वरूप धारण केले. हे युगप्रधान पुरुष प्रजेच्या जीवनोपायाचा विचार करतात म्हणूनच त्याना मनू म्हणतात सर्व सद्वर्तनी लोकाना एक कुटुब बनवून एकत्र राहण्याचा उपदेश देतात म्हणून त्याना कुलकर म्हणतात. कुटुबाची धारणा करतात म्हणून ते कुलधर असतात हे सर्व मनू युगाच्या आरभकालात सभवतात म्हणून त्याना

युगादिपुरुष म्हणतात अशा सर्व प्रजापालनात्मक गुणांमध्ये नाभिराजाचे स्थान अनुत्तर होते

## नाभिपुत्र ऋषभनाथ

नाभिराजाचे पितृत्व धन्य करणारा पुत्र कोणत्या योग्यतेचा असणार यासंबधीच्या भाग्याचे भाकित करीत असताना महापुराणकारानी माता-पित्याचे कौतुक पुढील शब्दात अंकित केले आहे–

**स एव पुण्यवाँल्लोके सैव पुण्यवती सती ॥**
**ययोरयोनिजन्माऽसौ वृषभो भवितात्मजः ॥ ६७ ॥**

– महापुराण, पर्व १२.

या जगात नाभिराजच खरे पुण्यवान आणि मरुदेवीच खरी पुण्यशील सती होय कारण अपुनर्जन्मा ( मोक्षगामी ) वृषभनाथ याचा जन्म याच दोघापासून होणार आहे

ऋषभाच्या जन्मप्रसगाचे वर्णन करताना नाभिराजाना उदयाचल आणि महाराणी मरुदेवीला पूर्वदिशा अशी उपमा अनेक आचार्यांनी दिली आहे कारण त्या दोघापासून तीर्थंकर ऋषभदेवरूपी सूर्यदेवतेचा उदय झाला जिनसेनाचार्य म्हणतात–

**भो नाभिराज सत्यं त्वम् उदयाद्रिर्महोदयः ॥**
**देवी प्राच्येव यज्ज्योतिः युष्मत्तः परमुद्बभौ ॥ ८१ ॥**

– महापुराण, पर्व १४

हे नाभिराज खरोखरच आपण वैभवशाली उदयाचल आहात आणि महाराणी मरुदेवी प्रकाशमान् पूर्व दिशा आहे कारण तुमच्यापासूनच परंज्योतीचा-ऋषभाचा उदय झाला

आचार्य मानतुग यानीही आपल्या भक्तामर स्तोत्रामधील रसाळ काव्य-रचनेमध्ये याच भावनाचा अविष्कार केला आहे–

**स्त्रीणां शतानि शतशो जनयन्ति पुत्रान्**
**नान्या सुतं त्वदुपमं जननी प्रसूता ॥**
**सर्वा दिशो दधति भानु–सहस्ररश्मि**
**प्राच्यैव दिक् जनयति स्फुरदंशुजालम् ॥ २२ ॥**

या भक्तिश्लोकात कवीने मरुदेवीच्या चरणकमलावर आपली भावपुष्पे अर्पण केली आहेत तीर्थंकराना जन्म देणाऱ्या माता-पित्याचे भाग्य कोणत्याही अर्थाने कमी असत नाही म्हणून नाभि-मरुदेवीच्या चरणी सपूर्ण विश्व आदराने अवनत झाले होते त्याचा पुत्र ऋषभ आपल्या पुरुषार्थाच्या सामर्थ्यावर लौकिक आणि पारलौकिक सुखे मिळविण्याचा योग्य मार्ग सर्वांना दाखविण्यास पूर्ण समर्थ होता दोन युगाच्या सधिकालामध्ये नाभिराजाने पुष्कळ समस्या सोडविल्या परतु कर्मयुगाचा आरभ होताच नव्या स्वरूपाच्या समस्या उभ्या टाकल्या कृतयुगाचे स्वरूप मागच्या युगाच्या मानाने फारच वेगळ्या पद्धतीने पालटत होते ते स्वत तर भोगभूमीत जन्मले होते म्हणून नव्या युगाचा अध्वर्यू जो ऋषभ तोच सर्वसमर्थ असणार हे लक्षात घेऊन नाभीने त्या कृतयुगीन समस्यांची जबाबदारी ऋषभनाथावरच सोपविली–

राया करेइ दण्डं सिट्ठे ते बिंति अम्ह वि स होउ ।
मग्गह य कुलगरं सो बेइ उसभो अ भे राया ॥

— जबूदीवपण्णत्ति, १२७.

पूर्वमनुप्रणीत नीतिनियमाचे अतिक्रमण वारवार घडू लागले समस्या लवकर सुटेनात तेव्हा ज्ञानादिक सर्व आवश्यक गुण ऋषभाजवळ भरपूर आहेत हे पाहून लोक आदिम तीर्थंकर ऋषभनाथाकडे अनुशासनाच्या मदतीसाठी गेले तेव्हा ऋषभदेवाने म्हटले– 'राजा दण्डानुशासन करीत असतो' हे ऐकून ते म्हणाले– 'आम्हालाही तो (राजा) असावा' ऋषभाने सागितले– 'कुलकराच्या ( नाभीकडे ) कडे मागणी करा'. त्यावर नाभिराज म्हणाले– 'ऋषभच तुमचा राजा'

## कृतयुगाचा प्रस्ताव

पुढे कल्पवृक्ष निष्प्रभ व निष्फळच नव्हे तर नष्ट होऊ लागले त्यामुळे अन्नादिक जीवनोपायाची समस्या जास्तच तीव्र झाली कल्पवृक्षाचे युग सपले होते पण कृषियुगाचा प्रारभ अजून आवाक्यात आलेला नव्हता त्यामुळे प्रजा अत्यत व्याकूळ झाली जीविताच्या आकाक्षेने लोक नाभीकडे येऊ लागले तेव्हा नाभीने त्यांना विशेष ज्ञान असलेल्या ऋषभाकडे पाठविले ते नतमस्तक होऊन जीवनोपायाच्या अपेक्षेने ऋषभाकडे गेले ही घटना महापुराणकारानीही नीटपणे शब्दाकित केली आहे आणि हाच कृतयुगारभाचा प्रस्ताव होय

तत्प्रहाणान्मनोर्वृत्तिं दधाना व्याकुलीकृताम् ॥
नाभिराजमुपासेदुः प्रजा जीवितकाम्यया ॥ १३३ ॥

नाभिराजाज्ञया स्त्रष्टुस्ततोऽन्तिकमुपाययुः ।।
प्रजाः प्रणतमूर्धानो जीवितोपायलिप्सया ।। १३४ ।।

— महापुराण, पर्व १६.

## पहिला राज्याभिषेक

या कृतयुगाची रचना ऋषभाने केली म्हणून त्याना स्त्रष्टा— निर्माता असे म्हणतात ती पात्रता ऋषभामध्येच होती म्हणून कृतयुगाच्या आरभाकालाबरोबरच खऱ्या अर्थाने नाभीची कारकीर्द सपली ते स्वत कालज्ञ होते आणि ऋषभनाथ कृतयुगाची सृष्टी प्रवर्तमान करण्यास पात्र होते म्हणून नाभीने योग्यवेळी ऋषभालाच राज्यपद दिले—

नाभिराजः स्वहस्तेन मौलिमारोपयत् प्रभोः ।।
महामुकुटबद्धानामधिराड् भवानिति ।। २३२ ।।

— महापुराण, पर्व १६.

नाभिराजाने स्वत च्या हाताने आपल्या मस्तकावरील किरीट ऋषभाच्या शिरोभागी विराजमान केले ऋषभनाथ आदिम राजाधिराज बनले पुढे ते धर्म-चक्रपरिवर्तनासाठी निघून गेल्यावर भरत चक्रीने आणखी एक पाऊल पुढे टाकून, चक्ररत्नाचे स्वामी बनून नाभिवर्ष भरतमय बनविला तेव्हा लोकानी त्याला भरतवर्ष *या नव्या नावाने गौरविले* भरत-वर्ष *या व्यक्तित्वनिष्ठ* नामकरणाचा हा पर्व पूर्वीच्या पायावरच आधारित होता. त्याला पारपारिक वारसा होता. या नव-प्रणालीत नाभिराजाचे स्थान पायाभूत आहे तेच व्यक्तित्वमूलक स्मृतिलक्षणरूप नामकरणाचा प्रारंभक अधिष्ठाते होत. त्यानीच कुलकराची प्रणाली बदलून नव्या राजशासन-प्रणालीचा प्रस्ताव तयार केला नतर ऋषभांनी पोसवलेली तीच राज-परपरा भरताने चक्ररत्न-सिद्धीच्या बळावर पूर्णावस्थेला नेऊन पोहोचविली नाभी राजा, ऋषभ राजाधिराज आणि भरत चक्रवर्ती अशी ही चढती कमान अखेर कळसाला पोहोचली म्हणून या कृतयुगातील राज्य-सस्थेचा सस्थापक व जनक नाभिराजच होत सर्व राजचक्राचे केन्द्र आणि सर्व सुधारणेचा गाभा होत म्हणून हा देश पूर्वीचे हिमवर्ष हे भौतिक नाव टाकून त्याच्या नावामुळे नाभिवर्ष या स्फूर्तिप्रद पदवीला पोहोचला त्याचे सार्थक झाले

## मन्वंतरकालीन कर्तबगारी

मनुयुग व कृतयुग याच्या आतरकालामध्ये ज्या घडामोडी घडल्या त्यामध्ये नाभींनी प्रजानुकूल अशा नव्या राज्यसस्थेचा पाया घातला ऋषभाच्या समर्थ

कर्तबगारीमुळे ती संस्था नावा-रूपाला आली नाभीने पाया रचला आणि भरताने शिखर गाठून त्या राज्यसंस्थेवर कळस चढविला तरी राज्यमंदिराची उभारणी आणि राज्यवेदीची प्राणप्रतिष्ठा मात्र ऋषभदेवांनीच केलेली आहे. त्याचे व्यक्तिमत्त्व दिव्य व तेजपुंज होते मध्यदीपाप्रमाणे त्याच्या कार्याचा प्रकाश मागे व पुढे दोन्ही बाजूने पडला आहे. त्यामुळे दोन्ही युग उजळून निघाले. पुत्रवत्सल नाभीचा पूर्ण भरवसा ऋषभावरच होता आणि भरत पूर्ण पितृभक्त व आज्ञाकारी होता. नाभिराजानीही प्रसंगी ऋषभाचीच मदत घेतली व महत्त्वाच्या कामगिरीवर नेमणूकही त्याचीच केली भरतचक्री देखील जन्मभर ऋषभनाथाचा दिव्य सल्ला स्वीकारीत होता. एकदाच त्याने सल्ला टाळला पण तो बाहुबलि-प्रसंग त्याच्या अंगावर चांगलाच शेकला त्याची स्मृती त्याला आगामी काळात सदैव बोचत राहिली एकूण नाभिराज व भरतचक्री या दोघाचे व्यक्तिमत्व ऋषभांच्या परज्योतीनेच तेजाळले. दिव्याप्रमाणे ते स्वत आत्मप्रकाशी होते शिवाय त्यानी नाभीला व भरतालाही तेजोदान केले.



: ८ :

# ऋषभवर्ष

यः स्तुत्यो जगतां त्रयस्य न पुनः स्तोता स्वयं कस्यचिद्
ध्येयो योगिजनस्य यश्च न तरां ध्याता स्वयं कस्यचित्।
यो नन्तृनपि नेतुमुन्नतिमलं नन्तव्यपक्षे स्थितः
स श्रीमान् जयताज्जगत्त्रयगुरुर्देवः पुरुः पावनः ॥

—महापुराण, ३७/२०४

आदि पुरुष आदीश जिन आदि सुविधि कर्तार ।
धर्म धुरंधर परम गुरू नमूं आदि अवतार ॥

– Rṣabha Deva, Salutation

This Man is freed from servile bands
Of hope to rise, or fear to fall,
Lord of himself, though not of lands,
And having nothing, yet hath all !

– Sir H Watton
Rsabha Deva, P. 107

# ८ ऋषभवर्ष

## ऋषभांचे विश्वरूप व्यक्तित्व

आतापर्यंत पाहिलेल्या या वर्षाच्या नामकरणाच्या इतिहासावरून असे दिसते की, पूर्वमनूचे शासनक्षेत्र अतिममनूकडे येताना त्या क्षेत्राच्या प्राकृतिक स्वरूपात बराच बदल झाला नाभिराज फक्त हिमवर्षाचेच अधिकारी झाले हा एक महत्त्वाचा घटनात्मक बदल घडला. आत्यंतिक परिणामात्मक बदल हा युगधर्मच होय भोगभूमीत किंवा सत्ययुगात जे बदल नैमित्तिक स्वरूपातही अपेक्षित नव्हते ते या कृतयुगात जणू काही नित्याचेच होऊन बसले त्यामुळेच या वर्षाचे नाव व्यक्तित्वावरून प्रवर्तित करण्याचा प्रघात पहिल्यादा नाभीच्या कारकीर्दीतच प्रचलित झाला त्यानुसार क्षेत्राच्या नावालाही एक प्रकारचे व्यक्तिमत्व प्राप्त झाले. काल अधिक गतिमान झाला तसे तेही नाव मागे पडले आणि शेवटी भरतवर्षाच्या स्वरूपात ते कायमचे स्थिरावले पण मन्वन्तराचा अतिम भाग आणि भरताचा चक्रपरिवर्तनाचा काल या दोन्हीमधील कृतयुगारंभीची प्रक्रिया फारच महत्त्वाची आहे आणि तो युगारभाचा काल ऋषभनाथांच्या कर्तवगारीने गाजून गेला आहे ऋषभदेवाची कामगिरी राजकीय व सामाजिक जीवन घडविण्यास जितक्या प्रमाणात आपल्या उपयोगी पडली तितक्या प्रमाणात दुसऱ्या कोणाच्याच कामगिरीचे आपण ऋणी नाही एक व्यक्तिमत्व म्हणून ऋषभनाथ हे नाभिराज व भरतचक्री या दोघापेक्षा किती तरी श्रेष्ठ आहेत या तीन नररत्नांमध्येही ऋषभांचे स्थान श्रीमालेतील कौस्तुभ रत्नाप्रमाणे आहे !

तरीपण या वर्षाला ऋषभवर्ष असे नाव का पडले नाही असा विचार सामान्यत. मनात आल्याशिवाय राहात नाही ऋषभवर्ष हे नाव प्रत्यक्षात

स्थिरावले नसले तरी साहित्यात त्याचा पूर्णपणे अभाव मात्र दिसून येत नाही त्या नावाचा सद्‌भाव असला तरी प्रसिद्धी मात्र तितक्या मोठ्या प्रमाणात झालेली दिसत नाही हे खरे आहे त्याची सामान्य कारणे मागे पाहिली आहेत पण त्या सर्व परिस्थितिजन्य कारणापेक्षा वैचारिक कारणच जास्त वलवत्तर असावे ! नाभीच्या अगोदर हिमालयाचे अस्तित्व सर्वांना इतक्या तीव्रतेने भासमान झाले की त्याला टाळणे अशक्यच ठरले. उलट ऋषभाच्या वेळी जनता त्याच्या व्यक्तिमत्वाने इतकी भारावली होती की ऋषभ हे नाव त्याना पूर्णपणे कवटाळताच आले नाही. त्याच्या तेजाने लोक नुसते दिपून गेले व स्तंभित झाले म्हणून ऋषभाचे नाव त्याच्या आवाक्यावाहेरच राहिले जनतेची मन स्थिती सुसभ्रान्त झाली असावी ! ! त्या सभ्रातीतून वाहेर पडण्याच्या आतच भरताचे व्यक्तिमत्व गुणवत्तेच्या क्षितिजावर इतके पुढे सरसावले की त्याना चक्ररत्नाचीही प्राप्ती झाली शिवाय त्याच वेळी ऋषभाना केवलज्ञानाची प्राप्ती झाल्याने त्याचे दिव्य विव लौकिक क्षितिजावरून पुढे सरकून ते अनंत अशा आध्यात्मिक विश्वात विराजमान झाले. त्यामुळे त्याची पात्रता वर्षाच्या नामकरणात्मक विनियोगापेक्षा फारच उच्चतर श्रेणीवर स्थिरावली

### ऋषभवर्ष नामकरणाचा मनोदय

क्षेत्राच्या किवा वर्षाच्या सदर्भातील ऋषभप्रेरित नामकरणाची प्रक्रिया पूर्ण होण्याच्या आतच त्याचे सक्रमण पुढील क्षितिजाकडे झाले होते. या अपूर्ण अवस्थान्तराची प्रक्रिया साहित्यात नोदलेली आहे ऋषभाना अनुसरून केव्हा या वर्षाला ऋषभवर्ष किवा भगवन्वर्ष तर केव्हा केव्हा एखाद्या विशिष्ट कामगिरीला अनुसरून स्ववर्ष असाही व्यपदेश केलेला आढळतो ती सर्व सकीर्ण व फुटकळ माहिती येथे जत्रीरूपाने माडण्याला फारसे महत्त्व नसावे म्हणून लक्षणात्मक असा एकच ठळक उल्लेख प्रातिनिधिक रूपाने सादर करतो–

> तस्य हीन्द्रः स्पर्धमानो भगवान्वर्षे न ववर्ष, तदवधार्य भगवानृषभदेवो योगेश्वरः प्रहस्यात्मयोगमायया स्ववर्षं अजनाभं नामाभ्यवर्षत् ॥
>
> – भागवतपुराण, ५/४/३.

यावरून हेच सिद्ध होते की या वर्षाच्या नामकरणावद्दल एक खास परंपरा निर्माण झाली आहे त्यातील सातत्य वाखाणण्यासारखे आहे या सातत्यातील एक महत्त्वाचा दुवा या स्वरूपात भागवतामध्ये हा उल्लेख आढळतो–

(१) अजनाभवर्षच ऋषभांना मिळाल्याने तो त्यांचा स्वत चा स्ववर्ष झाला.

(२) ऋषभाच्या स्वतःच्या वर्षालाच भगवान्वर्ष असे स्पष्टपणे म्हटले आहे. अजनाभवर्ष हे नाव मागे पडून ऋषभवर्ष असे नवे नाव प्रचलित होत असतानाच ऋषभाचे व्यक्तिमत्व खूपच उचावले होते म्हणून त्याचा उल्लेख भगवान या पूज्यतादर्शक संबोधनाने होऊ लागला

(३) भगवान म्हणजेच ऋषभदेव हेही अगदी स्पष्ट रीतीने सांगितले आहे

या सर्व विधानावरून या वर्षाच्या नामकरणातील कालक्रम व त्यातील संक्रमणशील अवस्था नीटपणे आणि एकत्रितपणे लक्षात येते या संक्रमणशीलतेचा परिपाक मोजक्या शब्दात सांगावयाचा तर मन्वन्तरकालीन जंबूद्वीपाचे अतिविशाल राज्य हळू हळू हिमवर्षाएवढेच मर्यादित झाले आणि हिमवर्ष–> नाभिवर्ष–> ऋषभवर्ष–> भरतवर्ष अशा प्रणालीने या वर्षाच्या नामकरणाची वाटचाल मार्गस्थ झाली त्यातूनही नाभीच्या व भरताच्या व्यक्तिमत्वाचे आकलन जसे एकसंघी व आकृतिबद्ध झालेले दिसते तसे भ. ऋषभनाथाच्या बाबतीत घडू शकले नाही त्याचे व्यक्तिमत्व अतिविशाल व उदात्त असल्याने नामकरणाच्या आवाक्याच्या बाहेरच राहून गेले म्हणून कधी भगवानवर्ष तर कधी ऋषभवर्ष अशी नामान्तरे प्रचारात रूढ झालेली आढळतात यासाठीच ऋषभवर्ष हा या नामप्रणालीतील एक सातत्यसाधक महत्त्वाचा दुवा आहे

## परिचय–संक्षेप

अशा या महत्तम व्यक्तीचा लघूत्तम परिचय एका दमात करून देण्यासाठी वसुदेवहिंडीमधील काही ओळींची आठवण झाल्याशिवाय राहात नाही–

> **नाभिस्स मरुदेवा य भारिया, उसभो नाम तिहुयणगुरू इक्खागवंसतिलओ पुत्तो आसी। सो य किर जायमेत्तो चेव मेरुसिहरे सुरेहिं तित्थयराभिसेएण अहिसित्तो। विवड्ढमाणो य कलाविहाणाणि सिप्पसयं पयाहिओ उवइसित्ता, रायधम्मं पवत्तेऊण, . पुत्तसयस्स जणवयसतं विभजिऊण निक्खंतो। . उप्पाइयकेवलणाणो भरहसुयं उसभसेणं पढमगणहरं ठवेऊण, बंभी य भरहभगिणी पवत्तिणीए, ततो भविए विबोहेमाणो सरदकाले रवी विव कमलायरे विहरति वसुहं निरुवसग्गं ॥**
>
> — वसुदेवहिंडी, भाग १, लंभ ५, पान १८३

नाभीची पत्नी मरुदेवी त्याचा सुपुत्र ऋषभ हा तिन्ही लोकातील सर्व जीवाना पूजनीय व गुरुस्थानी होता इक्ष्वाकुवशाला तो तिलकाप्रमाणे ललामभूत होता. जन्म होताच मेरुशिखरावर नेऊन शक्रादिकानी त्याच्या तीर्थंकरपदाला अनुसरून अभिषेक केला तरुणपणीच त्यांनी प्रजेच्या हितासाठी सर्व प्रकारच्या कलाकौशल्याचे आणि शिल्पाचेही विवरण केले राजधर्माचे मूळ प्रवर्तनही त्यानीच केले...... आपल्या शभर पुत्राना शभर प्रदेशाचे राज्य देऊन ..... त्यानी दीक्षा घेतली...... त्याना केवलज्ञानाची प्राप्ती झाल्यावर भरतपुत्र ऋषभषेण हा त्याचा प्रथम गणधर झाला भरताची वहीण ब्राह्मी ही आर्जिका आर्जिका-सघाची प्रमुख गणिनी झाली तेव्हापासून सूर्य ज्याप्रमाणे शरदऋतूतील कमलपुष्पाचा विकास करतो, त्याप्रमाणे सर्व भव्यजनाना बोध देत देत त्यानी सर्वत्र निराबाध विहार केला

**वंशनामकरण**

कुमारवयापासूनच ऋषभनाथांनी तत्कालीन समस्या सोडविण्यास सुरवात केली भोगभूमी नष्टप्राय झाल्याने आहार समस्या विकट झाली होती. निसर्गदत्त फलाहार कमी पडू लागला मानवी प्रयत्नाने आहारवस्तू निर्माण करण्याची कृषिकला अवगत झाली नव्हती अशा वेळी ऋषभानी उसाच्या रसाचा उपयोग सागितला त्या प्रसगी ही घटना फार मोठी होती ऊस निसर्गत निर्माण होत होता त्याच्या उपयोगाचा मार्ग शिकविणे सोपे वाटले तरी ते त्या काळी सुचणे कठीण होते हा मार्ग दाखविला म्हणून त्याना इक्ष्वाकू असे नाव मिळाले तेच त्याचे गोत्रनाव व वशनाव म्हणून रूढ झाले—

**सक्को वंसठवणे इक्खु अगु तेण हुंति इक्खागा ।**
**जं च जहा जम्मि वए जुग्गं कासीअतं सव्वं ॥**

— जबूदीवपण्णत्ति, २/२ व आवश्यकनिर्युक्ति - १८६

**आकानाच्च तदिक्षूणां रससंग्रहणे नृणाम् ।**
**इक्ष्वाकुरित्यभूद् देवो जगतामभिसम्मतः ॥ २६४ ॥**

— महापुराण, पर्व १६.

'ऋषभानी इक्षूचा उपयोग सागितला म्हणून त्याचे वशज इक्ष्वाकू नावाने प्रख्यात होवोत !' असे जे विधान वशनामकरण प्रसगी इद्राने केले होते ते सार्थकच झाले त्यावेळी ऋषभानी जे सागितले ते सर्व युगकर्तृत्वाला योग्य ठरले उसाचा रस ग्रहण करण्याचा विधी सागितल्याप्रमाणे लोकानी त्याचा स्वीकार

केल्याने ऋषभदेवांचे इक्ष्वाकू हे नाव जगतात सम्मत झाले याशिवाय पुढील काळात त्यांच्या निरनिराळ्या मुलांच्या नावावरूनही वंशशाखा निर्माण झाल्या— कुरुवंश, हरिवंश, नायवंश, उग्रवंश इत्यादि शिवाय त्यांच्या स्वत.च्या व्यक्तिमत्वावरून गौतम, काश्यप, मनू, विधाता, विश्वकर्मा, स्रष्टा इत्यादि अनेक नावानी प्रजा त्यांना ओळखू लागली (महापुराण, पर्व १६, श्लोक २५८ ते २६७).

## राजमुकुट-धारण

देश, काल परिस्थितीचे पूर्ण ज्ञान असल्याने, काळाची पावले ओळखून नाभिराजांनी लोकाच्या जीवन-व्यवस्थेची जबाबदारी कालानुसार अधिक योग्य असलेल्या व्यक्तीकडे सोपविण्याचा विचार केला त्यांचा कुलकरकाल संपत आला होताच शिवाय कुमार ऋषभराज सर्व अर्थाने प्रजेची सर्व प्रकारची जबाबदारी स्वीकारण्यास व ती पार पाडण्यास सुसमर्थ आहेत याची त्याना एव्हाना चांगलीच प्रचीती आली होती ऐहिक आणि दैवी दोन्ही सामर्थ्ये त्याना साध्य होती त्यांचे ज्ञान-विज्ञानही फलदायी होते प्रजाही त्यांच्यावर अनुरक्त होती म्हणून ऋषभाचा कुमारकाळ संपताच, दण्डादिक प्रजाशासनाचा अधिकार रीतसर देण्यासाठी, प्रतीक म्हणून नाभींनी त्याना आपले राजमुकुट अर्पण केले त्यामुळे ऋषभराज इतर सर्व मुकुटबद्ध राजामध्येही श्रेष्ठ असे अधिराज बनले (महापुराण, १६-२३२) सूरदासांनी या घटनेची नोंद आपल्या शब्दात पुढीलप्रमाणे केली आहे—

**बहुरो रिसभ बडे जब भये । नाभि राज दे बन को गये ।**
**रिसभ-राज परजा सुख पायो । जस ताको सब जग मे छायो ।।**

— सूरसागर, पान १५०

## षट्कर्मात्म योगक्षेम

काल पुढे पुढे धावत होता समस्या वाढतच राहिल्या केवळ उसाच्या रसाने भागणे शक्य नव्हते म्हणून ऋषभनाथ पुढे सरसावले त्यानी कृषी, असी, मसी, विद्या ( तंत्र ), वाणिज्य आणि शिल्प इत्यादी स्वरूपात लोकाना जीवनोपायाचा मार्ग दाखविला आणि ते खऱ्या अर्थाने प्रजापती बनले—

**प्रजापतिर्यः प्रथमं जिजीविषुः । शशास कृष्यादिषु कर्मसु प्रजाः ।।**

— स्वयंभूस्तोत्र, २.

कृषिप्रक्रियेतील विधीमध्ये नांगरणे ही पहिली क्रिया होय त्या महत्त्वाच्या कार्यामुळे ऋषभाची प्रजा आर्य या नावानेही प्रसिद्ध पावली. त्यांच्या उपजीविकेची प्रमुख समस्या संपली सर्व कृषिप्रधान प्रजा संपन्न व समृद्ध बनली. ऋषभप्रणीत

कृषिकला वृषभांकित झाली कृषिकर्माचा वाहक त्या काळी केवळ वृषभच असल्याने ऋषभनाथ वृषभध्वज झाले. वृषभलांछन ऋषभदेवांबरोबर वृषभाचाही आदर वाढला असल्यास नवल नव्हे. भारतामध्ये आजही कृषिकरणात व राज-कारणातही वृषभाला आदराचे स्थान आहे

## कल्याणकारी समाजव्यवस्था

पण एवढ्यानेच कृतयुगाची व्यवस्था सपणार नव्हती. लोकाचे जीवन अधिक संपन्न व समृद्ध करण्यासाठी ते अर्थपूर्ण करण्याचा प्रयत्न ऋषभराजांनी हरतऱ्हेने केला—

> तओ णं उसभे . महारायवासमज्झे वसमाणे लेहाइयाओ गणियप्पहाणाओ सउणरुअपज्जवसाणाओ बावत्तरिं कलाओ चोसट्ठि महिलागुणे सिप्पसयं च कम्माणं तिण्णि वि पयाहि-आए उवदिसइ त्ति ।।
> रोगहरणं तिगिच्छा अत्थागमसत्थमत्थसत्थित्ति ।
> निगडाइ–जमो बंधो घातो दंडादितालणया ।। ५२ ।।
> पहुणा उ देसियाइं सव्वकला सिप्पकम्माइं ।। ६४ ।।
>
> — जंबूदीवपण्णत्ति, २.

राज्य करीत असताना ऋषभदेवांनी सर्व प्रधान असे गणितशास्त्र आणि लेखनादिकापासून शकुनरुतापर्यंत सर्व ७२ कला, ६४ प्रकारचे स्त्री-गुणचातुर्य, शिल्पशास्त्र, त्रिविध कर्म या सर्वांचे उदाहरणासह विवरण प्रजेच्या हितासाठी केले त्याचप्रमाणे रोगाचा प्रतिकार व रोगावरील उपचार-स्वरूप आयुर्वेद, अर्थार्जनशास्त्र व अर्थशास्त्र-स्वरूप आजीविका, याशिवाय साखळदंडानी बांधून ठेवणे व यष्टिप्रहारादिकानी आघात करणे इत्यादी उपायांनी वन्यपशूपासून संरक्षण मिळविणे इत्यादी सर्व जीवन विद्या, इतर शिल्प आणि कृष्यादी कर्मविधी शिकविली

## जीवन-साधनेची पूर्तता

मानवी जीवनाला पोषक अशी त्यांची कर्तबगारी सदैव स्मरणात राहण्यासाठी लोकानी ऋषभांना विविध उपाधी व गुणविशेषणे बहाल करून त्यांचा आदर व्यक्त केला त्यांची कीर्ती त्याच्या कर्तव्याप्रमाणेच बहुविध आहे. त्याच्या अनेक बिरुदावलीमधील एक प्रख्यात व्यपदेश म्हणजे पुरु होय पुरु, पुरुदेव, पुरुपरमेश्वर अशी त्याची नावे साहित्यात सर्वत्र आढळनात. या

अभिधानाचा उल्लेख जिनसेनाचार्यांनी आपल्या महापुराणात १४/१६३, १५/७१ व ७३, २५/७५ इत्यादी ठिकाणी मोठ्या आदराने केला आहे त्यावरून त्याच्या ठिकाणी सर्व गुणाची पूर्ती झाली या घटनेची स्मृती अक्षरवद्ध करण्याचा हेतू स्पष्ट दिसतो प्रजेचे पूरण व पालन करण्यासाठी लागणाऱ्या सर्व गुणाचा समुदाय त्याच्याजवळ परिपूर्ण होता म्हणून त्याचे पुरु हे विरुद अर्थवाही आहे

सज्जनाचे पालन करण्यावरोवरच दुष्टाचे निग्रहण करणे देखील राजाचे एक तितकेच महत्त्वाचे कर्तव्य आहे म्हणून ऋषभानी राज्यव्यवस्थेसाठी व दंडनीतीच्या पालनासाठी आपल्या क्षत्रिय प्रजेचे **भोग, उग्र, राजन्य** आणि **नाग** असे चार वर्ग केले– (१) वयाने, गुणाने, अनुभवाने ज्येष्ठ व श्रेष्ठ असलेल्याना गुरुस्थानी मानून त्याच्यापासून सल्ला घेण्यास सुरवात केली त्याच्याशी विचार-विनिमय केला आणि त्याना राज्यकारभारात व समाज-व्यवस्थेत मोठ्या मानाचे पद दिले या विभागातील लोकाना **भोग** असे सवोधन प्रचलित झाले (२) **उग्रांचा** स्वभाव कडक होता. त्याना शासनसस्थेत कार्यकारी अधिकारी नेमले राज्याचे कारभारात्मक विभाग पाडून त्यावर निरनिराळ्या पदावर त्याची स्थापना करुन समाजात शातता आणि सुव्यवस्था निर्माण केली त्या अधिकारीवर्गावर उच्च स्तरावरील प्राताधिकारी व त्याच्याही वर मडलाधिकारी नेमले (३) **राजन्य** हा ऋषभाचा समवयस्काचा वर्ग होय. कोणत्याही प्रसगाला तोड देण्यासाठी त्याना स्वत वरोवरच सर्व दृष्टीने तरवेज केले सर्व प्रकारच्या व्यवहाराची माहिती दिली प्रसगानुसार कोणतीही जवावदारी स्वीकारून ती पार पाडण्यास सदैव तत्पर असा हा समाजातील अगदी महत्त्वाचा वर्ग होय (४) आणि उरलेली सर्वसामान्य निरागस क्षत्रिय प्रजा **नाग** म्हणून ओळखली जात असे (जवूदीवपण्णत्ति, राज्यसग्रहद्वार-१३१ आणि **महापुराण**, पर्व १६/२५५ ते २६३) ऋषभराजा क्षात्रधर्माचा जनक आहे प्रजेचे सरक्षण व पालन हा मुख्य राजधर्म असल्याने क्षत्रियाची कर्तव्ये सर्वांनाच शिकविली ती सर्व प्रथम ऋषभानेच होय ( महापुराण, ४२/६ ) शिवाय **महाभारतातही** या विधानाला पुष्टी देणारा उल्लेख अगदी स्पष्ट आहे—

**क्षात्रो धर्मो ह्यादिदेवात् प्रवृत्तः ।**
**पश्चादन्ये शेषभूताश्च धर्माः ॥ २० ॥**

— महाभारत, शातिपर्व, ६४/२०

इतर सर्व धर्मापेक्षा **क्षात्रधर्म** महत्त्वाचा आहे म्हणून क्षत्रियानाच प्रथमत शिकवून तयार केले त्यावरून प्रजापालनातील त्याची तत्परता व्यक्त होते प्रशासनाला आवश्यक असणारे सर्व गुण त्याच्याजवळ उत्स्फूर्तच होते पालन,

पोषण, रक्षण, न्याय, दण्ड, आजीविका, आरोग्य, कला-शिल्प-विद्या-कर्म अशा विविध क्षेत्रातील गुणसमुदाय त्याच्या अगी सहजपणे विद्यमान असल्याने ते पुरुषपरमेश्वर या पूज्य पदाला पोहोचले राज्य-व्यवस्थेसाठी लोकाचे चार वर्ग, राज्याचे कारभारात्मक विभाग, सरक्षण, व्रातता, पालन-पोषण, न्याय, दण्डनीती, पट्कर्मस्वरूपी आजीविका, मानवी उन्नतीसाठी समस्त जीवनकला, विद्या, शस्त्रास्त्रे, शिल्प-स्थापत्य, गणित, आहारविधी, वस्त्रविधी, आरोग्य-आयुर्वेद, उपकरणे, विवाह, दान, पशुपालन, यान-वाहन, उत्सव, क्रीडा, अलकार, अध्ययन-अध्यापन, सेना, युद्ध, शिक्षाप्रकार, सामादी नीती, मृतक-व्यवस्था, धनुर्वेद, श्मश्रुकर्म, गुरुपूजा-उपासना, ग्रामव्यवस्था, तपश्चर्या, राज्याभिषेक, प्रातविभाग, श्रमविभाग, राजकुमाराचे शिक्षण, राजकुमाराचे राज्यकारभारामधील स्थान, वारसा-परपरा अशा स्वरूपाची सर्व नवी व्यवस्था तयार करून ऋषभदेवांनी कृतयुगीन जीवन-व्यवस्थेचा पाया रचला. ब्राह्मी नावाच्या आपल्या मुलीला त्यानी प्रथमच अक्षर-लिपी शिकविली, म्हणून भारतातील पुरातन लिपीला ब्राह्मी लिपी असे आजही सबोधतात. आजच्या नागरी इत्यादी सर्व विद्यमान लिपींची आद्य जननी तीच आहे--

> कृष्यादि कर्मषट्कं च स्रष्टा प्रागेव सृष्टवान् ।
> कर्मभूमिरियं तस्मात्तदासीत्तद्व्यवस्थया ।। २४९ ।।
>
> — महापुराण, पर्व १६.

अशा रीतीने भोगभूमी नष्ट पावल्यावर या क्षेत्रात ऋषभनाथांनी कर्मभूमीची व्यवस्था लोकाना समजावून दिली, त्यासाठी अनुकूल अशी अवस्था निर्माण केली म्हणून त्याना या कृतयुगाचा <u>स्रष्टा</u> म्हणतात, तर या युगाला कृतयुग म्हणून ओळखतात

### ॐकाररूप व्यक्तित्व

अशा प्रकारे ऋषभाचे व्यक्तिमत्व विशाल व सर्वव्यापी होते म्हणूनच भारतातील भिन्न भिन्न धर्मियाच्या धर्मग्रथामध्ये त्याचे चरित्र आणि गुणगान प्रचलित राहिले आहे ऋग्वेदादिक श्रुतिशास्त्रे तथा स्मृतिशास्त्रे आणि पुराण-इतिहास-चरित्र ग्रथ इत्यादी सर्व साहित्य प्रकारात पूर्वीपासून आजपर्यंत त्याची स्मृती अतूट व अक्षुण्ण राहिली आहे ऋषभनाथ-आदिनाथ ही एक भारतीय श्रद्धा आहे त्याचा आदर भारतभर व्यापून राहिला आहे ऋषभदेवाच्या नामोच्चाराबरोबर स्मृतिपटलावर एक विशिष्ट मुनि-जीवन तरळून जाते पण ते केवळ एक समण मुनी आणि मोक्षार्थीच नव्हते तर या आपल्या कृतयुगीन जीवनाचे

शिल्पकार होते तीनही जागतिक पुरुपार्थांची पूर्ती करून झाल्यावरच त्यानी सिद्धीची साधना साध्य केली ते श्रेष्ठ नरेन्द्र आणि राजेन्द्रही होते, पुरुपसत्तम असून क्षात्रधर्माचे जनक होते

ऋषभं पार्थिवश्रेष्ठं सर्वक्षत्रस्य पूर्वजम् ॥ १४ ॥

— ब्रह्माण्डपुराण, २/१४.

आचार्य हेमचंद्रांनीही आपल्या त्रिषष्टिशलाकापुरुषचरित या विशालकाय ग्रथात ऋपभांचे राजकीय क्षितिजावरील जीवन थोडक्यात उजळविण्याचा प्रयत्न केला आहे—

ॐकार इव मंत्राणां नृपाणा प्रथमो नृपः ।
अपत्यानि निजानीव पालयामास स प्रजाः ॥ ९२५ ॥
असाधुशासने साधुपालने कृतकर्मणः ।
प्रत्यंगानि स्वकानीव मंत्रिणो विदधे विभुः ॥ ९२६ ॥
चौर्यादिरक्षणे दक्षानारक्षानप्यसूत्रयत् ।
सूत्रामेव लोकपालान् राजा ऋषभलाञ्छनः ॥ ९२७ ॥
विरचय्य नवामेवं व्यवहारव्यवस्थितिम् ।
नवोढामिव बुभुजे नवां राज्यश्रियं विभुः ॥ ९७७ ॥

— त्रि पु चरितम्, पर्व १, सर्ग २

सर्व मत्रामध्ये ॐकार जसा आदिम आहे तसे सर्व राजामध्ये ऋपभनाथाचे स्थान सर्वप्रथम आहे त्यानी प्रजेचे पालन स्वपुत्रवत् केले. सज्जनाचे पालन व दुष्टाचे दडन करण्यासाठी त्यानीं मत्रिमडळाची नेमणूक केली. ते सर्व मत्री ऋपभाच्या अगभूत अवयवाप्रमाणेच त्याना तन्मयतेने साथ देत होते ज्याप्रमाणे देवराज शक्र लोकपालाची नेमणूक करतो त्याप्रमाणे ऋषभराजानी चोरी इत्यादी पापकर्मापासून सरक्षण मिळविण्यासाठी कर्तव्यदक्ष असे आरक्षक नेम्ले राज्य-कारभाराची अशी नवी व्यवस्था निर्माण करून प्रभू ऋषभदेवांनी नव्या राज्य-लक्ष्मीचा नवविवाहित वधूप्रमाणे उपभोग घेतला

## इंद्राची शरणागती

ते आदिम क्षत्रियाचे आद्य राजे पराक्रमातही आद्यच होते त्याना जिकणे सदा विजयी अशा इन्द्रालाही जमले नाही, अशी स्पष्ट नोद वैदिक साहित्यात आढळते इन्द्राने त्याच्याशी खूपच ईर्षा केली पण शेवटी त्याला

समेटच करावा लागला. युद्ध न करणाऱ्या ऋषभांशी त्याला नमते घ्यावे लागले याची साक्ष ऋग्वेदासारख्या महत्त्वाच्या व प्राचीनतम ग्रंथात नोंदलेली आढळते ताण्डय-ब्राह्मणावरील टीकाकारानी ऋषभप्रणालीतील यतींचे वर्णन— वेदविरुद्ध-नियमोपेत, कर्मविरोधि-जन, ज्योतिष्टोमादि अकृत्वा प्रकारान्तरेण वर्तमान' इत्यादी विशेष-पदानी केले आहे अर्थातच इन्द्राला त्याचा द्वेष करणे कर्तव्यच वाटले त्याने या अवैदिक यतिजनावर कोल्हे-कुत्रे (शालावृक) सोडले (तैत्तिरीय संहिता, २/४/९/२ व ६/२/७/५, आणि ताण्डयब्राह्मण, १४/४/२८ व १८/१/९). परतु इन्द्राचे हे कृत्य देवाना उचित वाटले नाही आणि त्यानी त्यासाठी इन्द्रावर बहिष्कार घातला (ऐतरेय ब्राह्मण, ७/२८) पुढे युद्धात ऋषभ जेव्हा श्रेष्ठ ठरले तेव्हा मात्र इन्द्राने त्याना रथादिक युद्ध साहित्याचा नजराणा पाठविला, नव्हे पाठविणे भागच पडले—

**त्वं रथं प्रभवसे योधमृष्वमावो युध्यन्तं वृषभं दशद्युमम् ।**
**त्वं तुग्रं वेतसवे स चाहन्त्वं तुजिं गृणन्तमिन्द्र तूतो ॥**

— ऋग्वेद, ४/६/२६/४.

पुन एकदा इन्द्राने ईर्ष्येमुळे ऋषभाच्या राज्यात वर्षाव करणे बद केले तेव्हा ऋषभांनी आपल्या स्वत च्या ऋद्धि-प्रभावाने खूप वर्षाव घडवून आणला या अर्थाचा भागवतपुराण, ५/४/३ मधील एक उल्लेख इथेच पान १७२ वर दिला आहे याशिवाय तो प्रसग अथर्ववेदातही आढळतो—

**अतिसृष्टो अपां वृषभोऽतिसृष्टा अग्नयो दिव्याः ।**

— अथर्ववेद, काण्ड १६, प्रजापतिसूक्त.

हाच प्रसग महाकवी सूरदासानी देखील आपल्या सूरसागर ग्रथामध्ये मोठ्या रोचक पद्धतीने प्रस्तुत केला आहे—

**इन्द्र देखि ईरषा मन लायो । करिके क्रोध न जल बरसायो ।**
**रिषभदेव तब ही यह जानी । कह्यो इन्द्र यह कहा मन आनी ।**
**निज बल जोग नीर बरसायो । प्रजा लोग अति ही सुख पायो ॥**

— सूरसागर, पान १५०/१५१.

पहा, इन्द्राने मनातून ईर्षाभाव धारण केला रागाला येऊन जलवृष्टी बद केली हे जेव्हा ऋषभदेवाना समजले तेव्हा त्यानी इद्राच्या मनात असा विचार कोठून आला यासबधी विचार केला आणि स्वत च्या योगबलावर ऋषभदेवानी पाण्याचा वर्षाव घडवून आणला. त्यामुळे प्रजाजन अत्यत सुखी झाले

अशा प्रकारचा ईर्षाभाव इंद्राने ऋषभदेवाच्या विरोधामध्ये प्रगट केला होता असा उल्लेख ऋग्वेद-अथर्ववेद-भागवतपुराणाच्या परंपरेत पहावयास मिळतो, पण जेव्हा इंद्राचे काहीच चालेनासे झाले तेव्हा त्याने ऋषभदेवाच्या सेवेत आपले मन लावले असावे जैन परंपरेत तर आरंभापासूनच इंद्र हा ऋषभदेवाचा परमभक्त दाखविला आहे परन्तु तो जैनप्रणीत इंद्र स्वर्गीय देवराजा सौधर्माधिपती आहे मात्र हा वैदिक परंपरेतील इंद्र त्याहूनही वेगळा असू शकेल। कारण हा सोमप्रिय व संग्रामशील आहे काहीही असो, इन्द्र ऋषभदेवांचा भक्त बनला एवढे खरे। इंद्राची ऋषभभक्ती दोन्ही परंपरेत नोंदलेली आहे एवढीच साक्ष आपल्या विधानाला पुष्टी देणारी आहे

## क्षात्रधर्म-प्रवर्तन

ही ऋषभदेवाची क्षात्रपरंपरा ऋग्वेद-अथर्ववेद-भागवतापुरतीच मर्यादित नाही हा इतिहास **महाभारत, ब्रह्माण्डपुराण, वायुपुराण** इत्यादी ग्रंथात अधिक स्पष्ट केलेला आहे त्यामुळे ऋग्वेदात उल्लेखिलेल्या **ऋषभ** या एका थोर व्यक्तित्वाबद्दल कोणतीही शंका शिल्लक उरत नाही. राज्यव्यवस्था करीत असताना सुरवातीलाच लोकांचे चार वर्ग पाडले व त्यांच्याकडे राज्यकारभाराच्या निरनिराळ्या शाखा कार्यान्वित करण्यासाठी सोपविल्या हे आपण या पूर्वीच पाहिले आहे **ते चारही वर्ग क्षत्रियांचेच होते. वैदिक परंपरेतील चार वर्णांची कल्पना याहून नितांत वेगळी आहे.** सर्वप्रथम ऋषभदेवानीच स्वत च्या राज्यातील चारही वर्गांना प्रजानुपालनासंबंधीची विविध कर्तव्ये राज्यसंस्थेच्या बाल्यावस्थेतच शिकविली आणि त्यानंतर इतर सर्व प्रजा-धर्म व आजीविका-कर्म इत्यादींचे सविस्तर विवरण केले अशा अर्थाच्या जैन परंपरेतील विधानाला पुष्टी देणारी वचने जैनेतर ग्रंथातही जशीच्या तशी आढळतात– ( महाभारत, शान्तिपर्व, ६४/२० ) ऋषभदेवापूर्वी क्षात्रधर्माचे अनुशासन कुणी केलेच नव्हते तो क्षात्रधर्म आदिदेव ऋषभनाथ-प्रणीतच आहे। मनुयुगामध्ये केवळ कुलकर-धर्म होता. करता येईल तेवढे स्वत कुलकरच करीत असत ऋषभदेवानी मात्र क्षात्रधर्म खऱ्या अर्थाने सर्व समाजात प्रवृत्त केला आणि त्याला पोषक असे इतर सर्व धर्मकर्तव्ये त्यानंतर प्रवृत्त झाली त्याचेही मूळ उद्‌गाते ऋषभच आहेत

महाभारतातील आदिदेव या पदाबद्दल संदेह निर्माण होण्याचेही वस्तुत काही कारण नाही कारण **ब्रह्माण्डपुराण** (२/१४), **वायुपुराण** (पूर्वार्ध, ४/५०) इत्यादी ठिकाणी ऋषभनाथाना **सर्वश्रेष्ठ पार्थिव** आणि **सर्व क्षत्रियांचा पूर्वज** असे स्पष्टपणे म्हटले आहे तेच युगादिराज आहेत हे सर्वत्र मान्य केलेले आहे म्हणून **आदिदेव** या पदातील व्यक्ती ऋषभदेवच ठरते तेच या विश्वातील सर्व क्षत्रियांचे

पूर्वज आहेत तेच सर्व राजामध्ये ज्येष्ठ आहेत लिंगपुराणामध्येही अशा प्रकारच्या कुशकेचा पूर्णत परिहार केलेला आहे--

नाभिस्तु अजनयत् पुत्रं मरुदेव्यां महामतिः ॥ १९ ॥
ऋषभं पार्थिवश्रेष्ठं सर्वक्षत्रस्य पूजितम् ।
ऋषभाद्भरतो जज्ञे वीरः पुत्रशताग्रजः ॥ २० ॥
– लिंगपुराण, अ. ४७.

या ठिकाणी वरील विधानाला पुष्टी तर आहेच पण त्यागिवाय ऋषभाच्या पूर्वापार परपरेचाही स्पष्टपणे उल्लेख आहे सर्व क्षत्रियांचे पूर्वज आणि सर्वपूजित असे ऋषभ हे दुसरे कोणी नसून जे नाभिपुत्र, भरतपिता आणि प्रथम जैन तीर्थकर म्हणून प्रसिद्ध आहेत तेच हे ऋषभनाथ होत

एवढेच नव्हे तर हे नाभिपुत्र ऋषभनाथच क्षत्रियाच्या वीरमार्गाचे अध्वर्यू होते तो मार्ग त्यानीच प्रस्थापित केला आणि आयुष्यातील शेवटच्या पर्यायामध्ये ते प्रथम जिन झाले प्रथमच या युगाच्या आरभ--काळी त्यानी जैन तीर्थाचे प्रवर्तन केले म्हणजे आदिदेव, युगादिराज, प्रथम नृपती, सर्व क्षत्रियांचे पूर्वज, प्रथम वीर-मार्ग-दर्शक आणि प्रथम जिन किंवा जैन तीर्थंकर या सर्व अभिधानातील व्यक्ती एकच आहे. याला मनुस्मृतीचीही साक्ष आहे. त्यातील प्रत्येक शब्द अगदी स्पष्ट व बोलका आहे—

दर्शयन् वर्त्म वीराणां सुरासुरनमस्कृतः ।
नीतित्रितयकर्ता यो युगादौ प्रथमो जिनः ॥
– परिशिष्ट ४ मधील अवतरण पहा.

ज्यानी वीराच्या मार्गाचे मार्गदर्शन केले, ज्याना सर्व देवगण आणि असुरगण ( यक्षादिक ) वदन करतात, ज्यानी तीनही नीतीमार्गाचे प्रवर्तन केले ते या युगाच्या आरभकाळी होऊन गेलेले पहिले जैन तीर्थंकरच होत.

### ऋषभ नावाची सार्थकता

ऋषभांच्या अशा श्रेष्ठ आणि जनकल्याणकारी गुणामुळेच त्याच्या राज्यकाळी प्रजा अत्यन सुखी होती. त्याच्या राज्यात अशी एकही व्यक्ती नव्हती की जिला काही उणीवा भासत होत्या किंवा ज्याच्या गरजा पूर्ण भागत नव्हत्या. कोणालाही कोणत्याही प्रकारची याचना करावी लागत नव्हती त्यांना फक्त ऋषभ राजाच्या कृपेचीच अपेक्षा होती त्याच्या राज्यकालाचे अशा शब्दातील वर्णन भागवतात उपलब्ध आहे ( पूर्वस्कध, ४/१८ ) सुदर आणि डौलदार असे

त्याचे शरीर आणि यश, तेज, बल, ऐश्वर्य, बुद्धिमत्ता, कौशल्य, प्रभाव इत्यादी त्याच्या गुणावरुन त्याच्या पित्याने (नाभीने) ठेवलेले त्याचे ऋषभ हे नाव सार्थक ठरले कारण ते सर्व गुणधर्म त्याच्यामध्ये सदैव विलसत होते या सबधीचे भागवतामधील विवरण पहा—

**तस्य हि वा इत्थं वर्ष्मणा वरीयसा बृहच्छ्लोकेन चौजसा बलेन श्रिया यशसा वीर्य-शौर्याभ्यां च पिता ऋषभ इति नाम चकार।**

— भागवतपुराण, ५/४/२.

अशा प्रकारे वर्षामधील त्याच्या वरिष्ठतेच्या आणि सपूर्ण राष्ट्रावरील कीर्ती, ओज, बल, वैभव, यश, विक्रम-पराक्रम इत्यादी त्याच्या विपुल गुणाच्या वर्षावाच्या अपेक्षेने नाभिराज पित्याने त्याचे नाव ऋषभ असे ठेवले.

राज्यविभागाची रचना, राज्यकारभार, क्षात्रधर्म, कृष्यादिक वृत्तिव्यवस्था, कला-विद्या-शिक्षण, निवास-वस्त्र-उपकरण-निर्मिती, आरोग्यविधी इत्यादी जीवनोपायाच्या कल्याणकारी व्यवस्थेबरोबरच ऋषभदेवानी मनोरजनार्थ त्रिविध गाधर्व विद्याही प्रवृत्त केली आचार्य जिनसेनानी याचा उल्लेख पुढील शब्दात केला आहे—

**विभुर्वृषभसेनाय गीतवाद्यार्थसग्रहम् ।**
**गंधर्वशास्त्रमाचख्यौ यत्राध्यायः परः शतम् ॥ १२० ॥**

— महापुराण, १६/१२०.

सर्वसमर्थ ऋषभदेवानी वृषभसेन नावाच्या आपल्या मुलाला गीत, वाद्य आणि अर्थसग्रह (अभिनय) या स्वरूपात गाधर्व-विद्या शिकविली त्या शास्त्रात शभरापेक्षा जास्त अध्याय आहेत.

एकदरीत शलाका पुरुषाला ज्या ज्या गुणाची आवश्यकता असते त्या त्या सर्व गुणाची पूर्ती पुरुदेव ऋषभनाथामध्ये एकवटली होती एक समाजधुरीण म्हणून ते सर्वश्रेष्ठ ठरले कोणत्याही क्षेत्रातील त्याच्या योग्यतेला व।ण नव्हती मानवी आयुष्यातील सर्व साध्याच्या परिपूर्तीलाच ऋषभ हे नाव शोभले जिनसेनाचार्य म्हणतात—

**ऋषभोऽसि जगज्ज्येष्ठः पुरुः पुरुगुणोदयैः ।**
**नाभेयो नाभिसंभूतेः इक्ष्वाकुकुलनंदनः ॥ ७५ ॥**

— महापुराण, पर्व २५.

आपण जगातील सर्व लोकामध्ये ज्येष्ठ आहात म्हणून आपणास ऋषभ म्हणतात पुरुषामधील सर्व उत्तमोत्तम गुणाची परिपूर्ती झाल्याने आपण पुरु म्हणून प्रसिद्ध आहात शासनाच्या केन्द्रवर्ती विराजमान असलेल्या नाभिराजाच्या पोटी जन्म झाल्याने आपण गुणकर्णिकारूप नाभेय आहात आणि इक्ष्वाकू कुलातील सर्वांचा आनद विधाता असल्याने इक्ष्वाकु-कुलनदन अशी आपली ख्याती पसरली आहे

अशा रीतीने ऋषभदेवांनी जीवनाच्या सर्व क्षेत्रातील प्रजानुशासन अत्यन्त व्यवस्थित व पूर्व नियोजित पद्धतीने सफलतापूर्वक पार पाडले प्रजाधर्म व शासक-धर्म सुप्रतिष्ठित केले वृद्धाची व तरुणाची कर्तव्यक्षेत्रे व त्याचे सामाजिक जीवनातील महत्त्व स्पष्ट केले त्याची अर्थनीती प्रजानुकूल होती ऋषभांची राज्यव्यवस्था व त्यामागील त्याची विचारपद्धती याचा कालानुवर्ती अभ्यास केल्यास सशोधकाच्या मनात गोंधळ निर्माण होणार नाही, अशी अपेक्षा आहे कर्मभूमीच्या आरभकाळी असलेली या भूमीची अवस्था आणि रहिवासी लोकाची स्थिती लक्षात घेऊन त्याच्या वैयक्तिक व सामाजिक गरजाची पूर्ती करण्यासाठी मानव्याच्या दृष्टिकोणातून ऋषभदेवानी विचार केला व तो आचारात आणला. त्यासाठी त्यांनी आपली क्षमता व प्रभाव कमास लावला दिव्य परिश्रम केले आणि ते त्यांचे श्रम सार्थकी लागले.

## ऋषभ–संस्कृती

राज्यसस्थेची व्यवस्था मुरल्यावर योग्य वेळी ती सर्व जबाबदारी सबल अशा पुढील पिढीवर सोपवून ते अध्यात्मिक क्षेत्रातील सर्वोदय तीर्थाची स्थापना करण्यासाठी बाहेर पडले ससारी अवस्थेचा पूर्णपणे त्याग केला धर्मचक्र–परिवर्तन करण्यासाठी केवलज्ञानाची आवश्यकता होती त्याच्या प्राप्ती-साठी त्यानी आत्मगुण-सिद्धीचा मार्ग अवलंबिला आत्म्याचे बल वाढण्यासाठी, चेतोवृत्ती शुद्ध होण्यासाठी, शुद्ध ज्ञानगुणाची प्राप्ती होण्यासाठी त्यांनी सयमपूर्वक तपश्चर्या केली पूर्वाश्रमातील प्रजाहितात्मक समभाव व मुनि–अवस्थेतील तप पूत प्रशमगुण दोन्हीही ऋषभरूप झाले ‘महासमणे उसभे’ अशी त्याची ख्याती पसरली त्याचा मार्ग व त्याची परपरा ‘समण संस्कृती’ म्हणून सर्वश्रुत झाली. जैन धर्माचे सर्वच तीर्थप्रवर्तक पूर्वाश्रमीचे थोर क्षत्रिय राजे व गृहत्यागानतरचे थोर समण मुनी होते. ही समणाची संस्कृती जितकी वैशिष्ट्यपूर्ण तितकीच गहन आहे. या पुरुषसत्तमानी लौकिक व पारलौकिक अशा दोन्ही क्षेत्रातील आपली कर्तबगारी पूर्णपणे पार पाडली आहे

भोग व त्याग दोन्हीही धर्माचेच प्रत्यग असून त्याचे फळही धर्ममय व पुण्यप्रद आहे पुण्याचे प्रतीक म्हणून श्रेष्ठ भोगाची प्राप्ती झाली तर धर्म नेहमी

धर्मानुवर्तीच असतो म्हणून पुन धर्माचार व त्याचे प्रतीक म्हणून त्याग अशा ह्या समणाच्या सस्कृतीला अनुसरून जीवन–मार्गाची स्थापना युगादिराज ऋषभनाथानीच प्रथमत केली आहे. तेच त्या बीजाकुर–मार्गी सुखप्रद जीवन-मार्गाचे आद्य प्रवर्तक होत त्यासाठी त्यानी सपूर्ण राज्यश्रीचा जितक्या सहजतेने भोग घेतला तितक्याच लीलया तिचा त्यागही केला त्याना लौकिक मार्गाप्रमाणे मोक्षमार्गाचीही स्थापना आणि प्रतिष्ठा करावयाची होती त्यासाठी ते अतर्मुख बनले देहावर, देहाच्या वासनेवर, इद्रियाच्या विषयावर व मनावर त्यानी विजय मिळविला. कोणत्याही प्रकारच्या उपसर्गानी व परिषहानी ते विचलित झाले नाहीत हा त्याचा सयममार्ग स्वयंभू स्तोत्रातील एका श्लोकामध्ये शब्दाकित केला आहे—

विहाय यः सागर-वारि-वाससं
वधूमिवेमां वसुधा-वधूं सताम् ।
मुमुक्षुरिक्ष्वाकु-कुलादिरात्मवान्
प्रभुः प्रवव्राज सहिष्णुरच्युतः ॥

— स्वयभूस्तोत्र, १३.

मोक्षाला जाण्यास उत्सुक, इक्ष्वाकु-कुलातील आद्य आध्यात्मिक पुरुष अशा ऋषभदेवांनी सागरजलरूपी वस्त्र परिधान करणाऱ्या पृथ्वीरूपी वैभवशाली पत्नी-बरोबरच स्वत च्या सुशील पत्नीचाही त्याग करून प्रव्रज्यामार्ग अनुसरला आणि तेथेच सहिष्णू वृत्तीने तपश्चर्या करून ध्यानमार्गामध्ये अच्युत राहिले

## ऋषभांचा जीवनमार्ग

यापेक्षाही भागवतामधील वृत्तान्तावरून त्याच्या व्यक्तिमत्त्वाचा व जीवनहेतूचा बोध मानव्याच्या दृष्टीने अधिक चागला होतो त्याची लोक-कल्याणाची प्रवृत्ती त्याच्या त्याग-मार्गातही उत्कटतेने दिसून येते आता त्याच्या-वरील जबाबदारी दुपटीने वाढली होती साधुधर्म आणि गृहस्थधर्म अशा दोन्ही मार्गाचे नियमन त्यानी उत्कृष्ट रीतीने केले त्यांच्या जीवनातील त्यागमार्ग हा जबाबदारी कमी करण्याचा प्रयत्न नव्हता ती पळवाट तर मुळीच नव्हती पलायन वादाचा व ऋषभाचा सुतराम् सबध नाही. लौकिक धर्माची प्रतिष्ठा पूर्ण झाल्यावर पारलौकिक मार्गाचीही प्राणप्रतिष्ठा करण्यासाठी, धर्मार्थकामाबरोबरच मोक्षाचीही सिद्धी करण्यासाठी, मानवधर्माच्या पूर्तीसाठी, जीवनातील सनातन गुणाच्या अभ्युदयासाठी या नव्या व अन्तिम जीवनदशेत प्रवेश करून त्यानी त्यात प्रयत्न-पूर्वक यश मिळविले. म्हणूनच त्याच्या समवसरणाला सर्वोदय तीर्थ हे यथार्थ

नाम लाभले ऋषभदेव पूर्णत्वाचे प्रतीक होते. कोणत्याही कार्यातील अपूर्णता त्यांच्या व्यक्तित्वात विद्यमानच नव्हती त्यांची दीक्षा केवळ जीवनदशेच्या पूर्णत्वाचा प्रयास होता मंदिराच्या शिखराशिवाय कळस असा त्यांचा दृष्टीकोण नव्हता आधी पाया मग कळस असा त्याचा मार्ग सरळ होता म्हणूनच त्यानी मुनिवर्गाबरोबरच गृहस्थधर्माचेही नियमन केले—

> भगवान् ऋषभसंज्ञ आत्मतन्त्रः स्वयं नित्यनिवृत्तानर्थपरम्परः केवलानन्दानुभवः ईश्वर एव विपरीतवत् कर्माण्यारभ्यमाणः कालेनानुगतं धर्ममाचारेणोपशिक्षयन् न तद्विदां सम उपशान्तो मैत्रः कारुणिको धर्मार्थयशः प्रजानन्दामृतावरोधेन गृहेषु लोकं नियमयत् ॥
>
> — भागवत, ५/४/१४

ऋषभ नाव धारण करणारे भगवान् केवळ आत्मतन्त्रच ( पूर्णत स्वतत्र ) राहून, स्वत अनर्थपरपरेपासून सदैव अबाधित राहून शुद्ध आनदाचाच अनुभव घेणारे ईश्वरच होत त्यानी जगावेगळ्या कामाला ( तपश्चर्यात्मक त्यागाला ) आरभ केला कालानुरूप धर्माचा आचार करून, तो धर्म न समजणाऱ्याना त्या तत्त्वमार्गाचे शिक्षण दिले त्याच वेळी स्वत समता, शान्तता, मित्रता, कारुण्य, धर्म, अर्थ, यश, प्रजावात्सल्य आणि अक्षय आनद या भावरूप अवस्थेमध्ये रत राहून गृहस्थाश्रमातील लोकाचाराचे नियमन केले.

संस्कृत-अपभ्रंश महापुराणकार जिनसेन तथा पुष्पदन्त, हरिवशकार जिनसेन आणि पद्मपुराणकार रविषेणादिक इतर सर्व जैन पुराणकारानी ' ऋषभमुनीचा केवली विहार या क्षेत्रातील सर्व प्रदेशात झाला, त्यानी सर्व भव्यांना धर्मोपदेश केला ' असा एकमुखी उल्लेख केलेला आढळतो. भागवत पुराणात देखील (५/६/८ते११) ऋषभनाथांच्या उपदेश-विहाराचा थोडासा वृत्तान्त आलेला आहे कोंक, वेंक, कुटकाचल इत्यादी प्रदेशांत ऋषभांनी जैन धर्माचा प्रसार केला आणि कुटकाचलाचा राजा अर्हन हा ऋषभांच्या उपदेशाला अनुसरूनच राज्याचे अनुशासन करीत असे, असे सागितले आहे त्याच ऋषभाला विष्णूचा आठवा अवतार म्हणून त्यांची मान्यता आहे.

### धर्मस्वरूप ऋषभ

श्रीमद्भागवतामध्ये ऋषभ शब्दाची निरुक्तीही सागितली आहे या नावाचे औचित्य दाखविणारा श्लोक, विशेष म्हणजे तेथे स्वत. ऋषभनाथांच्याच

मुखाने वदविला आहे धर्म व धर्माराधना मनोनिष्ठ असतात मात्र तपश्चर्या बाह्य व शरीरगतही असू शकते या तप क्रिया सासारिक किंवा जागतिक क्रियेपेक्षा वेगळ्या असतात बाह्य दृष्टीने त्या क्रियाचा अर्थ उमजत नाही त्यातील सगती लक्षात येत नाही म्हणून सामान्य लोकाना त्या क्रिया बाह्य जगात विपरीत वाटतात परन्तु धर्माचरणात त्या सुसगतच असतात कारण तो मार्ग त्यागमय असतो तर सामान्याची दृष्टी भोगमय असते याच गोष्टी स्पष्ट करताना भागवतात म्हटले आहे--

**इदं शरीरं मम दुर्विभाव्यं सत्त्वं हि मे हृदयं यत्र धर्मः ।**
**पृष्ठे कृतो मे यदधर्म आरादतो हि मां ऋषभ प्राहुरार्याः ।।**

— भागवत, ५/५/१९

हे माझे शरीर जाणून घेणे कठिण आहे माझे हृदय तर पवित्र आहे त्या सत्त्वावस्थेत धर्माची स्थिती आहे सर्व प्रकारच्या अधर्माला मी अगोदरच मागे टाकले आहे, त्याचा परिहार केला आहे म्हणूनच मला आचारशील लोक ऋषभ म्हणतात

**ऋषभनाथ तीर्थकरानी धर्मचक्र परिवर्तन** करीत करीत सर्वत्र विहार केला जलवृष्टी करीत करीत मेघ सर्वत्र विहार करतात त्याप्रमाणे **ऋषभनाथ पूर्णत. धर्मरूप झाले.** जेथे जेथे भव्यजन होते तेथे तेथे त्यानी त्याच्यावर धर्मोपदेशाचा वर्षाव केला सर्वांना चित्तशान्तीचा लाभ झाला शारीरिक स्वास्थ्यावरोबरच मानसिक स्वास्थ्याची गरज असते **हा चित्तस्वास्थ्याचा मार्गच सस्कृतीचा निदर्शक असतो** मात्र त्याचा विहित मार्ग यच्चयावत लोकाना कधीही पेलत नसतो त्याना तो केवळ आदर्शभूत असतो पण एवढ्यासाठीच त्याला विरोध करणे हे दुष्ट-पणाचेच गणले जाते हाच भाव **भागवतामध्ये परीक्षिताच्या** शब्दात पुढीलप्रमाणे व्यक्त केला आहे--

**धर्मं ब्रवीषि धर्मज्ञ धर्मोऽसि वृषरूपधृक् ।**
**यद्धर्मकृत स्थानं सूचकस्यापि तद् भवेत् ।।**

— भागवत, १/१७/२२

हे धर्मतत्त्व जाणणाऱ्या ऋषभा, आपण धर्माची ( उपदेशामृताची ) वृष्टी करीत आहात धर्मवर्षावाचे स्वरूप धारण करणारे आपण स्वत मूर्तिमत धर्मच आहात ! दुष्टाना जे स्थान प्राप्त होते ते अधर्माचरणाचेच फळ असते

## ऋषभ-संस्कृतीचे वैशिष्ट्य

जैनधर्म ऋषभप्रणीत आहे. तो अर्थानच वैदिक धर्माहून वेगळा आहे तो कषायाचा नाश करणाऱ्या ध्यान मार्गावरच आधारित आहे तो सर्व अर्थाने ग्राह्य आहे याची नोंद भागवतकाराने स्पष्टपणे घेतली आहे स्वत च्या स्वरूपात्मक चेतना गुणांचा विकास हा जिनधर्माचा आधार आहे आणि आत्मोन्नती सर्वांना इष्ट आहे याच समुन्नत मार्गाची प्रभावना केल्यामुळे ऋषभनाथ पुन्हा पुन नमस्कार करण्यास पात्र आहेत श्रीमद्भागवतातील शब्दातच त्याची प्रशस्ती पहा—

**ॐ नमो भगवते उपशीलाय उपरतानात्म्याय नमो अकिंचन-वित्ताय ऋषिऋषभाय नरनारायणाय परमहंसपरमगुरवे आत्मारामाधिपतये नमो नमः इति ॥**

— भागवत, ५/९/११

भगवान ऋषभ ऋषीना नमस्कार! त्याचा स्वभाव कषायाचा उपशम करणारा आहे ते आत्म्याला अनुकूल असलेल्या विकारधर्मापासून विरक्त आहेत त्याना परतत्त्वस्वरूप धनाची आसक्ती किंचित् मात्र नाही ते सर्व पुरुषामध्ये नारायण आहेत त्याचा आत्मा परम पवित्र आहे ते सर्वांचे श्रेष्ठ गुरु आहेत ते आत्मस्थानाचे अधिपती आहेत त्याना पुन्हा पुन नमस्कार

भगवान ऋषभांच्या धर्ममार्गाची चर्चा भागवतात पुष्कळ ठिकाणी विखुरलेली आहे त्याच्या विविध तपश्चर्यानुयोगाचा उल्लेख मोठ्या आदरणीय शब्दात केला आहे जैन धर्मग्रथ त्याना केवलज्ञानी म्हणतात तर भागवतात (५/६/२४)—

**इति नानायोगचर्याचरणो भगवान् कैवल्यपतिः ऋषभः ।**

त्याना 'कैवल्यपति.' अशी सज्ञा दिली आहे जैन ग्रंथात त्याना योगिराट् म्हटले आहे योगी हा शब्द मुनिवाचक आहे ऋषभाना योगी, यती, ऋषी असे सबोधले असले तरी त्याची मुनी हीच सज्ञा जास्त प्रचलित आहे या सर्व शब्दातील अर्थ सामान्यपणे समान असला तरी ऋषभप्रणीत सघ हा मुनिसघच आहे. मुनिपरपरा ही वैदिक ऋषिपरपरेपेक्षा वेगळी आहे कारण ऋषभप्रणीत कषाय जिकण्याचा आत्मधर्म हा वैदिक क्रियाकाण्डापेक्षा स्पष्टत वेगळा आहे ऋषभपरपरेतील मुनीची श्रेष्ठता त्याच्या आत्मज्ञानावर आधारित आहे मुण (मुणइ) याचा अर्थ आत्मधर्म जाणणे-अनुभवणे असा आहे म्हणून ऋषभनाथांना किंवा त्याच्या प्रणालीतील धर्मसाधकाना मुनी म्हणतात मुनिधर्म वीतराग किंवा

जिन होण्यासाठी आहे वेदकाळी मुनि व ऋषि या दोन वेगवेगळ्या परपरेतील सस्था प्रचलित होत्या त्याचा मूलस्रोत स्वरूपाने वेगळा होता म्हणून त्याना मुनिसंप्रदाय व ऋषिसंप्रदाय असेही म्हणतात नतरच्या काळी मुनिसप्रदायातून समण सस्कृती आणि ऋषिसप्रदायातून प्रथम वैदिक व नतर ब्राह्मण सस्कृती अशा दोन प्रवाहानी जन्म घेतला

वैदिक आर्य भारतात येऊन स्थिरावल्यावरही काही काळपर्यंत तरी मुनिपरंपरा व ऋषिपरपरा एकमेकाना पूरक राहिल्या परतु आत्मश्रद्धेच्या बाबतीत मुळातूनच महदतर असल्याने त्याच्या अनुयायाच्या उपासना-मार्गामध्ये व जीवनविषयक दृष्टिकोणामध्ये विशाल अन्तर पडले प्रवासी काही काळपर्यंत एकाच मार्गाचे वाटसरू भासले तरी आपापल्या ध्येयबिंदूचे वळण आल्यावर दिशा बदलून इष्ट मार्गाने प्रवास करतात त्याप्रमाणे त्या दोन प्रणाली काही काळ बाह्यत व्यवहारधर्मातील सादृश्यामुळे समान पातळीवर विहार करताना दिसल्या एवढेच ! पण आत्मश्रद्धा वेगवेगळी असल्याने त्याच्यात पुढे दार्शनिक फरक पडला व तो वाढत गेला वैदिक यज्ञकर्मामुळे तर त्याचा व्यवहारधर्मही बदलला ऋषीच्या वैदिक परपरेत कर्मकाण्ड, मासाहार, ऐहिक वैभवाची तृष्णा व त्यामुळे परस्पर असहिष्णुता इत्यादी अनात्म प्रवृत्ती वाढल्या उलट पक्षी मुनीच्या मूळ प्रणालीमध्ये अहिंसा, निरामिषता, सहिष्णुता, मैत्रिभाव अशा मानव्याच्या प्रवृत्ती वाढीस लागल्या

## वैदिक दर्शनावर प्रभाव

पण त्यानतरच्या काळी पुन्हा नवीन युग अवतरले आणि

(१) **तस्मादात्मा वा अरे द्रष्टव्यः ।**

— बृह आ उप , २/४/५.

(२) **किं कारणम् ब्रह्म कुतः स्म ।**

— श्वेताश्वतर उप , १/१

(३) **न प्राक्त्वतः पुरा विद्या ब्राह्मणान् गच्छति ।**

— छादोग्य उप , ५/३

(४) **द्वया ह प्रजापत्या देवाश्चासुराश्च ।**
**ततः कनीयसा एव देवा ज्यायसा असुराः ॥**

— बृ. आ उप., १/३/१.

(५) पर एव हिरण्यगर्भ इत्येके ।
संसारीत्यपरे । पर एव तु मन्त्रवर्णनात् ॥
— वृ आ उप, १/४/६ भाष्य

(६) अहं ब्रह्मास्मीति । तस्मात्तत्सर्वमभवत् तद्यो यो देवानां प्रत्यबुध्यत स एव तदभवत्तथर्षीणां तथा मनुष्याणां . ..
— वृ. आ उप, १/४/१०.

(७) प्लवा ह्येते अदृढा यज्ञरूपा .
मूढा जरामृत्युं पुनरेवापयन्ति ।
— मुण्डक उप, १/२/७.

(१) अरे यासाठी आत्म्याचा विचार करावा

(२) काय कारण ? ब्रह्म कोठे होता ?

(३) विद्या ( आत्मज्ञान ) पूर्वीही ब्राह्मणाजवळ नव्हती आणि पुढेही नसणार !

(४) प्रजापतीची दोन अपत्ये, देव आणि असुर. त्यांपैकी देवच लहान होत. असुर तर ज्येष्ठ आहेत.

(५) परमात्माच हिरण्यगर्भ होय. ( फक्त हिरण्यगर्भ ऋषभनाथच एकटा परमात्मा होय ). बाकी सर्व ( देव ) संसारी आहेत. मंत्रातील वर्णनावरून तोच सर्वश्रेष्ठ होय.

(६) मी (प्रत्येक जीवतत्त्व) म्हणजेच ब्रह्म आहे. त्यापासूनच ते सर्व निष्पन्न झाले. हे तत्त्व देवांच्यापैकी ज्याने ज्याने जाणले तोच केवळ सर्व मानवांमध्ये आणि ऋषींमध्ये तथागत झाला.

(७) यज्ञस्वरूपी या नौका फुटक्या आहेत . त्या मूर्ख याज्ञिकांना पुनश्च म्हातारपण व मृत्यु याच दशा पुनः पुनः प्राप्त होतात हे निश्चित.

अशा स्वरूपाच्या विचार-प्रवृत्ती उसळून आल्या तेव्हा त्याना वैदिक ऋषी व ब्राह्मण आणि अवैदिक मुनी व यती याच्यातील भेद स्पष्टपणे उमजला. आणि खऱ्या आत्मधर्मासाठी त्यानी ऋषभ-प्रणालीतील मुनीची व यतीची प्रशसा आरभिली यातून इद्र या वैदिक देवतेवर बहिष्कार टाकण्यासारखा प्रसग उद्भवला ( ऐतरेय ब्राह्मण, ७/२८ ).

## मुनी आणि यती

या ऋषभाच्या परपरेतील मुनीप्रमाणे वैदिक ऋषी हे त्यागी आणि तपस्वी नाहीत त्याची आस्था यज्ञाचारामध्ये गुतलेली दिसते यज्ञातील हेतू ऐहिक वैभवाशी निगडित आहे पुत्र, धन, धान्य इत्यादी ऐहिक सपत्तीसाठी ते इद्रादिक देवताना आळवितात त्यासाठी यजमानाकडून भोग-सपत्तीचा स्वीकार करतात परतु या विरुद्ध मुनि-यती पूर्णत अपरिग्रहवादी दिसतात आत्मगुणाच्या साधनेत ते आपले कल्याण समजतात भगवद्गीतेतही ऋषी, मुनी व यतीचे स्वरूप विशद केले आहे तेथे मुनीना सयमी, विकाररहित व मोक्षपरायण मानले आहे तर यतीला कामक्रोधरहित, सयतचित्त आणि वीतराग म्हटले आहे--

**यतेद्रियमनोबुद्धिर्मुनिर्मोक्षपरायणः ।**
**विगतेच्छाभयक्रोधो यः सदा मुक्त एव सः ॥**

— गीता, ५/२८.

जो इद्रिये, मन, बुद्धी यावर विजय मिळवितो, मोक्षमार्गावर रत असतो तो मुनी होय त्याच्या इच्छा, भय, क्रोध इत्यादी सर्व वासना नष्ट होतात व तो मुक्त झाल्यासारखाच असतो

**दुःखेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः ।**
**वीतरागभयक्रोधः स्थितधीर्मुनिरुच्यते ॥**

— गीता, २/५६

ज्याचे मन दु खामुळे उद्विग्न होत नाही व सुखप्राप्तीमध्येही जो स्पृहालू बनत नाही, तसेच आसक्ती, भीती, क्रोध इत्यादी मनोविकार ज्याचे नष्ट झाले असून ज्याची बाह्यप्रवृत्ती स्थिरावली आहे त्याला मुनी म्हणतात

**कामक्रोधवियुक्तानां यतीनां यतचेतसाम् ।**
**अभितो ब्रह्मनिर्वाणं वर्तते विदितात्मनाम् ॥**

— गीता, ५/२६.

जो कामक्रोधरहित, सयमी आणि आत्मज्ञानी असतो त्याला यती म्हणतात त्याला निर्वाणपदाची प्राप्ती होते

### उग्र व्रताचरण

असे हे मुनी व यती वैदिक परपरेतील मुळीच नाहीत **सामवेदीय ताण्डयब्राह्मण** व **लाटचायन-कात्यायन-आपस्तवीय श्रौतसूत्रांमध्ये** त्याना शुद्ध करून आपल्या परपरेत सामावून घेण्यासाठी **व्रात्यस्तोम** नावाचा विधी सागितला आहे **हे व्रात्यही ऋषभाच्या परपरेतीलच मुनी होत.** त्याची व्रते फारच आग्रही व खडतर असल्यामुळेच त्याना व्रात्य म्हटले आहे (अथर्ववेद, अध्याय १५) ते स्पष्टत वेदविरोधी असल्याने वैदिकाच्या कोपाला बळी पडले मात्र **प्रश्नोपनिषदामध्ये**—

**व्रात्यस्त्वं प्राणैक ऋषिरत्ता विश्वस्य सत्पतिः ।**

या शब्दात त्याच्याविषयी आदरभाव व्यक्त केला आहे शांकरभाष्यामध्येही व्रात्याचा अर्थ—

**स्वभावतः एव शुद्ध इत्यभिप्रायः ।**

असा सागितला आहे ही परपरा ऋग्वेदामध्ये विस्कळीत स्वरूपात आढळत असली तरी तिचे अस्तित्व मात्र नाकारता येत नाही यातील काही स्थळाचा परिचय यापूर्वीच करून दिलेला आहे

### वातरशना मुनी

**श्रीमद् भागवतामधील स्कध ५, अध्याय ७ मध्ये ऋषभाचे चरित्र** सागितले आहे प्रत्यक्ष विष्णूने **वातरशना श्रमण मुनींचा धर्म प्रगट करण्यासाठी ऋषभावतार** घेतला असा त्या अवतारहेतूसबधी स्पष्ट उल्लेख आहे (५/३/२०) शिवाय याच पुराणात तोच हेतू स्पष्ट करण्यासाठी—

**अयमवतारो रजसोपप्लुत-कैवल्योपशिक्षणार्थः ।**

— भागवतपुराण, ५/६/१२.

असे म्हटले आहे **रजोधारण वृत्ती, जैन मुनींच्या देहमलधारणरूप** अस्नान इत्यादी मूलगुणाची **निर्देशक** आहे जैन मुनीचा **मलपरिषह** देखील प्रख्यात आहे ते व्रत इंद्रिय—सयमाचे एक आवश्यक अग आहे असे व्रतिक **रजोजल्लिक समण मुनी** या नावानेही प्रसिद्ध आहेत याच प्रणालीतील मुनीना वेदग्रथामध्ये **वातरशना** हे विशेषण लावलेले आहे—

वातरशना ह वा ऋषयः श्रमणा ऊर्ध्वमन्थिनो
बभूवुस्तानृषयोऽर्थमायँस्ते
निलायमचरँस्तेऽनुप्रविशुः कूश्माण्डानि तॉंस्तेषु
अन्वविन्दञ्छ्रद्धया च तपसा च–, इति ।

— कृष्णयजुर्वेदीय तैत्तिरीयारण्यक, प्र २/अनु ७

येथे वातरशना ऋषी म्हणजेच जैन श्रमण मुनी अशी स्पष्टातिस्पष्ट व्याख्याच उपलब्ध आहे याशिवाय ऋग्वेदातील उल्लेख पहा—

मुनयो वातरशना· पिशंगा वसते मलाः ।
वातस्यानु ध्राजिं यन्ति यद्देवासो अविक्षत ॥ २ ॥
उन्मदिता मौनेयेन वातॉं आतस्थिमा वयम् ।
शरीरेदस्माकं यूयं मर्तासो अभि पश्यथ ॥ ३ ॥

— ऋग्वेद, १०/१३६/२-३

वातरशना मुनी मल धारण करतात. त्यामुळे ते पिंगट दिसतात जेव्हा ते प्राणवायूवर तावा मिळवितात तेव्हा ते तपाच्या महिमेने देवतास्वरूप होतात (२) ' आनंदात मग्न होऊन आम्ही वायूप्रमाणे वघनरहित होतो तेव्हा तुम्ही मर्त्य लोक आमचे हे फक्त वाह्य शरीरच पाहू शकता ' (३)

श्रेष्ठ मुनींची ही एक उत्कृष्ट ध्यानमय अवस्था आहे अशा ह्या प्रकारच्या मुनींचा मार्ग समण भगवान ऋषभनाथानीच प्रस्थापित केला आहे ध्यानमार्गी मुनींच्या प्रणालीमध्ये ते स्वत ज्येष्ठ आणि श्रेष्ठ होते त्याशिवाय या वावतीत डॉ मगलदेव शास्त्रींचे मतही विचारार्ह आहे त्यानी ऋग्वेदीय वातरशना मुनींना आणि केशी मुनींना स्पष्ट शब्दात दिगवर मुनी म्हटले आहे ' भारतीय सस्कृति का विकास : औपनिषद् धारा ' ( पान १८० ) या आपल्या हिंदी ग्रथात ते लिहितात—

" ऋग्वेद के एक सूक्त (१०/१३६) में मुनियों का अनोखा वर्णन मिलता है। उनको वातरशना– दिगंबर, पिशंगा वसते मला– मृत्तिकाको धारण करते हुए पिंगल वर्ण और केशी– प्रकीर्ण केश, इत्यादि कहा गया है। यह वर्णन श्रीमद् भागवत ( पंचम स्कंध ) मे दिये हुए जैनियो के आदि तीर्थंकर ऋषभदेव के वर्णन से अत्यंत समानता रखता है। वहां स्पष्ट

शब्दो मे कहा गया है कि ऋषभदेव ने वातरशना श्रमण मुनियो के धर्मों का प्रगट करने की इच्छा से अवतार लिया था।"

## वैदिक परंपरेमध्ये ऋषभांची उपासना

पुराणपरंपरेमध्ये वेदग्रंथापेक्षा ऐतिहासिक तथ्ये जास्त प्रमाणात आढळतात तेथे त्यांची मांडणी सुसंगतवार करण्याचा प्रयत्न झालेला आहे. वैदिक शब्द-समुच्चयातील संदिग्धतेचा परिहार करून विधाने अधिक स्पष्टपणे मांडली आहेत त्याचा विचारपूर्वक अभ्यास केला तर वैदिक पदाचाही अर्थ स्पष्ट होऊ लागतो. या दृष्टीने पुराणग्रंथांना, ते वेदापेक्षा पुष्कळच अर्वाचीन असूनही, अधिक महत्त्व आहे. भागवतामध्ये (५/३/२०) ऋषभांना विष्णूचा अवतार मानून त्यांचे चरित्र आदरपूर्वक हाताळले आहे. त्या वृत्तान्तातील मूळ तथ्ये जैनांच्या पारंपरिक इतिवृत्ताशी सुसंगतच आहेत. विष्णुपुराणातही याच विधानाला पुष्टी मिळते आणि शिवपुराणात (७/२/९) तर त्यांना शंकराचे अवतार मानले आहे. ऋषभनाथ परमेश्वराचे अवतार असल्याची मान्यता प्राचीन काळापासूनच चालत आली आहे, अगदी ऋग्वेदातही– 'मुनिर्देवस्य देवस्य सौकृत्याय सखा हित.।' (१०/१३६/४) देवाधिदेवाचे (अवतार असलेले) हे मुनी उपकारी, हितकारी सुहृद आहेत असे म्हटले आहे.

भागवतामध्ये त्या ऋषभावताराचा हेतू श्रमण मुनींचा धर्म संस्थापित करणे (५/३/२०) आणि त्यांना अस्नानव्रती, मलोपसर्गजयी अशा (जैन) मुनिमार्गाने केवलज्ञानाच्या प्राप्तीचे शिक्षण देणे (५/६/१२) असा स्पष्टपणे सांगितला आहे. तेथेच ब्राह्मणोत्पत्तिमार्तण्ड, प्रकरण ५८ मध्ये त्या मुनिमार्गाविषयी योजलेल्या 'दिगंबराणा तपस्विनां ज्ञानिनां' इत्यादी पदामध्ये ज्ञानी, तपस्वी व दिगंबर अशा जैन-धर्म-प्रणालीचा स्पष्टपणे उल्लेख केला आहे. डॉ. मंगलदेव शास्त्रींच्या मताला हा फार मोठा आधार आहे. शिवाय शिवाचे अवतार हे रामावतार व कृष्णावतार यापेक्षा अतिप्राचीन मानलेले आहेत. त्यामुळे जैनधर्माची प्राचीनता वैदिकादी जैनेतर पुराव्यांनीच सिद्ध होते. या जैनधर्मीय श्रमण मुनिमार्गाच्या प्राचीनतेला ऋग्वेद आणि कृष्ण-यजुर्वेदासारख्या प्राचीनतर वेदग्रंथांचीही अनुकूल साक्ष आहे.

अथर्ववेदातील काही भागही ऋग्वेदाइतका किंवा त्याहूनही प्राचीन असावा. तेथेही ऋषभप्रणीत जैन मुनिमार्गाची व त्याच्या जीवनदृष्टीच्या व्यवहाराची माहिती मिळते (विभाग १५). कृष्ण यजुर्वेदीय तैत्तिरिय आरण्यक, प्रथम भाग, प्रश्न २ अनु. ७ मधील जैन श्रमण मुनी व वातरशना मुनी यांच्या एकत्वासंबंधी

आणि पूज्यत्वासंबंधी एक अवतरण येथेच पान १९३ वर सादर केले आहे त्याशिवाय पुढील ओळीही विचारार्ह आहेत--

**मरुत्वन्तं वृषभं वावृधानमकवारिं दिव्यं शासमिन्द्रम् ।**
**विश्वासाहमवसे नूतनायोग्रं सहोदामिहतं हुवेम ।**
**उपयामगृहितोऽसीन्द्राय त्वा मरुत्वत एष ।**
**ते योनिरिन्द्राय त्वा मरुत्वते ( १ ) ।**

— कृष्ण० तैत्ति० संहिता, १/४/१७.

Him with the Marutas, the mighty Vṛsabha,
The bountiful, The divine ruler, Indra,
All- powerful, the real, Giver of strength,
For present aid let us invoke

- Keith

ऋषभाचे दातृत्व उदार आहे, तोच लोकोत्तर प्रजापाल आहे सर्वश्रेष्ठ इद्र, अनत ऋद्धिधारी, सनातन आणि वीर्यप्रदाताही तोच आहे। म्हणून तावडतोबीच्या मदतीसाठी, मरुताच्या समवेत असणाऱ्या सामर्थ्यशाली वृपभाची आळवणी करू या

## केशी

ऋषभ, वृषभ, सिसिनदेव, नारायण, महादेव, कैवल्यपती, रजोजल्लिक, स्वर्दृश, देवाधिदेव, केशी, मुनी, यती, वातरशना, व्रात्य, हिरण्यगर्भ, परमहस, श्रमण, दिगबर, जिन इत्यादी पदावली समानार्थी असून समान शीलाचार दर्शकही आहेत या सर्व शब्दावलीतून एक सुसगत अभ्यास करता येतो त्यासाठी भागवतादि पुराण-ग्रथातून पुष्कळ सामग्री उपलब्ध होऊ शकते त्यातून ऋषभनाथांचे चरित्र, त्याचे व्यक्तिमत्व व त्याचे कार्य इत्यादी सबधी ऐतिहासिक वृत्तान्त सादर करता येईल यापैकी पुष्कळशी विशेषणे प्रत्यक्ष ऋषभाची अभिधान-व्यपदेश-सबोधनात्मक गुणबोधकेच आहेत, किंवा त्यांच्याच आचारप्रणालीतील मुनींचा उल्लेख करण्यासाठी वापरलेली आहेत या प्रकारच्या मुनीची साधना व तपश्चर्या याचा तुलनात्मक अभ्यास बोधप्रद ठरेल।

केशी याचा अर्थ केशधारी असा होतो मात्र प्रसिद्ध टीकाकार सयणाचार्यांनी त्या शब्दाचा अर्थ- 'केशस्थानीय रश्मीचा धारक' असा केला असून त्यातून 'सूर्य' असा अर्थ काढण्याचा प्रयत्न केला आहे. परतु वातरशना मुनीबरोबर त्या अर्थाची सुसगती जमत नाही केशी स्पष्टतः वातरशना मुनिसघाचे अधिनायक आहेत त्याच्या आचार-साधनेत मलधारण (मल परिषहजय), मौनवृत्ती, इद्रियनिग्रह,

आकिंचन्य, अपरिग्रह, केवलज्ञानाची उपासना, दिगवरवृत्ती इत्यादी गोष्टी प्रमुख आहेत त्या केशी सूक्तात अशा मुनीचेच वर्णन आहे ऋग्वेदामध्ये (१०/१०२/६) वृषभानाच केशी म्हटले आहे. पुढे (ऋ १०/१३६/४) केशीला महान हितकारी व उपकारी मुनी असे स्पष्ट म्हटले आहे. सायणाचार्यांनी देखील वृषभ व केशी याचा वाच्यार्थ पहिल्यादा वेगळा सागितला परतु प्रकारान्तराने पुन म्हटले की– 'अथवा, अस्य सारथि' सहायभूतः केशी प्रकृष्टकेशो वृषभः अवावचीत् भ्रशमशद्वयत्' इत्यादि. अशा प्रकारे केशी, वातरशना, श्रमण, वृषभ किंवा ऋषभ याच्या एकत्वाचा बोध व त्याचे पूर्ण समर्थन ऋग्वेदातच आढळते

## वृषभ

याशिवाय भागवतामध्ये (५/३/२०)– ' वातरशनाम् श्रमणानाम् ऋषीणाम् उर्ध्वमन्थिनाम् ' असा त्याचा श्रमण-मुनि-वाचक अर्थ स्पष्ट करून सागितला आहे पुढे तेथेच ( भा. पु ५/६/१२ ) त्याना 'रजसोपप्लुत' म्हटले आहे. तसेच ऋग्वेदामध्ये पुष्कळ ठिकाणी वृषभ याचा अर्थ बैल असा असला तरी आराध्य देवताच्या प्रार्थनेच्या सदर्भात त्या प्रकारचा चतुष्पाद प्राणी असा अर्थ निश्चितपणे होऊ शकत नाही ऋषभनाथ हे वृषभध्वज आहेतच. त्यामुळे त्या दोन शब्दाचे सान्निध्य आढळणे साहजिकच आहे पण श्रेष्ठ देवताचे आवाहन करण्याचा प्रसग प्रस्तुत असताना बैल असा अर्थ काढणे समर्थनीय आणि स्वीकारणीय होणार नाही. प्रार्थनेत बैलाचे आवाहन दिव्यत्वासाठी करणे सुसगत नव्हे ' त्यासाठी ऋग्वेदातीलच ऋचा पहा–

> **ककर्दवे वृषभो युक्त आसीद्**
> **अवावचीत् सारथिरस्य केशी ।**
> **दुधर्युक्तस्य द्रवतः सहानस**
> **ऋच्छन्ति मा निष्पदो मुद्गलानीम् ।।**
>
> – ऋग्वेद, १०/१०२/६

केशधारी वृषभ हे मुद्गल ऋषीचे ज्ञानी नेते (सारथी) होते. शत्रूचा नाश करण्यासाठी त्याची नियुक्ति केली होती रथरूपी शरीराबरोबर जुपलेली मुद्गल ऋषीची गायरूपी इद्रिये दुर्धरतेने पळत होती (चचल बनली होती). तेव्हा वृषभाच्या तोडून शब्द (उपदेश) बाहेर पडल्याबरोबर ती इद्रिये निश्चल झाली (स्थिरावली) आणि मुद्गल ऋषीच्या अतरगाकडे (मौद्गलानी) वळली– आत्मवर्ती झाली तात्पर्य :- निग्रहण सुटल्यामुळे मुद्गल ऋषीची इद्रिये परागमुख (विषयोन्मुख) झाली होती. पण अतिशय ज्ञानसपन्न अशा केशधारी वृषभाचा धर्मोपदेश ऐकून ती इद्रिये अतर्मुख बनली

याच ज्ञानसपन्न (केवलज्ञानी) केशी वृषभाची व त्याच्या दिव्य ज्ञानाची स्तुती ऋग्वेदामध्ये कोणत्या प्रकारे शब्दाकित झाली आहे हे पाहणे प्रसगोचित ठरेल ही पुढील स्तुती वातरशना मुनीच्या वर्णनाच्या सदर्भात प्रस्तुत केली आहे. यावरुन केशी हे त्या मुनिसघाचे अग्रणी आहेत हेच तथ्य स्पष्ट होते. या सदर्भात केशाचा अर्थ सूर्य असा होत नाही कारण त्याचा सदर्भ वातरशना मुनीकडे आहे हे उघड आहे त्या सर्व मुनिसघामध्ये केशधारी ऋषभ प्रधान आहेत–

**केश्यग्नि केशी विषं केशी बिभर्ति रोदसी ।**
**केशी विश्वं स्वर्दृशे केशीदं ज्योतिरुच्यते ।। १ ।।**
**अंतरिक्षेण पतति विश्वारूपावचाकशत् ।**
**मुनिर्देवस्य देवस्य सौकृत्याय सखा हितः ।। ४ ।।**

– ऋग्वेद, १०/१३६/१व४.

केशी (मुनी) अखिल विश्वातील व स्वर्गातील सर्व पदार्थांना जाणतात– पाहतात अग्नी, पाणी, आकाश व पृथ्वी या सर्व ठिकाणी केशीची ज्ञानदृष्टी व्यापलेली आहे केशीलाच प्रकाशमान (ज्ञान)–ज्योती म्हणतात– केवलज्ञानी म्हणतात ते अतराळातून विहार करतात विश्वातील सर्व तत्त्वांचे विवेचन करतात. ते ज्ञानधारी मुनी देवाधिदेवाचेही उपकारी हितकारी आणि सुहृद आहेत

## हिरण्यगर्भ

हिरण्यगर्भ हे विवरणही आदिराज ऋषभनाथाचेच आहे ते जैनधर्मीय प्रथम तीर्थंकर आहेत तीर्थंकराची सामान्य जनापेक्षा आणि इतर शलकापुरुषापेक्षाही काही वैशिष्टये असतात त्याचे गुणही इतराच्या मानाने अतिशयतेने भारावलेले असतात त्या सर्वात प्रमुख वैशिष्टय म्हणजे पाच कल्याणक महोत्सव. तीर्थंकराचा जीव जेव्हा गर्भात येतो तेव्हा त्या निमित्ताने जो कल्याणकोत्सव होत असतो त्याला गर्भकल्याण महोत्सव म्हणतात तेव्हा इद्राच्या आदेशाप्रमाणे कुबेर गर्भकालामध्ये नित्य हिरण्यवर्षा करीत असतो ऋषभनाथ हे पहिलेच तीर्थंकर तेव्हा प्रसगाचे लोकाना नवल वाटले आणि त्याची हिरण्यगर्भ अशी ख्याती पसरली. त्याच्या सदर्भात या गुणविशेषणाचा उपयोग वेदग्रथातही केलेला आढळतो–

**हिरण्यगर्भः समवर्तताग्रे भूतस्य जातः पतिरेक आसीत् ।**
**स दधार पृथिवीं द्यामुतेमां कस्मै देवाय हविषा विधेम ।।**

– यजुर्वेद, १३/४, २३/१ व २५/१०
आणि अथर्ववेद, ४/२/७.

हिरण्यगर्भ (ऋषभ)च सर्व देवतांचे अग्रणी आहेत सर्व भूतमात्राचे तेच एकमेव पालक आहेत (पूर्वजन्मी) स्वर्गाला आणि या (जन्मी) पृथ्वीलाही त्यांनीच आधार दिला आहे तेव्हा (त्याच्याशिवाय) दुसऱ्या कोणत्या देवाला आपण हवी अर्पण करावा ?

ज्याप्रमाणे वातरशना मुनींचा अभ्यास करण्यास भागवत पुराणाची मदत होते त्याचप्रमाणे शिवपुराणाच्या मदतीनेही काही अस्पष्ट अशा ऋग्वेदीय ऋचांचा अर्थ अधिक स्पष्टपणे लावण्यास हरकत नसावी. शिवपुराणामध्ये (७/२/९) ऋषभनाथाची गणना शिवाच्या प्रसिद्ध अठ्ठावीस योगावतारांमध्ये केलेली आहे तेथेही त्याचा आदर मोठ्या प्रमाणात केलेला आढळतो. म्हणून त्या प्रकाशात ऋग्वेदातील 'त्रिधा बद्धो वृषभो रोरवीति महादेवो मर्त्यानाविवेश ।' (४/५८/३) या ऋचाचा अर्थ– '(ज्ञान–दर्शन-चारित्र) या तीन गुणांनी युक्त असे ऋषभ एक महान देवता होत त्यांनी या मर्त्य जगामध्ये विहार केला आणि (आपल्या दिव्यध्वनीने) धर्म घोषणा केली ' असा करण्यास कोणतीच हरकत दिसत नाही. वेदाचा सुनिश्चित अर्थ लावण्यास कोणीही विद्वान अद्याप तरी पूर्णपणे यशस्वी झालेला नाही केशी, वृषभ, ऋषभ, वातरशना, महादेव व हिरण्यगर्भ यांच्या संबंधीच्या सर्व वेदवचनांचा सूक्ष्म अभ्यास केल्यास त्यातील रहस्य पूर्णत. उलगडल्याशिवाय राहणार नाही. याच संदर्भात ऋग्वेदातील (७/२१/५ आणि १०/९९/३) सिश्निदेवासंबंधीच्या (नग्नदेव) ऋचाकडेही लक्ष देणे योग्य आहे अशा सर्व अभ्यासामुळे जैन धर्माच्या प्राचीनतेवर चांगलाच प्रकाश पडेल !

## इतिहासातील प्राचीनतमता

आज जितका इतिहास ज्ञात आहे त्यामध्ये सर्वांत महत्त्वाची, सर्वांना पूज्य आणि सर्वांमध्ये प्राचीन अशी थोर विभूती म्हणजे भगवान ऋषभनाथच होत ऋग्वेदात (ऋषभ मा समानाना ..... १०/१६६/१ इत्यादि) अनेक ठिकाणी त्यांना एक सर्वश्रेष्ठ दैवत कल्पून त्यांची स्तुती केली आहे भागवतपुराण (५/६/८ ते ११) तसेच विष्णुपुराण, शिवपुराण इत्यादी ग्रंथातील तीनही पुराण परंपरेत त्यांना सर्वोच्च परमात्म्याचा अवतार मानून त्यांची भक्ति केलेली आहे. हे आतापर्यंतच्या अनेकविध अवतरणांच्या निरीक्षणावरून आपण जाणलेले आहे आणि ज्या परंपरेतून या वर्षाला व्यक्तिवाचक नावे देण्याची पद्धती प्रचलित झाली त्याच परंपरेचे ऋषभनाथ हे केन्द्रबिंदू आहेत. म्हणून भागवतपुराणा (५/४/३) मध्ये निर्देश केल्याप्रमाणे नाभि-भरत यांच्या मध्यकालामध्ये या वर्षाची ख्याति भगवान ऋषभांच्या नावावरूनच सर्वत्र पसरली असणे सर्वार्थाने समर्थनीय ठरते. पण त्यांच्या व्यक्तित्वातील तीर्थंकरत्व फारच प्रभावी असल्याने नामकरणासारख्या

लौकिक बाबींची नोंद फारशी घेतली गेली नसावी. तरी पण 'ऋषभवर्ष' व 'भगवान वर्ष' या नामकरणाला निश्चित स्वरूपाची इतिहासाची साक्ष आहे

**पूजार्हता**

**यं नत्वा पुनरानमन्ति न परं स्तुत्वा च यं नापरं**
**भव्याः संस्तुवते श्रयन्ति न परं यं संश्रिताः श्रेयसे ।**
**यं सत्कृत्य कृतादरं कृतधियः सत्कुर्वते नापरम्**
**स श्रीमान् वृषभो जिनो भवभयान्नस्त्रायतां तीर्थकृत्**

— महापुराण, ३७/२०५.

भव्य जीव ज्याना नमस्कार केल्यावर पुन दुसऱ्या कोणालाही नमत नाहीत, ज्याची स्तुती केल्यावर पुन दुसऱ्याची करीत नाहीत, स्वत च्या अभ्युदयासाठी ज्याचा आश्रय घेतल्यावर पुन दुसरा आश्रय शोधीत नाहीत, ज्याची पूजा करून कृतकृत्य झाल्यामुळे पुन केव्हाही दुसऱ्याचा आदरसत्कार करीत नाहीत, असे सर्वश्रेष्ठ केवली भगवान वृषभनाथ तीर्थंकर आमचेही ससारदु ख नष्ट करोत

रत्नाकरकवींनी आपल्या भरतेशवैभव ग्रथामध्ये भगवान ऋषभनाथाचा उल्लेख करीत असताना यत्र तत्र अत्यत गौरवास्पद अभिधाने वापरली आहेत त्या सर्वांची जत्री करणे अभिमानास्पद असले तरी तो मोह आवरणे भाग आहे म्हणून येथे वाणगीदाखल अल्पसा उल्लेख देत आहे—

**श्रीमन्महात्रैलोक्यराजेन्द्रमस्तकमणिगणकिरणप्रस्तारितांघ्रिपयोज-**
**पूतिकर्मस्तोममथनविक्रम- त्रिजगदन्तर्बहिरवगमेक्षण-**
**त्रिजगदद्भुतशक्तियुत- अजरानन्तसौख्ययुत- श्रीवृषभेश्वरः ।।**

— भ. वै , दिग्विजय, अकमालासन्धि

**नित्यानुभूत-निजलाभविवृत्ततृष्ण' ।**
**श्रेयस्य तदनया चिरसुप्तबुद्धेः ।।**
**लोकस्य यः करुणयाऽभयमात्मलोकम् ।**
**आख्यन्नमो भगवते ऋषभाय तस्मै ।।१९।।**

— भागवतपुराण, ५/६/१९.

आत्मगुणांची सिद्धी प्राप्त झाल्याने आत्मिक आनदामध्येच सदैव दग राहून जे स्वत सर्व प्रकारच्या ऐहिक तृष्णेपासून पूर्णपणे परावृत्त झाले आहेत आणि त्याच्याच मार्गाने आपापले श्रेय साधण्यासाठी दीर्घ-कालीन झोप टाकून जागृत झालेल्या लोकाना कारुण्य व अभय या तथ्यानी परिपूर्ण अशा उपदेशामृताने जे आत्मतत्त्वाचे विवरण करतात त्या भगवान ऋषभदेवाना नमस्कार असो.

: ९ :

# भारत - गौरव

निवासं भारते वर्षे आकाङ्क्षन्ति सदा सुराः ।
न भारतसमं वर्षं पृथिव्यामस्ति भो द्विजाः ।।

— ब्रह्मपुराण, २७/७२

# १ : भारत - गौरव

## नामकरणातील स्मृतिप्रेरणा

या पुण्यशील भारतभूमीवर अत्यत प्रतापशाली व यशशाली असे कित्येक राजे होऊन गेले परतु ज्याच्या नावावरून एवढ्या मोठ्या विशाल देशाचे नव्याने नामकरण झाले असे भाग्यशाली राजे केवळ तीनच पुष्कळ पराक्रमी आक्रमक व प्रशासक बाहेरूनही आले येथे सत्ताधीश बनले दीर्घ काल राहिले. त्यातून काही परत गेले तर काही येथेच विलीन झाले काही विभक्तही झाले काहीनी स्वत च्या, पुत्र-पौत्राच्या किंवा इतर प्रिय व्यक्तीच्या नावाने नवी नगरे वसविली काही स्थळाची पूर्व नावे बदलून ती स्वानुकूल केली पण भरतवर्षाच्या विशालपणाच्या दृष्टीने ती नगण्यच ठरली

काहीनी आपल्या नावे नवीन सवत्सर सुरू करण्याचा प्रयास केला त्यातील थोड्याना यश मिळाले पण ते दीर्घकाळ टिकले असे मात्र क्वचितच घडले त्यातही विक्रमशक आणि शालीवाहनशक बऱ्याच प्रमाणात परिणामकारक ठरले आजही त्याचा वापर होताना दिसतो पण तो प्रादेशिकच आहे वर्षव्यापी एकही नाही याशिवाय आणखी काही रूढी प्रचलित आहेत पण त्याचा आवाका फारच लहान । आज आपल्यात ख्रिस्तसवत्सर अक्षरश वर्षव्यापी आहे भारत सरकारकडून त्यातही बदल करण्याचा प्रयत्न चालू आहे पण त्याचा प्रभाव कितपत परिणामकारी ठरत आहे, हे आपणास माहीत आहेच आज आपल्या जीवन व्यवहाराच्या कक्षा किती तरी विस्तारल्या आहेत आपण फक्त भारतातच गुतून राहू शकत नाही यास्तव जगात मोठ्या प्रमाणावर प्रचलित असलेली सनावळ आपण वापरतो यामध्ये त्यामागील अधिष्ठित व्यक्तीच्या आदरापेक्षा व्यवहारी भावच जास्त प्रभावी आहे हे स्पष्ट दिसते

काही प्रादेशिक [illegible] [illegible] [illegible] [illegible] [illegible]
बदलण्याला प्रथम ग्रीक आर्यांनी [illegible] [illegible] [illegible]
आक्रमणांनी [illegible] नाही. [illegible] [illegible] [illegible]
दिला नाही. [illegible] भारतास इंडिया व हिंदुस्थान [illegible] [illegible]
नावे मूळ [illegible] सिंधुप्रदेशा[illegible] [illegible] [illegible] [illegible]
[illegible] आहेत. त्या नावातून [illegible] [illegible] [illegible] [illegible]
अथवा [illegible] [illegible] नाही. [illegible] सिंधु प्रांताला किंवा [illegible]
प्रदेशाला[illegible] संपूर्ण भारत देश [illegible] [illegible] [illegible].

आज त्या प्रदेशातील बराच मोठा भाग भारताच्या राष्ट्रीय [illegible]
बाहेर आहे. तरी भारताच्या प्राकृतिक [illegible] [illegible] [illegible]
आपल्या सर्वप्राय देशाला हिंदुस्थान आणि इंडिया म्हणणारे [illegible] [illegible]! पण
त्या नावाना ती प्रतिष्ठा लाभत नाही जी की भारत या भरतवर्ष या [illegible]
अधिष्ठित आहे. भारत या [illegible] व्यक्तिमत्व [illegible] [illegible] [illegible] ?
त्या [illegible] आधारलेला आदरभाव आणि [illegible] [illegible] [illegible]
केवळ भारताधिष्ठित आहे! म्हणून आपल्या राष्ट्रीय घटनेने आपल्यासाठी
केवळ भारत व इतरांच्या नजरांसाठी इंडिया अशी दोनच नावे ग्राह्य केलेली
आहेत. इतराचा पूर्णतः परिहार झालेला आहे. [illegible] [illegible] इंडियाच्या
संदर्भातील [illegible] [illegible] टाकण्यासाठी इंडिया वगळून फक्त भारत हे एकच नाव
धारण करण्याचा विचार पुढे सरसावत आहे.

पूर्वीचे नाव बदलून ज्या भरतचक्रवर्तीमुळे या देशाने आपले नाव नव्याने उजळविण्यात आले त्याचा इतिहास सूर्यप्रकाशाइतका स्पष्ट आहे. आज विद्यमान असलेल्या भारत वा भरतवर्ष नावापूर्वी अजनाभवर्ष किंवा नाभिवर्ष हे नाव प्रचलित होते. तेही भरतचक्रीच्याच पूर्वजांच्या परंपरेतून निष्पन्न झालेले होते. हेही तितकेच स्पष्ट आहे. त्यापूर्वीचेही नाव उपलब्ध झालेले आहे. ते होते हैमवत किंवा हिमवर्ष. मात्र ते कोणा एखाद्याच्या व्यक्तित्वाचे निदर्शक नव्हते. या आपल्या वर्षाची उत्तरीय मर्यादा आखणारा मानदण्ड जो आजचा हिमालय किंवा पूर्वीचा हिमवत नावाचा महान पर्वत आहे, त्याच्याच नावावरून त्या वर्षधर पर्वताच्या दक्षिणेकडील थेट सागरापर्यंतचा सर्व क्षेत्रविभाग ओळखला जात होता. कृतयुगाच्या फार पूर्वी जोपर्यंत असे एखादे भारदस्त व्यक्तिमत्व जन्मलेच नव्हते तोपर्यंत हे सीमादर्शक भौतिक नाव प्रचलित राहिले होते.

## वर्षनामकरणाचे उदात्तीकरण

मात्र जेव्हा या देशाला अलौकिक व्यक्तिमत्व असलेल्या थोरातिथोर विभूती लाभल्या तेव्हा या वर्षाने त्यांच्या नाम-सौभाग्याचे लेणे स्वीकारले

युगारंभाच्या प्रक्रिया-कालामध्ये एकाच परंपरेत एका पाठोपाठ अवतरलेल्या तीनही महापुरुषांना दुरंगी-तिरंगी व्यक्तिमत्व लाभले त्यांच्या जीवनकाळी कालपरिवर्तनाचा वेग महान होता. पृथ्वीवरील नैसर्गिक अवस्थांतर स्वतःच्या अंगावर पेलणारी आणि त्याचवेळी प्रजानुकूल स्थिती निर्माण करण्यास सर्वार्थाने समर्थ असणारी तीन नररत्ने एकाच कुलमालिकेत सातत्याने गुंफल्याचे उदाहरण दुसरीकडे नसेल ! तो युगारंभ, ती कुलपरंपरा, ती नररत्ने आणि तो देश सर्वच एकापेक्षा एक धन्य होत

कृतयुगाच्या भल्या पहाटे उगवलेला शुक्राचा तेजस्वी तारा म्हणजे नाभिराज होत ते जसे कुलकर-कुळातील कंठमणी होते तसेच ते अर्भकारोग्याचे अधिनायक होते नाळकर्म त्यांच्याच कर्तृत्वाचे स्वास्थ्यफल होय शिवाय समाज-जीवनाचा कणा असलेल्या शासनसंस्थेची प्रेरणा प्रथमतः त्यांनीच दिली या प्रेरणेला क्रियाशीलता प्राप्त करून दिली ती त्यांच्याच पुत्राने- ऋषभदेवाने कृतयुगीन सर्व जीवनकलांचे प्रणेते, राज्यसंस्थेच्या प्रांगणातील प्रथम विश्वकर्मा आणि सर्वोदय तीर्थाचे आद्य प्रवर्तक अशा अनेकविध जीवनक्षेत्रात ते विश्वगुरू ठरले जीवन-व्यवस्थेचा पाया ऋषभपिता नाभींनी घातला तर त्यावर ऋषभदेवांनी शुभंकर जीवनमंदिर उभे केले आणि त्याच्या शिखराची पूर्ती केली ती ऋषभपुत्र भरताने त्याने दण्डशासनाचे जनकत्व, चक्ररत्नाचे स्वामित्व आणि भरतदेश वैभवाचे भोक्तृत्व अन्वर्थक करून जीवनातील सामाजिक व्यवस्थेचा आणि सुखाचाही कळस गाठला. परिणामी या वर्षाचे उदात्तीकरण घडून आले ते इतके की देवादिक उच्च कोटीतील जीवांनाही या भारताचा हेवा वाटू लागला येथील जीवन इतके विलोभनीय होते की यक्ष - किन्नर - गंधर्वादिकांनाही ही भूमी अक्षरशः स्वर्गादपि गरीयसी आहे हे प्रत्यक्ष पटले म्हणून स्वस्थाने सोडून त्यांनी भारतीय क्षेत्रविभागात मनसोक्त विहार केला आणि या भूमीचे उतराई होण्यासाठी तिच्या चरणी स्तुति-सुमनांजली मनोभावे वाहिली

या इतिहासावरून पूर्वकालीन भारतीय सम्राटांमध्येहि ऋषभपुत्र भरतचक्रीचे स्थान कोणते होते हे प्रगटपणे दिसते त्याच्या अंगी दोन्ही प्रकारचे सामर्थ्य होते काही व्यक्ती दैवाने थोर ठरतात तर काही स्वतःच्या कर्तबगारीच्या जोरावर थोर बनतात भरतचक्री मात्र दिव्यपुरुष आणि कर्मपुरुषही असल्याने त्याची गणना शलाका पुरुषांमध्ये झाली आहे त्याचे आत्मबल अतर्क्य होते त्यांना तर्कातीत पुरुषार्थ-साधना जमली ते प्रतिभाशाली विद्यार्थी होते प्रतापी राजकुमार होते न्यायवंत प्रशासक होते समर्थ प्रजापाल होते वर्षान्त भूमी पादाक्रान्त करणाऱ्या चक्रवर्तींमध्ये त्यांचे कर्तृत्व आजही आद्यस्थानी विराजते मानवी आणि दैवी ऐश्वर्य भोगण्यात ते पुण्यशील होते गरजूंचे पालन-पोषण करण्यात भरणशील

होते धर्माचरणात संयमशील होते आणि राज्यत्याग करून मोक्ष-साधना सिद्ध करण्यात केवळ आर्षभ होते

## भरताची पुण्यशीलता

भरताच्या चरित्राला लोकाच्या मनात अलौकिक स्थान होते लोकाची अशी धारणा निर्माण झाली होती की त्याचे चरित्र ऐकल्याने व सांगितल्याने सर्व कामना सफल होतात मानव – महामानव – अतिमानव अशा प्रणालीतून त्याच्या व्यक्तित्वाचे उदात्तीकरण संपन्न झाले होते त्याच्यात दैवी शक्तीचा संचार होता सर्वसाधारण लोकाच्या मनात त्याच्या व्यक्तित्वासंबंधी मोठा आदरभाव होता भागवत पुराणात एके ठिकाणी म्हटले आहे की– हे राजन् ! भरताचे मन भगवद्भक्तीने भरलेले आहे त्याचे गुण निर्मळ असून राजर्षी भरताचे कर्मशील चरित्र कल्याणप्रद आहे त्याचे पुण्यस्मरण आयुष्य वाढविणारे, संपत्तीचे संवर्धन करणारे, यश देणारे असून स्वर्ग–मोक्षाच्या सिद्धीलाही साधनीभूत आहे आणि–

> आर्षभस्येह राजर्षेर्मनसापि महात्मनः ।
> नानुवर्त्मार्हति नृपो मक्षिकैव गरुत्मतः ॥ ४२ ॥
> यो दुस्त्यजान् दारसुतान् सुहृद्राज्यं हृदिस्पृशः ।
> जहौ युवैव मलवदुत्तमश्लोकलालसः ॥ ४३ ॥
>
> – भागवत, ५/१४/४२-४३.

ज्याप्रमाणे गरुडाच्या भरारीचे अनुकरण माशी करू शकत नाही त्याप्रमाणे ऋषभपुत्र भरत राजाच्या मार्गाचे अनुकरण दुसरा राजा केवळ विचारानेही करू शकत नाही तो राजर्षी महात्मा होता मनाला भुरळ पाडणाऱ्या म्हणूनच त्याग करण्यास अत्यंत कठिण अशा स्त्रियाचा, पुत्राचा, मित्राचा आणि राज्यवैभवाचाही त्या उत्तमश्लोक भरतराजाने तरुण वयातच त्याग केला त्या ऐहिक सुखाना त्याने तृणवत लेखले होते

## भरताने घडविलेला भारत

प्रजापालनाची भरतराजाची पद्धती कोणत्याही राजाला आदर्श होती ती केवळ भरतप्रणाली म्हणूनच प्रसिद्ध आहे ती पद्धत अवलंबणारा कोणीही नवा राजा भरत या पदवीस प्राप्त होतो आपल्या रामचरितमानस या नावाच्या लोकप्रिय ग्रंथात महात्मा तुलसीने भरत या पदाची निरुक्ती सांगितली आहे–

> बिस्वभरन पोषन कर जोई । ताकर नाम भरत अस होई ॥
>
> – रामचरितमानस, १/२२८/७

लौकिक व आध्यात्मिक क्षेत्रातील जीवनामध्ये लोकोत्तर समन्वय जीवनभर साधणे ही महान पुण्याची किमया आहे ही सिद्धी प्राप्त होण्यास केवळ भारताचीच भूमी पात्र आहे कारण येथील जीवनमार्ग लोकोत्तर पुण्यवन्तानीच घडविला आहे तरी पण त्याची पूर्ण सिद्धी भरतचक्रीसारख्या एखाद्याच सम्राटाला प्राप्त होते भरत हा केवळ भरतासारखाच असे म्हणण्याशिवाय गत्यतर नाही भरताच्या लोकोत्तर गुणाचा उल्लेख करताना भागवतकारानी म्हटले आहे--

**य इदं भागवतसमाजितावदातगुणकर्मणो राजर्षेर्भरतस्यानुचरितं स्वस्त्ययनमायुष्यं धन्यं यशस्यं स्वर्ग्यापवर्ग्यं वानुश्रृणोत्या-ख्यात्यस्य अभिनंदति च सर्वा एवाशिष आत्मन आशास्ते न कांचन परत इति ।**

— भागवत, ५/१५/४६.

राजर्षि भरताचे चरित्र, कल्याण, आयुष्य, सपत्ती व कीर्ती या लौकिक गुणाची प्राप्ती करून देण्यास समर्थ असून स्वर्ग आणि शेवटी मोक्ष या परम पुरुषार्थाच्या सिद्धीलाही ते साधनीभूत आहे कारण भरतचक्री परम भक्त असून त्याचे गुण आणि क्रिया उदात्त आहेत जो कोणी त्याच्या चरित्राचे श्रवण करतो, वर्णन करतो किंवा अभिनदन करतो त्याच्या सर्व कामना आपोआप सफल होतात आणि दुसऱ्यापासून केलेली कोणतीही अपेक्षा पूर्ण झाल्याशिवाय राहात नाही

अशा या भरताने घडविलेली आपली ही पुरातन भरतभूमी पूर्वकाळापासून स्वर्गापेक्षाही सुदर व सुखदायी म्हणून प्रसिद्ध आहे कारण येथे दिव्यत्वाचे अनुष्ठान आहे हे दिव्यत्व या भूमीवर भरतचक्रीच्या कर्तव्यातून आणि भरत राजर्षीच्या अतिम पुरुपार्थाच्या साधनेतूनच अवतरले आहे मानवी जीवनातील चारही पुरुषार्थांची आराधना समतोलपणाने साधून ती पूर्णत सिद्ध करण्याचा मार्ग भरत चक्रवर्तीनेच सर्वांना दाखविला आहे खऱ्या पुरुषार्थाला उत्तम पुरुषार्थही अपवर्ग मानण्याची गरज नसते. तीनच पुरुषार्थसिद्धीचा अपूर्ण मार्ग भरताला माहीत नव्हता त्याच्या परपरेत अपूर्णता कधी अवतरलीच नाही भरतपरपरा यशदायी असल्याने येथील पुरुषार्थ-साधनेचे मार्ग सर्व जगामध्ये श्रेष्ठ ठरले आहेत हा या भूमीतील जीवनमार्ग प्रत्यक्ष पाहण्यासाठी देवही उत्सुक बनतात हीच या भरतभूची थोरवी होय

**वित्थिण्णउ इह सिरि-भरहछेत्तु गंगाणईसिंधुहिँ विप्फुरंतु ।**
**जहिँ सरवरि उग्गय पंकयाइँ णं धरणिवयणि णयणुल्लयाइँ ।**
**जहिँ हालिणिरूवणिवद्धणेह संचल्लहिँ जक्ख ण दिव्वदेह ।**

— करकण्डचरिउ, १/३/३, ६ व ७.

या जंबूद्वीपामधील पुण्यशील भारतक्षेत्र विशाल आहे गंगा - सिंधू नद्यांमुळे त्याची शोभा वाढली आहे या भरतक्षेत्रातील सरोवरामध्ये उमलणारी कमलपुष्पे जणू धरणीमातेच्या चेहऱ्यावरील उल्हसित नेत्रपल्लवीच ! येथील शेतकरी स्त्रीच्याही रूपावर भाळल्याने स्वर्गीय शरीर धारण करणारे यक्ष देखील येथला मुक्काम हलवीत नाहीत.

## देवतांचे अधिष्ठान

या सबंध पृथ्वीतलावर सर्वांत रमणीय प्रदेश कोणता असेल तर तो भारतवर्षच होय कारण येथे धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष हे चारही पुरुषार्थ सफल होतात. येथील हिमालय, सागरतीरावरील वेलावन, सुरनदी गंगा इत्यादींचे अस्तित्व सर्व प्रकारचे दुःख हरण करण्यास आणि मानवी जीवनामध्ये श्रेष्ठ सांगल्याची प्रतिष्ठा करण्यास समर्थ आहे म्हणून भरतवर्ष खऱ्या अर्थाने सर्वसुंदर, शुभ व सुखकर आहे ज्यांना रमणीय आणि अरमणीय यांतील भेद खऱ्या अर्थाने समजतो ते सर्व बुद्धिवंत येथेच निवास करू इच्छितात कारण येथील प्रदेशात इष्ट दैवतांचे अधिष्ठान असून त्या मानवी सुखांना प्रेरणा देतात आणि त्यांची पूर्ती करतात धर्म व काम यांची सुसंगत संगती येथेच आढळते दैवी प्रेरणा आणि मानवी भोग येथेच एकवटतात. केवळ मानवच नव्हे तर उच्चतर योनीतील सुर, असुर, यक्ष, गंधर्व, किन्नर, नाग, सिद्ध, विद्याधर आणि इतर भूतगण सुद्धा भारतातील रमणीय निवासाची अभिलाषा बाळगतात या ठिकाणी गगन-विहारी पिशाचगणांनी केलेली भारतातील निरनिराळ्या पुण्यक्षेत्रांची प्रशंसा नवलाईची वाटावी–

> उद्दाम-संचरंत-तिनयन-वसभ-ढेक्कंता-रवुपित्थ-वुज्झंत-गोरी-
> पंचानन-रोस-वस-वितिन्न-विक्कम-निपात-पातित-तुंग-तुहिन-
> सित-सिसिर-सिला-सिखरो हिमवंतो रमनीयतमो, त्ति
> ॥ १८ ते २० ॥
> .... . वेला-तरंग-रंगंत-सलिल-वेवुद्धूत-सिसिर-मारुत-
> विकिरिय्यमानेला-लवंक-कक्कोलक-कुसुम-वहल-मकरंदामुतित-
> मधुकर-कलकलारावुग्गिय्यमानेक्केक्कम-पातप-कुसुम-सरो
> इमो य्येव वेला-वनाभोगो रमनिय्यतमो, त्ति ॥ २० ते २२ ॥
> .. ... सग्गावतार-समनंतर-पतिच्छित-नव-तिभाग-नयन-जटा-
> कटापोतर - निवास - ससि-कला- निद्धूतामत-निवह-मयुर-धवल-
> तरंग-रंगावली .. . पातकानि सिन्नान-मेत्तकेनं येव

> सल-सक्करानि पनस्संति । ता स च्चेय रमनीया सुरनति' त्ति । .... दिव्वाणं पि पूयनीया सव्वपावहारी भगवई सुरसरिया- ॥ २३ ते २७ ॥
>
> — कुवलयमाला, परिच्छेद १३९, पान ७१.

उन्मत्तपणे विहार करीत भ्रमताना शंकराच्या नंदीने फोडलेल्या डरकाळीच्या आवाजामुळे बुझलेल्या पार्वतीच्या सिंहाने क्रोधाविष्ट होऊन आपल्या पराक्रमी पजाच्या आघाताने हिमधवल शिखरावरील शीतल शिलाखण्ड विखरून टाकल्यावर तर हा हिमालय अत्यन्त रमणीय दिसतो

सागर-लाटाच्या तरगावर रागणाऱ्या पाण्याच्या कपामुळे उठणाऱ्या थडगार वाऱ्याने किनाऱ्यावरील वेलदोडा, लवग व ककोळ वृक्षाच्या फुलातील विखुरलेला मकरद भरपूर चाखून वेहोश झालेल्या भुग्याचा गुजारव येथील प्रत्येक झाडावरील फुलाच्या गुच्छामध्ये निनादित होत असल्याने सागरतटावरील हाच वनप्रदेश सर्वात जास्त रमणीय आहे

स्वर्गातून अवतरल्यावरोवर एकदमच त्रिनयनाचे मस्तक, त्याचा जटाकलाप आणि तेथे निवास करणारी चद्रकोर याच्यावर अभिषेक केल्यामुळे जिचे पाणी अमृताप्रमाणे मधुर झाले आहे आणि त्यावरील स्वच्छ तरगमाला वाहत्या रगावलीप्रमाणे दिसत आहेत अशी ही गंगा नदी, तिच्यामध्ये केवळ अघोळ करता क्षणीच, सर्व पापाचे निर्दालन करते म्हणून ही सुरनदीच सर्वात रमणीय होय ती स्वर्गंगा समस्त पापहारी असल्याने देवानाही पूजनीय वाटते

## मदनभूमी मलय

भरतवर्षातील मलय पर्वताला हिमालयाची थोरवी लाभली नसेल किंवा तेथे शकर-पार्वतीचे निवासस्थानही नसेल ! पण लौकिक सुखाच्या दृष्टीने मलय काही कमी महत्त्वाचा नाही, वरचढच ठरेल विद्याधर-सिद्ध-यक्ष याची क्रीडास्थाने आणि प्रणयस्थाने मलयावर जितकी चटकदार वठतात तितकी इतरत्र नाही. कामदेवाची ही आवडती विहारभूमी आहे त्याचा ध्वज दिग्विजयाला निघतो तो येथूनच पुढे फडकत जातो मलय कामपुरुषार्थाची क्रीडाभूमी आहे म्हणून तेथे लौकिक सुखाचे अधिष्ठान सदैव सपन्न असते—

> सुर-वहु-कड्ढिय-हिय-कुसुम-मुक्क-पलहूससंत-कप्पलयं ।
> चंदण-विउवंदोलण-सुह-सीयल-पसरिय-समीरं ॥ ३४८ ॥

मरगय-कडय-विणिग्गय-जरढत्तण-णिव्वडंत-त्तण-णिवहं ।
फलिय-सिलायल-पसरिय-फंस-मुणिज्जंत-णई-सोत्तं ॥ ३४९ ॥
जलहर-जल-विच्छोलिय-सुहिय-सुहासीण-मुणि-यण-समूहं ।
सिहरंतरिय-णहंगण-पच्छाइय-दस-दिसाहोयं ॥ ३५० ॥
इय विविह-मणहरुज्जाण-कणइ-भवणालि-रइय-पेरंतं ।
सुर-सिद्ध-सुह-णिवासं अच्चंत-मणोहरं मलयं ॥३५१॥
— लीलावई, ३४८ ते ३५१.

आपले पुष्परूपी हृदय देवागनेने काढून घेतल्यामुळे कल्पलता हळू हळू उसासे टाकीत आहे चदन वृक्षाच्या फाद्या डोलू लागल्याने पसरणारा वारा सुखद आणि शीतल भासत आहे (३४८) मरकत मण्यानी मढलेल्या मलयाच्या कड्यावर उगवलेले गवत पिकून पडत आहे स्फटिक मण्याच्या खडकातून वाहणारा नदीचा अच्छोद प्रवाह रंगरहित असल्यामुळे केवळ स्पर्शानेच जाणता येतो (३४९). ढगाच्या धारानी अभिषेक झाल्यावर सुखावलेले मुनिजन सतुष्ट मनाने बसले आहेत मलय पर्वताच्या शिखरांमधून दिसणाऱ्या आकाशरूपी छतामुळे दाही दिशा झाकून गेल्या आहेत (३५०) नाना रीतीने चित्ताचे हरण करणाऱ्या या उद्यानामधील लतामडपाची शोभा सिमातापर्यन्त पसरलेली आहे सुरगणाना व सिद्ध-मिथुनाना सुखमय निवासस्थान प्रदान करणारा हा मलय अत्यत मनोहारी आहे (३५१)

## देवपर्वत हिमालय

हिमालयावर प्रभूपासून पामरापर्यंत सर्वांचे प्रेम सारखेच आहे तरी ते उच्च कोटीचे स्थळ सर्वांना सहजपणे लाभत नाही तेथे गंधर्व-किन्नर-विद्याधरांची वर्दळ जास्त असते. पण मानवाची अभित्सा दाडगी. मोठमोठ्या राजानी आपले शेवटचे ऋषितुल्य आयुष्य हिमालयाच्या पाठीवर कठले. गधर्व-किन्नराच्या विहार–भूमीप्रमाणेच राजर्षीची तपोभूमी म्हणूनही हिमालयाची प्रसिद्धी आहे. तेथील ऋषीच्या मस्तकावर ब्रम्हा-विष्णु-महेश या तीनही श्रेष्ठतम दैवताचे कृपाछत्र विराजत असते. अशा मागल्याच्या कौतुकाचे आकर्षण कवीना वाटल्याशिवाय कसे राहील ?

हर-वसह-सिंग-विलिहण-वस-पसरिय-कणय-रय-पिसंगेहिं ।
अविहाविएक्कमेक्कं णिवसिज्जइ दिग्गइंदेहिं ॥ २७५ ॥
गरुल-णह-कुलिस-विउडिय-कणय-सिला-वट्ट-सुह-णिसण्णेहिं ।
परिपिज्जइ जत्थ जहिच्छियासवं सिद्ध-मिहुणेहिं ॥ २७६ ॥

छम्मुह-सिहंडि-तंडव-मणोहरुज्जाण-सुह-णिवासेहिं ।
गिज्जइ माहव-मय-मुइय-माणसं किण्णरगणेहिं ॥ २७७ ॥
णिसुणिज्जइ जत्थ विरिंचि-हंस-संलाव-सद्द-संवलिया ।
सत्त-रिसि-साम-णिग्घोस-मासला तुंबरालत्ती ॥ २७८ ॥
— लीलावई, २७५ ते २७८

शंकराच्या नदीच्या शिंगानी (सुवर्णगिरी) खरवडल्यामुळे उचळलेल्या सुवर्णकणानी रगलेले सर्व दिग्गज येथे एकमेकाना आलिगन देऊन निरतर उभे असतात (२७५). वज्राप्रमाणे कठीण असलेल्या नखानी आघात करून गरुडाने निर्माण केलेल्या येथील प्रस्तर-शिळेवर सुखाने बसून सिद्ध जोडपे मनसोक्त आसवपान करीत असतात (२७६) कार्तिकेयाच्या मोराचे मनोहारी नृत्य चालू असलेल्या येथील उद्यानात सुखाने निवास करणारे किन्नरसमूह वासतिक उन्मादाने मनोमनी भारावून जाऊन गाण्यामध्येच दग राहतात (२७७) ब्रम्हदेवाच्या हसाच्या मधुर बोलाने गुफलेले आणि सप्त ऋषीच्या सामघोषणेची साथ लाभल्याने द्विगुणित झालेले तबोऱ्याचे आलाप येथे ऐकू येत असतात (२७८)

## पावनप्रद अष्टापद

कैलास पर्वतावरील, जिनमदिराच्या विभागाला अष्टापद गिरी म्हणतात सिद्धक्षेत्रामध्ये त्याचे स्थान सर्वप्रथम आहे म्हणून जैनाना त्याचे मोठे आकर्षण असल्याने त्याची स्तुती, महती जैन साहित्यात सर्वत्र आढळते तेथील रत्नाच्या किरणानी सूर्य प्रकाशही द्विगुणित होतो उसळणाऱ्या सोनेरी प्रभेने सर्व दिशा रगून जातात चद्रकांत मणी पाझरत राहिल्याने तेथील रात्रीही उजळून निघतात अशा ह्या अष्टापद गिरीचा देव-किन्नरादिकाना मोह पडल्याशिवाय कसा राहील?

कत्थइ कडयुग्गय-पवर-पायवुप्पण्ण-पउर-फल-विहवो ।
सुर-सिद्ध-जक्ख-किण्णर-मिहुण-यणादिण्ण-परिवेढो ॥६४१॥
— चउप्पण्णमहापुरिसचरिय, ५४/६४१

या अष्टापद पर्वतावरील काही कड्यावर उगवलेल्या मोठ्या वृक्षावरील फलांचे वैभव फार मोठे असते म्हणून देव, सिद्ध, यक्ष, किन्नर या योनीतील दापत्याचे थवेच्या थवे या पर्वतावर सदैव गर्दी करून राहतात

## प्रथमपुरी अयोध्या

सुदर व अतिरमणीय अगा काही क्षेत्रविभागाप्रमाणे या भारतातील नगराचीही प्रशस्ती वेधक वाटते ही सुप्रसिद्ध अयोध्या नगरी—

समुद्दं पिव गंभीरा महा-रयण-भरिया य, सुर-गिरी विय थिरा कंचणमया य, भुवणं पिव सासया बहु-वुत्तंता य, सग्गं पिव रम्मा सुर-भवण-णिरंतरा य, पुहई विय वित्थिण्णा बहु-जण-सय-संकुला य, पायालं पिव सुगुत्ता रयण-पदीवुज्जोइया य त्ति। अवि य–

चंद-मणि-भवण-किरणुच्छलंत-विमल-जल-हीरण-भएण ।
घडिओ जीए विहिणा पायारो सेउ-बंधो व्व ॥

– कुवलयमाला, पान ७, ओ० २२ ते २५

(अयोध्य आणि विनीत लोकाची निवासभू अशी) ही साकेत नगरी महासागराप्रमाणे गभीर आणि मौल्यवान रत्नानी खचित आहे, मेरू पर्वताप्रमाणे सुस्थिर आणि सुवर्णसपन्न आहे, जगतीप्रमाणे शाश्वत असून विविध घटनानी प्रख्यात आहे, स्वर्गाप्रमाणे रमणीय असून सर्वत्र देवमदिरानी व्यापलेली आहे, पृथ्वीप्रमाणे सुविस्तृत असून सहस्रावधी नागरिकानी गजबजलेली आहे, यक्षनगरीप्रमाणे पूर्णत सुरक्षित असून रत्नाच्या ज्योतीनी उजळलेली आहे शिवाय भितीवर मढविलेल्या चन्द्रकान्त मण्याच्या किरणसमूहातून उसळणाऱ्या स्वच्छ पाण्यात वाहून जाण्याची भीती वाटल्यामुळे ब्रम्हदेवाने तिच्या भोवती बाधलेली तटबदी (समुद्रावरील) सेतूप्रमाणे शोभत आहे

## कीर्तिप्रवाही गंगा

तामाक्रान्तहरिन्मुखां कृतरजोधूतिं जगत्पावनीम्
आसेव्यां द्विजकुञ्जरैरविरतं संतापविच्छेदिनीम् ।
जैनी कीर्तिमिवाततामपमलां शश्वज्जनानन्दिनी
निध्यायन् विबुधापगां निधिपतिः प्रीतिं परामासदत् ।

– महापुराण, २६/१५०

जिनेन्द्राची किर्ती सर्व दिशेला पसरली होती तर गगेचा प्रवाह पूर्व भारतात सर्वत्र पसरला होता जिनकीर्तीने पाप धुऊन गेले होते तर गगाजलाने धूळ वाहून गेली होती जिनकीर्ती जगाला पुण्यमय करीत होती तर गगा पात्रभूमी स्वच्छ करीत होती श्रेष्ठ व्रतिक जिनाची सतत सेवा करीत होते तर गगाप्रदेश पक्षी आणि गजकुलानी निरतर गजबजलेला होता जिनकीर्ती ससार-दु ख नष्ट-करण्यास समर्थ होती तर गगा सूर्यकिरणाचा ताप दूर करीत होती जिनकीर्ती सुविशाल, कर्मरहित आणि लोकाना निरतर आनद देणारी होती तर गगेचा प्रवाह ही विस्तृत,

निर्मळ आणि सदासर्वकाळ आनंदकारक होता. याप्रमाणे सुरसरिता जिनेन्द्राच्या कीर्तिप्रवाहाच्या तुलनेत समान दिसल्याने लक्ष्मीपती भरतचक्रीला परमानंद झाला.

## वैभवशाली मगध

> अथास्ति जम्बूविटपिच्छलेन द्वीपेषु गर्वोन्नतमस्तकस्य ।
> द्वीपस्य भर्माभरणेऽत्र खण्डे रत्नायमानो मगधाख्यदेशः ॥२२॥
> यद्भूधरा भूतलसेव्यपादा भूपा इवाक्रान्तदिगन्तरालाः ।
> इन्दन्ति मत्तद्विपकैरवाक्षिकस्तूरिकाकाञ्चनरत्नखड्गैः ॥२३॥
> यस्योर्वरासारगुणस्य मूर्ताः पुञ्जा इवाभान्ति समंततोऽपि ।
> तिलातसीकोद्रवमुद्गमाषगोधूमवल्लक्षवशालिशैलाः ॥३३॥
>
> — मुनिसुव्रतकाव्य, १/२२, २३ व ३३.

या अभिमानास्पद जंबूद्वीपामधील भरतक्षेत्र सर्व खण्डामध्ये सुवर्णालंकाराप्रमाणे विलसत असून तेथील मगधदेश रत्नाप्रमाणे देदिप्यमान आहे (२२) तरुण ऐरावत, कमलनयना शची, सुगंधी कस्तूरी, तेजस्वी शातकुंभ, रत्नाच्या माळा अशा वैभवानी संपन्न असलेल्या शक्राप्रमाणेच मदोन्मत्त हत्ती, कमळाचे ताटवे, कस्तूरी मृग, कांचनकूट, रत्नाखात, गेंड्याचे कळप इत्यादींच्या समृद्धीमुळे येथील पर्वतराज संपन्न वैभवाचे इन्द्र आहेत (२३) अवती भोवती पसरलेल्या तीळ, जवस, कोद्रू, मूग, उडीद, गहू, वाल इत्यादी हिरव्यागार शेतींनी वेढलेले पर्वत म्हणजे मगधदेशातील वर्षालक्ष्मीने दिलेल्या शिलकी संपत्तीचे मूर्तिमंत राशीच उंचावत आहेत असे वाटते (३३)

## त्रिलोकसुंदर दक्षिणापथ

पुष्कळ वेळा दक्षिणापथाला विनाकारणच कमी लेखण्यात येत असते. तिकडील पुराणकाळचा प्रमुख राजा रावण हा रामाच्या विरोधी असल्यानेच केवळ तिकडील लोकांना अनार्य किंवा राक्षस वंशातील प्रजा समजणे चूक आहे. भरतवर्षातील हा भाग कोणत्याही अर्थाने हीन ठरत नसून उलट तो स्वर्गतुल्य आहे—

> बहु-रयणायर-कलिओ सुरूव-वियरंत-दिव्व-जुवइ-जणो ।
> विवुहयण-समाइण्णो सग्गो इव दक्खिणो सहइ ॥
>
> — कुवलयमाला, पा० १०४, ओळ ७

भरतवर्षातील हा दक्षिणेकडचा प्रदेश विविध प्रकारच्या रत्नांच्या राशींनी समृद्ध आहे. तेथे विहरत असणाऱ्या रूपवती युवती स्वर्गांगनाप्रमाणेच भासतात

तेथे बृहस्पतीसारख्या विद्वानाचीही उणीव नाही त्यामुळे हा दक्षिणापथ प्रत्यक्ष स्वर्गाप्रमाणेच विलसत आहे

स्वत तिकडे जाऊन तेथील किनारी प्रदेश पहिल्यादाच प्रत्यक्ष पाहणाऱ्या एका प्रवाशाची पुढील अनुभूती आणि त्याची प्रशस्ती किती भावस्पर्शी आणि मनोवेधक आहे ते पहा. काश्मीरच्या निसर्ग–सौदर्याचे प्रथम–दर्शन होताच शहाजहान बादशहाने 'अहो ! स्वर्ग स्वर्ग ज्याला म्हणतात तो हाच' या अर्थाचे जे उद्गार काढले त्याच मन स्थितीची अनुभूती येथेही आढळेल–

> **तत्थ गओ जाव पेच्छइ मरगय-मणि-कोट्टिमयलं णाणाविह-कुसुम-रेहिरं सरय-समए विय बहुल-पओसे णहंगणं । तं च पेच्छिऊण चिंतियं अणेणं– 'अहो एव्वं फिर सुव्वइ सत्थेसु जहा देवा सग्गे णिवसंति, ता ण ते सुंदरासुंदर-विसेस-जाणया। अण्णहा इमं पएसं तेल्लोक्क-सुंदरं परिच्चइऊण सग्गे ण णिवसंति' ॥**
>
> — कुवलयमाला, पान ७०, ओ० २२–२४.

तेथे जाऊन पाहतो तो कृष्णपक्षातील रात्री विलसणारे तेथील तारागण पाचूनी मढविलेल्या फरसीप्रमाणे किवा नाना प्रकारच्या फुलानी नटलेल्या शरदश्रीप्रमाणे आल्हाददायक वाटले. ते पाहताच त्याला पटले की– 'देव स्वर्गात राहतात असे सर्वच शास्त्रग्रथ एकमुखाने सागतात, ते जर खरे असेल तर त्या देवाना सुदर आणि असुदर यातील फरकच समजत नसला पाहिजे ! नाहीतर त्रिलोकामध्ये अत्यत सुदर असलेल्या या एकमेव (वेलावन) प्रदेशाला सोडून स्वर्गात राहणे त्यानी पसतच केले नसते !'

## योगक्षेमाचा आदर्श

मत्स्यन्याय व विषमता टाळण्यासाठी आणि जीवनातील योगक्षेम मगलमय करण्यासाठी सर्वोदयी कल्याण भावना पोसवणे हा मानवधर्म आहे या धर्माचारातील 'जगा आणि जगण्यास मदत करा' या मत्राची सिद्धी सफल होण्यासाठी 'आदहिदं कादव्वं जइ सक्कइ परहिदं च कादव्वं ।' ही योगक्षेमाची प्रक्रिया अगीकारावी लागते परहितक्षमता म्हणजेच महान मानवता ! यासाठी सस्कारी जीवनश्रद्धा रुजवावी लागते अशाच मानवी श्रद्धेने प्रेरित झालेल्या जीवनसाधनेत नाभि-ऋषभ-भरत-सस्कृतीची प्रणाली सफल झालेली दिसते त्यातील उपजीविकेची धारणा आजही आदर्श ठरते.

सर्व शास्त्रामध्ये वाङमयाला आणि वाङमयामध्ये लिपिविन्यासाला जसे आद्य स्थान आहे तसेच सपूर्ण जीवनव्यवस्थेमध्ये आजीविकेच्या सिद्धीसाठी अर्थशास्त्राला प्राधान्य आहे. म्हणूनच भगवान ऋषभनाथानीही ज्येष्ठपुत्र भरताला अर्थशास्त्राचे योग्य धडे दिले होते ( महापुराण, १६/११९ ) जीवनव्यवस्थेसाठी व संघर्षपरिहारासाठी अर्थशास्त्राचा व समाजशास्त्राचा अभ्यास अत्यत उपयुक्त आहे म्हणूनच भरतचक्रीनेही आपल्या सर्व माडलिकाना याच आचार-प्रणालीचा उपदेश केला ( महापुराण, ४२/२०४ ) ऋषभनाथांनी शिकविलेल्या अर्थशास्त्राचे स्वरूप नेमके काय होते याचे स्पष्टीकरण त्याच ग्रथात विपुल मिळते याच महापुराणाच्या समग्र अभ्यासावरून स्पष्टपणे प्रतीत होते की त्या अर्थशास्त्रीय विचारामध्ये केन्द्रवर्ती लक्ष्यबिंदू म्हणून मानव व मानवी जीवनातील मागल्य यालाच प्रधान स्थान मिळाले आहे मानवाची धनप्राप्ती, सप्राप्त सपदेच्या विनियोगातून भौतिक गरजाची पूर्ती, तसेच हितसुखाची आणि मानवी कल्याणाची सिद्धी साधण्याचा विधी हा त्या शास्त्राच्या अध्ययनाचा मूळ गाभा आहे—

> स तु न्यायोऽनतिक्रान्त्या धर्मस्यार्थसमर्जनम् ।
> रक्षणं वर्धनं चास्य पात्रे च विनियोजनम् ॥
>
> — महापुराण, ४२/१३.

प्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ प्रा उदयप्रकाश श्रीवास्तव यांनी 'प्रारभिक अर्थशास्त्र' ( लाईट हाऊस, पाटणा, १९६८ ) या आपल्या ग्रथातील पान २६९ वर अर्थशास्त्राच्या स्वरूपाच्या सदर्भात म्हटले आहे की– 'अर्थशास्त्र एक सामाजिक जीवनाची विचारपद्धती असून त्यामध्ये उत्पादन, उपभोग, विनिमय आणि वितरण या विस्तृत क्षेत्रातील मानवी व्यवसायाच्या अभ्यासाचा अन्तर्भाव होतो ' या सर्व आधुनिक विचारतत्राशी महापुराणातील विधाने किती सुसगत आहेत !! ( महापुराण, १६/११९, १६८, २४२ इ. )

## योगक्षेमाचा मूलाधार

पृथ्वी पार्थिव द्रव्यानी सपन्न असली तरी मन पूत सपत्ती हस्तगत करण्याची साधने मात्र मर्यादितच राहतात म्हणून दुर्लभता, अभाव आणि विषमता अशा अडचणीशी सामना सदैव करावा लागतो अनिवार्यता, प्राथमिक गरजाची आवश्यकता आणि त्यांच्या पूर्तीसाठी मर्यादित साधनाचा प्रसगानुरूप निर्दोष उपयोग या सदर्भातील अभ्यास म्हणजेच जीवितानुयोगाचे सिद्धात होत जीवन सुखी, समृद्ध व सन्तुष्ट बनविण्यासाठी न्यायमार्गाची प्रतिष्ठा करून ती कटाक्षाने साभाळावी लागते समाजामध्ये घडणाऱ्या सर्वच उलाढालीवर आर्थिक

व्यवहाराचा परिणाम होत असलेला दिसून येतो संपत्तीचा संबंध जीवनरक्षणाशी निगडीत असल्याने तिच्याकडे दुर्लक्षही करता येत नाही आणि कितीही प्रयत्न करून भोग साधनाची विपुलता सदा सर्वकाळी व सर्व ठिकाणी राखून ठेवता येत नाही ही मानवी अपूर्णता आहे म्हणून संघर्ष अटळच राहतो या संघर्षातून जीवनाश न होता सर्वांचे रक्षण व्हावे हा उद्देश मानवी हिताचा असल्याने जीवित-साधनाच्या विषमतेतील प्रमाण कमीत कमी करण्यासाठी आणि तसे करीत असताना बौद्धिक पावित्र्याचे रक्षण होण्यासाठी विवेकाची अत्यन्त गरज आहे म्हणून जैनांच्या जीवनश्रद्धेत या विवेकाला विशिष्ट महत्त्व प्राप्त झाले आहे

प्रत्येक भोगवस्तूच्या परिपूर्ण उपयोगितेचा पुरस्कार व व्यर्थ संचयाचा परिहार हा या विवेकाचा मूळ गाभा आहे यासाठीच विनियोगरहित पदार्थांना संपत्ती मानलेली नाही––

**रत्नानि ननु तान्येव यानि यान्त्युपयोगिताम् ॥**

-- महापुराण, ३७/१९

पदार्थांची उपयोगिता ठरविणे, जीवनावश्यक गरजा भागविण्यासाठी भोग्य सामग्री निर्माण करणे, आणि ती वाढविणे हाच अर्थशास्त्राचा मूल सिद्धान्त उत्पादन, उपभोग, विनिमय आणि वितरण इत्यादी विचार याच सिद्धान्ताची अंगोपांगे होत उपयोगितेची वाढ म्हणजेच मूल्याची वृद्धी पृथ्वीच्या पोटातील असंपादित खडे या विचारानुसार खरी रत्ने किंवा संपत्ती नव्हे

मात्र ही उपयोगिता जशी शारीरिक असते तशीच ती मानसिकही असते असंप्राप्तीमुळे शारीरिक आणि मानसिक अशा दोन्ही क्षेत्रांत वेदना निर्माण होतात त्यातून सामाजिक अशांतता, वैषम्य, क्षोभ, अभिचार, अनाचार इत्यादी अनैसर्गिक संकटे निर्माण होतात जीवनात या उपयोगितेला फारच महत्त्व असल्याने सामान्य मनाचा तोल सुटतो आणि द्रव्यासंबंधी अति मोह, आकर्षण, अनुराग, लालसा इत्यादी भावना वाढतात, पण त्या-प्रमाणात संप्राप्ती दुर्लभ ठरते आणि अशाच अपयशाने द्वेष, मत्सर, द्रोह, संघर्ष इत्यादी सामाजिक विकार जन्माला येतो अशा प्रसंगी प्रीती आणि अप्रीतीच्या भावनांचा तोल सांभाळण्यासाठी विवेक व न्यायवृत्ती याशिवाय अन्य उपाय उपलब्ध नाही. सामाजिक शांती व समता यातील तरतमभाव विवेक आणि न्यायवृत्ती यांच्या कमी जास्तपणावरच अवलंबून असतो भोगाकांक्षा अनंत आहे तर पूर्तीची साधने मात्र त्या मानाने अत्यल्प आहेत अशा प्रसंगी समग्र इच्छापूर्ती मानवी शक्तीच्या आवाक्यात येत नाही यास्तव जीवनामध्ये विवेकाची व न्यायवृत्तीची गरज फार मोठी असून ती कधीही न संपणारी आहे (महापुराण, ४१/१५८)

मानवी जीवनक्षेत्रातील अशा यशामुळेच भरत चक्रवर्तीला अग्रेसरत्व प्राप्त होऊ शकले

## विनियोगातील सुसूत्रता

जेणे करून परिमित सामग्रीचा विनियोग विविध प्रकारानी व विविध भोगक्षेत्रातील तृप्ती जास्तीत जास्त प्रमाणात करून घेता येईल अशा प्रकारे करावा हा अर्थशास्त्राचा प्रधान हेतू आहे गरजाची तीव्रता हीच प्राधान्यतेच्या निश्चितीकरणातील सुसूत्रतेचे गमक होय ही गरजाच्या पूर्तिक्षेत्रातील अग्रिमता ( Priority ) लक्षात घेऊन गरजाच्या क्षेत्राची वर्गवारी सामान्यत पुढीलप्रमाणे करण्यास हरकत नसावी— **(१) आजीविका, (२) निपुणता, (३) प्रतिष्ठा, (४) आराम आणि (५) विलास.**

(१) अन्न, वस्त्र, निवारा व दापत्यभोग या जीवनातील प्राथमिक गरजा आहेत त्याच्या पूर्तीवरच जीवनाचे अस्तित्व शाबूत राहत असते म्हणून आजीविकेच्या या मूळ गरजा न भागविता जीवनाचे पाऊल पुढे पडतच नाही (२) त्या पाठोपाठ आरोग्य, शिक्षण आणि व्यक्तित्वसाधनारूप मानवी भोग जीवनातील निपुणता व गुणवत्ता वाढविण्यास पायाभूत ठरतात (३) स्वातत्र्य, समता, बधुता इत्यादी मानव्याची साधना भावगुणाची आराधना, जीवनातील उदात्तता आणि सस्कारी मूल्य वाढविण्यास उपयुक्त ठरते त्यामुळे प्रतिष्ठित जीवनपद्धतीला अधिक वाव मिळतो म्हणून कल्याणकारी जीवनव्यवस्थेमध्ये या तीन प्रकारच्या गरजाची पूर्ती, त्याचा अनुक्रम न वदलता, करण्यात येत असते. या उलट (४) आराम आणि (५) विलास या अतिरिक्त भोगप्रकाराना आळा घालण्याचा प्रयत्न होत असतो

## कल्याणकारी तीर्थप्रणाली

या दोन्ही क्षेत्रातील प्रयत्न यशस्वी होण्यासाठी विवेक आणि न्यायवृत्तीची कास धरावी लागते उपभोग जेव्हा आराम व विलास याकडे जास्त झुकतो तेव्हा समाजातील उत्पादन सस्था ढासळते आणि निरनिराळ्या समाज-घटकामधील समतोलपणा ढळतो अन्तर्गत सघर्ष तीव्र होतो उलट पहिल्या तीन परिक्षेत्रातील उपभोग क्रमाने वाढतो तेव्हा मात्र समाजवाद स्थिरावतो समाजवादी समाजरचनेसाठी हा विचार पायाभूत आहे समाजवाद आरामवादाला व विलासवादाला विरोध करीत असतो या पाच प्रकारच्या उपभोग क्षेत्रातील पूर्वापरता ( Sequence ) विघडू न देणे मानवी कर्तव्य आहे यासाठीच विवेकाची आणि न्यायवृत्तीची गरज अटळ आहे विवेक-न्यायवृत्तीरूपी ही शीतल-मृदुल

पल्लवी धर्मवृक्षाचीच निर्मिती असल्याने अर्थ व काम या दोन पुरुपार्थांचा मूलाधा धर्मच मानला गेला आहे. धर्मवृक्षाचे फळ म्हणजे अर्थ आणि त्या फळाचा रसास्वा म्हणजेच काम होय याच अर्थाने ' धर्मफलं हि शर्म ' ( महापुराण, १६/२७३ ) या सूत्रात धर्माचे प्रत्यक्ष फळ म्हणजे सुखच होय असे नि सदिग्ध विधान आढळते मात्र धर्मवृक्षाचे मूळ सयमनामध्ये खोलवर रुतलेले असते म्हणूनच वृत्ती-प्रवृत्ती नियमन करावे लागते ( महापुराण, १६/२४२ ). यालाच कल्याणकारी संस्कृत म्हणतात थोडक्यात योगक्षेमानुचिंतन म्हणजे अर्थशास्त्रीय आणि समाजशास्त्री जीवनव्यवस्थेचा विचार होय (महापुराण,१६/११९व१६८).

गरजाच्या पूर्तीसाठी आवश्यक भोगवस्तूची निर्मिती आणि प्राप्त वस्तूच योग्य विनियोग या सबंधीचे मार्गदर्शन भ ऋषभनार्थांनी युगारभीच करून त्याचं एक विशिष्ट तीर्थप्रणाली तयार केल्याने व त्याच्या सर्व अनुयायींनी ती सत अनुसरल्याने भारतातील जीवन-सघर्ष कधीच कुपथगामी झाला नव्हता. त्यामु ' मारा आणि जगा ' असला क्षुद्र विचार भारतातील मूळ सस्कृतीला कधीच शिवल नाही. योगक्षेमानुचिंतनाची ही तीर्थप्रणालीच जीवन-विचाराचा मूळ सिद्धान्त म्हणून सर्वसम्मत झालेला आहे ! याच विचाराचा वारसा आपल्या भरताल भ ऋषभदेवापासून मिळालेला आहे. अशा मगलमय जीवनयोगामुळेच भरत वर्षातील निवासाची एवढी अभिलाषा आणि इतके आकर्षण !

## भरतकालीन सुस्थिती

मगलमय योगक्षेमाचा आदर्श प्रत्यक्ष कृतीत उतरविल्याने भरताच्या राज्यातील शाती आणि सपन्नता जणू काही काठोकाठ भरून ओसडत होती—

वप्रान्तर्भुवमाघ्रातुमिवोत्पलमिवानतान् ।
स कैदार्येषु कलमान् वीक्ष्यानन्दं परं ययौ ॥ ११३ ॥
आपीतपयसः प्राज्यक्षीरा लोकोपकारिणीः ।
पयस्विनीरिवापश्यत् प्रसूताः शालिसंपदः ॥ ११५ ॥
हारिगीतस्वनाकृष्टैः वेष्टिता हंसमण्डलैः ।
शालिगोप्यो दृशोरस्य मुदं तेनुर्वधूटिकाः ॥ ११७ ॥
सुगंधिमुखनिःस्वासा भ्रमरैराकुलीकृताः ।
मनोऽस्य जह्रुः शालीनां पालिकाः फलबालिकाः ॥ ११९ ॥
निगमान् परितोऽपश्यद् ग्राममुख्यान् महाबलान् ।
पयस्विनो जनैः सेव्यान् महारामतरूनपि ॥ १२३ ॥

**योषितो निष्कमालाभिः वलयैश्च विभूषिताः ।**
**पश्यतोऽस्य मनो जह्रुः ग्रामीणाः संश्रितावृत्तीः ॥ १२६ ॥**

— महापुराण, पर्व २६.

( अयोध्येच्या परिसरामध्ये ) शेतातील कलम साळीचे पीक भरलेल्या लोंब्याच्या भाराने नम्र होऊन जणु काही कुपणातील कमळाचा सुगध हुगीत होते. ते पाहून भरतचक्रीलाही परमानन्द झाला ( ११३ ) साळीचे पीक टच्च भरून दुधाळलेल्या अवस्थेत प्रजेच्या आजीविकेची पूर्ती करण्यासाठी, पाण्याने भरलेल्या खाचरामध्ये तिष्ठत राहिल्याने विशाल प्रान्तात पसरलेली ती साळीच्या रोपाची सपदा जणु लोकोपकार करण्यासाठी तत्पर बनून पाण्यावर आलेल्या दुभत्या गायींच्या खिल्लाराप्रमाणे दिसत होती ( ११५ ) साळीच्या शेताचे राखण करताना आळविलेल्या मनोहारी गीतातील माधुर्याने चकित होऊन एकत्र गोळा होणाऱ्या हसपक्ष्याच्या थव्यामध्ये वेढलेल्या नवतरुणीकडे पाहून भरताच्या दृष्टीचे पारणे फिटत होते (११७). स्वत च्या मुखातील सुगधी स्वासाकडे आकृष्ट होणाऱ्या भृग्यानी सत्रस्त झालेल्या गोड तरुणी येथील साळीचे रक्षण करता करताच वाटसरूचे मन हरण करीत होत्या ( ११९ ) सुसपन्न वसतीच्या परिसरातील सर्व ग्रामनेते सामर्थ्यशाली होते तर आराम बागेतील सर्व वृक्षही पक्षिगणानी व मानवसमुहानी गजबजलेले होते (१२३) तेथील सर्व ग्रामीण युवतीनी सुवर्णालकाराची विभूषा केलेली असल्याने त्या कुपणाच्या आडून देखील मनोहारी भासत होत्या (१२६)

## भरतवर्षातील सुखसिद्धी

सर्व गुणानी परिपूर्ण असा दुसरा भूभाग या सबध पृथ्वीतलावर अस्तित्वात नसल्यामुळे भारताची तुलना करणे अशक्य आहे. भारत भारतासारखाच असल्याने एकमेवाद्वितीय आहे—

**निवासं भारते वर्षे आकाङ्क्षन्ति सदा सुराः ।**
**न भारतसमं वर्षं पृथिव्यामस्ति भो द्विजाः ॥**

— ब्रह्मपुराण, अ० २७/७२.

स्वर्गातील देव देखील या भारत वर्षात निवास करण्याची सदैव अपेक्षा बाळगतात ! कारण हे द्विजानो भारतासारखा दुसरा वर्ष या अखिल पृथ्वीवर आढळत नाही

**यानि किंपुरुषाद्यानि ह्यष्टवर्षाणि सत्तम ।**
**तेषां स्वाभाविकी सिद्धिः सुखप्राया ह्ययत्नतः ॥**

— अग्निपुराण, अ० १०८/९.

किन्नर-किंपुरुष इत्यादिकांच्या ज्या विशिष्ट विद्या असतात त्या सर्व, त्यांच्या वयाची आठ वर्षे पूर्ण होताच प्रयत्न न करताही सुखाने आणि सहजतेने त्यांना प्राप्त होतात– ते याच भारतवर्षामध्ये !

## भरतवर्षाची स्पृहणीयता

सर्व पुराणामध्ये विष्णुपुराणाला एक विशेष स्थान आहे वैष्णव दर्शनाच्या दृष्टीने त्याला जवळ जवळ भागवत पुराणाएवढेच महत्त्व आहे ते वैष्णव दर्शनाचे मूलस्त्रोत होय श्री रामानुजाचार्यांनी आपल्या श्रीभाष्य टीकेमध्ये विष्णु पुराणातील पुष्कळ अवतरणे स्वीकारली आहेत ज्ञानमार्ग आणि भक्तिमार्ग यांचा सुरेख संगम येथे पहावयास मिळतो विष्णुपुराणामध्ये भरताच्या या भूमीचे गुणगान केलेले आहे, तिकडे चित्त वेधल्याशिवाय राहात नाही–

**गायन्ति देवा. किल गीतकानि धन्यास्तु ते भारतभूमिभागे।**
**स्वर्गापवर्गास्पदमार्गभूते भवन्ति भूयः पुरुषाः सुरत्वात् ॥**

– विष्णूपुराण, २/६/२४.

'भरत राजाच्या या भूमीवर जे जन्म घेतात ते मानव धन्य होत' अशा शब्दात देवही भारतीयांच्या भाग्याचे कौतुक गातात स्वर्गाकडे आणि मोक्षाकडे जाणारे दोन्ही मार्ग या भारतातूनच जात असल्याने स्वर्गातील देवही आपला देवपणा सोडून याच भरताच्या भूमीवर मानवजन्म घेऊ इच्छितात !

भारतीयांच्या सौभाग्याचा मत्सर सर्वांनाच वाटतो, पूर्वीपासूनच वाटत आला आहे त्यातून स्वर्गीय देवतांचीही सुटका झाली नाही त्यांना एक विचार सदैव छळत असतो– भारतातील लोकांवर प्रसन्न होऊन भगवानांनी त्या भूमीतच जन्मावतार घेतले, तेव्हा आमचाही जन्म तेथेच व्हावा भागवतातील पुढील ओळी किती मनकवड्या आहेत ! !

**अहो अमीषां किमकारिशोभनं प्रसन्न एषां स्विदुत स्वयं हरिः।**
**यैर्जन्म लब्धं नृषु भारताजिरे मुकुंद सेवोपायिकं स्पृहा हि नः ॥**

– भागवत, ५/१९/२१

भारतीयांचा हेवा करणारे स्वर्गस्थ देव म्हणतात– अहो ! या भारतीयांनी असे कोणते महान पुण्य केले होते की प्रत्यक्ष भगवान विष्णु यांच्यावर स्वतःहून प्रसन्न झाले ! आणि त्यांच्या इच्छेला अनुसरून भगवानांनी भारताच्या विशाल प्रांगणामध्ये मानवी जन्म घेतला व त्यांना प्रत्यक्ष सेवेची संधी दिली तीच तर सेवा करण्याची इच्छा आम्हालाही आहे ! !

## भारतीय वारसा

या भूमीवरील सर्वश्रेष्ठ प्रजापाल भरत चक्रवर्तीच ठरल्याने त्याची प्रजा त्याला पितृतुल्य समजत होती भरताच्या याच पितृत्वामुळे त्याचे स्वत चे पिता ऋषभनाथ सर्व भारतीयाचे पितामह ठरले तेव्हापासून ऋषभानाथाचा उल्लेख पितामह असा होऊ लागला आणि ती परपरा अतूट राहिली या पुण्यस्रोताला लेशमात्र खळ नाही सतराव्या शतकातील वनारसीदास म्हणतात–

**भारतखण्ड के प्राणी जे ते । प्रजा भरत राजाकी ते ते ।**
**भरत नरेश ऋषभ की शाखा । ताते लोग पितामह भाखा ।।**

– वनारसी विलास, ३८

या भरत खण्डातील सर्व मानव प्राणी भरतचक्रीची प्रजा होय. राजा भरत हा ऋषभनाथांचा आत्मज (पुत्र) आहे. त्यामुळे मर्व लोक ऋषभनाथांना पितामह म्हणतात

भरत आणि ऋषभ याचे व्यक्तिमत्व बहुरगी होते त्याचा आत्मा जितका तप पूत होता तितकेच त्याचे व्यवहारी जीवन सार्वजनिक होते, लोकोपयोगी होते त्याना आत्मिक महत्ता होती, तसेच लौकिक महत्त्वही होते त्याचा आयुष्यक्रम सर्वमान्य होता. ही मान्यता जन्मापासून त्याच्या अतापर्यंतच नव्हे तर युगान्तानंतरही अखड व अवाधित राहिली आहे. म्हणून जैन, बौद्ध, वैदिक, वैष्णव, शैव इत्यादी सर्व भारतीय सप्रदायातील साहित्य–परपरेमध्ये त्याना विवादातीत स्थान मिळाले आहे त्याच्या गुणकीर्तनापुरता तरी सर्वांचा समभाव स्थिरावला आहे कारण ही दैवते मर्वार्थाने विवादातीत आहेत वाद-प्रवादाच्या जन्मापूर्वीच त्याना ते स्थान मिळालेले आहे त्याचा कालखड युगारभाच्या वेळेचा असल्याने त्याची प्रणाली सर्वात प्राचीन व समीचीन आहे कुमार्गाचा जन्म फारच नतरचा आहे

जैन परपरेप्रमाणे ऋषभनाथ त्याचे प्रथम तीर्थंकर असून धर्मोपदेशाची सुरवात त्याच्यापासूनच झाली आणि वैदिक परपरेप्रमाणेही वेदाची उत्पत्ती त्याच्यापासूनच झाली असल्याने ते वेदाचे मुख होत 'वेद आस्तरणम्' म्हणजे समवसरणातील तीर्थंकराची वेदी होय वैदिक वाङमयका इतिहास, प्रथम भाग (१९३५) या ग्रथात पान ५६-५७ वर वेदान्तसूत्र भाष्यातील १/३/३० आणि १/४/१ या भागाच्या सदर्भात म्हटले आहे–

**'शंकरस्वामी ब्रह्मा से हिरण्यगर्भ अभिप्रेत मानते हैं। यही उनका ईश्वर है। वह मनुष्यो से ऊपर है। उस देव ब्रह्मा को**

कल्पके आरंभ में परमेश्वर की कृपा से अपनी बुद्धि में वेद प्रकाशित हो जाते हैं।'

शिवाय वृहदारण्यक उपनिषद, १/४/१४ आणि श्वेताश्वतर उपनिषद, ६/१८ यामध्ये स्पष्ट म्हटले आहे-

**यो ब्रह्माणं विदधाति पूर्वं। यो वै वेदांश्च प्राहिणोति तस्मै॥**
**तं ह देवमात्मबुद्धिप्रकाशं। मुमुक्षुर्वै शरणमहं प्रपद्ये॥१८॥**

आणि प्रजापती हा देखील मूळ जीवात्मा नव्हे. त्यालाही मागचा जन्म होताच-

**स प्रजापतिर्जन्मान्तरेऽश्वमेधेनायजत।**

– (वृ. आ. उप, १/२/६, शांकरभाष्य)

उपनिषद व पुराण ग्रंथ तर त्यांनाच भगवान मानतात व त्याच्या अवताराची किर्ती गातात वैदिक आणि अवैदिक अशा दोन्ही परपरेत त्याचे जीवन मानवी व दैवी अशा दोन्ही गुणानी युक्त मानले आहे त्याचा प्रभाव सर्वत्र सारखाच मान्य आहे उपासनामार्गात फरक सापडत असला तरी त्याच्या जीवनातील मुख्य घटनाचा इतिवृत्तान्त मात्र सर्वत्र सुसंगत आणि एकमुखीच आढळतो. त्यामुळे त्याच्या व्यक्तिमत्वासवधी मुळीच सदेह निर्माण होत नाही

भागवत व इतर प्रमुख पुराणाच्या परपरेला अनुसरून महामानव भरत चक्रवर्ती ऋषभ देवांच्या शभर पुत्रामध्ये ज्येष्ठ होते त्याचे राज्य हिमालया-पासून सागरापर्यंतच्या अखिल भूमीवर अप्रतिहत चालत होते त्याच्या नावावरूनच या देशाला भरतवर्ष किंवा भारत असे अभिधान प्राप्त झाले आहे भरतवर्ष म्हणजे भरताचा वर्ष आणि भारत म्हणजे भरताचा देश असा सरळ बालबोध अर्थ आहे या मवधीचा इतिहास सर्वत्र एकमुखी आहे शिवाय भागवतामध्ये या भरतचक्रीलाच स्पष्टपणे नारायणभक्त म्हटले आहे (११/२/१७) भरताची पितृभक्ती उघड आहे यावरून ऋषभालाच नारायण म्हणजे जो मानवजन्म सफल करून सिद्ध होतो असा मुक्तात्मा असे मानले आहे-

**म्हणोनि म्हणती नारायण आत्मयासी।**

– एकनाथी भागवत, २/१४३.

### अंतर्दृष्टीची आवश्यकता

या ठिकाणी भरताला परम भक्त मानण्यातील जैनाची धारणा व भागवतकाराची भावना एकाकारच दिसते. तो जसा जैनाचा आराधनीय देव आहे

तसाच भागवत पथीय लोकानाही उपासनीय आहे भरत आणि ऋषभ या दोघाची परपरा **स्वयंभू** मनूपासून प्रचलित झाली असे दोघानीही मानले आहे सर्व ऋषिकुलाची आणि राजवंशाची उत्पत्ती दोन्ही प्रणालीत एकसारखीच मानली आहे पण यामुळेच काही विद्वानानी कालविपर्यय लक्षात न घेता, जैनपथ वैदिक मार्गापासून नतर फुटून निघाला इत्यादि जो हीन प्रचार केला, त्यामुळे त्याचे केवळ मनोमालिन्यच प्रगट झाले **ऋषभ-भरतांच्या** उच्चतम व्यक्तित्वामुळेच सर्वांच्या मनात त्याच्याविषयी आदरभाव निर्माण झाला व तो युगा-युगातून टिकून राहिला आहे

पुढे जेव्हा लोकामध्ये आचारमार्ग व उपासनामार्ग विविध प्रकारानी बदलले तेव्हापासून मात्र त्याच्या भक्तामध्ये निरनिराळे सघ व सप्रदाय निर्माण झाले चढाओढही निर्माण झाली वैरभाव जोपासला गेला आणि पराकोटीचा सघर्षही अनुभवास आला अतर फार दूरवर चालून गेल्याने मूलस्त्रोत दुरावला सर्वांची दृष्टी कमीजास्त प्रमाणात मदावली आद्यारभ दृष्टीआड झाला. एकतेचे बधन जीर्ण-शीर्ण होता होता नष्ट झाले परकेपणा तेवढा जोपासला गेला पण हा परभाव, वैरभाव जर खोटा आहे तर तो फार काळ टिकणार नाही. प्रासगिकच असल्याने तो तो प्रसग सपताच, स्व-भाव व स्नेह-भाव पुनरपि प्रादुर्भूत होणे आवश्यक आहे पण त्यासाठी अतर्दृष्टीची आवश्यकता असते त्या अतर्दृष्टीचा एक साधक म्हणूनच ह्या इतिहासाचा आधारस्तभ उभा करण्याचा हा अल्पसा प्रयत्न हा स्तभ कालातीत आहे. मुळापासून कळसापर्यंत तो शलाकारूप आहे. अधारमय स्थितीचा दीपस्तभ आहे आपल्या मूळ ऐक्याचा दुवा साधण्यासाठी **नाभिराज-ऋषभदेव-भरतचक्री** अशी एकसधी स्मृतिशृखला अतूट व अभेद्य राहावी ही अपेक्षा.



: १० :

# नामस्वामी भरतेश्वर

नानारत्ननिधानदेशविलसत्सम्पत्तिगुर्वीमिमां
साम्राज्यश्रियमेकभोगनियतां कृत्वाऽखिलां पालयन् ।
योऽभून्नैव किलाकुलः कुलवधूमेकामिवाङ्कस्थितां
सोऽयं चक्रधरोऽभुनक् भुवममूमेकातपत्रां चिरम् ॥

— महापुराण, ३७/२०२.

# १० नामस्वामी भरतेश्वर

## राज्यपदाचा इंद्रमणी

या देशाचे भरतापूर्वीचे अधिक प्रचलित नाव नाभिवर्ष ते बदलून या खण्डप्राय देशाचे नाव भरतवर्ष असे पडले ही घटना म्हणजे एक युगपरिवर्तन होय युगपरिवर्तन घडविणारे राजे कोणत्याही भूमीला क्वचितच लाभत असतात कारण तितके सामर्थ्य व पात्रता एखाद्याच महापुरुषाला प्राप्त होते भरत देखील असाच एक शेलका महापुरुष होय. असे महापुरुष शलाकाप्रमाणे इतर सर्व भूमिपालामध्ये उठून दिसतात त्याचे व्यक्तिमत्व जीवनभर नेहमीच उचावत जात असते ते स्वत उच्चकोटीला जाऊन पोहोचतात ते मात्र स्वत च्याच गुणाधिक्यामुळे. त्यांची कर्तबगारी अखिल मानवाच्या उपयोगी पडत असते त्याचे गुण स्वयसिद्ध असतात त्याच्या थोर गुणाची जंत्री देण्याची गरज नसतेच. म्हणून येथे भरतचक्रीचे आमूलाग्र चरित्र सागण्याचा मुळीच उद्देश नाही त्याच्या उन्नत पराक्रमाचीही सपूर्ण गाथा गावयाची नाही ज्या विशिष्ट गुणामुळे त्याची कीर्ती दिगतात पसरली व त्याच्या ज्या कर्तबगारीमुळे या आपल्या भारताची भरभराट झाली त्यापैकी वेचक गुणाचा व कार्यांचा नुसता नामोल्लेख केला तरी भारताला त्याच्या नावाचा अभिमान का व किती वाटतो हे लक्षात येईल आणि अशा थोर व दैवी गुणाच्या स्मरणाने भरतवर्षाचे नाव अर्थपूर्ण असल्याचे पटल्याशिवाय राहणार नाही

भरत या वर्षातील सर्व सहाही खडावर आधिपत्य गाजवीत होते केवळ मानवाचेच नव्हे तर यक्षगणाचे व विद्याधराधिपतीचे ही ते प्रशासक होते मानव, दानव, विद्याधर, यक्ष, गधर्व, किन्नर इत्यादी उच्चकोटीतील सर्व देवताही त्याची

आज्ञा पाळण्यास तत्पर व सेवा करण्यास उत्सुक होते ते चक्ररत्नासारख्या दैवी व मानवीही १४ रत्नाचे आणि ९ निधिस्वरूप वैभवाचे मालक होते एवढेच नव्हे तर श्रेष्ठ मानवी गुणाचे धारक बनून आपल्या आचरणाने सर्वांना आदर्शभूत झाले होते सर्व मानवाचे कल्याण साध्य करुन देण्यास समर्थ होते म्हणून सर्वांनाच त्याचा अभिमान होता त्याच्या व्यक्तित्वामुळे भारतातील मानवी जीवन उचावले आणि उच्च पातळीवर स्थिरावले त्यामुळे इतरानाही त्याचा आदर्श स्वीकारणे सोपे झाले ती उच्चतम जीवनाची भरतपातळी आजपर्यंत दुसऱ्या कोणत्याही भारतीय थोर विभूतीने गाठली नाही त्याच्या गुणातिशयामुळेच भारत आजही त्याचे स्मृतिचिन्ह आपल्या भालप्रदेशावर मोठ्या अभिमानाने मिरवीत आहे

या देशात प्रतापशाली व यशशाली असे अनेक स्वकीय, परकीय आणि आगतुक राजे-महाराजे गेल्या लाखो वर्षांच्या प्रदीर्घ कालखण्डात या भूमीचे शासन करीत होते परतु त्याच्यापैकी कोणाच्याही नावाने हा देश आज ओळखला जात नाही हा देशही महान आहे त्याला त्यापेक्षा लहान नाव कसे आवडेल ? एवढ्या मोठ्या देशाचे नामकरण सिद्ध होण्यासाठी त्या नावाचीही महती तितकीच किंवहुना त्यापेक्षाही वरचढ असली पाहिजे ! इतिहासाला ज्ञात असा एकच नरभास्कर भरतापूर्वी या भूमीच्या क्षितिजावर उदय पावला होता की ज्याच्या उज्वल प्रकाशात हा सपूर्ण वर्ष न्हाऊन निघाला होता. त्याचे जागतिक नाव नाभिराज. ते भरतचक्रीचेच पितामह आणि त्याच्याच कुळातील अध्वर्यू , त्याची कीर्ती स्मृतिवद्ध करण्यासाठी या देशाने एकेकाळी नाभिवर्ष हे नाव धारण केले होते परतु त्या पुण्योदयाच्या वेळी भारताचे सुदैव एवढ्यापुरतेच मर्यादित नव्हते नाभिराजापेक्षा युगादिराज ऋषभानी तो श्रेष्ठाचा वश अधिक उचीवर पोहोचविला पण नाभिराजाच्या जीवनकाळीच ऋषभदेवानी आपल्या राजकीय व लौकिक कर्तबगारीला पूर्णावस्था प्राप्त करून दिली होती एवढेच नव्हे तर पुढे लवकरच आपल्या ज्येष्ठ पुत्र भरताला राज्यरथाचा सारथी नेमून आपण स्वत तीर्थराज्याच्या स्थापनेसाठी राजमदिरातून वाहेर पडले आणि नाभिपौत्र भरतराज प्रशासन करु लागले या भरतानेही तो वश आणखी एका पर्वाने उचविला.

हळू हळू तो राज्यपदाचा इन्द्रमणी ठरला काही राजे केवळ कण्ठहार असतात तर काही थोडे कठमणी पदाला पात्र ठरतात इद्रत्व लाभण्यास मानवी आणि दैवी, जागतिक आणि आत्मिक अशी चतुरस्र पात्रता असावी लागते भरत तर सर्वगुणभृत असल्याने त्याची उची मानस्तभासारखी सरळ आकाशश्रेणीने उचावून सर्वातिशायी झाली. त्याच्या कल्याणकारी प्रशासनाने मानवी जीवन

समुन्नत झाले त्याच्यासमोर ऋषभदेवाचा आदर्श मार्गदर्शनासाठी सदैव सिद्ध होता ऋषभनीती हाच त्यांचा न्यायमार्ग होता. त्यानी त्याचे पालन पितृभक्तीने व प्रजावत्सलतेने केले. त्यात ते सिद्धहस्त बनले त्याची ही सिद्धी पाहून विद्याधरच नव्हे तर सिद्ध-यक्ष-गंधर्व-किन्नर-गणही त्याची स्तुती करीत असत त्यांच्या अशा अलौकिक कार्याच्या गौरवार्थ नाभिवर्षाने भरतवर्ष असे नवे नाव धारण करण्यात धन्यता मानली तर त्यात काय आश्चर्य ? त्याच्या कीर्तिपदाचा ध्वनी आजही सर्वत्र निनादत आहे पूर्वसूरींच्या स्मृतिपटलावर त्याच्या धवल कीर्तीची सुगंधी फुले सर्वत्र उमललेली आहेत त्या नित्य ताज्या फुलाचा तरल सुगंध सर्व सूरींच्या काव्यरचनेत सर्वत्र दरवळत आहे त्यातील काही अभिजात पक्तींचे कौतुक करावे तितके थोडेच आहे मनाला क्षणभर तरी मोह पडल्याशिवाय राहात नाही.

## शाश्वत कीर्ती

भरतचक्रीने मानवी जीवनाची उन्नती करण्याचा खूप प्रयत्न केला त्याचा प्रताप तर त्याच्यासारखाच तेजस्वी होता त्याचे राज्य अतिविशाल होते त्याचे प्रशासन व प्रजापालन आणि दण्डनीतीहि कल्याणकारी असल्याने त्याची कीर्ती दिगंतात सर्वत्र पसरली होती ती आजही अक्षतच राहिली आहे महापुराण-कारानी वाहिलेली ही शब्दांजली—

> मनुश्चक्रभृतामाद्यः षट्खण्डभरताधिपः ।
> राजराजोऽधिराट् सम्राडित्यस्योद्घोषित यशः ॥ २० ॥
> नंदनो वृषभेशस्य भरतः शातमातुरः ।
> इत्यस्य रोदसी व्याप शुभ्रा कीर्तिरनश्वरी ॥ २१ ॥
>
> — महापुराण, पर्व ३७

'हा ( १६ वा ) मनू आहे पहिला चक्रवर्ती आहे सहाही खंडाचा एकछत्री स्वामित्व आहे सर्वश्रेष्ठ नृपेन्द्र आहे इतर सर्व राजेलोकाचाही अधिपती आहे.' अशा अभिप्रायाने त्याचा यशोदुंदुभी सदैव निनादत होता हा तर भगवान ऋषभदेवांचा प्रत्यक्ष नंदन आहे. याला शभर भाऊ आहेत पृथ्वी व आकाश व्यापून टाकणारी याची धवल कीर्ती चिरकाल टिकणारी आहे

## नवी दण्डनीती

भरताची दण्डनीती आणि शिक्षापद्धती कोणत्या अर्थाने मानवी जीवनाला उपयोगी पडली, त्यात लोककल्याणाची भावना कितपत अनुस्यूत होती हे पुढील ओळीत दिसेल ।

शरीरदण्डनञ्चैव वधबंधादिलक्षणम् ।
नृणां प्रबलदोषाणां भरतेन नियोजितम् ।। २१६ ।।

— महापुराण, पर्व ३

ज्याची अपराधी प्रवृत्ती महान अनर्थ घडविण्यास समर्थ होती अशा अपराध्यासाठी भरताने मार देणे, बधनात ठेवणे आणि शरीराला आघात पोहोचविणे अशा स्वरूपाच्या नव्या दण्डनीतीची योजना केली.

पिताजीच्या पावलावर पाऊल ठेवीत सदैव प्रगती करीत राहणे हा भरताचा स्वभावधर्मच होता. नाभिराजाच्या दण्डनीतीमध्ये ऋषभनाथांनी भर घातली आणि भरतही त्याचमार्गाने पुढे सरसावले इतकेच नव्हे तर ऋषभराज जसे शासनसस्थेचे अधिष्ठाते ठरले तसेच भरतचक्रीही सर्व राजाना राज्यशास्त्राचे पाठ देण्यात अग्रणी ठरले—

शास्ति स्म वृत्तमखिलं पृथिवीश्वराणाम् ।

— महापुराण, ४२/२०४.

## धर्मानुपालन

भरताची राजनीती धर्मरहित नव्हती तशी असणे शक्य नव्हते. कारण धर्म हा सर्व नीतींचा आणि वर्तनांचा दीपस्तंभ आहे. शिवाय त्याने शासनाचे सर्व धडे ऋषभांकडूनच घेतले होते. त्यालाही चक्ररत्नाची प्राप्ती धर्माच्या प्रभावानेच झाली होती. धर्म सोडून काम व अर्थ या दोनच पुरुषार्थांच्या सिद्धीचा मार्ग अधुरा ठरतो. महापुरुषाना तर चारही पुरुपार्थ साधावयाचे असतात त्याच्या कोणत्याही आचार–विचार मार्गात धर्म हा मूलाधार असतो धर्माशिवाय सामान्याचाही जीवनहेतू पूर्णपणे सफल आणि सुखकर होत नाही त्यामुळे भरताने आपल्या समृद्धीचा आणि शान्ततेच्या काळाचा उपयोग स्वत च्या अधिक धर्माचारासाठी आणि धर्माच्या प्रसारासाठी केला असेल तर त्यात आश्चर्य ते कोणते ? प्रत्यक्ष विहरमान तीर्थंकर ऋषभनाथच त्याचे कुलदैवत होते ! तरी पण धर्माच्या प्रचारासाठी राज्ययत्रणेचा आणि शासनसस्थेच्या सामर्थ्याचा वापर मात्र मुळीच केला नाही हे लक्षणीय आहे त्याच्या या धर्मप्रवृत्तीमुळे इतर सर्व माडलिकानीही भरताचा आदर्श मानून धर्माचरणातही भरताचेच अनुकरण केले कारण यथा राजा तथा प्रजा—

कुलधर्मोऽयमित्येषामर्हत्पूजादिवर्णनम् ।
तदा भरतराजर्षिरन्ववोचदनुक्रमात् ।। २५ ।।

— महापुराण, पर्व ३८.

अर्हद्धर्मच आपला कुलधर्म या विचाराने प्रेरित होऊन राजर्षी भरताने त्या काळी प्रजेला अर्हत्पूजा इत्यादी धर्माचार क्रमाक्रमाने समजावून सांगितला.

**भरतोऽभिरतो धर्मे वयं तदनुजीविनः ।**
**इति तद्वृत्तमन्वीयुः मौलिबद्धा महीक्षितः ॥ १०२ ॥**
**सोऽयं साधितकामार्थश्चक्री चक्रानुभावतः ।**
**चरितार्थद्वये तस्मिन् भेजे धर्मैकतानताम् ॥ १०३ ॥**

— महापुराण, पर्व ४१.

'भरत धर्मामध्ये तत्पर आहे आणि आमचे जीवन तर त्याच्यावरच अवलंबून आहे' असा विचार करून भरताचे मांडलिक राजेही त्याच्याप्रमाणेच धर्माचा आचार करू लागले. ज्याला चक्ररत्नांच्या प्रभावाने अर्थ आणि काम या दोन पुरुषार्थांची पूर्ण सिद्धी साध्य झाली आहे असा हा चक्र-रत्नाधिपती त्या दोन पुरुषार्थासंबंधीची आपली कर्तव्ये संपल्यामुळे आता फक्त धर्मपुरुषार्थाचीच एकाग्र चित्ताने साधना करीत आहे

## दिव्यानुभाव

भरताच्या अलौकिक प्रतापाची कल्पना येण्यासाठी सर्वप्रतापी सूर्याचीच उपमा शोभून दिसते कारण भरताच्या प्रतापाचा विस्तार सूर्याप्रमाणे सर्वंगामी सर्वंकश आणि अप्रतिहत होता. भरतराजा आदित्यराजाप्रमाणेच विश्वाचे पोषण करणारा एक मित्र बनला होता—

**भरतपतिमथाविर्भूतदिव्यानुभाव-**
**प्रसरमुदयरागं प्रत्युपात्ताभिमुख्यम् ।**
**विजयिनमनुजग्मु भ्रातरस्तं दिनादौ**
**दिनपतिमिव मयूखा दिङ्मुखाक्रान्तभाजः ॥ १८५ ॥**

— महापुराण पर्व, ४०.

भरताधिपती दिनपती सूर्यापेक्षाही प्रभावशाली होते कारण त्याच्या दिव्य प्रभावाचा आविष्कार सर्वत्र दशदिशामध्ये एकदम झाला होता सूर्य उदयकाळीच आरक्त असतो तर भरत सदासर्वकाळी प्रजानुरक्त होता सूर्य विश्वातील केवळ तेजोगोलामध्येच प्रमुखस्थानी विराजत असतो तर भरत सर्व तेजस्वी नृपेन्द्रामध्येही प्रमुख होता सूर्य रोज अस्त होत असतो तर भरत सदा विजयशील होता सूर्याची फक्त किरणेच सर्व अंधकाराचा निपात करून सर्व दिशा व्यापतात तर भरताच्या बंधुवर्गानीही सर्व दिशा आपल्या कीर्ति किरणानी आक्रान्त केल्या

होत्या सूर्याची स्वत ची किरणेच फक्त त्याला अनुसरतात तर भरताचे तेजस्वी भाऊ देखील त्याचे अनुयायी बनले होते

## सर्वांग समृद्ध राजधानी

भरताच्या वैभवाची, मानवी धनोपयोगाची, राजनीतीची, न्यायदानाची, बौद्धिक-मानसिक उन्नतीची आणि सर्वांग परिपूर्ण राज्यकारभाराची स्पष्ट कल्पना येण्यासाठी आचार्य गुणसेनानी केलेला भरताच्या राजधानीचा आविष्कार पहा—

**स्वान्तर्नीतसमस्तवस्तुविसरां प्रास्तीर्णवर्णोज्ज्वलाम् ।**
**निर्णिक्तां नयचक्रसन्निधगुरुं स्फीतप्रमोदाहृतिम् ।।**
**विश्वास्यां निखिलाङ्गभृत्परिचितां जैनीमिव व्याहृतिं ।**
**प्राविक्षत्परया मुदा निधिपतिः स्वामुत्पताकां पुरीम् ।।१८६।।**

— महापुराण, पर्व ४०

त्याची नगरी अनेक गुणानी परिपूर्ण होती तेथील अनेक ध्वज-पताका त्या गुणाच्या प्रतीक होत्या (१) त्या नगरीत सर्वप्रकारच्या जीवनोपयोगी वस्तूचा साठा भरपूर होता त्याचप्रमाणे तेथील सरस्वतीच्या विहारामध्ये विश्वातील समस्त तत्त्वाचे अवगाहन होत असे. (२) ती विस्तीर्ण नगरी अयोध्या सर्व प्रकारच्या रगाविष्कारानी उज्ज्वल झाली होती तेथील सारस्वताच्या प्रागणातील सुदर सुदर वर्णनस्थळे सविस्तृत होती. (३) ती नगरी केर-कचऱ्यानी रहित असल्याने अगदी स्फटिकाप्रमाणे स्वच्छ होती तेथील न्यायनिर्णय दोषरहित असल्याने नीतीला पोषक आणि प्रजेला आनददायक होता (४) सात प्रकारच्या नीतीच्या सान्निध्यामुळे तेथील प्रशासन श्रेष्ठ दर्जाचे होते सात नय-निक्षेपांच्या स्वीकारामुळे तेथील शास्त्राभ्यास उच्च प्रतीचा होता (५) तेथील आनदरसरूपी विशाल सागराला भरती आली होती, शास्त्राभ्यासातील आनंदाच्या ऊर्मी सदैव उचंबळून येत होत्या (६) तेथील प्रशासनाने सप्ताग राज्यपद्धतीमधील सर्व अगोपागाचा पुरस्कार केला होता तेथील अभ्यासक्रमामध्ये समस्त अंग व उपाग ग्रथाचा समावेश झाला होता (७) ती नगरी अखिल विश्वामध्ये प्रमुख होती, तिला सर्व दिशाना प्रवेशद्वारे होती तेथील विद्वत्ता विश्वासपात्र होती त्याच्या ज्ञानाभ्यासातील अनुयोगद्वारे (Faculties) सर्वांग परिपूर्ण असून विश्वमुखी होती (८) तेथील प्रशासन विजय-धर्मानुसारी होती आणि सरस्वती ऋषभजिनांना अनुसरणारी होती (९) त्या नगरीतील सपत्ती ९ निधीप्रमाणे अक्षय-स्वरूप होती. भरत स्वत ९ निधीचा स्वामी होता. स्वत च्या स्वामीच्या व नागरिकाच्या विविध गुणाच्या पताका धारण करणाऱ्या त्या विनीता नगरीत भरताने प्रवेश केला तेव्हा त्याच्या मनात अत्यानंदाची भरती आली होती

भरताची राजधानी अक्षरश अयोध्या होती ती अखेरपर्यंत अयोध्याच राहिली तिच्यावर कोणाचे आक्रमण होऊ शकलेले नाही भारताची आजची राजधानी दिल्ली ही पूर्वीपासूनच नित्ययोध्या म्हणून प्रसिद्ध आहे बाकीच्याही राजनगरीची कथा थोड्याबहुत प्रमाणात अशीच असते कारण कोणत्याच राजनगरीला नाभिराज-ऋषभदेव-भरतचक्री अशी चढत्या पायरीची नाथ-परपरा अतूटपणे लाभलेली नाही या शलाका पुरुषाच्या सान्निध्यामुळे अयोध्येचे अतरग वेगळचाच वैशिष्टचानी घडविलेले आढळते त्या घटक तत्त्वामध्ये भरत-संस्कृती स्पष्टपणे प्रगटते वेणाबाईने आपल्या सीतास्वयंवर या ग्रथामध्ये एका ओवीत अयोध्येच्या वैशिष्टचाची नोद केली आहे–

**येश जय प्रताप कीर्ति । हे अयोध्येची बलुती ॥**

– सीतास्वयवर (धुळे), ६/६३

अयोध्येची प्रसिद्धी यश, जय, प्रताप आणि कीर्ती या चार घटक गुणामध्ये गुफलेली आहे अयोध्येची ही सस्कृती भरतादिकाच्या अतूट परपरेतच घडवलेली आहे

## यशशाली राज्यनीती

श्वेतावर मुनिपरपरेमध्ये ज्याना सर्वश्रेष्ठ स्थान प्राप्त झाले, अरिहत केवलीच्या अभावकाळी ज्याची कलिकाल-सर्वज्ञ अशी कीर्ती पसरली त्या हेमचद्र आचार्यांनीही भरताचा गौरव सविस्तरपणे केलेला आहे दिगवर आम्नायातील महापुराणाप्रमाणेच त्याच्या त्रिषष्टिशलाका-पुरुष-चरित या विशालकाय रचनेला मोठी मान्यता लाभली आहे साहित्यातील प्रत्येक क्षेत्रात त्यानी प्रचड रचना केली आहे अगाध रचनेच्या दृष्टीने हेमचद्राची तुलना करणे कठीण आहे विपयव्याप्तीच्या दृष्टीने त्याची रचना केवळ वीरसेन आचार्यांचाच मार्ग अनुसरते विशालता, विविधता आणि परिपूर्णता ही त्याच्या रचनेची वैशिष्टचे होत भरतचक्रीच्या अलौकिक गुणाच्या माहात्म्याविषयी ते म्हणतात–

**श्रीर्वाग्देव्यै कुप्यति वाग्देवी द्वेष्टि सततं लक्ष्म्यै ।**
**भरतमनुगम्य सांप्रतमनयोरात्यतिकं प्रेम ॥ ९६० ॥**

– त्रिष० चरित, पर्व १, सर्ग २.

सपत्नी स्वभावत च सरस्वतीवर कोप करीत असते आणि सरस्वतीही लक्ष्मीचा सतत द्वेष करते. मात्र आता भरतराजाचा उदय झाल्यावरोवर त्याच्या मागोमाग जाणाऱ्या ह्या दोघीचे परस्परावरील प्रेम देखील अकाटच वनले आहे ! !

**धान्यधनैर्जीवधनैः सर्वदा निरुपद्रवैः ।**
**ग्रामाणां संपदं पश्यन् निजनीतिलताफलम् ॥ ६०५ ॥**

— त्रिषष्टि० चरित, पर्व १, सर्ग ३.

धनधान्यानी आणि उपद्रव न देणाऱ्या पशुधनांनी सपन्न असे आपल्या राज्यातील सर्व ग्रामसमूह पाहून आपली राज्यनीतीरूपी लता फलसपन्न झाली असे भरताला वाटले.

**जयशाली युद्धनीती**

भरत हा दुष्टानुशासन व प्रजानुपालन या दोन्ही प्रकारच्या राजकर्तव्यामध्ये सदैव दक्ष होता. शत्रूची उपेक्षा ही चीज त्याला अज्ञात होती त्यामुळे त्याच्या राज्यात सर्वत्र सदासर्वकाळी कुशलच वर्तत होते त्याची ही जयशाली नीती सर्वांनाच अनुकरणीय आहे–

**उपेक्षितव्यो न परः स्वल्पोऽप्यामयवद् यतः ।**
**तदद्यालं विलंबेन यतध्वं तज्जयं प्रति ॥ १३ ॥**

— त्रिषष्टि० चरित, पर्व १, सर्ग ५.

ज्याप्रमाणे रोग कितीही अल्पप्रमाणात असला तरी त्याची केव्हाही उपेक्षा करू नये, त्याचप्रमाणे शत्रू कितीही लहान असला तरी त्याच्याकडे दुर्लक्ष करू नये. म्हणून आजचा दिवसही वाया न घालविता त्याच्यावर जय मिळविण्यासाठी प्रयत्न करा

**भरत-वैभव**

**रम्यैः स्वेच्छाविनोदैर्निरविशदधिराड् भोगसारं दशाङ्गम् ।**

— महापुराण, ३७/२०८

चक्रवर्ती भरत १० प्रकारच्या सारश्रेष्ठ चक्रिभोगाचा मनसोक्त उपभोग रमणीयतेने व खेळकरपणे घेत असे. आणि त्याच्या पायाशी संपूर्ण मानवी आणि दैवी वैभव लोळण घेत होते असा नातिशय गुणगौरव अनेक ग्रथात आढळतो ज्यासाठी भरतेश-वैभवासारखे खास ग्रथ निर्माण होतात ती विभूती आज परोक्ष असली तरीही तिला मनश्चक्षूसमोर आणण्याचा मोह आवरणे कठीण आहे जिनसेन आचार्यांनी आपल्या महापुराणातील ३७ व्या पर्वामध्ये भरताच्या वैभवाचे विवरण– (१) देहवैभव, (२) देवता, (३) मन्त्रिमंडळ, (४) संग्राम-सामग्री, (५) सेनादल, (६) अधिसत्ता, (७) राज्यांगविस्तार, (८) साम्राज्य वैभव, (९) वैयक्तिक भोगवैभव, (१०) भोगायतनविस्तार आणि (११) अंतःपुर

अशा अकरा अनुयोगद्वारामध्ये थोडक्यात दिलेले आहे या प्रकारच्या जिज्ञासा-पूर्तीने भरताचे व्यक्तित्व मनामध्ये अधिक स्पष्टपणे साकार होण्यास मदत होते त्याच्या वर्धनशील विभूतीची कल्पना करणे शक्य होते जन्माने मानवी असूनही आपल्या शलाका पुरुषार्थाने जीवनभर दैवी अवस्था उपभोगून अती ससारातीत अनतावस्था साध्य करणाऱ्या त्या क्षमतेचा साक्षात्कार होणे सोपे जाते

**(१) देहवैभव–** सस्थान, सहनन अशा परिभाषेत आणि काव्य-विलासात भरताच्या शरीराचे वर्णन अखड करता येईल पण दृक् स्वरुपात केलेले मूर्तिमत वर्णन जिनसेन आचार्यांनी पुढीलप्रमाणे एका क्षेपेत केले आहे–

> **निस्तप्तकनकच्छायं सच्चतुःषष्टि लक्षणम् ।**
> **रुरुचे व्यञ्जनैस्तस्य निसर्गसुभगं वपुः ॥ २९ ॥**
> **शारीरं यच्च यावच्च बलं षट्खण्डभूभुजाम् ।**
> **ततोऽधिकतरं तस्य बलमासीद् बलीयसः ॥ ३० ॥**
>
> **– महापुराण, पर्व ३७.**

भरताची देहकान्ती तावून सुलाखून घेतलेल्या सोन्याप्रमाणे कान्तवर्ण होती सपूर्ण ६४ लक्षणानी व तीळ इत्यादि शुभ चिन्हानी सुशोभित असा भरताचा देह निसर्गत च मनोज्ञ असल्याने सर्वांना आवडत होता या समस्त सहाही खडातील इतर सर्व राजाचे मिळून जितके व ज्याप्रकारचे शारीरिक सामर्थ्य होते त्यापेक्षा वरचढ शरीरबल भरताच्या त्या एकाच देहात विलसत असल्याने तो निखालसपणे व्यजनत व भावत बलिष्ठच होता

**(२) दैवीवैभव–** ९ निधी, १४ रत्ने, आणि १६ हजार गणबद्ध देव भरत चक्रीच्या सेवेत सतत हजर होते

९ निधी– (१) काल, (२) महाकाल, (३) नैसर्प्य, (४) पाण्डुक, (५) पद्म, (६) पिङ्गल, (७) मानव, (८) शख आणि (९) सर्वरत्न.

१४ रत्ने– यापैकी ७ देवताधिष्ठित अशी राज्योपयोगी वस्तू असून बाकी ७ लौकिक जगातील अतिशययुक्त सर्वोत्कृष्ट सेवाकारी आहेत 'या परी हाच' असे ज्याचे वर्णन करता येते अशा सातिशय चिजानाच रत्न अशी सज्ञा आहे.

देवताधिष्ठित– (१) चक्ररत्न सुदर्शन, (२) छत्ररत्न सूर्यप्रभ, (३) दण्डरत्न चण्डवेग, (४) असिरत्न सौनदक, (५) चर्मरत्न वज्रमय, (६) मणिरत्न चूडामणी आणि (७) काकिणीरत्न चिंताजननी.

सेवाकारी– (१) सेनापतिरत्न जयकुमार, (२) स्थपतिरत्न भद्रमुख, (३) गृहपतिरत्न कामवृष्टि, (४) हस्तिरत्न विजयगिरी, (५) अश्वरत्न पवनंजय, (६) स्त्रीरत्न सुभद्रा आणि (७) मन्त्रिरत्न (पतप्रधान) बुद्धिसागर.

१६ हजार गणवद्धामर– हे देवगतीमधील पारिपार्श्विक गणातील अमर असून त्यांची संख्या सोळा हजार होती यांची चक्रिसेवा सर्वव्यापी असली तरी आधुनिक परिभाषेत सांगावयाचे तर एका अर्थाने यांचे काम Aides-de-Camp या स्वरूपाचे असते जेव्हा परिस्थिती अतिरेकी होते तेव्हा हे गणवद्ध चक्रीला सर्वच प्रकारची मदत करतात आचार्य हेमचन्द्रांनी तर याचा उल्लेख आत्मरक्षक देवता असाच केला आहे

(३) **मंत्रिमंडळ** ( १ ) पतप्रधान बुद्धिसागर, ( २ ) सेनापती जयकुमार, ( ३ ) गृहमंत्री कामवृष्टी, ( ४ ) स्थापत्यविशारद भद्रमुख, ( ५ ) युवराज अर्ककीर्ती, ( ६ ) पंडितवर्य दिविजकलाधर

इत्यादी कार्यकारी मंत्रिमंडळाशिवाय भरतचक्रीला त्याचे वैयक्तिक सल्लागार निरनिराळ्या आठ प्रकारच्या राजनीतीमध्ये सल्ला देत असत व प्रत्यक्ष कारभारातही मदत करीत असत. पुष्कळदा त्यांच्या नावावरूनच त्यांच्या कार्याचाही बोध होतो ही पुढील नावे भरतेशवैभव या ग्रंथात यत्र तत्र आढळतात–

(१) महानागर, (२) अनुकूलनायक, (३) विटनायक, (४) शठनायक, (५) दक्षिणाक, (६) कुटिलनायक, (७) पीठमर्दक– हा नि पात करण्याचा सल्ला देत असे आणि (८) विदूषक– हा शत्रूचें वा विरोधी सल्लागाराचे व्यंग फोडत असे याशिवाय भरताच्या दरबारातील राजपंडितांची संख्या सातशे (७००) होती

( –भ वै , दिग्विजय विभागात यत्र तत्र )

(४) वैयक्तिक **संग्राम-सामग्री**– वरील दैवी आयतने, उपकरणे, रत्ने इत्यादिकांशिवाय– ( १ ) गंभीरावर्त शंख, ( २ ) भूतमुख खेटास्त्र, ( ३ ) अभेद्य कवच, ( ४ ) अजितंजय रथ, ( ५ ) वज्रकाण्ड धनुष्य, ( ६ ) अमोघ बाण, ( ७ ) वज्रतुण्ड शक्ती, ( ८ ) सिंहाटक भाला, ( ९ ) लोहवाहिनी कट्यार, ( १० ) मनोवेग कणयास्त्र, ( ११ ) वीरांगद प्रकोष्टक

(५) **सेनावैभव—** सपूर्ण सैन्य तसे अफाट आणि असख्यच पुष्कळसे सैन्य प्रसगानुसार निर्माण करण्यात येत असे माडलिक राजांच्या सैन्याचाही उपयोग होत असे विशेष म्हणजे पुढील यक्षवलाचे दोन खास विभाग होते ते चक्रीच्या इतर सैन्याला पर्वतरागा, नद्या, समुद्र अशा प्राकृतिक अडचणीच्या ठिकाणी पाहिजे तेव्हा पाहिजे ती मदत करतात त्यापैकी स्थलभागाची जवावदारी अद्रिकुमारांवर असे त्यामध्ये कृतमाल, नाटचमाल इत्यादी किन्नर विभागप्रमुख होते आणि जलभागाची जवावदारी अब्धिकुमारांवर असते एक प्रकारे नौदलच त्यात मागध, वरतनू, प्रभास इत्यादी यक्ष विभागप्रमुख होते भरताचे खडे सैन्य पुढीलप्रमाणे—

(१) देवसेना १६ हजार, (२) यक्षवल प्रसगानुसार, (३) विद्याधरसेना ३२ हजार, (४) हस्तिदल ८४ लक्ष, (५) रथदल ८४ लक्ष, (६) अश्वदल १८ कोटी आणि (७) पायदळ ८४ कोटी

(६) **अधिसत्ता—** भरतवर्षाधिपती चक्रीची सत्ता सहाही खडातील सर्व आर्य, म्लेच्छ, विद्याधर, यक्ष आणि किन्नरावर अवाधित असे त्यापैकी काही सख्या- (१) मुकुटवद्ध राजे ३२ हजार, (२) देशसख्या ३२ हजार, (३) म्लेच्छ-राजे ३२ हजार, (४) आतरद्वीप ५६ हजार आणि (५) कुराज्ये ४९ फक्त.

(७) **राज्यांगविस्तार—** (१) नगर ३२ ह (२) ग्राम ९६ कोटी, (३) पत्तन ४८ ह (४) द्रोणमुख (वदर) ९९ हजार, (५) खर्वट २४ ह (६) मडव २४ ह (७) आकर २० ह (८) खेट १६ ह (९) संवाह १४ ह (१०) वनविभाग २८ ह आणि (११) रत्नखाणी १८ हजार

(८) **साम्राज्य-वैभव—** (१) राजधानी अयोध्या, (२) राजभेरी आनंदिनी, (३) सेनानिवास नद्यावर्त, (४) राजसभा स्वस्तिक, (५) श्रीगृह (प्रासाद) गिरिकूट, (६) नृत्यालय वर्धमानक, (७) भाण्डार कुवेरकान्त, (८) कोष्ठागार वसुधारक, (९) सिंहासन अनुत्तर, (१०) परिकोट क्षितिसार, (११) गोपुर सर्वतोभद्र आणि (१२) आयुधशाला.

(९) **वैयक्तिक भोगवैभव—** (१) हर्म्य (निवासालय) पुष्करावर्त, (२) शयनासन सिंहवाहिनी, (३) छत्र सूर्यप्रभ, (४) चामर अनुपम, (५) दण्ड सुविधी, (६) दिव्याशन (अन्न) महाकल्याण, (७) भक्ष्याशन अमृतगर्भ, (८) स्वाद्य अमृतकल्प, (९) पानक अमृत, (१०) किरीट देवमुकुट, (११) कवच अभेद्य, (१२) कुडल विद्युत्प्रभ, (१३) रत्नमाला अवतंसिका, (१४) पादुका विषमोचिका, आणि (१५) रथ अजितजय.

(१०) **भोगायतनविस्तार**– (१) सर्वर्तुकमहल वैजयंत, (२) ग्रीष्ममहल धारागृह, (३) वर्षामहल गृहकूट, (४) दूष्यकुटी देवरम्या, (५) स्नानगृह जीमूत, (६) रथनस्थाली १ कोटी, (७) हल १ लक्षकोटी, (८) गोशाळा ३ कोटी, (९) पताका ३८ कोटी, (१०) सूपकार ३६३, (११) नर्तक रंगशेखर, (१२) नर्तकी नेत्रमोहिनी व चित्रमोहिनी इ. ३२०००

(११) **अन्तःपुर**– (१) देवीवर्ग · स्त्रीरत्न सुभद्रादिक ९६ हजार –
(i) ३२ हजार विद्याधरकन्या
(ii) ३२ हजार राजकन्या
(iii) ३२ हजार म्लेच्छराजकन्या

(२) पुत्रवर्ग अर्ककीर्ती, वृषभराज, आदिराज, अरविंद, कुरुविंद प्रभृति १२०० पेक्षा जास्त.

(३) कन्यावर्ग : नलिनावती, कुमुदावती, रत्नावली, मुक्तावली, मधुरा इत्यादी ५०१ पेक्षा जास्त

(– भ वै , दिग्विजय, पुत्रविवाहसंधि· )

उपरोक्त पुष्कळशा भोगवस्तू विविधोपयोगी असतात म्हणून त्यांचा उल्लेख अनेक ठिकाणी करता येतो पण असा पुनरुक्त उल्लेख टाळून यादी लघुत्तम करण्याचा प्रयत्न केला आहे

## विशेषणपदे

रत्नाकर कवीनी त्याच्या भरतेशवैभव ग्रंथामध्ये भरताचा गौरव फार मोठ्या प्रमाणात केलेला आहे खास भारताचाच वडिवार गाण्यासाठी ती ग्रंथ-रचना झाली असल्याने इतर कोणत्याही ग्रंथापेक्षा त्यात भरतगुणकीर्तन अधिक प्रमाणात आढळते त्यातील केवळ भरताची विशेषणपदे तपासून पाहिली तरी त्याच्या व्यक्तिमत्वातील शेलका भाव लक्षात आल्याशिवाय राहात नाही नमुन्यादाखल पुढील विरुदावली पहा—

**श्रीमन्महानिस्सीमसामर्थ्य– विस्तारितोर्वरीतलदुस्तररिपुराज– वैपर्याप्तरजस्तोमसंतोषकर– कामिनीजनपंचबाण– षट्खण्ड-भूमण्डलाग्रगण्य– नाममात्रश्रवणसुक्षेमकर– सुजनेन्दु– भरतभूपतिः . ...॥**

– भ. वै., दिग्विजय, भूचरीविवाहसंधि. ।

**हंसोपमानसारग्राही ... तद्भवकर्मविध्वंसि- सुज्ञानावगाही- शृंगारयोगि- शुद्धात्मानुरागी राज्याङ्गोऽपि संगत्यागी अंगनाजनवनमधुमास- दिव्यमुक्त्यंगनाचित्तविलास- भरतचक्रेशचण्डः हुण्डावसर्पिणीकालस्यादौ षट्खण्डमण्डले अस्मिन् खण्डे अखण्डभोगी बभूव ॥**

— भ. वै, दिग्विजय, अकमालासंधिः ।

## भरतनीतीतील मंत्र

लोकशाहीच्या या युगात सर्वोदयी नीती किंवा कल्याणकारी राज्यपद्धती सर्वांनाच प्रियच नव्हे तर विलोभनीय वाटते ! पण ते तंत्र फारसे जमत नाही कुणालाच कारण त्यातील मन्त्र चुकतो तरी, किंवा तो पेलण्यास राज्यकर्ते अपात्र तरी ठरतात कल्याणाचा प्रयत्न स्वानुवर्ती असून चालत नाही. हिताची भावना आत्मवर्ती झाली की त्या स्वार्थाच्या पोटी पापाची सर्वच वशावळ पटापट जन्म घेते. भरताचे राज्य निष्पाप होते कारण भरताची राज्यनीती विश्वकल्याणानुसारी होती ! ही भरतनीती आजच्या शासनाने स्वीकारली तर—



**इलायाः सकलायाः यः करोति कुशलं स्वयम् ।**
**अस्ति तस्य स्वतः सिद्धं कुशलं भरतेशितुः ॥ ८७ ॥**

— त्रिषष्टि० चरित, पर्व १, सर्ग ५

भरत राजा सपूर्ण पृथ्वीचे कल्याण साधण्यात स्वत जातीने दक्षता घेत असे. म्हणून त्या भरताग्रणीला स्वत च्या कल्याणाची साधना आपणहून साध्य झाली होती.

पूर्वकालीन कुलकरांनी प्रजानुशासनासाठी हा, मा, धिक् अशा तीनच प्रकारच्या दण्डनीतीचा, कालमान परिस्थितीला व अपराधाला अनुसरून प्रयोग केला होता. नाभिराजांच्या वेळी काही वेळा या तीनही नीतीचा उपयोग फलदायी होईनासा झाला म्हणून नाभीनी स्वत हून ऋषभाना राज्याभिषेक केला शासन सस्थेची सर्व जबाबदारी त्याच्यावर सोपविली कालानुरूप दण्डनीती व दण्डशास्त्र सुधारणे अपरिहार्य ठरले. त्याप्रमाणे ऋषभदेवानी पूर्वीच्या तीन प्रकारच्या दण्डनीतीमध्ये परिभाषणा आणि मंडलबध अशा नव्या दोन मार्गांचा प्रसगोपात्त अवलब केला. आणि खऱ्या अर्थाने राज्यसंस्थेला बळाचा वापर करण्याची पद्धत या जगावर प्रथमच प्रचलित झाली ! या नव्या व्यवस्थेला अनुसरून ऋषभदेवाना युगादिकालचा प्रथम नृपती अशी मान्यता मिळाली आहे भरत राजाला मात्र हा-मा-धिक् या परपरागत दण्डप्रकाराचा कोणताही उपयुक्त परिणाम प्रत्यक्षात

अनुभवास आला नाही म्हणून त्याना त्या तीन प्रकाराचा उपयोग फक्त शहाण्या लोकांसाठीच केला. आणि अपराधी प्रवृत्तीच्या लोकांसाठी (४) परिभाषणा, (५) मण्डलबध, (६) चारग आणि (७) छविच्छेद या शेवटच्या चार प्रकाराचा अवलंब अपराधाच्या तीव्र-मंदतेला अनुसरून केला आणि आपले प्रशासन अधिक प्रभावी व कालानुरूप बनविले या शेवटच्या चार प्रकारानांच भरतनीती अशा विशिष्ट नावाने ओळखतात. तीच स्वतंत्रपणे चार प्रकारची दण्डनीती म्हणून प्रसिद्ध आहे—

परिभासणा उ पढमा मंडलबंधम्मि होइ बीयाओ ।
चारगछविछेदाई भरहस्स चउव्विहा णीई ॥
— ठाणंग, ७ व अभिधानराजेन्द्र पान ५९५.

या चार प्रकारच्या दण्डनीतीच्या वापरासबंधी काही निश्चित असे धोरणही आखलेले होते त्यावरून दण्डनीतीच्या मागे असलेली विचारसरणी कोणत्या स्वरूपाची होती याचेही ज्ञान होते दण्ड-प्रयोगाचा दुरुपयोग होऊ नये म्हणून चांगली खबरदारी घेतली जात होती तशी ती घेणे आजच्या युगातही फायदेशीर आहे—

शरीरदण्डनञ्चैव वधबंधादिलक्षणम् ।
नृणां प्रबलदोषाणां भरतेन नियोजितम् ॥ २१६ ॥
— महापुराण, पर्व ३.

मार देणे, बांधून ठेवणे आणि देहाची हानी करणे अशा स्वरूपाची जी शिक्षा विहित केली होती तिचा उपयोग ज्या लोकाचे अपराध तीव्र स्वरूपाचे असून जास्त हानीकारक असतात अशाच अपराध्यासाठी भरत राजाने केला होता

मात्र शत्रूसाठी त्यानी वापरलेली नीती साम-दाम-दण्ड-भेद अशा ४ प्रकारची होती शत्रूच्या संदर्भातील या चार नीतींचा उपयोग भरतराजे कशा पद्धतीने करीत असत. हे सांगताना हेमचंद्र आचार्यांनी स्पष्ट म्हटले आहे की— भरतचक्री कितीही मोठा व शक्तिशाली असला तरी नीतीक्रमाचा अधिक्षेप करीत नसे प्रथम सामाचाच प्रयोग होत असे—

महान्तः शक्तिमन्तोऽपि प्रथमं साम कुर्वते ॥ २९० ॥
— त्रिषष्टि० चरित, पर्व १, सर्ग ३.

## सर्वंकष श्रेष्ठत्व

चक्रवर्ती भरताच्या अगभूत महाशक्तीचा परिचयही काही खास शब्दावलीत करून दिलेला आढळतो भरतासारख्या थोर विभूतींना केवळ उत्तम मानवी गुणच नव्हे तर काही दैवी ऋद्धीही प्राप्त झालेल्या असतात त्यांचा आत्माही पुण्यसमर्थ असतो या सर्वांचा एकत्रित परिणाम म्हणून त्यांचे व्यक्तिमत्त्व फारच उचावते म्हणून ते अखेरपक्षी दैवततुल्य भासतात—

> **दो सोला वत्तीसा सव्ववलेणं तु संकलनिवद्धं ।**
> **अच्छंति चक्कवट्टिं अगडतडम्मि ठियं संतं ।। ७३ ।।**
> **घेत्तूण संकलं सो वामगहत्थेण अछमाणाणं ।**
> **भुंजेज्ज विलिंपेज्ज व चक्कहरं ते न चाएंति ।। ७४ ।।**
>
> — अभिधानराजेन्द्र, पान १२८७

चक्रवर्ती राजाला साखळदडाने बाधून, त्यांना विहीरीच्या काठावर उभे करून वत्तीस हजार राजानी आपल्या सर्व शक्तीनिशी ओढण्याचा प्रयत्न केला तरी केवळ आपल्या डाव्या हातानेच ती साखळी सावरून धरून चक्रवर राजा, ते सर्व वत्तीस हजार राजे त्याना विहिरीकडे ओढीत असतानाच, खुशाल (उजव्या हाताने) जेवू शकेल किंवा लेपनकार्य करू शकेल ! तरीही ते राजे त्याला ओढून विहीरीत पाडू शकणार नाहीत.

महाकवी पंप हा एक फार मोठा प्रतिभावत कन्नड साहित्यकार होऊन गेला त्याला कन्नड साहित्यामध्ये सर्वज्येष्ठ व श्रेष्ठ स्थान आहे अक्षरश तो त्या साहित्यातील आद्य कवी आहे त्यानी लिहिलेले कन्नड भाषेतील रामायण उत्तरेतील तुलसी-रामायणाप्रमाणेच लोकविश्रुत आहे याच पप कवीने कन्नडमध्ये आदिपुराणाचीही रचना केली तो ग्रथ त्याने इ सन ९४५ मध्ये लिहून पूर्ण केला त्यात त्याने प्रसिद्ध आचार्य जिनसेनाचे अनुकरण केलेले आढळते या पपकृत आदिपुराणाची लोकाभिरुची सारखी वाढतच राहिली त्याची किर्ती सर्व दिशेला पसरली लोक त्याना काव्यचक्रवर्ती म्हणून ओळखू लागले त्याचा जन्म १००० वर्षांपूर्वी झाला असला तरी त्याचे ग्रथ मात्र आजही जिवत आहेत ते कालातीत बनून अमर होत आहेत त्याच्या जीवनावर अधिक प्रकाश पडेल असे दोन शिलालेख हैद्राबाद जवळील बोधनपूर येथे सापडलेले आहेत त्यावरून त्याची परपरा अधिक स्पष्टपणे जाणून घेण्यास नवी साधन-सामग्री उपलब्ध झाली आहे त्याच्या कन्नड आदिपुराणामध्ये भरताच्या श्रेष्ठतेसबधीचे काही उल्लेख नमुनेदार आहेत. आपला दिग्विजय सपवून परत अयोध्या राजधानीस येऊन पोहोचल्यावर

अयोध्या-प्रवेशाच्या निमित्ताने भरतचक्रींनी सर्वांना उद्देशून जे निवेदन केले आहे त्यामध्ये त्याची श्रेष्ठता स्पष्टपणे दृग्गोचर होते–

पुरुपरमेश्वर पुत्रम्
भरतेश्वर-चक्रवर्तिवंदिर्दम् त–।
– द्धरणि-निवासिगळु व्यं–
– तरामरर् बंदु काणवुदवनतमकुटर् ॥

– पंपकृत आदिपुराण, आश्वास १२, पद्य ८९.

पुरुपरमेश्वर ऋषभनाथाचे पुत्र भरतेश्वर चक्रवर्ती याचे (अयोध्येमध्ये) परत आगमन झाले आहे म्हणून या पृथ्वीतलावर राहणारी सर्व जनता, व्यंतरादिक यक्षगण आणि स्वर्गातील देवसमूह या सर्वांनी येथे येऊन आपापली मुकुटे अवनत करुन भरतचक्रींचे दर्शन घ्यावे

ज्या बाहुबलीने द्वंद्वामध्ये भरताचा पराभव केला त्याला देखील भरताचे श्रेष्ठत्व मान्य होते स्वत च्या बाहुबलावर भरवसा ठेवून त्याने भरताला आव्हान दिले पण त्याचे गुण आणि त्याचे व्यक्तिमत्व लक्षात येताच एवढा मोठा कणखर बाहुबली देखील बर्फाच्या पर्वताप्रमाणे झर-झर विरघळला तेव्हा भरतापेक्षा श्रेष्ठव्यक्ती कोणी दुसरा असणे शक्य नाही. तो केवळ सर्वश्रेष्ठच ठरला. याविषयीचे पंप महाकवीचे विवरण पहा–

पुरुपरमेश्वरपुत्रम्
चरमाङ्गं चक्रवर्तियेन्दोडे पेळल् ।
दोरे पेररार् भरतनोळेने
करगिदुदा गर्वपर्वतं मागधना ॥

– पपकृत आदिपुराण, आ. १२, पद्य १०९.

भरत पुरुपरमेश्वर ऋषभनाथ याचा पुत्र असून चरमोत्तम-देहधारी आहे आणि तो आता चक्ररत्नाचा स्वामी बनला आहे हे मान्य केल्यावर भरतासमान दुसरा कोणीही राजा असू शकणार नाही असा विचार मनात येताच मगध-राजकुमार बाहुबलीचा गर्वरूपी पर्वत पार वितळून गेला

भरतचक्री हे चरमशरीरी अर्थात तद्भवमोक्षगामी होते. अशा आत्म्याची शक्ती फारच तरळ व प्रभावी असते ते ज्या क्षेत्रात शिरतात तेथे थेट शिखरावर पोहोचतात अपूर्ण यश त्याना ठाऊकच नसते मानव असूनही दैवताचे वैभव, यक्षादिकाची सेवा आणि विरक्त मुनीचे निर्लेप मन याचा सुदर आदर्श या

पृथ्वीतलावर केवळ जिनमंदिराच्या रूपानेच प्रत्यक्ष दिसतो हे जाणून भव्य जनाच्या आराधनेसाठी भरताने मंदिरनिर्मितीच्या क्षेत्रामध्येही अत्युत्तम कामगिरी केली पराक्रम आणि त्याग असा पूर्णाकार आदर्श त्यांनी निर्माण केला म्हणून त्या मंदिरांना केवळ भौक्तिक महत्त्व नसून त्यांच्या रूपाने अध्यात्मिक विकासातील ती आदर्श गुणस्थाने बनली भरताच्या चक्ररत्नाने दिग्विजय करून पृथ्वीची परम सीमा गाठली तर त्याच्या धर्मशील कार्याने कैलासावरील मंदिर-रूपाने पुण्याचाराचा कळस गाठला तेराव्या शतकात होऊन गेलेल्या नयसेनाने धर्मामृत नावाचा एक सुंदर ग्रंथ कन्नड भाषेत लिहिला त्यातील दृष्टांत-कथा व उदाहरण-कथा यांची रचना फारच सुंदर बठली आहे याच भरताने बांधलेली कैलासवरील जिनमंदिरे ऋषभनाथाच्या जीवन चरितातील दृश्यांनी कशी व्याप्त आहेत हे सांगणारा त्यातील एक उल्लेख पहा—

> भरतेश्वरनष्टापद
> गिरियोळ् लेसागि समेद चैत्यावळियम् ।
> तरलाक्षिगे वण्णिसुतुं
> पुरुपरमेश्वरन चरितेयं केळिसुतम् ।।
>
> — धर्मामृत, आ० १०, पद्य २८

अष्टापद गिरीवर भरतेश्वरांनी जिनमंदिराची सुंदर रांग बांधविली आहे (एका यात्रेकरूने) आपल्या तरळ दृष्टीच्या (गरोदर) पत्नीला त्या मंदिराचे वर्णन सांगीत सांगीत तिला पुरुपरमेश्वर ऋषभनाथांचे (संपूर्ण) चरित्रच ऐकविले

## भरताची भोगनिती

लौकिक आणि पारलौकिक, भौतिक आणि आत्मिक, भोग आणि त्याग अशा सर्वच क्षेत्रातील आत्यंतिक मर्यादा एकाच आयुष्यात गाठणाऱ्या सर्व पुण्यत्रनामध्ये भरत अग्रगण्य होत सर्वकष अशी त्यांची विभूती वर्णनातीत आहे त्यांचा प्रभाव शब्दातीत आहे सर्वोत्तम भोगामध्ये स्वतःची सर्वेंद्रिये पूर्णपणे गढली असतानाही त्यांचे मन भोगवृत्तीपासून किती अलिप्त राहत होते आणि इंद्रियांना तपश्चर्येमुळे त्रास होत असतानाही त्यांचे मन कसे सर्वानंदात मग्न राहू शकत होते यासंबंधीच्या त्यांच्या मनाच्या सामर्थ्याचे वर्णन रत्नाकर कवीने आपल्या भरतेश-वैभव या कन्नड ग्रंथात केले आहे त्या ग्रंथात भोग आणि योग या दोन्ही मार्गांच्या संदर्भातील तत्त्व-ज्ञानाचा सुरेख संगम झाला आहे असे मानतात भरताच्या अलिप्ततेच्या सामर्थ्याचे वर्णन करताना रत्नाकर वर्णीने— 'भरत शिलाखंडावर ध्यानस्थ असतानाही भोग घेऊ शकतात तर चारुगात्रीच्या उरोजाशी खेळत असतानाही भोगातीत असे

महायोगी बनू शकतात ! अशा शब्दात भरताच्या विशिष्ट मनोरचनेचे चित्रण केले आहे त्याच्या स्वभावातील वैशिष्टच स्पष्ट करण्यासाठी– उण्ड उपवासी (जेवूनही उपवासी) व वळसि ब्रह्मचारी (स्त्री-भोग घेऊनही ब्रह्मचारी) असे खास शब्दप्रयोग वापरले आहेत 'जल में कमल भिन्न है।' ही रीतही भरताची भोगनीती समजून घेण्यास पूर्णपणे समर्थ नाही मनावर पूर्ण तावा आणि मनाची मुक्तावस्था भरताच्या उदाहरणानेच शिकणे शक्य आहे अशा महान प्रभावशाली भरताचा केवळ दृष्टिक्षेपही त्वरित मोक्षाचा लाभ करुन देण्यास समर्थ आहे–

पुरुपरमेशन हिरियकुमारनु
नरलोककोब्बने राय ।
मुरिदु कण्णिटरे क्षणके मुक्तिय कास्व
भरत चक्रिय हेळलळवे ॥

– भरतेशवैभव, भोगविजय, सधी १, पद्य २०

हा पुरुपरमेश्वराचा ज्येष्ठ पुत्र एकटाच या सपूर्ण मानवी जगताचा अधिपती झाला त्याची कृपादृष्टी ज्याच्याकडे वळेल त्याला एका क्षणातच मोक्ष प्राप्त होईल ! अशा प्रभावी भरतचक्रीचे वर्णन करण्यास कोण समर्थ आहे ?

## नामलेखनाची भूमिका

इ स ७८३ मधील हरिवशपुराण देखील महापुराणाइतकेच प्रमाणभूत आहे त्यामध्ये नामलेखनाचा वृत्तान्त दिला आहे या लेखन क्रियेची व त्या उत्कीर्ण नामाची भूमिका ह्या वर्षाच्या नामकरणामध्ये उद्बोधक भासेल. ऋषिकूट ही पूर्णचक्रीच्या दिग्विजयाची अतिम मर्यादा उत्तरेकडील दिग्विजयाचा अतिम टप्पा ठरलेल्या हिमवंत पर्वतातील ऋषभकूट शिखराजवळ पोहोचताच दिग्विजय पूर्ण होत असतो त्या शिखरावर नाव कोरण्याची पद्धत सर्वच चक्रवर्तींनी पाळलेली आहे ते नामलेखन जयाच्या व यशाच्या पूर्णत्वाचे द्योतक आहे शिल्पकार स्वत चक्रस्वामी पुरुषरत्न, साधनीभूत लेखनी प्रत्यक्ष काकिणी रत्न व पार्श्वभूमीसाठी ऋषभकूट गिरिरत्न अशा तीन अनुत्तर रत्नांच्या सगमभूमीवरील नामरत्नाची अक्षर कीर्ती अक्षरश अविनाशी ठरल्यास नवल कसले ?

आगत्य चक्रवर्ती च ततो वृषभपर्वतम् ।
तत्रालिखन्निजं नाम काकण्या स परिस्फुटम् ॥ ४७ ॥
वृषभस्य सुतो भोऽहं चक्री भरत इत्यसौ ।
प्रवाच्य विजयार्धस्य वेदिकामगमत् प्रभुः ॥ ४८ ॥

– हरिवशपुराण, सर्ग ११.

भरत चक्रवर्ती वृषभ पर्वतावर येऊन पोहोचला तेथे काकिणी रत्नाच्या साहाय्याने त्याने " मी वृषभनाथाचा मुलगा असून माझे नाव भरत आहे. मी या वर्षाचा चक्रवर्ती आहे " असे आपले नाव स्पष्टपणे ठळक अक्षरात कोरले त्या नामलेखाचा उद्घोष केला आणि वर्षाधिपती भरत परतीच्या मार्गावर असलेल्या विजयार्ध पर्वतावरील वेदिकेजवळ येऊन पोहोचला

## अतुलनीय ज्येष्ठता

सर्व पर्यायातील आणि स्थित्यंतरामधील भरताची सार्वकालिक श्रेष्ठता ९ व्या शतकातील आचार्य गुणभद्रानी आपल्या उत्तरपुराणातही व्यक्त केली आहे भरत केवळ एक वीर्यातिशायी चक्री आणि प्रभावी प्रशासकच होता असे नव्हे तर तो मानवाचे कल्याण चिंतण्याच्या बाबतीतही एक श्रेष्ठ विचारवंत होता म्हणूनच त्याला मनूची पदवी बहाल करण्यात आली तो एक अंतिम असा सोळावा मनू असूनही प्रशंसापात्र ठरला तो जसा ऋषभदेवाचा ज्येष्ठपुत्र होता तसा त्याचा प्रधान अनुयायीही होता भारतातील संपूर्ण मानवी आणि दैवी वैभव त्याच्या पायाशी लोळण घेत असतानाही तो त्यात जीवन्मुक्त प्रवृत्तीने निरागसच राहिला. म्हणून दीक्षा घेता क्षणीच त्याला केवलज्ञानाची प्राप्ती झाली जणू काही कैवल्यश्री त्याच्या दारी वाटच पाहात उभी राहिली होती त्याही पर्यायामध्ये तो सर्व अनासक्त महात्म्यांमध्येही ज्येष्ठच ठरला सर्वत्रच ज्येष्ठता त्याला वरत राहिल्याने तो केवळ अनुपमेयच आहे.

**आदितीर्थकृतो ज्येष्ठपुत्रो राजसु षोडशः ।**
**ज्यायांश्चक्री मुहूर्तेन मुक्तोऽयं कस्तुलां व्रजेत् ॥ ४९ ॥**

**– उत्तरपुराण, पर्व ७४**

ज्येष्ठ तीर्थंकर ऋषभदेव याचा ज्येष्ठ पुत्र भरत सोळावा मनू म्हणून प्रसिद्ध पावला तो सर्व चक्रधर सम्राटामध्येही ज्येष्ठच होता दीक्षेनंतर थोड्याच काळामध्ये कैवल्याची संप्राप्ती करून घेणाऱ्या मुनींमध्येही तो ज्येष्ठच ठरला अशा सर्वज्येष्ठ महात्म्याची तुलना कोणाशी करावयाची ?

भरत हा महाप्रतापी राजा होता सर्व रत्नाचा आणि निधींचा भोक्ता होता समग्र पृथ्वीचा अधिपती होता. दुष्टाचा संहारकर्ता होता त्याप्रमाणे तो उत्तम प्रजापालही होता. कोणतेही मानवी कर्तव्य त्याने अपूर्ण ठेवले नाही सर्व चारही पुरुषार्थ उत्तमरीतीने साधणारा तो एक आदर्श शलाकापुरुष होय शलाका-पुरुषामध्ये त्याचा दुसरा क्रमांक आहे तो केवळ त्याच्या पित्यामुळेच कोणाचाही पिता कालक्रमाने पूर्ववर्तीच असतो हा निसर्ग ! ऋषभनाथ जसे चक्रधर

नसतानाही सर्वश्रेष्ठ पृथ्वीपती होते तसेच भरत तीर्थंकर नसतानाही श्रेष्ठ धर्म-पुरुष होते त्याचा जन्मही सोन्याच्या खाणीत उद्भवणाऱ्या हिऱ्याप्रमाणे होता मानवाच्या कल्याणाच्या दृष्टीने कुलकरधर्म पाळण्यात नाभिराज प्रधान नाभिपुत्र ऋषभदेव सर्व मानवाचे सार्वकालिक मंगल करण्यासाठी सर्वोदय तीर्थ स्थापण्यात प्रधान तसा ऋषभपुत्र भरतही सर्वच पुरुषार्थ पूर्णपणे साधण्यात सर्वातिशायी ठरून मानवी जीवन पूर्णपणे सफल करणाऱ्या महापुरुषामध्ये प्रधान त्याना त्याच्या स्वत शिवाय दुसरी कोणतीही उपमा या जगात उपलब्ध नाही विश्वाचे पालन-पोषण त्यानी इतक्या मन पूर्वक केले की त्याची धवल कीर्ती आजपर्यंत युगानुयुगे टिकली आहे या पृथ्वीवर खोल ठसा उमटविणारी त्याची नाम मुद्रा आजही अक्षुण्ण आहे त्याची वंशपरंपरा महामानवाचीच आहे त्याची कोणतीही गती प्रगतीच आहे त्याच्या पूर्वापार वंशोत्पत्तीचा उल्लेख महापुराणात पुढील शब्दात नोंदविलेला आहे—

**नाभिश्च तन्नाभिनिकर्तनेन प्रजासमाश्वासनहेतुरासीत् ।**
**सोऽजीजनत्त वृषभं महात्मा सोऽप्यग्रसूनुं मनुमादिराजम् ॥२३७॥**

— महापुराण, पर्व ३.

संततीच्या उत्पत्तीच्या वेळी प्रसूतिविज्ञान अत्यंत उपयोगी असते. त्या आरोग्य शास्त्राचा जनहितासाठी उपयोग करून ज्या नाभिराजाने प्रजेच्या दु खाचे निराकरण केले, त्याच श्रेष्ठ कुलकर नाभिराजाने वृषभदेवाना जन्म दिला तो वृषभही मानवाचे कल्याण साधण्यात महात्मा ठरला त्या महात्मा वृषभानेही ज्या एका ज्येष्ठ पुत्राला जन्म दिला त्या भरतानेही मनूची देखील कर्तव्ये पार पाडून अखेर तो पहिला चक्रवर्ती बनला

**प्रसेनजित्परं तस्मान्नाभिराजश्चतुर्दशः ।**
**वृषभो भरतेशश्च तीर्थचक्रभृतौ मनू ॥ २३२ ॥**

— महापुराण, पर्व ३.

तेरावा श्रेष्ठ मनू प्रसेनजित होय त्यानंतर नाभिराज चौदावा मनू झाला नाभिपुत्र वृषभदेव तीर्थंकर आणि कुलकरही झाले. आणि ऋषभपुत्र भरतेशही चक्रधर आणि कुलधरही झाला असाच उल्लेख इतरत्रही आढळतो (महापुराण, ३/२१३ इ०)

## अतूट परंपरा

हा उज्वल इतिहास परंपरेने अखंड व अक्षुण्ण आहे प्राचीन युगाबरोबरच भरतही केवळ प्राचीन म्हणून त्याची विस्मृती झाली नाही प्राकृत-संस्कृत

साहित्यकार मावळले प्रादेशिक भाषेत नवे साहित्यकार निर्माण झाले पण तो सनातन इतिहास मात्र नित्य नवाच राहिला. हिंदी इत्यादी अर्वाचीन भाषेतही नव्या शब्दात नवा फुलोरा येतच राहिला कोणताही वसत ऋतू निष्फळ ठरत नाही नवा वसत नवा बहार ! नवी भाषा नवी माडणी हे चक्र अखड चालूच राहणार ! म्हणूनच सत्य चिरंतन राहते त्याचा स्वभावच सनातन असतो

कैलास पर्वतावर भरताने ऋषभदेवांच्या स्मरणार्थ अनेक मदिरे निर्मिली ते एक उत्तम तीर्थस्थान बनले. याची नोद कविवर द्यानतराय आपल्या द्यानत-विलासमध्ये कोणत्या शब्दात करतात ते पहा—

**फूली वसंत जहँ आदीसुर शिवपुर गये ।**
**भरत भूप बहत्तर जिनगृह कनकमयी सब निरमये ।।**
**तीन चौवीस रतनमय प्रतिमा अंगरंग जे जे भये ।**
**सिद्ध समान शीष सम सबके अद्भुत शोभा निरमये ।।**
**द्यानत सो कैलास नमो हो गुन को पै जात बरनये ।**

— द्यानत-विलास, ५७.

जेथे भगवान आदीश्वर (ऋषभनाथ) मोक्षाला गेले, जेथे नित्य नवा वसत फुलतो (आनदरूपी उद्यानाचा सुगध दरवळतो), जेथे भरत चक्रवर्तीने (भूत-भविष्य-वर्तमान कालीन अशा) बहात्तर तीर्थंकराची जिनमदिरे निर्माण करून ती सर्व सोन्याने मढविली, आणि जेथे नैसर्गिक रगानी युक्त अशा ७२ जिनाच्या रत्नमय प्रतिमा स्थापन केल्या असून त्या सर्व अलौकिक सौंदर्यसपन्न मूर्तीचे बिब सिद्धासन मुद्रेत विराजत आहेत, त्या कैलास पर्वताला नमस्कार करा एवढेच द्यानतराय सागतात त्या प्रतिमाचे व कैलास पर्वताचे गुणवर्णन पूर्णत करण्यास कोण समर्थ आहे ?

एकदा भरत राजाला एकाच वेळी वार्ताहराने, सेनापतीने आणि अत-पुरातील दासीने आनददायक अशा निरनिराळ्या तीन वार्ता एकदम सागितल्या— (१) आदिनायाना केवलज्ञानाची प्राप्ती, (२) आयुधशाळेत चक्ररत्नाचा प्रादुर्भाव, आणि (३) महाराणीला ज्येष्ठ पुत्ररत्नाचा लाभ भरतचक्री धर्म, अर्थ आणि काम या तीन पुरुषार्थांची साधना परस्पर सघर्ष न आणता करीत असत ती साधना या प्रसगी कसाला लागली. पण विवेकी असल्याने त्यातून त्यानी अचूक मार्ग काढला त्याना खात्री होती की अर्थाचा व कामाचाही अधिष्ठाता धर्मच आहे धर्मशून्य अर्थ व काम सुखकर ठरत नाहीत कारण ते स्वतत्रपणे विकार प्रवृत्त असतात अशुभही असतात आणि अध पतनाला कारण ठरतात केवळ धर्मामुळेच

ते दोन पुरुषार्थ शुभ व सुखदायक ठरतात. म्हणून भरताने प्रथम केवलज्ञान महोत्सव साजरा केला नंतर कामासाठीही अर्थच महान साधन आहे हे लक्षात घेऊन पराक्रमाचे प्रतीक असलेल्या, पृथ्वीवरील सर्व संपत्ती एका छत्राखाली आणण्यास सर्वसमर्थ असलेल्या चक्ररत्नाच्या प्राप्तीचा महोत्सव उरकून शेवटी पुत्र जन्मोत्सवाचे मंगल अनुष्ठान केले हा वृत्तान्त कविवर द्यानतराय यांनी आपल्या जैन पदसंग्रहामध्ये पुढीलप्रमाणे शब्दांकित केला आहे--

> एक समय भरतेश्वर स्वामी तीन बात सुनी तुरत फुरत ।
> चक्ररतन, प्रभुज्ञान, जनम सुत पहले कीजे कौन किरत ॥
> धर्म प्रसाद सबै शुभ संपत्ति जिन पूजे सब दुरत दुरत ।
> चक्र-उछाह कियो सुत मंगल 'द्यानत' पायो ज्ञान तुरत ॥
>
> — जैन पदसंग्रह, च. भा २९७

एकदा भरत राजाने एकाच वेळी तीन घटनांची वार्ता घाई-गर्दीत ऐकली— ( १ ) चक्ररत्नाचा उदय, ( २ ) ऋषभनाथाना केवलज्ञान-प्राप्ती आणि ( ३ ) पट्टराणीला पुत्ररत्नाचा लाभ. तेव्हा त्याना कोणते कार्य प्रथम उरकावे असा प्रश्न पडला तरी 'सर्व शुभ संपत्ती केवळ धर्माचाच प्रसाद आहे आणि जिनाची पूजा केल्याने सर्व दुरित दूर पळते' असा विचार करता क्षणीच 'प्रथम केवली जिनाची पूजा, मग चक्रमहोत्सव साजरा आणि नंतर पुत्राचे मंगल कौतुकोत्सव' या क्रमपद्धतीचे ज्ञान भरताला त्वरित झाले.

## भरतशासनाची शिरोधार्यता

धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष या चारही पुरुषार्थांची सिद्धी भरताने पूर्ण प्रमाणात केली जन्मभर त्याच्यामध्ये परस्पर विरोध होऊ दिला नाही. प्रत्येक क्षेत्रामध्ये तो अग्रणी आणि अग्रगण्य ठरला वृषभपुत्र खऱ्या अर्थाने नरवृषभ ठरला, प्रतापाने पुरुषोत्तम ठरला, आणि सर्व क्षत्रियांचा क्षत्रचूडामणी बनून शेवटी नराचा नारायणही झाला केवळ त्याच्या भरतवर्षात निवास करणाऱ्यानाच नव्हे तर सर्व विश्वाला तो आजही वंदनीय आहे त्याच्या शासनाज्ञा या विसाव्या शतकातही शिरोधार्य वाटतात—

> भरतस्यादिराजस्य चक्रिणोऽप्रतिशासनम् ।
> शासनं शिरसा दध्वं यूयमित्यन्वशाच्च तान् ॥ १३६ ॥
>
> — महापुराण, पर्व ३१.

भरत हा एकमेव प्रमुख राजा आहे तो षट्खंडावर आधिपत्य गाजविणारा चक्रवर्ती आहे. त्याच्या प्रशासनाला प्रतिपक्ष असू शकत नाही म्हणून त्याची आज्ञा तुम्ही शिरोधार्य माना

भरताच्या बाबतीत ही वस्तुस्थिती प्रमाणभूत असल्याने त्याचे विविध क्षेत्रातील गुणशील व्यक्तिमत्व ध्यानात घेऊन आचार्य हेमचंद्र पुढील शब्दात त्याची आदरपूर्ण संभावना करतात—

**विजयस्व जगन्नाथ ! प्रचण्डाखण्डविक्रम ! ।**
**आखण्डल इवाऽसि त्वं षट्खण्डे क्षोणिमंडले ॥ ४५२ ॥**

— त्रिषष्टि० चरित, पर्व १, सर्ग ४.

हे जगताधिपती तुमचा विजय असो आपला अप्रतिहत प्रताप सूर्यप्रतापा-प्रमाणे अखण्डित राहून चिरकाल टिको या षट्खण्डात्मक भूमंडलामध्ये आपले प्रशासन शक्राप्रमाणे अखण्डितच आहे ! ।



: ११ :

# इतिहास आणि जीवनबोध

न विषादो भयं ग्लानिः नारुचिः कुपितञ्च न ।
न कार्पण्यमनाचारो न बली यत्र नाबलः ॥ ७९ ॥
स्वदुःखे निर्घृणारंभाः परदुःखेषु दुःखिताः ।
निर्व्यपेक्षं परार्थेषु बद्धकक्ष्या मुमुक्षवः ॥ १६४ ॥

— महापुराण, पर्व ९

# ११ इतिहास आणि जीवनबोध

## प्रासंगिक निर्णयातील दोष

मानवी जीवनाचे क्षेत्र दररोज अधिक विशाल होत आहे रोज नव्या आशा, आकांक्षा निर्माण होत आहे त्या प्रमाणात अनुभवाचे मार्गदर्शन कमी पडत आहे मानवी अनुभव गतकालाइतकाच विशाल असला तरी नव्या नव्या गरजा हजारोनी हजर होत आहेत त्या सर्व नव्या गरजा गतकालीन अनुभवाशी एकरूप करता येतातच असे नाही कधी त्या जवळ जवळ समांतर दिसतात पण त्यातील तेवढेही अंतर कमी करता येत नाही कधी ते एकमेकाला काटशह देतात तर कधी त्याची दिशा विरोधी मार्ग आक्रमिते अशा वैचारिक गोधळाच्या कालखडात हा आदिम इतिहासाचा अभ्यास कितीसा उपयोगी पडतो ? आजच्या जीवनातील समस्या सोडविण्यास किंवा नव्या कार्यप्रवृत्तीला मार्गदर्शन करण्यास तो किती समर्थ आहे ? या इतिहासाचे साध्य कोणते ? असे अनेक प्रश्न आणि विविध सशय निर्माण होतात हे खरे आहे कारण आपले इतिहासाचे ज्ञानच अपूर्ण, सदोष किंवा विकृत असते

पक्षाभिमान कार्यप्रेरक वाटत असला तरी त्यातून निर्माण होणारा पक्षपात मात्र अखेरपक्षी घातक ठरतो. मग असा पक्षपात राष्ट्रवाद, वशविचार, धर्ममार्ग, ऐहिक स्वार्थ इत्यादी कोणत्याही क्षेत्रातील असो ! पक्षाभिमानाने तर्क विकृत होतात, निर्णय पूर्व परिग्रहामुळे दूषित ठरतात, परस्पर सबध अमानवी बनतात व दुरावतात, सामाजिक सुसगतीच्या ऐवजी विसगती निर्माण होते, नको ते प्रसग उद्भवतात पण एवढ्यासाठी इतिहास निरुपयोगी ठरविता येत नाही मात्र

**सया सच्चेण संपण्णे मित्तिं भूएहिँ कप्पए ।**

— सूयगड, १/१५/४३;

नेहमी सत्याची कास धरल्याने सर्व भूतमात्रांशी मैत्री जमते खऱ्या वृत्तांताचा बोध केव्हाही कल्याणदायीच असतो त्यातील प्रेरणा उद्बोधकच असते त्यातील शोध-बोध जीवनाला निश्चितच मार्गदर्शक ठरतो. मानवी ज्ञान समृद्ध होते पुढील जीवनाला उजाळा मिळतो प्रयत्नाला योग्य दिशा लाभते निर्णय घेण्यामध्ये मार्गदर्शन घडते आणि चुकाची पुनरावृत्ती टाळता येते

## निर्णयातील सापेक्षवाद

इतिहास नेहमीच गतकालीन असला तरी संपूर्ण गतकाल मात्र उपलब्ध इतिहासात सामावलेला नसतो कालतत्त्व अनादी असल्याने आमूलाग्र इतिहास कोणालाही ज्ञात नसतो म्हणूनच इतिहासाच्या अभ्यासाचा आरंभ ठरवावा लागतो असा आरंभ ठरविण्याच्या विचारपद्धतीमध्येही काही रूढ समजूती दृढमूल झाल्या आहेत विशिष्ट भूखंडातील इतिहास लिहिताना एखाद्या विशिष्ट संस्कृतीला मूलाधार मानतात आणि त्या आधारभूत पायावर पुढील इतिहासाची इमारत रचतात त्यामुळे कधी कधी काढलेले निष्कर्ष निरुपयोगी ठरतात व तर्क चुकतात कारण मानलेला आधार हा खरोखरच मूलाधार नसतो सिंधू, नाईल, तैग्रीस किंवा अशाच काही भूविभागांना संस्कृति–चाळांना जोजवणारे पाळणे समजतात. इतिहासाचा एक नवा पल्ला, ज्ञानाची एक विस्तृत सीमा या दृष्टीने त्या सर्वांचा अभिमान जरी सार्थ वाटला तरी तेवढ्याने इतिहासाचे ज्ञान सार्थकी लागतेच असे नाही. त्याही पूर्वीचा काळ इतिहासाच्या कक्षेत आल्यावर मात्र पूर्वीचा कल्पित मूलाधार त्यानंतरही तितकाच समर्थ ठरू शकत नाही म्हणून त्यावर रचलेला इमलाही कोसळतो अगर थोटका ठरतो म्हणून काळाची कक्षा वाढविणे, अपुऱ्या ज्ञानाची पूर्ती करणे आणि पूर्वीचे वितर्क सोडून देऊन नवीन निष्कर्ष अंगीकारणे आवश्यक ठरते या दृष्टीने इतिहास नेहमीच काल-सापेक्ष असतो त्याचे निर्णयही सापेक्षच मानावे लागतात काळाच्या कक्षेला अनुसरून ते वेळोवेळी बदलून घ्यावे लागतात नव्या कालक्षेत्रातील नव्या साधनाच्या प्रकाशात मानवाचा स्वभाव, त्याची आजची वर्तणूक आणि भविष्यातील घडण या बाबतीत इतिहासाचा बोध काय आहे याचा विचार प्रत्येक जण स्वतंत्रपणे करू शकतो

## इतिहासावर भूगोलाचा प्रभाव

मानवी इतिहासाला कालखंडाप्रमाणेच भूखंडाचाही मोठा आधार असतो त्या भूमीचे संस्कार तेथील मानवी जीवनावर प्रभावी ठरतात म्हणून भूगोलाचे ज्ञानही इतिहासाच्या अभ्यासाला पोषक ठरते. अंगभूत सामर्थ्य आणि मानसिक प्रेरणा यांच्याइतकीच काल आणि परिस्थिती यांच्या संलग्नतेवर देखील मानवी

जीवनरूप नौकेची गती अवलबून असते ते दोन जणु काही त्या जीवन-नौकेच्या दोन्ही बाजूच्या दोन वल्हीच होत काल आणि वातावरण याना अनुसरून भूमीचेही स्वरूप बदलत राहते त्या प्रमाणात तिचा मानवी सस्कृतीवरील प्रभावही बदलतो काल, भूमी आणि वातावरण याच्याशी जीवन समातर असले तरी त्याचा परस्पर प्रभाव परस्पराना पूरक असावा लागतो भूस्तरशास्त्राच्या दृष्टीने सर्व भूपृष्ठच अस्थिर आहे तेथे नाना स्थित्यंतरे सभवतात ती जीवनाला नाना प्रकारची वळणे घेण्यास भाग पाडतात त्यामुळे जीवनाचे स्वरूप पालटते म्हणून भूपृष्ठ सस्कृतीची जन्मभूमी आणि इतिहासाची जीवनभूमी आहे

## अनुवांशिक क्षमता आणि विषमता

जीवनावर कालाचा व भूमीचा जसा प्रभाव असतो तसाच वशभेदाचाही सभवतोच काल व भूपृष्ठापेक्षा वशवादाचा परिणाम अधिक विविध असतो त्यामुळे सामाजिक विषमपणा वाढत जातो ह्या विषमतेवर निश्चित उपाय अजून तरी, बाह्य जगाला सापडलेला नाही या विषमतेमुळेच जीवन सग्राममय बनते या सग्रामात काही वश नष्ट होतात तर काही बलिष्ठ वश उन्मत्त होऊन दुसऱ्यावर सदैव अत्याचार करीत राहतात हा वशप्रभाव जसा शरीरनिष्ठ असतो तसा तो मनोनिष्ठही असतो शारीरिक वशभेद सकर-विवाहाबरोबर काही प्रमाणात बदलत राहिले तरी पुन नवे भेद-प्रभेद सभवत असतातच शिवाय मनोनिष्ठ वशभेद तर कोणत्याही बाह्य परिवर्तनाने किंवा सकटमय स्थितीनेही कमी होत नाहीत उलट जीवनातील ऐहिक साफल्याने वाढत मात्र जातात या मनोमय, विचारात्मक वशप्रकृतीमुळे आरोग्य, सामर्थ्य, बुद्धिमत्ता आणि स्वभाव यामध्ये भिन्नता येतच असते यातूनच नवा उच्च-नीच भाव आणि **जातीयवाद** जन्म घेत राहतात जीवनाच्या कल्पना बदलतात व मतभेद वाढत राहतात त्यातील परस्पर सघर्षामुळे पुन कालच्या स्ववशाचाही आज सहार घडतो

समतेची स्थापना हा जीवनाचा आदर्श असला तरी विषमतेचा जन्म देखील नैसर्गिकच आहे या विषमतेमुळे सामाजिक गुतागुत वाढत जाते आणि अशा गुतागुतीमुळे जीवन जास्तच विषमय बनत राहते हे दुष्टचक्र थाबविणे स्वाधीन नाही जगातील प्रत्येक जीवनानुकूल तथ्य सामर्थ्याच्या व पात्रतेच्या अधीन होत असते बलवान त्यामुळे अधिक बलवान तर निर्बल अधिक निर्बल होत राहतात यालाच काहीजण Survival of the fittest म्हणतात पण हा fitness ही निश्चित स्वरूपाचा नसतो कारण हे जीवन सामर्थ्यही कालान्तराने शरीरनिष्ठ व बुद्धिनिष्ठ अशा दोन वर्गांमध्ये दुभगते ! आणि एका परीने समर्थ असलेल्याच दोघामधील झगडा तीव्रतम होऊन तो दीर्घकाल टिकतो पुनः सस्कृतीची व समतेची हानी होते.

## स्वीकार्य संदेश

शिवाय जीवनपात्रता वंशाविष्ठित नसते. त्या पात्रतेचा जन्म देहबल आणि बुद्धिबल या दोहीच्या पोटी होत असतो वंशाला अनुसरून जसे मानवाचे वर्ग पाडता येतात तसे देहबल व बुद्धिबल याच्या आधारावर मात्र वर्गभेद स्पष्ट करता येत नाहीत कारण देहबल व बुद्धिबल एकमेकापासून अगदी वेगळे करता येत नाहीत ते एकाच व्यक्तीमध्ये एकत्रही असू शकतात किंवा विरोधी आणि विषम देखील असू शकतात म्हणून त्यातील एका बलाचा नाश करण्यास दुसरे बल कार्यप्रवण ठरत नाही त्यामुळे नवा समस्थायी सघर्ष निर्माण होतो. या परिणाम चक्राला अत नाही म्हणून एका वर्गभेदातून नव्या वर्गभेदाकडे जाण्यापेक्षा **एकमेकाला समावून घेण्यातच समाजजीवन सुखी बनते.** हे तत्त्वत. मान्य करूनही या पृथ्वीवरील जीवन पूर्ण सुखी होत नसते कारण केवळ तत्त्व मान्य केल्याने प्राकृतिक विषमता निर्माण होण्याचे थांबत नसते पण अशी विषमता निर्माण होत असतानाही समतेसारखी जीवनमूल्ये मात्र पूर्णपणे नष्ट होत नसतात. देहबलावर व बुद्धिबलावर मानसिक सस्कार करण्याचा मानवाचा प्रयत्न अव्याहत चालू असतो पण अशा सस्काराची प्रतिक्रिया सर्वत्र सारखी दिसून येत नाही त्यातून पुन सास्कृतिक संघर्ष निपजत असतो या प्रकारच्या सघर्षाला आपण समसघर्ष म्हणू अशा समसघर्षामध्ये **'बळी तो कान पिळी'** अशी नीती अवलबण्याचे कारण पडू नये **यालाच संस्कारी जीवन-पद्धती म्हणता येईल.** दुसऱ्या जीवनपात्र मानववर्गावर नियंत्रण प्रस्थापित करण्यात जीवनशक्ती वेचण्यापेक्षा किंवा **'मारा आणि जगा'** या नीतीपेक्षा **'जगा आणि जगू द्या'** अशा स्वरूपाची नीती अधिक मानवी ठरते! मानवी जीवन आणि इतिहास यातून स्वीकार्य संदेश हाच आढळतो

## संस्कारतंत्राची प्रक्रिया

निसर्गाचा कल व्यतिरेकाकडे झुकतो तर सस्कृतीचा कल समन्वयाकडे वळतो सस्कृती मानवी गुणाच्या जोपासनेलाच वाहिलेली असते स्वातन्त्र्य आणि समता यांचा आदर्श समन्वय हा केवळ कल्पनाविलास नसून ते जीवनातील एक आवश्यक तथ्य आहे! ते तथ्य दुरावले की मानव इष्ट कल्याणाला मुकतो आदर्शाचा हा एक टप्पा गाठता आला तर त्या पुढील अनेक टप्पे दृष्टिपथात येतात मानवाच्या जीवनगतीपेक्षा आदर्शाची कल्पनागती जास्त वेगवान असते त्यामुळे आदर्श समन्वय साधणे कठीण जाते हे खरे असले तरी समतेच्या केवळ साधनेमुळेच मानवी जीवनातील सघर्ष कमी होऊन सहजीवनाचा एक एक नवा टप्पा गाठता येतो हा फायदा काही कमी नव्हे अधिक सामर्थ्याच्या आराधनेसाठी

स्वातत्र्याची कक्षा वाढवावी लागते पण या सामर्थ्यामुळे छळवाद वाढू नये म्हणून त्या स्वातत्र्याच्या मर्यादेवरही निर्बंध लादावेच लागतात विषाने रोग तर नष्ट व्हावा पण मानवी जीवन मात्र नष्ट होऊ नये याच तत्त्वावर निष्ठा ठेवून औषधाची निर्मिती होत असते जीवनहेतू सिद्ध झाला तरच त्यातील औषधी गुण खरा ठरून तो रोगाचा परिहार करण्यास उपयोगी पडतो ज्याप्रमाणे त्यातील उपयोगी तत्त्व साभाळून सामर्थ्य निर्माण करण्यासाठी त्याच्या निर्मितीच्या प्रक्रियेमध्ये सस्कार-तत्राची गरज आहे तसेच मानवी जीवनामध्ये समतेची प्राणप्रतिष्ठा करण्यासाठी सस्काराची–संस्कृतीची, म्हणजेच जीवनाच्या वेलगाम प्रवृत्तीवर व वासनाच्या स्वैर आविष्कारावर प्रक्रिया करून त्यातील गुणाचीच शक्ती वाढविण्याची गरज आहे.

उलट वलप्रवृत्ती वाढल्याने जसा इतराचा नाश होतो तसा स्वत च्याही इतर गुणाना ओहोटी येते म्हणून विषमता काही नष्ट होत नाही काही काळ ती दवली गेली तरी वाईटच कारण त्या अवस्थेत तिच्या तीव्रतेचा दाव वाढत जातो अशा वेळी वळाचा वापर वदलावा लागतो कारण वळाप्रमाणेच विषमता देखील क्रियाशील असते तिच्यावर प्रक्रिया करूनच तिचे स्वरूप व कार्य वदलून घ्यावे लागते त्यासाठी सस्कारी सामर्थ्यच उपयुक्त ठरते अशा सामर्थ्याची उपासना समतेच्या तत्त्वाला अनुसरूनच करावी लागते आपल्या जीवनप्रणालीचे, जीवनातील उद्दिष्टाचे, आपल्या सस्कृतीच्या स्वरूपाचे आणि परकीय सघर्षामुळे निर्माण झालेल्या तात्कालिक वदलाचे, स्वीकाराव्या लागलेल्या आपद्धर्माचे व सकरभावाचे ज्ञान पूर्ण होण्यासाठी या सर्व सघर्षाच्या परिणामातीत आत्मस्थितीचे आणि केवळ स्वत चीच अशी जी सनातन जीवनमूल्ये काही काळ दृष्टीआड झालेली असतात त्याचे सम्यग्दर्शन झाले तर काही सूज्ञ, समजस व समर्थ लोकाना तरी सकरातीत अशा स्वत च्या सस्कृतीची कक्षा स्पष्ट दिसते

**सव्वभूयप्पभूयस्स सम्मं भूयाइं पासओ ।**

— दसवेयालियं, ४/९.

सर्व भूतमात्राकडे आत्मौपम्य दृष्टीने पाहणाऱ्याला सर्व जीवातील साम्यभाव उमजतो तो जीवनात उतरविण्याचा जे प्रयत्न करतात त्याना यश मिळण्याचीही शक्यता असते असे समर्थ लोक सस्कृतीचे शुद्धीकरण पुनश्च घडवून आणतात. आणि समाजावर नियत्रण करू शकतात

अशा रीतीने जीवनहेतूचा कल योग्य त्या दिशेला वळवून नवी प्रगती अनुभवता येते पण अशा कर्त्या पुरुषाची वुद्धी यशाभिनिवेशाने व हाती आलेल्या सत्तेने उन्मत्त न होता स्थिर होण्यासाठी सस्काराची गरज असते. सत्याची चाड,

अन्यायाची चीड, प्रामाणिकपणा, सदाचरणावरील अभग श्रद्धा, आत्मार्पण करण्याची तयारी इत्यादी गुणाची जोपासना संस्कृतीची काम धरल्याशिवाय करता येत नाही मानवी जीवनावरील आघात, प्रत्याघात व अपघात यामुळे संस्कृतीला ग्रहण लागते पण ती वेळ सरताच सज्जनाच्या सत्प्रवृत्तीने तिला पुन नवे तेज लाभत असते वैयक्तिक जीवन आणि राष्ट्राचा इतिहास या दोन्ही क्षेत्रात युगानुयुगे हेच घडत आलेले आढळते सस्काराची प्रक्रियाही मानवी जीवनात आदिम कालापासूनच चालत आली आहे. त्यातील चढ-उताराचा अनुभव, प्रगतीच्या युक्त्या-प्रयुक्त्या, चुकीची दुरुस्ती, पुन न चुकण्याची सावधगिरी आणि आदर्शाच्या दिशेचे ततोतत मार्गदर्शन या दृष्टीने सास्कृतिक इतिहासाचा अभ्यास बोधकारी ठरतो

## मानवी मनाची संस्कार-क्षमता

स्वातत्र्य, समता, सस्कृतिसवर्धन, गुणानुकूलता अशा मानवी गुणाचा आदर्श समन्वय म्हणजे केवळ कल्पनांचा दिलास आहे किंवा एक स्वप्नाळू मनोवृत्ती आहे असे पुष्कळाना वाटत असावे. कारण प्रत्यक्षात सत्ता हाती पडताच सबळ दुर्बळाना दडपण्यास सिद्ध होतात असा व्यवहारी अनुभव आहे. तरी पण तो अनुभव फारच स्थूल आहे हे विचारवताच्या लक्षात येण्यास वेळ लागत नाही. उताराकडे वाहणे हा पाण्याचा कल नैसर्गिक आणि दृक्सत्य असला तरी मानवी जीवन, पाण्याप्रमाणे केवळ अधोगामी असे एक अचेतन जडतत्त्व नसून ती अेक बलिष्ठ भावस्थिती आहे त्याला स्वत ची प्रेरणा आहे स्वतःची गती वा प्रगती ठरविण्याची बुद्धिमत्ता व विवेकक्षमताही आहे आणि आपल्याच निवडीप्रमाणे वागण्याची पात्रता आहे त्या पात्रतेला चेतनेचा अखड पाठिंवा आहे हे विसरता येत नाही पुष्कळ असस्कृत लोक बळाचा दुरुपयोग करतात म्हणून सदुपयोग कोणीच करीत नाहीत किंवा करू शकत नाहीत असे मानणे मानवी जीवनाशी सुसगत ठरत नाही अशा थोर विभूती केव्हा तरीच निर्माण होतात हे खरे असले तरी त्या विभूती अनेकाना, हजारो–लाखो लोकाना प्रेरणा देऊन जातात ते लोकही त्याच्याच भावमार्गाने गतिशील होतात तशा जीवनातील गुणवत्ता मानतात. तसा आचार करतात आणि दुसऱ्याकडून करवून घेण्याचा प्रयत्नही करतात. त्या प्रयत्नातून एक मोठी प्रभावी तीर्थप्रणाली तयार होऊन ती पुढील काळात युगानुयुगे प्रचलित राहते. असा अनुभव काही कमी नाही सर्व संताचा व इतर क्षेत्रातीलही सर्व थोर विभूतीचा इतिहास असाच आहे मग हा काय कमी लाभ आहे ?

अशा विचारप्रवृत्त मार्गाने जीवनाची वाटचाल मार्गस्थ झाली तर आदर्शाचे टप्पे गाठता येतात आणि तीच ऊर्मी उजळत राहिली तर त्यापुढील अधिक

उत्कर्षाचे अनेक टप्पे दृगोचर होत राहतात. अशा रीतीने उत्कर्षाचे टप्पे एकामागून एक सर करीत पुढील उच्चत्वाकडे अधिकाधिक वेगाने सरसावता येते मानवाच्या जीवनगतीपेक्षा आदर्शाची कल्पनागती जास्त वेगवान असते. त्यामुळे पुढे आदर्शवाद व मागोमाग तदनुकूल आचार किंवा प्रयत्न अशी ही युती मानवाला चिरकाल साथ देण्याची शक्यता निर्माण होते ही साथ ज्याना लाभली होती ते निश्चितच समुन्नत झाले अशी मानवी इतिहासाची साक्ष आहे पण पुष्कळ वेळा आचार व आदर्शवाद याची युती भग पावते, रथाचे घोडे रथापासून वेगळे व्हावेत त्याप्रमाणे परिणामी गती खुटते, दभ माजतो आणि अपेक्षित समन्वय कठीणच नव्हे तर अशक्य व अनैसर्गिक वाटतो प्रगट असो वा अप्रगट असो यशाबरोबर अपयशाचीही वाटचाल गतिमान असतेच म्हणूनकाही मानवाने अपयशालाच तत्त्वरूपाने कवटाळावयाचे नसते !! दिवस व रात्र पाठोपाठ येतात म्हणून त्या दोन्हीचा सभ्रम करून घेण्यात काय अर्थ आहे? 'तमाकडून तेजाकडे' असाच ध्येयवाद अगीकारावा लागतो तेजाकडून तमाकडे किंवा तमाकडून तमाकडे असा मार्ग स्वीकारार्ह नव्हे!

## मानवतेचा मूलाधार

विषमतेची वाढ थाबविण्यासाठी माणसाच्या बलोत्सर्गी स्वातत्र्यावर निर्बंध लादणे हा संयम मार्गच समाज-जीवनाला उपकारी ठरतो. काही काळ शरीरबल विजयी झालेले दिसले तरी अखेर मनोबलापुढे त्या बलाची मात्रा चालत नाही त्यामुळे जिताजिताची उलटापालट झाल्याशिवाय राहत नाही दोन बलाचा असा सघर्ष चालू ठेवण्यात कोणतेच कल्याण साध्य होत नाही 'जगेल तो सुख चाखेल' ही नीती सुखदायक ठरत नाही मानवेतर प्राण्यांच्या जगातील जीवन व्यवहाराचे निरीक्षण करून काढलेले निष्कर्ष मानवाला तंतोतंत लागू करणे म्हणजे आपली फसगत करून घेणे होय. कारण मानव ही एक ऊर्जात्मक स्वतत्र जात आहे तोही एक प्राणीच असला तरी तो कोणत्याही इतर प्राण्यापासून निर्माण होत नाही. ज्यापासून त्याचा जन्म होतो तो त्यावेळी इतर प्राण्यासारखा उरलेला नसतोच.

कारण या निर्माणभूमीच्या तत्त्वावरच जात ही सज्ञा आधारलेली आहे जर कोणत्याही प्राण्यापासून कोणताही प्राणी निर्माण होत असेल तर जात हे तथ्य शिल्लक उरणार नाही आणि प्राण्याचा जातिपरत्वे अभ्यासही करता येणार नाही आकारातील साम्य तर जात ठरविण्यास निखालसपणे निरुपयोगी आहे काही जतु कीटकासारखे दिसतात पण ते शास्त्रीय भाषेत 'कीटक' नसतात, हे सर्वप्रसिद्ध आहे मानव हे एक मानसिक तथ्य आहे. केवळ त्याच तथ्यावरून तो मानव ठरतो. केवळ चेतनातत्त्वावरच आत्मा सिद्ध होतो मनोमय अवस्थासुद्धा

बाह्य ठरते मानवता ठरविण्यासाठी मन आणि चेतना याच तत्त्वांचा विचार करावा लागतो इतर कशानेही मानवता ठरविणे गैरच होय या दोन तत्त्वामुळेच मानवी जीवनमूल्ये वेगळी आहेत. आणि यासाठीच 'जो जगू शकतो त्याने जगावे' वा 'जो मारू शकतो त्याने मरावे' अशा दृष्टिकोणातील विचारप्रणाली मानवी जीवनाला लागू होत नाही.

## जीवो जीवस्य जीवनम् ।

जीव जीवाचे जीवन आहे. जीव आणि त्याची जीवनक्रिया या विचारासंबधी हे एक साधे विधान आहे अभिप्राय जीवनानुसारी आहे जीव जीवनप्रिय असल्याने त्यातून मरणानुसारी अभिप्राय स्वीकारणे म्हणजे जीवनहेतूशी कृतघ्नता बाळगणे होय काही प्राणी दुसऱ्या प्राण्याना खात असतात एवढ्यावरून ते एक जीवनतत्त्व आहे आणि मानवासहित सर्व प्राण्याना ते विधायकपणे लागू पडते असा बोध घेण्यास वाव नाही जीवनम् या अन्त्य पदाचा अर्थ जीवनपर न घेता मरणपर घेणे जीवनानंदातील मूळ अभिप्रायाशी विसंगत आहे सर्व जीवाना जगण्याची इच्छा असते, मरण्याची नव्हे !

**सव्वे जीवा वि इच्छंति जीविउं ण मरिज्जिउं ।**

— दसवेयालियं, ६/१०.

या वैश्विक अनुभूतीला बाधा आणण्याचे काहीच कारण नाही भक्ष्यन्याय स्वीकारल्यास जीव मरणपर आहे असा अर्थ संभवेल ! एकाला जीवनपर तर दुसऱ्याला मरणपर असा महान भेद कल्पण्याचे कारण काय ? हा न्याय आत्मघातकी आहे भक्ष्य-भक्षकामध्ये भेद न उरल्याने सर्वच जीव केवळ भक्ष्य ठरतील. पण इतर अन्न व त्यावर भूक शमविणारा प्राणी यातील भेद तर स्पष्ट आहे !

म्हणून वरील विधानाचा अर्थ— 'एक जीव हा दुसऱ्या जीवाचा जीवनोपकारी असतो' असा जीवनपर घ्यावा लागतो जीव हाच जीवाचे जीवनतत्त्व होय जीवाचे जीवन म्हणजे त्याचे प्राण होत हे जीवनविश्लेषपर विधान जीवनतत्त्वाशी एकनिष्ठ आहे जीवाच्या प्राणाचा व्याघात करू नये हा उद्देश स्पष्ट आहे ज्याप्रमाणे पदार्थाची स्पष्टतर अनुभूती प्रकाशाच्या वलयात होते त्याप्रमाणेच या जीवनसूत्राचा अर्थही **उमास्वामींच्या तत्त्वार्थसूत्रातील** (५/२१) **परस्परोपग्रहो जीवानाम् ।** या सहभावी सूत्राच्या सान्निध्यात स्पष्टतर प्रतिभासित होतो. या सूत्रातील पदावली निश्चितपणे परस्पर जीवनदायी आहे यातील परस्पर जीवनमार्गाचा बोध निःसंदिग्ध आहे. यापरत्वे निराळा अभिप्राय अशक्यप्राय होय.

जीवाचे शरीर भौतिक असल्याने त्यात अन्नमयता सभवत असली तरी जिवत देह म्हणजे केवळ भूतिपदार्थ नव्हे ! चेतनाविष्ठित शरीर जीवाचा एक मूलप्राण आहे प्राणघात म्हणजे प्राण्याचाही घात. मग प्राणघात जीवनक्रिया कशी ठरेल ? एकाच्या प्राणसाधनेसाठी दुसऱ्याच्या शरीराचा व्याघात करणे म्हणजे मरण-मीमासा नव्हे तर काय ? मूल विधान सर्वांना समान असल्याने इतरेतराना निराळा अभिप्राय अतर्क्य होय मृत देहामध्ये अन्नकल्पना सभवनीय असली तरी जिवत देहामध्ये ती तशीच करता येणार नाही तसे झाले तर सारेच प्राणी केवळ पार्थिव ठरतील ! भक्षकाच्या अभावी अन्न-कल्पनाही शून्य ठरते जीवशास्त्रज्ञाच्या Survival of the fittest या तर्काप्रमाणे खरोखरच जीवनाचा मूलाधार जर शारीरिक पात्रताच असती तर सर्व थरातील स्त्रीवर्ग पूर्णपणे नष्ट झाला असता प्रत्येक वर्गातील मादी नराच्या तुलनेने fit आढळत नाही. पण वस्तुस्थिती तशी नाही आणि हा fitness शरीरबलाशिवाय निरनिराळ्या तथ्यावर आधारला तर विविध प्रकारचे सर्व जीव त्या त्या तथ्याच्या बलावर fit ठरतातच देहप्राप्ती म्हणजेच जीवनाची पूर्ती तीच पात्रता. जीवनपात्रतेसाठी दुसरी कोणतीही कसोटी लावली तर ती आत्मघातकी ठरते हिंस्र प्राण्याला भक्ष्य पकडण्यासाठी काही साधने असतात तशीच हिंस्य प्राण्यालाही बचावाची काही साधने निसर्गत च मिळालेली असतात

## सामर्थ्यवादाचे विवरण

जीवासबधी योग्य दृष्टिकोण हा **सम्यग्दर्शनाचा** आधार असल्याने जैन साहित्यात जीवनाची विविध दृश्ये मोठ्या कौशल्याने चितारली आहेत **मत्स्यनीतीवर** विदारक प्रकाश पाडणाऱ्या अनेक प्रसगातील जीवनतथ्याचे चिंतन मार्मिक आहे **कुवलयमालेतील** पान १८९ वर– आहारासाठी सापच सापाला, मासा माशाला, मगर मगराला गिळतो शरभ सिंहाला, सिंह वाघाला, वाघ चित्रकाला, चित्रक कोल्ह्याला, कोल्हा माजराला, माजर पक्ष्याला, पक्षी किडयाला खात आहे असा प्रसग चितारला आहे यात शरभही सर्वप्रतापी नाही हे उघड आहे या चित्रणावर आणि त्यावरून अन्नासाठी धडपडणाऱ्या सर्वच प्राणि-भक्षकावर विचार करा आणि fitness ठरविता येतो का पहा

सर्वच प्राण्यामध्ये गजराज वलिष्ठ समजला जातो त्याच्या सोडेत सापडलेला सिंहही वाचत नाही पण त्या सोडेच्या छिद्रात प्रवेश करणारा मुगळा मात्र त्याला परास्त करतो. जाळ्यात सापडलेला सिंहही उदराला शरण जातो व उदीरही त्याची मुक्तता करतो तेव्हा Survival of the Fittest हे तत्त्व नेमके कोणाला लागू पडते ? केवळ सधी मिळण्याचा अवकाश, सर्वच स्थिती बदलून जाते हत्तीही

सिंहाला मारतो तर सिंहही हत्तीला बैल वाघाला तर वाघ बैलाला. पण हत्ती किंवा बैल भक्षणासाठी प्राणी मारीत नाहीत हेही लक्षात घेतले पाहिजे म्हणून सामर्थ्यवादाचा निकाल निश्चित स्वरूपाचा नसतो यातील उपहास एका लोककथेत केला आहे—

एका साधूच्या आश्रमातील उंदरावर मांजराने हल्ला चढविला तेव्हा उंदराची दया येऊन त्याचे बल वाढविण्यासाठी, आपल्या मंत्रप्रभावाने साधूने त्याला मांजर बनविला अशाच काही प्रसंगाने शेवटी त्या प्राण्याला कन्येचे रूप मिळाले मागील अनुभवावरून संरक्षणाचा प्रश्न कायमचा सोडविण्यासाठी ती कन्या सर्वप्रतापी सूर्याला देऊ केली. तेव्हा मनोदय ओळखून सूर्याने सांगितले की त्याच्यावर ढग आक्रमण करू शकतो. मग साधू ढगाकडे गेला पण ढगाने त्याच्या-पेक्षा पवन सामर्थ्यशाली असल्याचे सांगितले. पवनराजाकडे गेल्यावर त्याने पर्वताच्या सामर्थ्याची खात्री दिली नाईलाजाने साधू पर्वतराजाकडे गेला तेव्हा पर्वत पोखरणारा उंदीर बलिष्ठ ठरला ! ! ही कथा तात्विक नसली तरी तत्त्व-बोधक खास आहे Fitness किंवा समर्थता एखाद्या वर्गात किंवा प्राण्यात सर्वार्थाने कधीच नसते.

## दुर्बलानां बलं राजा ।

समर्थता आणि जय पुष्कळ वेळा सघिनिष्ठ असतात सधी कधीच स्थिर नसते. म्हणून शारीरिक बल, पराक्रम, पात्रता याची लक्षणे सुनिश्चित ठरू शकत नाहीत तुलनावस्तु बदलली तर तुल्याची किंमत बदलत राहते.

> सूरं मण्णइ अप्पाणं जाव जेयं ण पस्सइ ।
> जुज्झंतं दढधम्माणं सिसुवालो व महरहं ॥
>
> —सूयगडं, १/३/१.

खरा जेता दिसत नाही तोपर्यंत प्रत्येक जण स्वत ला शूर समजतो परन्तु प्रत्यक्ष लढण्याचा प्रसग आल्यावर मात्र महारथी कृष्णाला पाहून शिशुपालाची जी दशा झाली तीच त्याची होत असते. म्हणून मत्स्यन्याय किंवा भक्ष्यन्याय सपूर्ण जीवनाचा तत्त्वार्थ होऊ शकत नाही जीवन त्याहून फार विशाल आहे ! मत्स्यन्याय खोटा नसला तरी तो एक जीवनधर्मातील अपवाद आहे. तो काही प्राण्यामध्ये आढळला तरी मानवाला मात्र इष्ट नव्हे मानवी जीवन विवेकानुसारी असते तेथेही मत्स्यन्याय बोकाळला तर ती आपत्ती नष्ट करण्यासाठी मानव सदैव कटिबद्ध असतो त्यासाठी मानवाने कृतयुगाच्या प्रारभकालापासूनच राज्य-सस्थेची स्थापना केली आहे आणि त्याचा आदर अव्याहत होत आहे दुर्बलानां

बल राजा ही धारणा अगीकारली आहे. यातील राजा प्रतिकात्मक आहे आजच्या लोकशाहीत यालाच Rule of Law किंवा न्यायप्रणीत शासनपद्धती म्हणता येईल. कायदा सर्व समर्थ असून तो दुर्बलाना आत्मसंरक्षणासाठी बलप्रदान करतो पूर्वी हेच कार्य राजा करीत असे कारण तो आत्महित करण्यात सिद्धहस्त ठरल्याने परहित करण्याच्या त्याच्या क्षमतेचे क्षेत्र विस्तारत असे त्यातही तो वरदहस्त ठरला तर त्याला प्रजापाल म्हणून मान्यता मिळे अशा समर्थ राजाला सत्याच्या ऊर्जेने असत्याचा परिहार करण्याची विज्ञापना केलेली आढळते--

**ऋतेन राजन्ननृतं विविञ्चन् मम राष्ट्रस्याधिपत्यमेहि।**

— ऋग्वेद, १०/१२४/५.

महापुराण किंवा जैन-जैनेतर नीतिग्रथामध्ये आपल्या राज्यसस्थेचा हेतू नानाप्रकारे स्पष्ट केलेला आढळतो. त्यातील—

**राजास्य जगतो हेतुर्वृद्धे ।**
**आनृशंस्यं परो धर्मः सर्वप्राणभृतां मतः।**
**दुर्बलानां बलं राजा।**

इत्यादी विधाने मानवी जीवनावर स्पष्ट प्रकाश टाकतात मानव हा एक उन्नयनशील प्राणी आहे विवेक हा त्याचा मूलाधार आहे. पापपुण्याचा विश्लेष हा त्या विवेकाचा प्रधान गुण आहे. म्हणून क्षुद्र प्राणिजीवनातील दृश्य घटनावरून मानवी जीवनाची मीमासा करता येत नाही हिंसा-नाश टाळून सर्वांच्या हितसुखाची वृद्धी करणे, दयाभाव वाळगणे, बलप्रदान करणे ही राज्यसस्थेची प्रधान कर्तव्ये होत. अशी कल्याणकारी राज्यसस्था मानवी जीवनाचे प्रतीक आहे. दण्डसस्था तिचे सर्वश्रेष्ठ सामर्थ्य आहे राजाचे बल हे सर्व दुर्बलाचे बल असल्याने त्याहून सबल दुसरा कोणी ठरू शकत नाही म्हणून मत्स्यन्यायाचा आपोआप परिहार होतो तेव्हा मानवी जीवनाच्या सदर्भात 'एक जीव दुसऱ्या जीवाला खाऊन जगतो' या विधानाला कोणताही अर्थ उरत नाही जीवनातील कल्याणाची ही किमया जैन सस्कृतीने मुळारभापासूनच साध्य केली आहे तिची प्रकृतीच सर्वोदयी आहे म्हणूनच विश्वातील घटनेतून बोध घेण्याची तिची प्रवृत्ती वेगळी आहे

राज्यसस्था मानवीजीवनातील सर्वस्पर्शी सस्था आहे बलाचा दुरुपयोग टाळून सदुपयोग करणे, समता प्रस्थापित करणे, सामान्य जनाना आनद देणे (महापुराण, ३८/२५७), प्रजेला अन्यायामध्ये प्रवृत्त होऊ न देणे (महापुराण, ३८/२५८), बलाचा दुरुपयोग करणाऱ्याचे शासन करणे, शिष्टाना सदाचारात

मदत करणे आणि मानवधर्माचे रक्षण करणे (महापुराण, ३८/२५९) ही राजाची मुख्य कर्तव्ये होत विषमता पूर्णपणे नष्ट झाली नाही तरी तिला अन्यायकारक ठरू न देणे आणि अन्याय घडल्यास त्याचे निवारण करता यावे यासाठी दण्डसंस्था स्थापून ती राजाच्या हवाली केलेली असते कषायप्रेरित विकारप्रवृत्ती जरूर दण्डनीय आहे भोगभूमीत किंवा सत्ययुगात नीतिपालन सहज शक्य होत असे पण पुढील काळात कषायप्रेरणा वाढल्याने अपराध घडू लागले. त्याचवेळी समतेच्या परिपालनासाठी ऋषभनाथांनी राज्यसंस्थेची प्रतिष्ठा केली आणि दुर्बलानां बलं राजा ही नीती चिररूढ केली त्यामुळे या भरतभूमीवर मत्स्यन्याय बोकाळू शकला नाही येथील जीवनाचा हेतू सदा सर्वकाळी शांती, समाधान, समता, गुणसमृद्धी या मार्गाने परिपुष्ट झाला आहे

## वैर कारण

विकारप्रवृत्ती आणि कषायप्रेरणा ही जीवनव्यवहाराची लक्षणे असली तरी ती जीवाचे गुणधर्म नव्हेत रोगलक्षणे रोग्याचे गुणधर्म नसतात त्याप्रमाणे उपचाराने तो रोग व ती लक्षणे नष्ट करता येतात त्याचप्रमाणे समता, न्याय, मैत्रिभाव इत्यादींच्या अभियोगाने वैरभावादिकाचे शमन करता येते रोगाचा प्रादुर्भाव साहजिक असला तरी तो जीवनाचा अविनाभावी अंश नव्हे की गुणधर्म नव्हे. तसेच विकारही केवळ आहारासाठीच हल्ला होतो असे नाही ईर्ष्या, द्वेष, उन्माद, अज्ञान इत्यादी विकारही वैराची कारणे असततात—

ईसा-वसेण एए अवरोप्पर-पसर-वेर-वेलविया ।
जुज्झंति पेच्छ पसवो अण्णाण-महातमे छूढा ।।

— कुवलयमाला, पान ३०१, ओळ ३.

पुरिसा कसायवसगा करेंति एक्केक्कम-विरोहं ।

— पउमचरिय, ४/४९.

## वीराची वीरता

या विकारवशतेमुळेच संस्कृतीची हानी झालेली आढळते तेव्हा मानवाने आपल्या वीरतेचा, तेजाचा, क्षमतेचा उपयोग करण्याची दिशा बदलून महाणाचा मार्ग अनुसरावा—

मोत्तु कसाय-जुज्झं संयमजुज्झेण जुज्झिमो एण्हि ।।

— पउमचरिय, ४/५१.

हा जो लढण्याचा मार्ग भरत-बाहुबलींनी आखून दिला आहे तो सर्वांनी अंगीकारावा तो सार्वत्रिक हिताचा आहे, शांतिप्रद आहे विकारप्रधान व विवेकप्रधान अशी वीरता दोन प्रकारची आहे पहिली बालाची तर दुसरी चतुराची म्हणून आत्मौपम्य दृष्टीने हिताचा अंगीकार करावा—

**आयतट्ठं सुआदाय एवं वीरस्स वीरियं ॥**

– सूयगड, १/८/१८

हीच खऱ्या वीराची वीरता असे सूयगड या आगम ग्रंथात (१/८/१ ते १८) विधान आहे

**तेजो यस्य विराजते स बलवान्** । हे तेज म्हणजेच आत्मवीर्य जीवाचे स्वतत्त्व या तेजाचे संवर्धन म्हणजेच गुणानुसारी जीवन किंवा सांस्कृतिक अभियोग होय अशा आत्मगुणाच्या आराधनेत 'मारा आणि जगा' ही धारणा विराधक ठरते तेज आत्म्याच्या ओजोगुणावर अधिष्ठित असते, देहाधिष्ठित नव्हे ! **तेज स्वतत्त्वाचा प्रत्यय आहे,** वासनाचे आक्रमण नव्हे खरे गुण नेहमीच इतर गुणानाही साधक व पोषकच असतात **विरोधाशिवाय प्रगती हीच तर संस्कृतीची खरी गुरुकिल्ली.** ही किल्ली हरवल्यामुळेच 'जीवो जीवस्य जीवनम्' या सूत्राच्या अर्थाचे महाद्वार उघडता येत नाही

## अहिंसेची प्रतिष्ठा

ही आत्मग्राही वीरता असाध्य किंवा अनैसर्गिक नाही रुग्णावस्थेनंतरही स्वास्थ्य जितके संभवनीय तितकाच हा मार्गही प्रसंगी पशूसुद्धा या मार्गाचा अवलंब करतात तर मानवाची काय कथा ? **सत्त्वेषु मैत्री** या भावनेतील संस्कारी प्रभावाने प्राण्यामधील वैर काही काल तरी शमते हा प्रभाव काही कमी गणता येत नाही. **अहिंसा मार्ग आणि समण संस्कृती** सर्वप्रभावी आहे ते याच अर्थाने ही सातिशयता संपन्न करणे हाच मानव्याचा मूळ हेतू **पतंजलीच्या योगसूत्रामधील** (२/३५)

> **'अहिंसाप्रतिष्ठायां तत्सन्निधौ वैरत्यागः'** । या विधानात आणि त्यावरील **'शाश्वतिकविरोधा अप्यश्वमहिषमूषक-मार्जाराहिनकुलादयोऽपि भगवतः प्रतिष्ठिताहिंसस्य सन्निधानाच्चित्तानुकारिणो वैरं परित्यजन्तीति ॥'**

या त्याच्या टीकेतही असा प्रभाव मान्य केलेला आहे असे चित्रण जैन साहित्यात विपुल आढळते कुवलयचन्द्र राजकुमाराला असाच अनुभव समणसान्निध्यातील एका वनविभागामध्ये प्रत्ययास आला—

खेल्लंति वग्घ-वसहे मुइए कीलंति केसरि-गइंदे ।
मय-दीविए वि समयं विहरंति असंकिय-पयारे ॥
अण्णोण्ण-विरुद्धाइं पि इय राय-सुओ ससं पलोएइ ।
वीसंभ-णिब्भर-रसे सयले वण-सावए तत्थ ॥
भगवओ उवसमप्पभावेण विरुद्धाणं पि पेम्मं अवरोपरं सउण-सावयाणं जायइ ' त्ति ॥

— कुवलयमाला, पान २८, ओळ २२ ते ३२

वाघ, बैल, सिंह, हत्ती आनदाने एकत्र खेळतात. हरिण आणि चित्ता निर्भय मनाने सगत सोबत विहार करतात हे सर्व प्राणी नेहमीच परस्पर वैरी असूनही युवराज कुवलयचंद्राने त्याना एकत्र नान्दताना पाहिले. त्या वनातील सर्वच श्वापदे परस्पर विश्वासात दग झाली होती जैन मुनीच्या उपशम भावनेच्या अभिभावाने परस्पर विरोधी असणान्या पशुपक्ष्याच्याही मनात प्रेमभाव निर्माण होतो तो असा

## सुखस्वरूप धर्म

हा परिस्थितिजन्य प्रभाव असला तरी सम्यक्त्व आणि संयम या आतर मार्गानेही प्रशमभाव, समताभाव, मैत्रिभाव नावता येतो अज्ञान आणि अवरुढी टाकल्या पाहिजेत कुलाचार, अवानुकरण, गमत, उपजीविका किंवा धर्ममार्ग कल्पूनही निरनिराळ्या मिषाने हिंसा करण्याची प्रवृत्ती आटळून येते. ती सर्व मूढताच होय मानवी जीवनाचा उद्देश पुरुषार्थप्रधान आहे ही पुरुषार्थपर वृत्ती मानवाने सोडली तर मानव दानवापेक्षा वेगळा राहणार नाही श्रद्धापूर्वक गुण-विकासाचा प्रयत्न करणे ही मानवी प्रकृतीच आहे. ही समण सस्कृती सर्व प्राण्याच्या चित्ताला सुख-शाती देणारी आहे सर्व प्रकारच्या ऐहिक वैभवालाही हाच परमभाव कारणीभूत आहे म्हणून अर्थाची व कामाची पूर्ती होण्यासाठीही याच समताधर्माची कास धरली पाहिजे. तिन्ही पुरुषार्थानी जो वचित असतो तो केवळ जनावरच नव्हे तर एक व्यसनशील प्रेत होय—

धम्मत्थ-काम-रहिया बुहयण-परिणिंदिया गुण-विहूणा ।
ते होंति मय-सरिच्छा जीवंत-मयल्लया पुरिसा ॥

—कुवलयमाला, पान ४८, ओळ १४

या समतामय समण सस्कृतीच्या विरुद्ध जे उपदेश देतात ते आपले आप्त नव्हेत हिंसक आत्मा आपला असूनही आप्त नसतो आप्तता इष्टतेवर अवलबून असते

ही आप्तताच समतेची माता आहे हिंसेमुळे मात्र ही आप्ततेची भावना मरून जाते जिनागमामध्ये तर समतेला आद्य स्थान आहे सर्व मांगल्याचे, सुखाचे, शांतीचे, वैभवाचे मूलकारण हा समभावच होय जगातील सर्वच सुखसुमने या समण-संस्कृति-तरूचा केवळ बहार होय–

> जं किं पि कह वि कस्स वि कत्थ वि सोक्खं जणस्स भुवणम्मि ।
> तं जिण-वयण-जलामय-णिसित्त-रुक्खस्स कुसुमं तु ॥
>
> – कुवलयमाला, पान २१६/२५.

## मूल्यकल्पना

ऐहिक जीवनाला आवश्यक असलेल्या साधन-सामग्रीतील सुधारणा आणि त्यामुळे वाढणारी माणसाची कार्यक्षमता व जीवनपात्रता याच बाबी केवळ महत्त्वाच्या नसून आपल्या जीवनयोगातून निर्माण होणाऱ्या मानसिक समाधान, शांती, गुणवत्तेची व कला-चातुर्याची वाढ, आत्मगौरव आणि व्यक्तित्वाची थोरवी अशा भावस्थितीलाच मोठी किंमत असते सत्त्वशील भावावस्थेतील जीवनानुभूतीतून जी मानवी मूल्यांची धारणा, साधना व सिद्धी यासबधी गुणमूलक श्रद्धा पोसवली जाते तिलाच सर्वाधिक श्रेष्ठ स्थान आहे

आपल्या जीवनानुयोगाला अनुसरून विरोधी प्राण्याशी अगर निसर्गशक्तीशी सामना करीत असताना किंवा युद्धप्रसंगी सन्मान-विजय प्राप्त करून घेताना मानवी मूल्याची साधना अभंग ठेवणे हे मानव्याचे पहिले लक्षण आहे मत्स्यनीतीतील सामर्थ्यवादालाच जीवनपात्रता किंवा मानवी गुणवत्ता समजण्यात नेमकी हीच मूल्य-साधना भंग पावते त्यामुळे मानव हा दानव किंवा क्षुद्र प्राणी ठरतो या उलट ती मूल्यसाधना अक्षुण्ण ठेवण्यासाठी जो प्रयत्नशील राहतो तो क्षात्र ठरतो खरा क्षत्रिय त्या मूल्यासाठी आपले प्राणही पणास लावतो आणि सांस्कृतिक इतिहास त्या क्षात्रतेजाने उजळून निघतो आपला आदिम इतिहास मूल्यसाधनेच्या महान सिद्धीमुळे अधिकोत्तर उजळलेला दिसतो

केवळ Biological Life किंवा देहस्थिती महत्त्वाची नसून मानव्याची साधना त्यापेक्षा अधिक महत्त्वाची आहे जगणे प्रेय असले तरी जगविण्याची कला श्रेय आहे हे विसरण्यात् आपलाच श्रेयोमार्ग चुकतो. आजपर्यंतच्या थोर-महात्म्याच्या आणि क्षात्रतेजाच्या इतिहासावरून हाच बोध सिद्ध झालेला आहे. म्हणून देह-जीवनापेक्षा या मूल्याचा विचार आणि साधना अधिक श्रेष्ठ आहे देहाच्या गरजेची पूर्ती झाल्यावर विकाराची व्यग्रता काही काळ शमते. हे शमन उन्हातून सावलीत येण्यासारखे आहे. व्यग्रतेचे शमन ही सुखाची बाह्यावस्था होय. तिची

आस्था साहजिक असली तरी त्या स्थितीला खरी सुखस्थिती म्हणता येत नाही म्हणून रोगाप्रमाणे या व्यग्रतेचा मुळातून परिहार करून गुणस्थिती समृद्ध करावी गुणशीलना तर केवळ सुखस्वरूप असून ती जीवाची स्वभावस्थिती आहे त्यामुळे उन्हात जाणे घडतच नाही मग सावलीचा शोध कुठला ? क्षुधा आणि आहार हे ऊन-सावलीसारखे बाह्यस्थितीचे निदर्शक आहेत गुण मात्र स्वस्थितीच असल्याने त्यात अवस्थांतरण संभवत नाही. त्यात निरंतर सुखदशा अवतरते मूल्यकल्पनेला याच भावस्थितीचे अधिष्ठान लाभलेले आहे या मूल्यकल्पनेचा उदय मनोमनी होत राहणे ही मानवाच्या इतिहासातील एक अत्यंत महत्त्वाची घटना आहे आणि या घटनेचा इतिहासही मानवा इतकाच प्राचीनतम आहे या घटक तथ्याने विरहित असे मानवी जीवन कल्पण्यात अनुपलब्धी दोष घडतो

जीविताच्या अनेक अवस्यांतरामधून वाटचाल करीत असताना या मूल्यकल्पनेचा सर्वत त्याग करणे मानवाला कोणत्याही काळी जमलेले नाही होकायंत्रातील काटा प्रसंगी कितीही थरथरला तरी तो स्थिरावताना दक्षिणोत्तर दिशा सोडू शकत नाही त्याचप्रमाणे अनेक आपद्धर्मातून पार होत असतानाही या स्वाभाविक आणि स्वस्थितिमूलक मूल्यकल्पनेचा परित्याग करणे मानवी जीविताला शक्य झालेले नाही

शुभाशुभ कल्पनाचा, कुलाचाराचा, धर्मचरणाचा आणि तत्त्वश्रद्धाचा उदय देखील अगदी याच मन स्थितीतून झालेला आहे आत्मार्पण-बलिदानाचे महत्त्व, गुणाची पूजनीयता, दैवताची अर्हता, आप्ताची इष्टता,- विव्हलाच्या उद्धारासाठी समर्थता आणि दुर्बलासाठी सामुहिक बल निर्माण करून मत्स्यन्यायाला टक्कर देणाऱ्या शासनसंस्थेची निर्मिती इत्यादी मानव्याच्या प्रतीकांची प्रतिष्ठा मूल्यानुसारी जीवनानुयोगामुळेच संपन्न झाली आहे. अशा वाटचालीतूनच मानवाने आपला इतिहास घडविला आहे

मानवामध्ये या वैचारिक कल्पनाशक्तीचा उदय सतत होत राहणे हा त्याच्याच मनाचा गुणधर्म आहे या मानसमस्येच्या आणि ओजोधर्माच्या प्रभावामुळेच आपल्यासारख्या प्राण्याना मानव ही संज्ञा प्राप्त झाली आहे म्हणून मननाधिष्ठित भारतीय परंपरेचे अन्य कोणत्याही अवस्थेतून उन्नयन झालेले आढळत नाही. याचमुळे आपली संस्कृती सर्वोदयशाली, कल्याणदायी व गुणानुगामी आहे. इतर संस्कृतीपेक्षा आपल्या संस्कृतीचे जे वैशिष्ठ्य आहे ते हेच होय

आदिम इतिहासाचे ज्ञान सन्मानाचे, पराक्रमाचे, बलाचे, ऐश्वर्याचे समतेचे आणि स्वाभिमानाचे मूलस्रोत आहे. त्याच्या अभावाने ग्लानी येते, उदासीनता व

आळस वाढीस लागतो स्वत च्या उज्वल इतिहासाच्या विस्मरणाने परकीय प्रेरणा उसनी घ्यावी लागते आणि त्यातून अनेक अनिष्टे उद्भवतात परकीय प्रेरणेने केवळ बौद्धिक आनद लाभला तरी त्यातून स्वोन्नतीच्या मूल्यगुणाची प्रक्रिया सुरू होत नाही. म्हणून स्वकीय इतिहासज्ञानाची मातब्बरी मोठी आहे इतिहासाचे मूलभूत प्रयोजन जाणले पाहिजे त्याशिवाय स्वराष्ट्रीयत्वाचा अभ्युदय प्राप्त करणे कठीण आहे स्वत चा पूर्वेतिहास व सद्यस्थिती आणि परकीयाचा प्राचीन व समकालीन इतिहास याच्या परिशीलनाने व तुलनेने जीवनदृष्टीमध्ये विशालपणा, बुद्धीमध्ये प्रगल्भता व वर्तनामध्ये विचक्षणता आणता येते म्हणून आदिम इतिहासाच्या प्रत्येक अगाचे पद्धतशीर अभ्यास करून विकासाची सामग्री वाढविली पाहिजे

## प्रयोगनिष्ठ शास्त्रज्ञांची अगतिकता

मात्र या युगाचा कल शास्त्राभिमुख आहे प्रयोग पद्धतीने चेतना तत्त्व व त्याला अनुसरून आविष्कृत होणारे मानवी मनोव्यापार याचे विश्लेषण व्हावे तितके झालेले नाही परतु चेतनाविष्ठित मानवता आजच्या शास्त्राला अमान्य आहे असेही नाही उत्क्रांतिवाद हा अभ्यासातील केवळ एक टप्पा आहे ते परमतत्त्व नव्हे ! अलीकडचे काही शास्त्रज्ञ, मानव हा माकडापासून नव्हे तर अस्वलापासून उत्क्रान्त झाला असे मानतात नेपल्समधील एक सुप्रसिद्ध शास्त्रज्ञ डॉ. अॅमेनडोला यानीही असेच प्रतिपादन केले आहे शिवाय सन १९६९ च्या सप्टेंबर महिन्यात इग्लडमधील ऑक्सफोर्ड येथे 'आध्यात्मिक व चेतनाधिष्ठित अनुभवाचे शास्त्रीय सशोधन केन्द्र' अशा नावाची सस्था स्थापन झाली आहे या सस्थेचे सस्थापक, सचालक व मार्गदर्शक सर अॅलिस्टर हार्डी असून ते ऑक्सफोर्ड विद्यापीठातील प्राणिशास्त्राचे प्रसिद्ध प्राध्यापक आहेत अलिकडील सर्व शास्त्रज्ञ चेतनामय, मनोमय व सामान्य देहगत प्राणिजीवन, या सर्वांचे विवरण भौतिक व रासायनिक शास्त्रातील सूत्र-प्रणालीनेच करू इच्छितात हा एक अट्टाहास आहे पण तो योग्य नव्हे असे हार्डीचेही मत आहे कारण सजीवी हे नुसती रासायनिक व ऐंद्रियिक यत्रे नव्हेत त्याची उत्पत्तीही आकस्मिक नाही प्राण्याचे व्यवहार जरी शरिराच्या सकरवर्मातून आविष्कृत होत असले तरी प्राण्याचे मूलतत्त्व वेगळे आहे त्याचा परस्पर सबध असतो हे खरे असले तरी तो सबध नेहमीच कार्यकारण भावाला अनुसरूनच असतो असे नाही

आजच्या प्रयोगनिष्ठ शास्त्राला चेतनामय अवस्थेचा अर्थ कळलेला नाही ही चेतनेची सत्तामय अवस्था मानवाप्रमाणेच उच्च कोटीतील इतर प्राण्यामध्येही स्पष्टपणे जाणवते या अवस्थेचे मूळ कारण मेंदूतील केवळ पार्थिव व रासायनिक

प्रक्रिया असावी हे शक्य वाटत नाही म्हणूनच चेतना हे एक मूलतत्त्व मानले पाहिजे. यासाठीच प्राण्यातील उत्क्रांतिवादाचा विचार करताना या चेतनामय अवस्थेतील उत्क्रांतीही लक्षात घेतली पाहिजे. वास्तविक ही कल्पना नवी नाही पण त्या चेतनेची गभीर दखल शास्त्रज्ञ घेत नाहीत तरी तसा अभ्यास सामाजिक हिताचा आहे चेतनाविरहित विज्ञान व्यक्तीच्या भावनेची कदर करीत नाही. म्हणून तरुण बुद्धिजीवींच्या मनामध्ये विज्ञानवादासबंधी एक अढी निर्माण होत आहे. चेतनावादाला कवटाळल्याने विज्ञानालाही सामाजिक समता प्रस्थापित करण्यासाठी राबविता येईल. भौतिक उपायांनी न सुटलेले प्रश्न सोडविता येतील चेतना व ऊर्जा या आतरशक्तीच्या मदतीने मानवी जीवनाची पातळी उचाविता येईल खरे तर मानसशास्त्राला हे कार्य शतकापूर्वीच करता आले असते. पण मानसशास्त्रज्ञानीही 'चेतना' तत्त्वाला डावलून भौतिक व रासायनिक प्रक्रियाना कवटाळले

## मानवधर्म

यास्तव मानवी समाजातील विषमता बदलण्याची मूल्ये वेगळी असून ती मानवधर्मावरच अधिष्ठित आहेत आणि असली पाहिजेत मानव्याच्या मार्गावर आत्माहुती, स्वार्थत्याग, परार्थबुद्धी, उद्धार, राष्ट्रभक्ति, समाजसेवा, दलितसेवा, रुग्णसेवा, प्रजापालन, हितोपदेश, स्व-पर-कल्याण, शिक्षण इत्यादिरूपाने संस्कृतीची दीपगृहे उजळत आहेत. अशा गुणाचा अभाव इतर प्राण्यामध्ये आढळून येत असतानाही या दोन निरनिराळ्या जीवनक्रमाची तुलना एकाच तोलाने का करावी ?

पुष्कळाचा असाही एक गैरसमज आहे की जीवनाच्या खालच्या थरातील व्यक्तीलाच समता हवी असते आणि ज्यांना आपल्या अगभूत गुणाची श्रेष्ठता ठाऊक असते त्यानाच मुक्त स्वातंत्र्य हवे असते पण हे पूर्ण सत्य नव्हे हाही आभास अन्यथा विचारसरणीतूनच निर्माण झालेला आहे. सर्वच मानव किंवा कोणताही एक मानवसमूह सदा सर्वकाळी अशा नीच विचारसरणीचा दास असत नाही तो केवळ स्वार्थाचाच विचार करतो हा विचार आभासमय आहे श्रेष्ठ लोकच समानता निर्माण करण्यासाठी झटतात. उलट कनिष्ट किंवा दलित व्यक्ती लाचार बनते, ती तत्त्वाच्या आविष्कारासाठी व समाजातील विचारधारा बदलण्यासाठी झटण्यास अपात्र असते या शिवाय सामान्य माणूसही गुणप्रियच असतो छळवाद केवळ उन्मत्ताचाच जीवनक्रम असतो अशा उन्मत्ताना मानवी प्रतिष्ठा कधीच लाभलेली नाही [1] म्हणून त्याच्याच विचारधारेतून संपूर्ण मानवी जीवनाचा अभ्यास करण्याचा अभिनिवेश कोणीही उराशी बाळगू नये

मानवी गुणाचा भारतीय आदर्शवाद दांभिक असून तो जीवनानुसारी नाही असे म्हणणे आत्मघातकीपणा आहे यासाठीच भारतीय जीवनाचा अभ्यास भारतोत्पन्न दृष्टिकोणातून केला पाहिजे परकीयाच्या दृष्टीने पाहण्यास आपल्या कित्येक पिढ्याची फसगत झाली आहे ती यापुढे तरी टाळण्याचा प्रयत्न केला पाहिजे त्यासाठी कदाचित आपणास आर्यपूर्व काळातील भारतीय जीवनाचा खोलवर अभ्यास करावा लागेल कारण वैदिक आर्यसुद्धा बाहेरूनच भारतात आले असल्याने येथे ते उपरे ठरतात ही सत्य स्थिती आहे. युगानुयुगाच्या जीवन-प्रक्रियेमुळे त्याच्यातही भारतीयत्त्व संक्रमित झाले असणे शक्य असले तरी या भारतभूमीवर पाऊल ठेवताना आपल्याबरोबर जी जीवनदृष्टी घेऊन ते आले ती मात्र अभारतीय आहे ती दृष्टी कोणत्याही कारणाने स्वीकारून केलेला भारतीय जीवनाचा अभ्यास शुद्ध स्वरूपाचा ठरणार नाही संकरयोगामुळे पीक संवर्धित होत असले तरी तो योग तत्त्वाला पुष्ट करीत नाही मानवताही त्या नियमाला अपवाद ठरण्याची फार मोठी शक्यता आहे ! !

गाजलेल्या राजकीय व सामाजिक क्रान्त्या इतिहासप्रसिद्ध आहेत या ऐतिहासिक क्रान्त्याचा खूपच बोलबाला झालेला आहे पण त्यातून माणूस किती बदलला आहे ? गेल्या चार हजार वर्षांत तरी मानवी स्वभाव बदललेला नाही अशी इतिहासाचीच साक्ष आहे साधने आणि क्लृप्त्या बदलल्या पण हेतू आणि फलित यात मुळीच बदल झालेला नाही युद्ध करणे, तह करणे, स्वारी करणे, माघार घेणे, संकेत करणे, मैत्री करणे, तटस्थ राहणे, मदत देणे किंवा नाकारणे इत्यादी क्षेत्रातील मानवी स्वभावात मूलत फरक झालेला नाही कोणी राजकीय दृष्टीने पुढारलेले किंवा मागासलेले असले तरी त्याच्या मानवी मूळ भावना एकच असतात ज्या सत्ताधाऱ्याच्या विरुद्ध बंड करण्यास विरोधी लोक उभे ठाकतात ते स्वत मात्र सत्तेवर आल्यानंतर तसलाच उन्मत्तपणा अगदी सहजपणे करतात

क्वचित् प्रसंगी मानवी गुणाचा प्रभाव त्याच्यावर पडतो, नाही असे नाही नव्या परिस्थितील नव्या पेचप्रसंगाचा अभ्यास करून विचारपूर्वक घेतलेले निर्णय मानवी जीवनाला लाभदायक ठरतातही. एखाद्या चर्चिलचे वक्तृत्व हजारो सैनिकापेक्षा जास्त मोलाचे ठरते नवे डावपेच, तीव्र मानवी प्रेरणा, अमोल प्रसंगावधान, गतिमान कौशल्य, बंधुत्वाची वा राष्ट्रभक्तीची ऊर्मी अशा मानवी प्रकर्षामुळे नवी राज्ये निर्माण होऊ शकतात पाश्चर, मॉर्स, एडिसन, फोर्ड, भाभा, बोस, लेनिन, ताओ, म गांधी, मार्टिन ल्यूथर किंग अशाच्या प्रयत्नामुळे परंपरागत जीवनाची घडी बदलते परन्तु कितीही मोठी विभूती अवतरली तरी मानवी संस्कृती किंवा संस्कारानुसारी जीवनपद्धती फारशी बदलत नाही कारण संस्कृती प्रसंगानुसारी नसून ती मानवातील मूळ गुणावर अधिष्ठित असते.

आपद्धर्माप्रमाणे सस्कृती केवळ प्रासगिक मूल्यावर जगत नाही दीर्घ कालीन अनुभवजन्य ज्ञानाचा परिणाम सास्कृतिक मूल्यावर होत असला तरी केवळ वैयक्तिक अनुभूतीच्या धारेतून सस्कृतीचा अखड प्रवाह निर्माण होत नाही **मानवतेच्याच सिद्धीचा परिपाक म्हणजे सनातन संस्कृती होय.** नवी सुधारणा जर या मानवतेच्या कक्षेत समाविष्ठ होण्यासारखी असली तर ती स्वीकृत ठरते **संस्कृतीच्या या गुणामुळेच नवे प्रश्न, नव्या रीती नीट पारखल्या जातात आणि त्यातून कालानुसारी नवे सामर्थ्य मिळत राहते.** केवळ नीतिनियमन म्हणजे सस्कृती नव्हे आचार-नियम स्थळ-कालपरत्वे भिन्न भिन्नच नव्हे तर परस्पर विरोधीही आढळतात. आपल्याच सस्कृतीतील काही विवाह-प्रकार आज अशुभ वाटत असले तरी एके काळी त्याना मोठी मान्यता होती. कारण या गोष्टी परिस्थितिसापेक्ष असतात. सस्कृती परिस्थितीच्या पोषाखात वावरत असली तरी तिचा आत्मा वेगळा असतो तो मानवी तथ्याला अनुकूल असतो

## भारतीय संस्कृतीचा मूळ गाभा

सनातन मानवी तथ्ये मात्र देश-काल-परिस्थितीच्या त्रागड्यातून जन्मत नसतात तर ते मानवतेचे अगभूत अश किंवा घटकमूल्ये असतात शेतीप्रधान जीवनातील लोकाच्या सस्कृतीचा तोडावळा औद्योगिक क्रांतीने बदलत असला तरी त्या दोन जीवनपद्धतीमधील लोकाची मूळ सस्कृती वेगळीच असते असे नाही हस्ताक्षराच्या विविध स्वरूपामुळे तत्त्वार्थ बदलत नाही निरनिराळ्या आजीविकामधील लोकाची एक राष्ट्रीयता, एकतेची भावना, एकच सस्कृती असणे अनैसर्गिक नव्हे. जीविकेचा उद्देश वेगळा असल्याने त्यानुसार सस्कृतीमध्ये बदल होतोच असे नव्हे म्हणूनच एकाच सस्कृतीच्या प्रागणात उपजीविकेची विविधता आढळते. उलट दोन समाज देवभक्त असले तरी केवळ त्या देवभक्तीमुळे त्याची मानवी श्रद्धा एकरूप असतेच असे नाही एकजण भीतीच्या पोटी देवकल्पना उराशी बाळगून त्या त्या देवतेला तृप्त करण्याचा प्रयत्न करतो, तर दुसऱ्याची देवकल्पना आत्मगुणाच्या साक्षात्कारातून जन्माला आलेली असते. म्हणून **देव-देवता-तर्पणाचा हेतू व मार्ग आणि आत्मगुणाच्या सिद्धीची साधना व हेतू यात महदतर आहे.** आणि हेच अतर सस्कृतीच्या मूलस्रोताचे निदर्शक आहे त्या दोन सस्कृती वेगवेगळ्या होत

यापैकी शुद्ध भारतीय सस्कृती कोणती हे ओळखणे आवश्यक आहे त्यामुळेच स्वत्वाची जाणीव जागृत होईल ! ही परपरा कितीही जुनी असली तरी ती ज्ञात होणे हिताचे आहे मार्गदर्शक आणि प्रेरक ठरणार आहे कारण **तोच भारतीयत्वाचा मूळ गाभा आहे.** मूर्ती कितीही अलकारप्रिय असली तरी

अलंकाराचे ते वलय दूर केल्याशिवाय मूर्तीच्या अंगभूत आकाराचे सम्यग्दर्शन होत नाही पुढे देहाचाही आकार ओलांडून त्यातील चेतनातत्त्वाचा साक्षात्कार करून घेण्यातच खरी साधना आहे. कारण तेथेच गुणसिद्धी आहे आणि केवळ ही गुणसिद्धीच कल्याणदायी असते! ही आवश्यक अशी पारख टाळली तर गुणसिद्धी दुरावते, मार्ग चुकतो, प्रयत्न वाया जातो, अश्रद्धा मनात घर करते आणि कायमची फसवणूक होते म्हणूनच धर्माचे पूर्ण उच्चाटन आजपर्यंत सिद्ध झालेले नाही. जीवन व धर्म या दोहोंचा मूलाधार चेतना तत्त्वच असल्याने धर्माचाराचे स्वरूप बदलत राहिले तरी धर्मभावनेची चेतना सदैव अस्तित्वात राहाणारच आहे. धर्माचा साचा देखील सहसा बदलत नाही कारण दुसरा उपयुक्त साचा शोधून काढणे तितके सोपे नसते. म्हणून धर्म नष्ट करणे वा होणे ही दूरची वाव आहे याच कारणाने धर्मनिरपेक्ष संस्कृतीचे एकही उदाहरण आढळत नाही. आजही नाही व पूर्वीही नव्हते परपरागत धर्माचार नष्ट करणाऱ्या समाजालाही नवसमाजाच्या सुनियत्रणासाठी धर्मच उपयोगी पडत आलेला आहे म्हणून धर्माचे साकार दर्शन घडविणाऱ्या दैवताचे किंवा आयतनाचे अस्तित्व कर्मभूमीत सदैव आढळणारच फक्त तत्संबंधी आचारपद्धती वा बाह्य रूढी बदलत राहतील एवढेच!

## मानवता आणि शासनसंस्था

अशा जीवनानुसारी घटनांच्या अभ्यासामुळे व त्याच्यामागील मानवी मूल्याच्या जाणिवेमुळे मानवी स्वभावधर्म बदलण्यास, मदांध सत्तेचे अनुशासन करण्यास आणि व्यक्तिविकास साधण्यास मदत होते. वंश, जातीयवाद, धर्म आणि सामाजिक व राष्ट्रीय हक्क यासंबंधीची मिरासदारी विस्कळीत होते उच्चतेची व वलिष्ठतेची विषम शिखरे समपातळीवर आणणे शक्य होते. समाजाच्या जीवनामध्ये स्फोटक परिस्थिती निर्माण झाली असताना क्रान्तीच्या मार्गाने समतोलपणा राखला जातो हा नवा बदल अनुकूल होण्यासाठी राष्ट्रीय श्रद्धा व राजकीय स्थिती सुधारणे आवश्यक ठरते सांस्कृतिक स्फुल्लिंगांनी चेतोवृत्ती चेतविणे हा सर्व प्रकारच्या मानवी प्रगतीचा आधार आहे अशी सर्व सूत्रे नीट सांभाळता येण्याची पात्रता अंगी अवतरण्यास मानवी मूल्याचा आमूलाग्र अभ्यास उपयुक्त ठरतो

शासनपद्धतीमध्ये बरे-वाईट निवडण्यासंबंधी शाब्दिकवाद निर्माण करणे निरर्थक होय पद्धतीमध्ये बरे-वाईटपणा धुंडण्यापेक्षा शासकातील गुणवत्ता वाढविणे हाच समाजसुखाचा एकमेव मार्ग होय संस्कृतिबाह्य आणि संयमरहित शासनपद्धती ही वाममार्गीच असते मग त्याला नाव लोकशाही असो वा दुसरे काही असो शासनातीत जीवनपद्धती केवळ हेतुबोधक आहे! या युगामध्ये

त्याचा अवलंब ही केवळ एक कल्पना मात्र ठरते. सत्ययुगासारख्या–भोगभूमी-सारख्या निर्विकारी अवस्थेतच ती कल्पना प्रत्यक्षात अवतरणे शक्य समजावे विकारबहुल जीवनामध्ये शासनसंस्था एक समाजाची अंगभूत गरज आहे. मात्र शासनाच्या सद्य स्थितीमध्ये काही बदल हवा असेल तर समाजजीवनामध्ये विकास घडवून आणावा लागतो आणि हा विकास इतिहासाच्या बोधावर अवलंबून असतो.

## संस्कृतीचा मूलमंत्र

ज्याप्रमाणे व्यक्तीच्या वर्तणूकीसाठी प्रेरणेची गरज असते आणि प्रेरणा इष्ट मार्गाने कार्यशील होण्यासाठी तत्त्वश्रद्धेची गरज असते त्याचप्रमाणे सामाजिक समतोलपणा साधण्यासाठी संस्कृतीच्या मूलस्रोताच्या शोधाची गरज भासते. नाही तर दिशाभूल होऊन कष्टाने घडवून आणलेली क्रांतीही केवळ उत्पातकारी ठरते सामाजिक विद्वेष वाढतो जीवनाची प्रतिष्ठा समतोल राहण्याऐवजी विघात झालेलाच अनुभव जास्त वेळा प्रत्ययास येतो. म्हणून इतिहासाच्या शिक्षणातून माणसाच्या मनाचा विकास घडविता आला तर खरा समतोलपणा साधता येईल! अशा साधनेमुळे अहंगड व न्यूनगड समपातळीवर येतात. माणुसकी स्थिरावत जाते जनप्रतिष्ठेला समान वाव मिळतो छळ, द्रोह, हीनता, क्षुद्रता इत्यादी समाज-जीवनाच्या विरोधी प्रवृत्ती क्षीण होतात जित व जेत्यामधील वितुष्ट नष्ट होते युद्धातील तात्त्विक विजय माणुसकीला पोषक ठरतोच असे नाही उलट ऐनवेळी घेतलेली माघारही मानवी जीवनाच्या दृष्टीने मौल्यवान असू शकते पुष्कळ प्रमाणात युद्धविजय तर सर्वच्या सर्व आक्रमणविजय घातकच ठरले आहेत

जीवनमूल्यातील समतोलपणा साधता आला नाही तर लोकराज्याच्या नावाखाली लालसेने बरबटलेल्या व्यक्तीच्या हातामध्येच सर्व राज्यसूत्रे केन्द्रित होतात आणि जो अनर्थ टाळावयाचा असतो तोच मुकाट्याने भोगावा लागतो. अशा प्रकारच्या सामाजिक, वांशिक व पारंपरिक हक्कासंबंधीच्या अन्यायाविरुद्ध चेतना निर्माण करणे हे इतिहासाचे सांस्कृतिक कार्य आहे प्रगतिशील स्पर्धा व चढाओढ चेतनामूलक असल्यामुळे त्या संपूर्णपणे टाळणे योग्य नव्हे पण असा प्रयत्न हा परस्पराच्या गुणाच्या उत्कर्षासाठीच राबवावा त्यातून **'मारा व जगा'** ही नीती पोसवू नये **गुणाचा उपयोग स्व-पर उत्कर्ष करण्यासाठीच असल्याने 'जगा, जगू द्या व जगण्यासाठी मदत करा'** अशा सहकार नीतीची कास धरावी. जगण्याबरोबरच जगविण्यामधील मानवीय आनंद ओजप्रद आहे कारण जगण्यापेक्षा जगविण्यासाठी जी अधिकोत्तर पात्रता, कार्यप्रवणता आणि माणूसकी असावी लागते, तीच तेथे सिद्ध होत असते

मानवी विकासाची व आनदमय जीवनाची ही धारणा चुकल्यानेच पुष्कळशा चागल्या सस्कृतीचा विनाश झालेला आढळतो तो नाश त्याच्या अपात्रतेमुळेच झाला असे नाही पराभव हा एक अपघातही असू शकतो 'म्हणून आक्रमणात ज्याचा पराभव होतो ते अपात्रच असतात असे म्हणवत नाही कारण ज्याचा जय झाला त्याचाही अखेर नाशच झाला आहे शिवाय युगारभीच घडून आलेल्या **भरत-बाहुबलींच्या** युद्धाचे कारण, त्याची अपूर्व व आदर्श पद्धती, त्याची परिणती आणि जित-जेत्यानी अनुसरलेला मार्ग या ऐतिहासिक अनुभवामुळे **पात्रतानुसारी जीवन** ( Survival of the Fittest ) या स्वरूपाच्या नीतीला काही वैचारिक भूमिका लाभत नाही आणि काही चिरतन अर्थ उरतोच असे नाही तत्त्व जर तसेच असते तर सबळाचा वा जेत्याचा नाश व्हावयास नको होता

सुमारे ७ कोटी वर्षांपूर्वी या पृथ्वीतलावरून Dinosaur एकाएकी नष्ट झाले **डायनॉसर** म्हणजे विराटकाय सरडे ज्ञात स्थलचरापैकी सर्वात प्रचण्डकाय प्राणी. त्याचे अश्मीभूत अवशेष सर्व जगभर— **ऑस्ट्रेलिया, अमेरिका, आशिया** अशा दूर दूरच्या खण्डातच नव्हे तर अगदी **अटार्टिका** खण्डातही सापडले आहेत हे सागाडे हत्तीपेक्षाही महाप्रचण्ड आहेत असे हे अगडबब डायनॉसर या भूतलावरून एकाएकी पूर्णत नष्ट का व्हावेत ? डार्विनप्रणीत जीवनाच्या कलहाचा व क्षमतेचा सिद्धान्त येथे लागू होत नाही कारण त्याना नष्ट करणारा त्याच्याहीपेक्षा बलवान प्राणी त्या काळी तरी अस्तित्वातच नव्हता डायनॉसर-प्रमाणे अनेक बलवान प्राणी नष्ट झालेत **मॅमथ** ( Mammoth ) हा प्रचण्ड केसाळ हत्ती तर गेल्या काही हजार वर्षातच नष्ट झाला आहे तो विद्यमान हत्तीपेक्षा देहाकाराने बराच मोठा व बलिष्ठ होता अशी अनेक उदाहरणे देता येतील पण त्याचा नाश होण्याचा उलगडा **डार्विनचा उत्क्रान्तिवाद अगर जीवनकलहाचा सिद्धान्त** करू शकत नाही एवढे नक्की

## सामर्थ्याचे प्रयोगतत्त्व

Survival of the fittest किंवा **जीवो जीवस्य जीवनम् ।** यातील Fitness चा व जीवनाचा बावगा अर्थ घेणारे स्वत ला वैश्विक किंवा निसर्गानुसारी किंवा बहुमतानुसारी समजतात आणि **अहिंसाप्रेरक** जीवनमार्गाकडे व **सत्त्वेषु मैत्री** या सस्कारी भावनेकडे कुत्सित दृष्टीने पाहतात शिवाय अखिल मानवी जीवनातील मानवतेची सनातन उच्च जीवनतत्त्वेही त्याना केवळ जैनाळू भासतात !! वास्तवता मात्र नेमकी याविरुद्ध आढळते **अहिंसाप्रेरित** उच्च तत्त्वेच वैश्विक असून **बलाधिष्ठित जीवनवाद** मात्र केवळ स्वार्थान्धतेने काळवडलेला आढळतो नाहीतर १९०७ मध्ये साहित्य क्षेत्रातील **नोबेल** पारितोषिक मिळवून विश्वविख्यात झालेले साहित्यकार Rudyard Kipling सारख्या विचारवताना

सामर्थ्याच्या प्रयोगतत्त्वाचे दर्शन पुढीलप्रमाणे होण्याचे कारणच काय ? त्यानी आपल्या The Children's Song मध्ये मानवी सामर्थ्याच्या उपयोगासबधी एक वैश्विक तत्त्व चपकळ शब्दात माडले आहे—

> Teach us the Strength that cannot seek
> By deed or thought to hurt the weak,
> That, under Thee, we may possess
> Man's strength to comfort man's distress
>
> – Rudyard Kipling

हे देवा, निर्बलाना दु ख होईल अशा रीतीने प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्षही ज्याचा वापर करता येत नाही अशाच सामर्थ्यवादाची आम्हाला शिकवण दे तुझ्याच कृपेने आम्हाला मानवी सकटाची शाती करू शकणारे दैवी सामर्थ्य लाभो

(१) कोणत्याही रीतीने दुर्बलाना दुखविणे हा सामर्थ्याचा उपयोग नव्हे (२) उलट मानवी आपत्तीचा परिहार करणे आणि शुभ सप्राप्तीसाठी झटणे हाच सामर्थ्याचा योग्य उपयोग होय अशा स्वरूपाच्या सामर्थ्याची आणि त्याच्या वापराची ही प्रमुख तत्त्वे अगदी मोजक्या शब्दात सागितली आहेत सामर्थ्याची ही तत्त्वे अगीकारणे म्हणजे जगातील सर्व प्रकारच्या आघात-विघातावर रामबाण उपाय योजणे होय यामध्ये तेच सनातन मगल तत्त्व गोवलेले आहे की ज्याचा अगीकार भरत-सस्कृतीने आदिम कालापासूनच केलेला आहे नेमके तेच तत्त्व भरतसस्कृतीचा प्राण होय !

## संस्कृति-सातत्य

पात्रता-अपात्रता, जय-पराजय, सबलता-दुर्बलता, विकास-विलय, जगणे-मरणे या गोष्टी योगायोगाच्या अधीनही असू शकतात. असा योगायोग किंवा अपघात याच गोष्टी बलवत्तर असतील तर पात्रतानुसारी जीवनाचे तत्त्व फोल ठरते योगायोगाचा हिशेब माडणे आपल्या आवाक्यात नसते शिवाय एखादीच क्षुल्लक पण नेमकी चूक देखील सर्वनाश घडवून आणते पण असे नुकसान म्हणजे पूर्ण विनाश नव्हे. व्यक्तीचा नाश झाला तरी तो कालानुसारी असतो मानवी मूल्यावर आधारलेल्या सस्कृतीचा पूर्ण नाश कधीच होत नसतो

इतिहासपूर्व कालापासून तपास केला तरी अनेक आक्रमणामध्ये बळी पडलेली भारताची मूळ सस्कृती देखील तशा अर्थाने नष्ट झालेली नाही ती यामुळेच उलट ज्या ज्या आक्रमकानी ही भूमी कायमचीच आपली निवासभूमी केली व ज्याचे वशज कालातराने येथील भूमिपुत्र बनून तिच्याशी एकनिष्ठ

राहिले त्या सर्वांवर ( वैदिक आर्यांसह ) **भरत-संस्कृतीचा** प्रभाव पडल्याशिवाय राहिला नाही मग तिच्या नाशाची कथा कशाला ? याच अर्थाने **ग्रीक** इत्यादी पुरातन संस्कृतीही नष्ट झाल्या असे नव्हे त्याचा वारसा अप्रतिहत आहे. मध्यतरीच्या घडामोडींमुळे त्याच्यात स्थलकालानुसार बदल झाला असेल इतकेच. त्यातील प्रेरणेच्या अर्थाने तर त्या संपन्न संस्कृती अखंड राहून शिवाय स्थळ-कालाच्या आणि राष्ट्रियत्वाच्या भौतिक मर्यादा ओलाडून विशाल बनल्या आहेत **होमर** इत्यादिकाचे वाङ्मय, **प्लेटो** इत्यादिकाचे तत्त्वज्ञान, त्याच्या अभ्यासाचे प्रमाण, क्षेत्र आणि कालखडही विस्तारलेला आहे त्याचा आदर वाढत गेलेला दिसतो

मात्र सर्वच संस्कृतीचा अभ्यास तेवढ्याच आदराने व आस्थेने होतो असे नाही त्यालाही कारण योगायोग किवा कालाधीनताही असू शकेल ! किंवा काही परिस्थितिजन्य अन्य कारणेही असू शकतील ! भवितव्यता तशीच असावी ! परन्तु अशा योगायोगाला काही वारसा हक्क नसतो **भरतसंस्कृतीचा** मूलमंत्र कल्याणकारी असल्याने **आदिराजपुत्र भरताचा,** त्या काळच्या संस्कृतीचा आणि ऐतिहासिक घटनाचा अभ्यास काही कायमचा वर्ज्य नव्हे योगायोग जमून आला तर तोही अभ्यास जरूर प्रगत होईल तो व्हावा असा माझा मानस आहे. **ऋषभपुत्र भरत चक्रवर्तीचा** पूर्ण अभ्यास होऊन एक मोठा इतिहास ग्रंथ प्रकाशात यावा ही एक मोठी सामाजिक गरज आहे ती समाजापुढे माडून थोडीशी चालना देण्यासाठीच त्या **भरत राजाचा व आपल्या देशाच्या नामकरणाचा** इतिवृत्त येथे देण्यात येत आहे

## भरत-संस्कृतीची अक्षुण्णता

राज्ययंत्रणाही नष्ट होते काही प्रदेशही उजाड होतात किंवा भौगोलिक स्थितीमध्ये मोठ्या प्रमाणात फरक होतो पण संस्कृतीची बीजे मात्र तात्त्विक विचारसरणीमुळे किंवा शिक्षणाच्या संस्कारामुळे सदा पुष्ट होत राहतात मानवी जीवनावर संस्कृतीचा परिणाम खोलवर होत राहतो मानवी मूल्याची बीजे पुन पुन अकुरत राहतात आणि बीजांकुर-न्यायाच्या चक्र-परिवर्तनामुळे ती नेहमीच सर्जनक्षम राहतात जीवन मरणावर मात करीत असते व्यक्ती मरत असतात पण वंशावळ वाढत असते त्या वंशवेलीवर संस्कृतिबीजाचा मोहर फुलत राहतो, मानवी मूल्याची व विचारधनाची चेतनावृत्ती नव्या मनात संक्रमित होऊन नवतेजाने उजळतच असते **स्वासोच्छवास** जसे जिवतपणाचे मूळ लक्षण तसे **समाज-जीवनाच्या चेतनावृत्तीचे प्रतीकात्मक** लक्षण **म्हणजे संस्कृती** ती पूर्णपणे नष्ट होत नसते एक समाज-व्यवस्था नष्ट होऊन दुसरी येत असली तरी उदयाला

येणाऱ्या त्या समाजावर मूळ संस्कृतीचा प्रभाव पडतच असतो भरत राजा गेला त्याची शासनपद्धती गेली, त्याच्या वंशजापासून राज्यसूत्रे दुसऱ्या मानव-समुहाकडे गेली तरी सर्वोदयवादी भरत-संस्कृती मात्र नष्ट झाली नाही.

भारतामध्ये घडून आलेल्या शासकीय, नैतिक, धार्मिक आणि उदरनिर्वाहाच्या साधनमार्गावर घडलेल्या उलाढालीतून आणि ऐतिहासिक परिवर्तनातून भरत-संस्कृतीची वाटचाल अक्षुण्णपणे चालूच आहे यामुळे भारतात आलेले आर्य, मुसलमान, पारसी, शक, हूण, मोगल इत्यादी परकीय मानवसमूह इतरत्र गेलेल्या त्यांच्याच वंशजापेक्षा वेगळ्या संस्कारांनी आविष्कृत झालेले आढळतात जे कोणी येथे स्थिरावले ते भारतीयच बनले भारतीय संस्कृतीने त्यांच्यावर आपला प्रभाव गाजविला नाही तर भारतात आलेले आर्य आणि इराणमध्ये गेलेले आर्य यांच्या संस्कृतीमध्ये फरक असण्याचे दुसरे कारण दिसत नाही या अर्थाने भरत-संस्कृतीने आपलेच रूप विशाल केले आहे. या उलट जर येथील पूर्ववर्ती भारतीय संस्कृती निष्प्रभ ठरली असती तर आजचा भरतवर्ष वेगळा दिसला असता तो अभारतीय समाजाची एक वसाहत बनला असता. उपऱ्या आगंतुकाच्या संस्कृतीचाच प्रादुर्भाव दिसला असता पण प्रत्यक्ष स्थिती तशी नाही भारतीय संस्कृतीचा हा मूळप्रभाव पुढील काळातही टिकविण्यासाठी मनातील शुद्ध व सनातन चेतोवृत्ती आणि सर्वोदयवादी तीर्थप्रणाली सदैव जागृत राहिली पाहिजे.

## जीवनातील अमृतसिद्धी

सनातन चेतोवृत्ती जागविण्याचे कार्य खऱ्या इतिहासाच्या अभ्यासानेच साधत असते म्हणून भरताचा यथातथ्य इतिहास जोपासणे आपले आद्य कर्तव्य आहे भाषा, कला, तत्त्वज्ञान, उदरनिर्वाहाची पद्धती, कौटुंबिक व सामाजिक न्यायपद्धती, अद्वेष, उदारबुद्धी, निस्वार्थ सहकार इत्यादी मार्गांनी मानवी मूल्यांची जोपासना करणे, ती परिपुष्ट व समर्थ करणे आणि ती पुढील पिढीपर्यंत पोहोचविण्यासाठी योजलेली एक श्रेष्ठ युक्ती म्हणजे शिक्षणसंस्था व तिचे वैचारिक कार्य होय अशा शिक्षणामध्ये ऐतिहासिक घटनांचा परामर्ष फार महत्त्वाचा असतो त्याच्या आधारावरच नव समाजाचा पाया स्थिरावतो व त्याची वलधारणा होत राहते म्हणून मानव समाजाचा इतिहासाशी सांगड घालणे आवश्यक आहे हा दुवा तोडून चालणार नाही. कारण तो संस्कृतीच्या व मानवी मूल्यांच्या संक्रमणासाठी आणि पूर्व परंपरा पिढ्यानुपिढ्या अतूट राहण्यासाठी एकमेवाद्वितीय आहे म्हणून इतिहासाचे शिक्षण हे मानवी संस्कृतीचे एक अंगभूत लक्षण आहे अशा ज्ञानाची व्याप्ती वाढविणे आवश्यक आहे हे निःसंशय होय.

जुन्या अवश्रद्धा नष्ट करणे हे ज्ञानाचे पहिले लक्षण होय खऱ्या ज्ञानाची कास धरल्यानेच आपण पुढील पिढी जास्त सुसस्कृत व सबल करू शकू म्हणून या आदिम इतिहासाचा अभ्यास म्हणजे उकिरडा उकरणे किंवा केवळ थडगी उपसणे नव्हे ही भीती स्वार्थी व अस्थानी आहे जिताच्या चुकाची व गुन्ह्याची जत्री जमविणे आणि जेत्याची टाळी वाजविणे एवढीच दृष्टी ठेवून इतिहास न वाचता त्यातील मानवी मूल्ये शोधणाऱ्याला व त्या काळातील थोर विचार-प्रणालीचे आणि कर्तबगारीचे साहचर्य प्राप्त करून घेणाऱ्याला जुना इतिहास म्हणजे रुक्ष चर्चा वाटत नाही उलट त्या काळातील सत्पुरुष, मुत्सद्दी, कलावत, पराक्रमी, परोपकारी, विचारवत इत्यादिकाची चेतनामय भेट झाल्याने मन प्रफुल्लित राहून त्याचे तेज व ओज वाढत असते.

माणूस आपल्या जीवनात जेवढा अर्थ ओतील, चेतना निर्माण करील तेवढाच अर्थ मानवी विकासात आढळतो अशा एकागी विचाराने पूर्वेतिहासाचा व अनुभवाचा वारसा नाकारणे योग्य नव्हे जेवढे पिकते तेवढेच स्वीकारून मूग गिळण्यात जिवतपणा नाही व पुढील वेगमी कमी पडल्याने होणारी उपासमारही टळणार नाही स्वत बरोबर इतराचेही अधिक पोषण होण्यासाठी अधिक पीक पिकविण्याची गरज असतेच त्यामुळे अधिक फलधारणा पदरात पाडून घेण्यासाठी उभ्या पिकाचा मुळापासूनच नव्हे तर बीजापासून समग्र अभ्यास करावा लागतो त्याशिवाय सुधारणेचा खात्रीलायक उपाय सापडत नाही म्हणून **जीवनातील अर्थसप्राप्ती व चेतोवृत्ती अधिक प्रभावी करण्यासाठी मानवी विचार-धनाचा पूर्वेतिहास अभ्यासणे हे सांस्कृतिक जीवनाचे एक प्रमुख अंग आहे.** आपली सस्कृती आपल्याला जशी आपल्या पूर्वजानी दिली तशीच नव्हे तर तिचे अधिक सवर्धन करून ती आपल्या कित्येक भावी पिढ्याना देण्याचा प्रयत्न करणे प्रत्येकाचे सामाजिक व सास्कृतिक कर्तव्य आहे **ही सस्कृतिवितरणाची प्रक्रिया मानवी जीवनामध्ये अमृत प्रसवल्याशिवाय राहणार नाही**

## सांस्कृतिक कर्मयोग

मानवासमोर अनेक समस्या सदैव उभ्या असतात त्यापैकी काही समस्याच्या बाबतीत नुसता वितडवाद करून किंवा वाक्चातुर्य दाखवून भागत नसते प्रत्येक समस्येचा विचार करीत असताना त्या समस्येबरोबरच स्वत शीही तन्मय होणे आवश्यक असते कारण प्रत्येक समस्या मानवी दृष्टिकोणातून आणि मानवी हिताला बगल न देता सोडवावी लागते नाही तर उपायही अपाय ठरतात, किंवा तशी भीती मनाला सदैव त्रस्त करीत राहते इतिहासाचे सशोधन किंवा त्याचा अभ्यास कितीही कष्टदायक किंवा खर्चिक वाटला तरी त्यासबधी आस्था राखलीच

पाहिजे कारण मानवी मूल्यांकनाचा एक मानदण्ड तयार करण्यासाठी मानवाला तो मार्गदर्शन करीत असतो. हे इतिहासाचे मार्गदर्शन टाळणे किंवा त्यापासून वचित राहणे म्हणजे स्वत च्या पायावर धोंडा पाडून घेण्यासारखेच ठरणार आहे

इतिहासाचे सशोधन किंवा अभ्यास करताना कुणावर मात करण्याचा प्रश्नच उद्भवत नाही वैयक्तिक प्रतिष्ठेच्या कक्षेच्या पलीकडचा हा प्रान्त आहे जुने उकरण्यात पैसा, श्रम, वेळ इत्यादी फुकट दवडविण्याचा किंवा इतर राष्ट्रीय गरजानुसार योजलेल्या प्रकल्पासाठी राखून ठेवलेल्या सपत्तीमध्ये ढवळाढवळ किंवा कपात करण्याचाही हा प्रश्न नव्हे एकदर राष्ट्रीय उत्पादन व खर्च लक्षात घेऊन तुलना केल्यास अशा अभ्यासावर हजारातून दोन रुपयेही प्रत्यक्षात खर्च होत नाहीत हा खर्च त्या मानाने अगदीच अल्प असतो

मानवी हिताच्या कार्यक्रमावर खर्च किती होतो आणि त्या मानाने फायदे किती होतात अशा तऱ्हेचा पैशाच्या स्वरूपात हिशेब माडण्यात स्वारस्य नाही. कारण इतिहासाच्या अभ्यासामुळे होणारे मानवी फायदे अधिक सखोल आणि प्रभावकारक आहेत. असे फायदे प्रत्यक्ष मोजण्याचे माप सापडणे कठीण असले तरी त्याकडे दुर्लक्ष करणे परवडणार नाही, हेही लक्षात घेतले पाहिजे स्थूल मानाने पाहता इतिहासाच्या अभ्यासामुळे राष्ट्राला होणारे काही सास्कृतिक फायदे पुढील शब्दात सागता येतील—

(१) आपला वारसा समजल्याने पारपरिक हक्क प्राप्त होतात किंवा प्राप्त करून घेता येतात. त्यासाठी प्रेरणा व स्फूर्ती मिळते

(२) आपण परके, उपरे, आगतुक, परागदा, उपकृत किंवा आश्रित ठरत नाही. स्वत्वाची जागृती लाभून स्वाभिमानपूर्वक उच्च जीवन जगण्याचा हक्क प्राप्त होतो, मार्ग सापडतो गुलामी वृत्ती जाऊन मानव्याच्या थोर परपरेत स्थान मिळते प्रतिष्ठा वाढते

(३) आपल्या पैतृक भूमीवर आपणास राष्ट्रीय हक्काने जगता येते. ती दुसऱ्याच्या ताब्यात गेलेली असल्यास परत मिळविण्याचा प्रयत्न करता येतो. ताब्यात मिळाल्यावर मातृभूमीची उन्नती करता येते. जगात मानाचे स्थान प्राप्त होऊन, आपल्या पात्रतेच्या व सामर्थ्याच्या बळावर इतरावर मानवी उपकार करण्याची सधी मिळते मानवी जीवन सफल होते. आपली राष्ट्रीय सामग्री कोणत्या स्वरूपाची आहे, ती कशी उपयोगात आणता येईल, नवी नैसर्गिक साधने कशी उपलब्ध होतील आणि त्यामुळे मानवी कल्याण कितपत साधता येईल इत्यादी गोष्टी नीटपणे कळतात

(४) उपलब्ध नसलेली पण आवश्यक असलेली जीवनसामग्री तयार करण्याची विद्या प्राप्त होऊन नवे कार्यक्षेत्र लाभते

(५) मागच्या चुका सुधारता येतात पुढचा मार्ग अचूकपणे आक्रमिण्यास मदत होते

(६) इतिहासाचा अभ्यास केवळ इतिहासासाठीच नसून तो जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात मार्गदर्शन करतो त्यामुळे वैद्यकीय, तान्त्रिक, यान्त्रिक, शैक्षणिक, तसेच दळणवळण, व्यवस्थापन, अनुशासन, अधिशासन, शास्त्र, शेती, व्यवसाय, कला वगैरे जीवनाच्या विकासाला पोषक अशा प्रत्येक क्षेत्राला त्याचा फायदा मिळतो

(७) जीवनातील दार्शनिक व तात्त्विक भूमिका बळकट बनते नव्या अनुकूल श्रद्धा अंगी रुजविणे सोपे जाते अशक्याला आव्हान देऊन त्यावर मात करण्याची अभित्सा निर्माण होते आव्हान ही एक मानवी गरज आहे. ह्या प्रवृत्तीला महत्त्व आहे जर याचा अव्हेर केला तर माणसातील काही तरी एक आवश्यक व हिताची बाब नामशेष होईल ! ती राखणे आपला राष्ट्रीय बाणा आहे

(८) मानवी जीवनाला अत्यंत आवश्यक अशी सहकाराची व समंजसपणाची भावना पोसविण्यास मदत होते सहकार्यामुळेच मोठमोठी राष्ट्रीय उद्दिष्टचे साध्य होत असतात मतभेद असणे व्यक्तित्वाचे लक्षण असले तरी, राष्ट्रीय हिताची दृष्टी जागृत ठेवण्याचे व बुद्धिभेदाला बळी न पडता उद्दिष्टचे साध्य करताना सर्वोदयी मार्गापासून च्युत न होण्याचे मानसिक सामर्थ्य प्राप्त होते हा मानसिक संस्कार अखेर मानवी कल्याणासाठी राबविता येतो.

याशिवाय आंतरराष्ट्रीय दृष्टीने उपयुक्त असे असंख्य फायदे वाढत्या प्रमाणात आपल्या आवाक्यात येत राहतात. आणि वैश्विक जीवनातील एक प्रतिष्ठित दुवा बनण्याची पात्रता मिळविण्याची संधी मिळत राहते.



: १२ :

# जैन क्षत्रियानुयोग

जयन्ति जितमृत्यवो विपुलवीर्यभाजो जिनाः ।
जगत्प्रमदहेतवो विपदमन्दकन्दच्छिदः ।।

— महापुराण, पर्व ४२, पुष्पिका ३.

# १२ जैन क्षत्रियानुयोग

## जैन क्षत्रियानुयोगाचा आत्मा

ओजस्तेजोविद्यावीर्ययशोवृद्धिविजयविभवसनाथाः ।
माहाकुला महार्था मानवतिलका भवन्ति दर्शनपूताः ।।

– रत्नकरण्डश्रावकाचार, १/३६.

मागील प्रकरणामध्ये अनेक ग्रथाच्या आधारे हा इतिहास सिद्ध झाला आहे की **भगवान ऋषभनाथच क्षात्रधर्माचे आदिम प्रवर्तक होत.** ते स्वत व त्याच्या परपरेतील **भरतादिक** सर्व जैन राजे विपुल वीर्याचे धारक, जगाला आनदकारक, महान विक्लवाचा मुळापासून उच्छेद करणारे आणि सदा विजयशाली होते ( महापु प ४२, पु ३ ) त्यानी आतर्बाह्य सर्व शत्रूना जिकून स्वत बरोबरच सर्व प्रजेलाही श्रेष्ठ सुखाची प्राप्ती करून दिली आपल्या वैचारिक व अतर्दृष्टीच्या प्रभावाने ओज, तेज, जीवनविद्या, पराक्रम, यश, सपन्नता, विजय आणि वैभव याची परिपूर्ण सिद्धी करून ते जगाला शिरोधार्य भूषण ठरले (रत्न०) त्यानी ज्या क्षात्रधर्माचे प्रवर्तन केले त्यामुळेच मानवी कल्याणाचा मार्ग परपरेने प्ररूढ झाला आपल्या पात्रतेच्या आणि कर्तबगारीच्या जोरावर त्यानी ओजवर्धनाची व तेजसधारणेची साधना सफल करून मानवी जगासमोर पुरुषार्थ-सिद्धीचा जो आदर्श निर्माण केला तोच **जैन क्षत्रियानुयोग** होय केवळ पृथ्वी जिकणे, शत्रूना नमवून त्याना दास बनविणे, उरलेल्यावर आक्रमण करणे, सामर्थ्याचे प्रदर्शन करणे, सर्वांना भयग्रस्त करणे, आपल्या सपत्तीत स्वैर भर घालणे, तिचा स्वच्छद उपभोग घेणे आणि उन्मत्त वागून आपल्यातच दग राहणे यातच काही क्षात्रधर्माचे स्वारस्य नाही एकदरीत **नाभि-ऋषभ-भरत** याच्या

प्रजापालनकार्यातून जी एक सर्व कल्याणकारी क्षात्रधर्माची परंपरा निर्माण झाली आहे तिलाच जैन क्षत्रियानुयोग म्हणतात

भरतक्षेत्र जीवन जगण्यासाठी स्वर्गापेक्षाही सुंदर व सुखदायी आहे अशी पारंपरिक प्रसिद्धी या क्षत्रियानुयोगाच्या दिव्यत्वावरच आधारित आहे. हे दिव्यत्व नाभि-ऋषभ-भरतांच्या वीराणुयोगाच्या साधनेतूनच अवतरले आहे. त्याग्य समतोलपणा साधून चारही पुरुषार्थांची समग्र साधना सिद्ध करण्याचा मार्ग त्यांच्याच जीवनसाफल्यातून आविष्कृत झालेला आहे ही परंपरा श्रेष्ठ असल्यानेच जीवनसाधनेचे भारतीय मार्ग जगामध्ये अभीष्ट ठरले आहेत दु खाचा परिहार करून सुखाचा संयोग घडवून आणणारा हा जीवनक्रम मानवातील श्रेष्ठतम मांगल्याची प्रतिष्ठा करण्यास सर्वसमर्थ आहे दैवी प्रेरणा आणि मानवी भोग येथेच एकवटतात. लौकिक सुखाचे भोग भरतप्रणीत मार्गाने जितके सरस ठरतात तितके अन्य प्रकारे नव्हे !

राजभोग कामपुरुषार्थाची क्रीडाभूमी आहे तेथे लौकिक सुखाचे अधिष्ठान सदैव संपन्न ठेवण्यासाठी भरतानुयोगच समर्थ आहे विजय, वैभव, स्वर्गीय भोग यांकडे आणि मोक्षाकडेही जाणारे मार्ग याच वीराणुयोगाच्या क्षेत्री एकमेकांत विलीन होतात हा अनुयोग तप पूत असल्याने व्यवहारी जीवन लोकोपयोगी बनते तर आंतरिक जीवन अलौकिक सुखाने व्यापून जाते परभाव किंवा वैरभाव वस्तुत खोटा असल्याने तो फार काळ टिकू नये प्रासंगिक वैरभाव प्रसंग संपताच लय पावणे व स्वाभाविक स्नेहभाव पुनरपि प्रादुर्भूत होणे हा निसर्ग आहे हा वैराणुयोग टाळण्यासाठी अंतर्दृष्टीची आवश्यकता असते तीच अंतर्दृष्टी हा जैन क्षत्रियानुयोगाचा आत्मा आहे.

## सनातन अधिष्ठान

ऋषभ-भरताच्या प्रणालीतील संस्कृती फार मोलाची आहे. त्यामुळेच भारतीयता टिकून आहे तिचा परिचय एका टप्प्यात पूर्णांगाने करून देणे कठीण आहे. अंगप्रत्यंगांचा विचार करू गेल्यास विस्कळितपणा उद्भवल्याशिवाय राहणार नाही आणि या ग्रंथाच्या संदर्भात त्याची गरजही नसावी नाभिराज, ऋषभदेव आणि भरतचक्री यांच्या योग्य व्यक्तित्वाविषयी आणि त्यांच्या क्षात्रप्रणालीसंबंधी एक विशिष्ट दृष्टिकोण स्पष्ट होण्यासाठी जैन क्षत्रियतेचे अंतरंग व्यक्त करणे इष्ट वाटते. हे अंतरंग म्हणजे एक भावमय अवस्था आहे एक चिंतनशील प्रक्रिया आहे संपन्न जीवनदृष्टीमधील एक झलक या दृष्टीने वाचकांना भरतसंस्कृतीच्या अभ्यासाची प्रेरणा मिळावी ! भारतीय संस्कृतीच्या घडणावळीमध्ये जैन दृष्टिकोण फार महत्त्वाची भूमिका बजावीत आला आहे. प्राचीनकाळी मध्य आशियातून

बाहेर पडून सर्व युरोपात व इतरत्रही देदिप्यमान प्रगती करून जगावर प्रभुत्व गाजविणारे आर्य, त्यांच्या संस्कृतिसंपन्नतेबद्दल प्रख्यात आहेत. विशेषत त्यांची विजिगिषा आणि वर्णश्रेष्ठत्वाचा दर्प फार उग्र आहे व ऐहिक जीवनामध्ये ते स्वतःला श्रेष्ठ आणि ज्येष्ठ समजतात. या श्रेष्ठ-कनिष्ठतेच्या यज्ञात मोठी आहुती पडली ती भारतीय संस्कृतीची !

परंतु सिंधुखोऱ्यातील उत्खननाच्या अभ्यासामुळे तेथील संस्कृती वैदिक आर्यांच्या संस्कृतीपेक्षा सनातन व श्रेयस्कर होती असे सिद्ध झाल्यावर भारतीयांनी ज्या नव्या प्रेरणा स्वीकारल्या त्यातून एक नवी जीवनदृष्टी पोसवत गेली. त्यामुळे वेदमंत्रप्रणीत आणि आर्यवंशप्रेरित, उच्चतेच्या कल्पनेला धक्का बसला. भारतीय संस्कृतीची श्रेष्ठता आवासित आर्यांवरही अधिष्ठित नाही की वेदप्रणीतही नाही– हे विदारक सत्य प्रगट झाले. भारतीय संस्कृतीची श्रेष्ठता भरतवर्षातील सनातन जीवनमूल्यावरच पोसवलेली आहे. म्हणून दर्शनशास्त्र, मूर्तिपूजा, सोमयागादिक यज्ञप्रकारांचा त्याग, निरामिष आहाराकडील वळण इत्यादि कित्येक जीवनक्षेत्रात भारतातील आवासित आर्य इतर देशातील कोणत्याही आर्यसमूहापेक्षा संस्कृतिमूल्याने वेगळे दिसतात. हे वेगळेपण त्यांच्या बदललेल्या जीवनमूल्यविषयक दृष्टिकोणाचेच निदर्शक आहे. आणि हा सर्व प्रभाव येथील मूळच्या भरतसंस्कृतीचाच आहे.

अत्यंत प्रभावी अशी ही भारतातील प्राचीन संस्कृती मानवी जगातील एक वैशिष्ट्यपूर्ण मूल्यांकित जीवनश्रद्धा आहे. त्यातील भारतीयता, नावावरूनच भरताधिष्ठित आहे. प्राचीनता आणि जीवनमूल्यात्मक श्रद्धा यावरूनही हा भरत वैदिक परंपरेतील नाही हे उघड आहे. आर्यपूर्वकाळापूर्वी असंख्य वर्षे पोसवलेली ही संस्कृती ज्यांनी ज्यांनी घडविली त्यामध्ये जैनांचा वाटा फार मोठा आहे. जीवनाचे प्रत्येक क्षेत्र जैनश्रद्धेने प्रभावित झालेले आढळेल. जैनश्रद्धा ही एक गुणविशिष्ट दर्शनपरंपरा आहे. त्यामुळे त्यांचा धर्माचारच नव्हे तर त्यांचे ऐहिक जीवनही वेगळे दिसते. सल्लेखनेमुळे तर त्यांनी मरणालाही थोरवी प्राप्त करून दिली आहे. हा वेगळेपणा मानव्याच्या आवश्यक गुणावर आधारलेला आहे. जन्मापासून मरणापर्यंत सर्वच मानवी व्यवहार गुणानुरूप करण्यासाठी जैन दर्शनाचा उपयोग मोठ्या प्रमाणात होतो. हा जीवनाचा दृष्टिकोण निर्व्याज, निर्वंद्य, निरुपद्रवी असून स्व–परकल्याणकारी आणि वर्धनशील आहे. या गुणानुगत प्रभावामुळे आपला वा दुसऱ्याचा नाश न होताच सर्वोदय होत असतो. आणि नेमक्या याच कारणामुळे जैन क्षत्रियानुयोग वेगळा आहे. या ऊर्जेच्या अंतरंगातील भावमूर्तीचे ओझरते दर्शन घडविणे सांस्कृतिक विचाराचेच एक अंग आहे. शिवाय जैनगत क्षात्रतेज सर्वसमर्थ असूनही अहिंसेचे सान्निध्य झिडकारीत नसल्यामुळे

पुष्कळाना त्याचे नीट आकलन होत नाही उलट गैर समजुती मात्र पसरत राहतात गुणवत्ततेचीही टवाळी व हेटाळणी होत राहते पण ती होऊ नये आणि जैनाची जीवनमूल्ये जैन गुहेतच गुप्त व सुप्त राहू नयेत ! जिनप्रणीत जीवनतथ्ये केवळ निर्वाणासाठीच उपयुक्त नसून ती ऐहिक जीवनाचा आदर्श गाठण्यास सर्वस्वी समर्थ आहेत हे स्पष्ट करण्यासाठी या क्षत्रियानुयोगाची परिभाषा समजणे आवश्यक आहे

## दार्शनिक साधना

जीवनक्रियेमध्ये दार्शनिक अभिव्यक्ती फार महत्त्वाची असते कारण दर्शनबीजात्मक धर्मच जीवनवृक्षावर तरारून बहरत असतो दार्शनिक गुणश्रद्धाच जीवनवेलीवर उमलून येत असते तिचाच गंध आसमंतात दरवळत असतो त्यामुळेच व्यवहारातील मूल्ये निश्चित ठरविण्यासाठी योग्य दिशा लाभते जैन क्षत्रियतेची दार्शनिकता इतराहून वेगळी असून ती स्वत च्या खास तत्त्वविधानावर अधिष्ठित असल्याने जैनाच्या अन्त प्रेरणाचा प्रादुर्भावही बीजानुसार वेगळाच होत आला आहे या प्रेरणेप्रमाणे क्षत्रियता व इतर जीवन-व्यवहार योग्य तेथे आपोआपच वळण घेत राहतात जीवनसाधना व तिचा प्रकार बदलतो त्याचा प्रभाव दैनंदिन व्यवहारावर दिसून आल्याशिवाय राहात नाही म्हणून जैनाची जीवनमूल्ये वेगळी ठरतात त्याच्या राजकीय दृष्टीमध्ये आणि आनंदाला पूरक अशा विविध कलाच्या उपासनेमध्येही निश्चितपणे वेगळेपणा आढळून येतो मात्र हा वेगळेपणा मानवी जीवनाला अधिक पोषक असल्याने त्याचा अभाव तीव्रतेने जाणवल्याशिवाय राहात नाही

ज्या जीवनव्यापारावर अतस्थ भावरूप तथ्याची छाया पसरत असते ते भावस्वरूपही साधनेतूनच लाभत असते गुणात्मक साधनेतून व्यक्त होणाऱ्या भावनाच मानवाचे व्यक्तित्व घडवितात जैन व्यक्तिमत्व वेगळे आहे कारण त्याच्या भावना व भावस्वरूप अतरग वेगळ्याच आविर्भावाने भारावलेले असते 'समता सर्वभूतेषु' हा मत्र त्याच्या आचारातील स्थायीभाव आहे त्याच्या धर्मपालनात सामायिक अग्रगण्य तर अतरातील **मैत्री, प्रमोद, कारुण्य, तटस्थता,** विकारशमन इत्यादी गुणभक्तीतून प्रादुर्भूत होणारा सामाजिक सहकार, गुणाराधना, दु खितासाठी त्याग व सेवा, परस्परातील संघर्षाचे शमन, परस्परोपग्रह यावरोबरच कोणत्याही प्रकारची गुणहानी व इद्रियवशता इत्यादी अनिष्ट योग टाळणे अशा मार्गाने जैनानी धरलेली मानवतेची कास विख्यात आहे. यामुळे जैनाचे जीवन परिस्थितीच्या वादळात सापडले तरी त्याची वाताहत न होता ते जेथल्या तेथे स्थिरावते त्याला गती मिळाली तर ते फक्त उचावते. अशा स्थायीभावामुळेच त्याचे राजकीय व सामाजिक जीवन इतराहून वेगळे दिसते.

मानवी जीवनाच्या क्षितिजावरून वरील गुणाची अनुपस्थिती मनानेही कल्पणे कठीण होईल मानवी जीवन देखील स्वार्थी, पशुतुल्य व बलप्रधान बनेल राष्ट्रीय श्रद्धेचा मूलाधार नष्ट होईल परस्पर द्विधा वृत्ती, क्रौर्य-द्रोह, वर्गकलह, भाषावाद इत्यादी समाजविघातक घटना बोकाळतील म्हणूनच जैनानी केलेली **क्षात्रधर्माची परिभाषाही वेगळी आहे.**

## गुणाधिष्ठित सुरक्षा

क्षतात् त्रायते इति क्षत्रिय.। हे या विचारसरणीतील आद्य सूत्र क्षतीपासून,-कोणत्याही गुणहानीपासून सरक्षण मिळविणे व मिळवून देणे हाच क्षत्रियाचा एकमेव धर्म म्हणून जिनसेन आचार्यांनी क्षत्रियाना पहिलीच जाणीव दिली की—

**क्षतत्राणे नियुक्ताः स्थ यूयमाद्येन वेधसा ।।**

— महापुराण, ४२/२

क्षत म्हणजे आघात किंवा आघात पोहोचलेले जीव आघातपूर्व सावधगिरी आणि आघात झाल्यावर त्याचे निवारण अशी दोन्ही प्रकारची जबाबदारी क्षत्रियावर सोपविलेली आहे कारण ते स्वत या दोन कार्यांत आणि त्यापुढील गुणप्रकर्षातही सर्वस्वी पात्र आणि समर्थ असतात पुढे लगेच अकराव्या बाराव्या श्लोकामध्ये क्षत्रियाच्या त्रिविध कार्याची पद्धती व त्याच्या सीमाही सांगितल्या

**रक्षणाभ्युद्यता येऽत्र क्षत्रियाः स्युस्तदन्वयाः ।। ११ ।।**

— महापुराण, ४२/११.

क्षत्रियानी रक्षण कार्यामध्ये नेहमी उद्युक्त असावे आणि ते कार्य करीत असताना त्यानी ऋषभदेवाची परपरागत प्रणाली अनुसरावी रक्षणासारखे महत्कार्य करतात म्हणून केवळ क्षत्रियाना स्वच्छदपणाचा परवाना असू नये त्याचे ते रक्षणकार्य कसे असावे याचे मार्गदर्शन करताना त्यानी पुढील तीन व्रते पाळली पाहिजेत असा आदेश दिला आहे—

**तेषां समुचिताचारः प्रजार्थे न्यायवृत्तिता ।। १२ ।।**

— महापुराण, ४२/१२

त्याचे रक्षणकार्य गुणसिद्धीच्या दृष्टीने अत्यत उचित असावे ते प्रजेच्या हिताचेच असावे आणि ते कार्य करीत असताना न्यायाचा स्थायीभाव ढळू देऊ नये शिवाय न्यायप्रवृत्ती आत्मधर्मानुकूल असावी असाही आदेश पुढील तेराव्या श्लोकातच दिला आहे म्हणून क्षती किंवा हानी स्वैर कल्पनेवर आधारता येत

नाही. त्या विचारालाही सिद्धान्ताचा आधार आहे क्षती किंवा हानी कोणत्याही एकाच पक्षाची असते असे मानण्यास तत्त्वाधार नाही शिवाय क्षती ही केवळ द्रव्यात्मकच असते असेही नव्हे ती भावनिक व आत्मिकही असते चेतनात्मक क्षतीपासून सावध राहणेच अखेरपक्षी कल्याणप्रद असते भावना, चेतना व आत्मा यांच्या सुस्थितीवरच जीवनातील कल्याण आधारित असते. या जीवनतथ्याकडे दुर्लक्ष करून द्रव्याच्या व वैभवाच्या राशीचा विस्तार करीत राहणे म्हणजे आपले जीवन व्यर्थ घालविणे होय.

## स्वतत्त्वाची प्रतीती

शत्रूचा समाचार घेण्यास सामर्थ्याची गरज असली तरी खरा शत्रू ओळखण्यास तत्त्वविचारच उपयोगी पडतो हा तत्त्वविचार क्षत्रियामध्येही वलिष्ठ असला पाहिजे त्याच्या बाहुवलापेक्षाही बुद्धिवलाचा स्तर उंचीवरच स्थिरावला पाहिजे. चेतनातत्त्वाच्या भक्कम आधाराशिवाय विचाराची उंची स्थिरावत नाही म्हणून **स्वतत्त्वाची प्रतीती जागृत ठेवणे हा या सर्व जीवन-क्रियेतील मध्य बिंदू होय.** केन्द्रबिंदूशिवाय परीघाच्या पसाऱ्याला अस्तित्वच प्राप्त होत नाही आत्मधर्माची ओळख, त्याची अनुभूती आणि तद्रूप होण्याची पात्रता मिळविणे हाच जीवनसिद्धीचा खरा मार्ग होय अशा साधनातील जीवनाची क्षती न होऊ देणे हाच खरा क्षात्रधर्म !

जीवाला बाह्य शत्रूपेक्षा आतरिक शत्रूच जास्त विघातक असतात बाह्यशत्रू आंतरिक शत्रूमुळेच निर्माण होतात आणि त्याच्याच प्रेरणेने कार्य करीत असतात. म्हणून स्वत· आणि परत विषयवासना, धनलालसा, तृष्णा, मोह इत्यादी मनोविकार जिंकणे आणि **आत्म-क्षती टाळणे हाच उत्तम क्षात्रधर्म !** अशा सत्त्वाविष्ठित क्षात्रतेजामुळे स्वत·च्या आणि इतराच्याही क्षतीचा परिहार होतो सर्वत्र कल्याणाचा प्रकाश फाकतो व कुशल नांदते हाच वैश्विक कल्याणाचा खरा मार्ग. **याच क्षात्रधर्माचे प्रवर्तन** आदिराज **ऋषभानी** केले आणि **भरतादी सर्व जैन क्षत्रियांनी तीच प्रणाली पुष्ट केली** त्यापैकी जे पूर्ण समर्थ होते त्यांचे कार्य परिपूर्ण सिद्ध झाले. आणि इतराचे त्यांच्या त्याच्या शक्तीप्रमाणे मात्र ऋषभांच्या सर्व अनुयायांनी ती प्रणाली प्राजळपणे अनुसरली आहे **भ. आदिराज पक्के क्षत्रिय असून त्यांनीच आध्यात्म मार्गाचेही प्रवर्तन केले हे कितीही अद्भुत वाटले तरी त्यापरते दुसरे ऐतिहासिक सत्य आज तरी उपलब्ध नाही.**

## क्षात्रविद्या व आत्मविद्या

आणि याच कारणामुळे आजही खऱ्या क्षत्रियानाच आत्मविद्येचे पुरस्कर्ते मानतात. आपला सांस्कृतिक इतिहास धुंडाळून पाहिला तर असेच आढळते की

ज्या थोर जिनभक्तानी आत्मविद्येचा पुरस्कार केला ते सर्व पक्के क्षत्रिय होते सर्वच तीर्थंकर एक तर एकछत्री सम्राट होते किंवा युवराज तरी होते शौर्य, धैर्य, वीर्य या क्षेत्रातील त्याच्या गुणाचे उद्गान सर्वच ग्रथात स्पष्टपणे आढळते. वैदिक परपरेतही या दृष्टीने राजा जनकाला श्रेष्ठ स्थान आहे सर्वंकष क्षत्रिय असूनही त्यानी आत्मविद्येचा पुरस्कार केला आत्मविद्येतील त्याची थोरवी सर्व ऋषिमुनीनीही मान्य केली होती **यावरून आत्मविद्येचा स्रोत क्षत्रियकुडातूनच प्रवाहित झालेला आहे हे सत्य सूर्यप्रकाशाइतके स्वच्छ व स्पष्ट आहे.** तरी पण काही आत्मसतुष्ट व अभिनिवेशाभिमुख पडिताना आत्मधर्मात आणि क्षात्रधर्मात विरोध आढळतो! काही पारपरिक अधाना तर आध्यात्मिक मार्गातील थोर पुरुष क्षात्रतेजाने ओजस्वी व महापराक्रमी असतात या त्रिकालाबाधित सत्य विधानात फक्त विरोध व विसगतीच आढळते दिवाभीताना सूर्यकिरणाचा स्रोतही काळा दिसत असतो तरी त्यात किरणाचा कोणताही दोष नसतो

क्षती बाह्य असो वा आतरिक असो त्यापासून जीवनतथ्याचे रक्षण करण्यास उपकरणसाध्य नव्हे तर उत्पादनात्मक सामर्थ्याचीच जास्त गरज असते. निर्वीर्य, नि सत्त्व मानव ती इष्ट सिद्धी पावू शकत नाही **सामर्थ्य आणि जीवनसिद्धी नेहमी एकत्र नांदतात खरे ज्ञातेच खरे वीर होऊ शकतात** बाह्य क्षती-बरोबरच आतरिक क्षतीपासूनही जो जीवनतथ्यांचे सरक्षण करू शकतो तोच खरा क्षत्रिय होय शत्रूला तत्त्वत जाणल्याशिवाय शत्रूवर मात करता येत नाही म्हणून **खऱ्या क्षत्रियाला जीवनतथ्याचे आणि मानवी मूल्याचे ज्ञान असणे आवश्यक आहे** जीवनाचे सर्वांगीण परिज्ञान झाल्यामुळे खरा क्षत्रियच लौकिक कल्याणाबरोबर आत्मकल्याणही साधतो केवळ कापाकापी म्हणजे क्षात्रधर्म नव्हे!! भारतीय सस्कृतीमध्ये क्षात्रविद्या व आत्मविद्या प्रसगी एकरूप होतात त्याचा परस्पर सघर्ष कोठेच दिसत नाही उलट त्यामधील सुसगती अप्रतिहत राहिली आहे **श्रीकृष्णानेही गीता** ऐन रणागणावरच सागितलेली आहे!

## विजय आणि जीवनमूल्ये

पृथ्वी जिकण्यामध्ये आणि वैभव अकित करण्यामध्ये रणसंग्रामाला जितके व जसे अवश्यभावी स्थान आहे तितकेच आणि तसेच नव्हे तर त्याहीपेक्षा अधिक अनिवार्य स्थान तमस्वभावी मोहादिक आतर शत्रूना जिकण्यासाठी आध्यात्म-मार्गाला असते कारण विकारादी आतरिक शत्रूमुळे आपल्या जीवनमूल्याना व चेतनाधर्माला जितकी क्षती पोहचते तितकी काही बाह्य शत्रूमुळे पोहोचत नाही बाह्य क्षतीचा परिणाम क्षणिक तरी असतो किंवा सभ्रममूलक तरी असतो म्हणून तिकडे दुर्लक्ष झाले तरीही जीवाच्या गुणाना पोहोचणाऱ्या क्षतीकडे

मात्र काणाडोळा करता येत नाही. विजय हा जीवनतथ्यांना अनुकूल आहे किंवा नाही हे पारखावेच लागते नाहीतर विजय देखील हानीमूलक व अनर्थकारक ठरत असतो

पृथ्वी जिकण्याचा रोख वाह्याकारी असतो तर दोप जिकण्याचा रोख आतरिक असतो पहिल्या सग्रामापेक्षा दुसरा सग्राम अत्यत कठीण आणि दु साध्य असतो तरी पण त्याची सिद्धी एकदा जमली की त्याचा आस्वाद शाश्वत मिळत राहतो. कारण पहिल्या विजयाप्रमाणे हा विजय भ्रममूलक नसतो जैन क्षत्रियांनी या दोन्ही क्षेत्रातील लढाया उत्तम रीतीने जिकल्या अशा क्षतीहीन पराक्रमाची परपरा भ. ऋषभदेवांनी प्रस्थापित व भरतचक्रींनी परिवर्तित केली आहे. क्षात्रधर्माचे खरे लक्षण हेच व असेच आहे आपल्या सस्कृतीमध्ये अशाच शुद्ध क्षात्रधर्माला मोठे स्थान मिळाले आहे भारतातील जैन–अजैन अशा सर्वच प्राचीन ग्रथामध्ये यासवधीची मान्यता अतूटपणे प्रवाहित झालेली आढळते

'सत्वेषु मैत्री' या मत्राचा भग करणे म्हणजे जीवनातील क्षती किंवा हानीला अवसर देणे होय आणि अशा हानीचा प्रतिकार करणे हाच क्षात्रधर्म ! अशा प्रतिकारात हीन झालेल्या मैत्रिभावाची पुन स्थापना करणे हाच मूल उपायसिद्धान्त होय पण अशा आराधनेत जेव्हा गुणविराधकावर शस्त्र उगारण्याशिवाय दुसरा उपायच उरलेला नसतो तेव्हा ते विराधकच शस्त्रांनी नमविण्यास योग्य असे शत्रू होत अनिर्वंध क्षतिप्रवृत्ती म्हणजेच शत्रुत्व ! गुणविराधक प्रवृत्ती नसेल तेथे शत्रुत्वही नसते आणि शस्त्रोपचाराची गरजही नसते केवळ हाती शस्त्र आहे, अगात वळ आहे म्हणून त्याचा स्वच्छद प्रयोग करणे क्षात्रधर्म नव्हे ही वीराणुयोगाची मूळसूत्रेच क्षत्रियातील महापुरुषत्वाची ग्वाही देतात

मात्र शस्त्रास्त्रे ही वाह्य उपकरणे असल्याने वाह्य शत्रूनाच जिकण्यासाठी त्याचा प्रयोग करता येतो व्रत, तप, सयम, अनुप्रेक्षा, ध्यान इत्यादी मार्ग अभ्यतरातील सूक्ष्म विचाराधीन असल्याने त्याचा उपयोग अंतरग शत्रूना जिकण्यासाठी होतो अशा चिंतनशील योगमार्गाने आत्मविजयाची सिद्धी लाभते हा आत्मविजय मिळाल्यावरच अनुयोगशील वीराचा विजय पूर्णत्वाला पोहोचतो पूर्णत्वच महापुरुषाची लक्षणशलाका असल्याने वीराणुयोगाची समाप्ती ध्यानमार्गातच होत असते. म्हणून खरे क्षत्रिय ध्यानमार्गाचा स्वीकार करीत आले आहेत.

अशा वीराणुयोगाच्या साधनेत सतत प्रयत्नशील असल्याने ऋषभपुत्र भरतचक्रीच्या राज्यात क्षोभ, उपासमार, ईती, भीती, उत्पात इत्यादी आपत्तीचा प्रादुर्भाव होत नव्हता. त्या राज्यात कल्याणकारी स्थिती सदैव प्रवर्तत असे हाणामारी, वचनभग, दण्डापत्ती, मनोमालिन्य, ग्लानी अशी दु स्थिती नव्हती.

योगक्षेम सर्वांग परिपूर्ण होता सर्वत्र स्वास्थ्याचे राज्य नांदत होते. पृथ्वीने स्वर्गाशी मैत्री जमविली होती अशा अर्थाचे वर्णन **भरतेशवैभव** (मोक्षविजय, राज्यपालनसंधि ) या ग्रंथात रत्नाकर कवीने सविस्तर केले आहे.

## अष्टगुणी विजय

सौंदर्य, संपत्ती, सामर्थ्य व सत्ता प्राप्त करून घेण्याची क्षमता म्हणजे क्षत्रियता क्षात्रतेजाने झळकणाऱ्या ओजादी आठ ऋद्धीच्या प्राप्तीमध्येच खरा जीवनानंद मिळतो आणि क्षत्रिय मानवतिलक बनतो, नराचा नारायण होतो. निराशा, मनोमालिन्य, ग्लानी यामुळे जीवन अंधारते या अंधारात पापाचे राज्य पसरते त्यामुळे जीवनाचा मार्ग हितसुखाकडून हतसुखाकडे वळतो जीवनाला श्रेयोमार्गाकडे नेण्यास क्षात्रगुण समर्थ असतात म्हणून क्षत्रियाच्या जीवनात आनंदाचा वर्षाव होतो अशा वर्षावाने तो **वृषभमार्गावर** उद्युक्त बनतो हीच ती जीवनातील नित्य वहारणारी कला होय

जीवनातील सारे मांगल्य, सारे सुख, सारे क्षेम प्राप्त करून घेण्याची हिंमत राखतो तो क्षत्रिय जीवनक्रमातील अनिष्टाशी सामना करून तो इष्ट प्राप्तीची उमेद बाळगतो या ऐहिक मांगल्याची, प्रेमाची व श्रेयाची पूर्ती झाल्यावर तो पावन पवित्र अशा मन शांतीची, निरामय अशा परमपदाची अपेक्षा बाळगतो सर्व क्षमता, क्षत्रियता व आपला वीरयोग पणाला लावून आंतरिक परम ऊर्जेच्या बळावर तो परंज्योती बनतो त्या ऊर्जेचा मार्गदर्शक काटा धर्मप्रेरित असतो तो अशा गुणमय ऊर्जेनी संपन्न असतो रिक्तता, शून्यता, दीनता ही सर्व अधर्माची संतती आहे जीवनानंदाच्या सर्व कला व चातुर्य आत्मसात करण्याचे सामर्थ्य याच क्षत्रियानुयोगामुळे प्राप्त होते श्रेष्ठ भोगोपभोगाच्या लब्धीसाठी जीवाची ऊर्जा देखील श्रेष्ठ पातळीवर न्यावी लागते ही उंचावणारी ऊर्जा क्षत्रियामध्येच प्रादुर्भूत होते

**अहिंसा** तत्त्वही त्यानाच कळते की ज्यांना त्या सात्विक ऊर्जेची अनुभूती लाभली आहे व त्यात ज्यांना आनंद मिळतो हिंसेचे, गुणहानीचे आकलन झाल्याशिवाय अहिंसा किंवा गुणानुकूल वृत्ती कशी बाळगता येईल ? **संवेद्यता जागृत झाल्यानंतरच आत्मतत्त्वाच्या शोधाला प्रारंभ होतो. आत्मदर्शन स्वसंवेद्य** आहे त्यासाठी दिग्दर्शकाची गरज नसते जैनांचा वीरयोग अशी पात्रता मिळवून देतो **आंतरिक ऊर्जेचे उन्नयन जेव्हा विषयातीत होते तेव्हाच आत्मसंवेद्यता निर्माण होते** संवेद्यता प्रबळ झाल्यावर उपभोगाशिवायही आत्मिक आनंदाची अनुभूती लाभते वस्तूच्या उपभोगाला कालावधी असते पण अंतरानुभूतीमुळे विषयोपभोगाच्या कित्येक पट आनंद समयागणिक मिळत राहतो. **अशी तरळ**

आनंदानुभूती म्हणजे सुखाचा त्याग नव्हे ! म्हणून जैन क्षत्रियाच्या अंतिम प्रव्रज्येला पलायनवाद म्हणता येत नाही. त्याचे जीवन अधिक उंचावून सामान्याच्या दृष्टिक्षेपाच्या पलीकडे क्षेपावलेले असते एवढेच

## समग्र क्षत्रियता

क्षत्रियता अशा श्रेष्ठतम ऊर्जेनी भारावलेली असल्यामुळे ती केवळ शस्त्रधारी रक्षकाची संस्था नव्हे ! रक्षण हा जीवनाचा एक भाग झाला बाकीचे जीवन क्षत्रियाला नाकारता येत नाही म्हणून जैन क्षत्रियता एक संपूर्ण जीवनाचा अनुयोग आहे इतक्या श्रेष्ठ ऊर्जेचे पुरुष आपला अंतिम आदर्श गाठल्याशिवाय कसे राहतील ? क्षत्रिय संपूर्ण साफल्यानेच मानवतिलक म्हणून पूज्य ठरतात. अशा शलाका पुरुषाचा आचार सर्व दुरिताचा नाश करणारा असतो (महापुराण २/४०)

**भवन्तु सुखिनः सर्वे सत्त्वा इत्येव केवलम् ।**
**यतो यतन्ते तेनैषां यतित्वं सन्निरुच्यते ।।**

— महापुराण, ९/१६६.

जीवमात्र सुखी होवोत याच ऊर्जेने प्रेरित होऊन हे सत्त्वशील क्षत्रिय प्रयत्न करीत असतात या त्यांच्या व्रतपालनामुळे त्यांना यती अशीही एक योग्य संज्ञा प्राप्त झाली आहे धर्माचार हाही जीवनयोगाचा एक अटळ भाग आहे कारण धर्म गुणधारणात्मक असला तरी अपाय नष्ट केल्याशिवाय गुणधारणा होत नाहीच म्हणून जिनसेन आचार्यांनी—

**पश्य धर्मस्य माहात्म्यं योऽपायात्परिरक्षति ।।३५।।**
**स धर्मो विनिपातेभ्यो यस्मात्संधारयेन्नरम् ।।३७।।**

महापुराण, २/३५ व ३७

धर्माचे स्वरूप या शब्दात सांगितले आहे रक्षणधर्माला वाहून घेतलेल्या क्षत्रियाला धर्मापासून दूर कसे राहता येईल ? सर्व प्रकारच्या अपायांपासून रक्षण करून जो अध पातापासून जीवाचा उद्धार करतो तोच धर्म व तोच क्षत्रियही या दोन धारणा व्यंजनत भिन्न वाटल्या तरी हेतुत एकच आहेत या एकरूपतेचे उत्तम उदाहरण म्हणजे तीर्थंकरत्व होय म्हणून सर्वच तीर्थंकर क्षत्रियधुरंधरही होते आणि धर्मधुरधरही होते समग्र क्षत्रियता ही अशी आहे

## शासनाचा गुरुमंत्र

भोगभूमीची अवस्था संपुष्टात येत असताना आदिराज ऋषभांनी सर्वांचा योगक्षेम कुशलतेने चालण्यासाठी षट्कर्मविषयक जो पहिलाच उपदेश केला

त्यातही असिकर्मच अग्रगण्य आहे ती शस्त्रविद्या त्यानी सर्वच प्रजेला शिकविली आणि रक्षणकार्यासाठी त्याची नेमणूक केली (महापुराण, १६/२४३) परतु जेव्हा जीवनोपायासाठी योग्य ते कष्ट न उपसता लोक स्वत च्या गुणाची विराधना करतात व लोकाचाराचे व न्यायमार्गाचे अतिक्रमण करून सर्वांनाच उपद्रव-कारक ठरतात तेव्हा ते विकारानी मातलेले असतात त्याच्यावर दण्डाचा प्रयोग करावाच लागतो दण्डाच्या केवळ भीतीनेच लोक उन्मार्गगामी होत नाहीत आणि राजाला जयसिद्धीचे फळ मिळते (महापु १६/२५३) इतराची सपदा हिसकावणे किंवा त्यासाठी कोणाचातरी नाश करणे हा दण्डसामर्थ्याचा हेतू नव्हे उलट अशी विरावना ज्या मनोविकारातून घडून येते त्या विकाराचा मुकावला करणे हेच क्षात्रकर्तव्य होय म्हणून विकार हेच मूळ शत्रू होत विकारी जीव हा दुय्यम शत्रू होय. यास्तव मूळ शत्रूना जिकणे हाच क्षत्रियानुयोगाचा गाभा होय आणि जैन क्षत्रिय हाच मूळधर्म पाळतात म्हणून त्याचा क्षात्रधर्म व क्षत्रियवृत्ती इतरापेक्षा वेगळी असते आणि तसे असणे आवश्यक ठरते

दण्डाचा उपयोग आणि दण्डाचे सामर्थ्य मोठे असले तरी त्याचा प्रयोग हा आपद्धर्मच आहे, नित्यधर्म नव्हे दण्डप्रसगच उद्भवू न देणे हा मात्र आदर्शधर्म आहे म्हणून केवळ दण्डधारक हा अभीष्ट राजा नव्हे नीतिकोविदानी राज-सस्थेमध्ये दोन प्रकारच्या व्यक्तिमत्त्वाची अपेक्षा केली आहे—

**वदन्तीन्द्र-यमस्थानं राजानं नीतिवेदिनः ।**
**कृतीन्द्रस्तान एवायं दण्डयाभावात् प्रजागुणात् ॥**

— महापुराण, ५५/१०.

राजा इन्द्रधर्मात्मक व यमधर्मात्मक असा उभयधर्मी असावा इन्द्रस्थानीय राजा प्रजेवर अनुग्रह प्रदान करण्यास समर्थ असतो तर यमस्थानीय राजा दुष्टावर दण्डप्रयोग करीत असतो पण राज्यसस्थेची सिद्धी मात्र इन्द्रस्थानात असते. इन्द्रस्थानीय राजाच कृतकृत्य होत असतो कारण त्याची प्रजा गुणानुमार्गी असते दण्डनीय दुष्टाचा त्याच्या राज्यात अभाव असतो म्हणून त्याला दण्डप्रयोगाचा आपद्धर्म अगीकारणे भाग पडत नाही उलट आदर्शधर्मात स्थिरावता येते खरा क्षत्रियानुयोग शरीरबलाच्या पहिल्या थरावरच थावत नाही तेथून तो मनोबल व आत्मबल याकडे प्रगती करतो म्हणूनच वीर्याणुयोग हा संरक्षण, प्रजापालन, दण्डानुशासनादी राजकारणातील गुरुमत्र आहे

प्रजापालनातील अत्यत आवश्यक तत्त्व म्हणजे रक्षाविधी होय आप-पर अस्तित्वाच्या रक्षणासाठीच राज्यसस्थेची प्रतिष्ठा मानलेली असते. सरक्षणाशिवाय आजीविकादी कोणतेही व्यवहार साध्य होत नाहीत सर्वत्र समृद्धता आणि

निरामय जीवनक्रम प्रस्थापित करणे हेच प्रजापालननीतीचे फळ होय असे हेमचंद्र आचार्यांनी—

**धान्यधनैर्जीवधनैः सर्वदा निरुपद्रवैः ।**
**ग्रामाणां संपदं पश्यन् निजनीतिलताफलम् ॥**

— त्रिषष्टि-०, १/३/६०५

या शब्दात सांगितले आहे. राजदण्डाचा व शस्त्रास्त्राचा उपयोग सदैव निरुपद्रवी असला पाहिजे, एखाद्याचा नाश करण्यासाठी नव्हे दण्डाचा दुरुपयोग होऊ नये म्हणून दण्डसंस्था लायक आणि सज्जन पुरुषाच्या हाती सोपवावी लागते. स्वतःची तुंबडी भरणे व उन्मत्तपणे दुसऱ्यांना त्रास देणे टाळावयाचे असेल तर स्वतःच्या जीवनाच्या दृष्टीने जे पूर्ण समर्थ आहेत आणि दीन-दुःखिताचा उद्धार करण्यास जे पात्र व प्रभावी आहेत अशा सज्जनानाच दण्डधारणेचा अधिकार आहे ज्याना स्वतःच्या संरक्षणाची तजवीज करता येत नाही ते दुसऱ्याचा उद्धार कसा करणार? दण्डधारण करण्याची पात्रता सांगत असताना जिनसेन आचार्यांनी—

**लोकस्य कुशलाधाने निरूढं यस्य कौशलम् ।**

— महापुराण, ३१/१००.

असे विधान केले आहे अशा समर्थ महापुरुषानी धारण केलेल्या त्या राजदण्डाचे माहात्म्य आणि परिणाम खालील शब्दात व्यक्त केला आहे—

**दण्डभीत्या हि लोकोऽयमपथं नानुधावति ।**
**युक्तदण्डधरस्तस्मात् पार्थिवः पृथिवीं जयेत् ॥**

— महापुराण, १६/२५३

राजनीती सफल करून प्रजापालनातील सिद्धी गाठण्यासाठी आणि राजाला इन्द्रस्थान प्राप्त होण्यासाठी निरुपद्रवता, संपदा आणि युक्त दण्डन्याय या त्रयींचे तंत्र जमले पाहिजे म्हणजे जयाची उदीरणा होते, अन्यथा नाही

## शासनसंस्थेचा हेतू

जीवनोपायाना हानी पोहोचल्याने प्राणी व्याकूळ होत असतात आणि जीविताचे रक्षण व्हावे म्हणून सामान्य जीव समर्थ क्षत्रियाला शरण जातात अशा शरणागताला त्याच्या जीवनोपायाची खात्री देणे, योग्य ती मदत करणे हे क्षात्रकर्तव्य तत्रासिकर्म सेवायाम् । (महापुराण, १६/१८१) या सेवायोगातूनच शासनसंस्थेचा जन्म झालेला आहे हा इतिहास महापुराणातील सोळाव्या

पर्वामध्ये सविस्तर दिलेला आहे त्यातील मूलसूत्र ध्यानात घेणाऱ्याला क्षात्रधर्माचे मर्म समजणे सोपे जाते महाभारतातील--

**क्षात्रो धर्मो ह्यादिदेवात् प्रवृत्त. पश्चादन्ये शेषभूताश्च धर्माः ।**
— महाभारत, शान्तिपर्व, ६४/२०

या विधानाचीही महापुराणाला साक्ष आहे ब्रह्माण्ड (२/१४) इत्यादी पुराणग्रथातही याच सूत्राची अनुवृत्ती सगतवार सापडते स्वयम्भूस्तोत्रामध्ये आदिराज भ ऋषभदेव आणि त्याची प्रजा याचे परस्पर नाते स्पष्ट करणारी दोन पदे वापरली आहेत त्यावरून ऋषभराजाच्या कल्याणकारी नीतीवर चागला प्रकाश पडतो--

**प्रजापतिर्यः प्रथमं जिजीविषुः शशास कृष्यादिषु कर्मसु प्रजाः ।**
— स्वयभूस्तोत्र, १/२

प्रजा नेहमी जीवितप्रिय असते म्हणून पुत्राप्रमाणे त्याचे परिपालन करणे हे क्षत्रियाचे आद्य कर्तव्य होय जीविताला अनुकूल अशा उपयाची पूर्ती करणे हाच मूळ राजधर्म शिवाय पालनकर्ता शिक्षकही असावा लागतो कारण जीवनोपायाची पूर्ती करताना कृष्यादिक कर्म आणि गणित-लिपी इत्यादी कलाही शिकवाव्या लागतात ऋषभदेवानी तर गीत, वाद्य, अर्थसग्रह इत्यादी प्रौढ कलाही प्रजेला शिकविल्या होत्या (महापुराण, १६/१२०) यावरून क्षत्रिय हा जीवनाला जवळचा मित्र व विकसनाला पात्र असतो हे समजते जिनसेनाचार्यांनी (महापुराण पर्व, ४२), प्रजानुपालनाचा मुद्दा स्पष्ट करताना गवळ्याचे उदाहरण दिले आहे रक्षण, दमन, रोगोपचार, आहार-विहाराची सोय, उपद्रव दूर, करणे वात्सल्यभाव वाळगणे इत्यादी पालकाची सर्व कर्तव्ये स्पष्ट केली आहेत प्रजा अनुयायी तर राजा स्वामी, प्रजा सतुष्ट तर राज्य परिपुष्ट राजा कर्तव्यभ्रष्ट झाला तर शातता भग पावते प्रजा विरक्त झाली तर ती अनुचित मार्गाचा अवलब करते म्हणून त्याच्या योगक्षेमाची हानी न होऊ देणे ही राजाची जबाबदारी आजीविकेची नीच पद्धती व बुद्धिभेद टाळणे ही त्याचीच खबरदारी यासाठी जीवनमार्ग तीर्थानुसारी राखणे आणि सामायिकाचा विचार जागृत ठेवणे आवश्यक असते

## सामनीती

राजाला स्वराष्ट्राबरोबरच उपद्रवकारक अशा परराष्ट्राचाही विचार करावा लागतो आणि जीवनहानीच्या परिहारार्थ, युद्धही अपरिहार्य ठरते मात्र

केवळ हानिप्रद हाणाहाणीला सुरवात करण्याच्या अगोदर श्रेयोमार्गाचा विचार करणे क्षत्रियाचा मानवी धर्म आहे म्हणून सग्रामनीती ही सामपूर्वकच अवलंबावी लागते हितबुद्धी क्षात्रधर्माचा स्यायीभाव आहे. उद्या ज्याना सामर्थ्याने नमवावयाचे त्याना आज सामनीतीने नमविणे ही महायुक्ती होय. हे एक राजांग रहस्य आहे—

**अतो विश्वजनीनार्थं साम तावत्प्रशस्यते ।**

— हरिवंशपुराण, ५०/५४

सर्वांच्या कल्याणासाठी सामनीतीच प्रशस्त आहे या सामनयाच्या वापरासबधी कोऊहलाच्या लीलावई ग्रथातील काही सूचना छान आहेत—

**णय-विक्कमोवहोज्जा सव्वाण वि पत्थिवाण एस मही ।**
**ण उणेक्क-विक्कम-रसा हवंति सिरि-भाइणो पुरिसा ॥१५१॥**

या वसुमतीचा भोग घ्यावयाचा असेल तर सर्वच क्षत्रियाना नीती आणि पराक्रम या दोनही मार्गांचा अवलब केला पाहिजे नीती सोडून केवळ एका पराक्रमालाच वाहून घेतल्याने कोणत्याही पुरुषाला लक्ष्मीचा भागीदार होता येत नाही राज्यरथ एका चाकावर चालत नाही—

**ता साम-णए संते संते पुरिसाण भेय-विण्णाणे ।**
**दाणे वि संपडते को दडे आयरं कुणइ ॥ १५२ ॥**

नीतीचा उपयोग देखील क्रमानुसारी असावा लागतो. साम-नयाचा प्रभाव दिसत असताना भेदनीतीचा अवलव अकारण आहे. भेदानतर दामनीती आणि तीही निष्फळ ठरल्यावरच दण्डनीतीचा अवलव करावा पूर्वनीती प्रभावी असताना उत्तरवर्ती नीती शहाण्याने वापरू नये कारण—

**जइ सो तेणं चिय उयणमेइ ता साह किं पयासेण ।**
**वायाए जो विवज्जइ विसेण किं तस्स दिण्णेण ॥ ११५ ॥**

शत्रू जर केवळ सामनीतीनेच नमत असेल तर दण्डादिकाच्या वापरण्यामधील त्रासाचा व हानीचा मतलव काय ? जो केवळ शब्दाने मरतो त्याला विप का पाजावे ?

### क्षत्रियतेचा स्थायीभाव

कोणत्याही विरोधामध्ये मानव्याचे मत्र प्रभावी ठरत असताना युद्धतत्राच्या प्रयोगामध्ये गुतणे योग्य नव्हे । केवळ सामर्थ्य आहे म्हणून नीतीला आणि

युक्तीला फाटा देऊ नये द्वेषभावाला बळी पड् नये द्वेषामुळे मनातील शाती जळून जाते सपदा स्वाधीन असूनही ती सुख प्रसवू शकत नाही अशा वाझ सपत्तीमुळे मत्सराग्नी अधिकच भडकत जातो आणि सर्वस्वाची होळी पेटते वैराने वैर शमत नाही

**न हि वेरेन वेरानि संमंतीध कुदाचनं ।**

**– धम्मपद, १/५**

हा समजसपणा जीवनरसदायी आहे विवेक सरला की मनात वैरभाव ठाण माडून बसतो. सयमाचे बाध तुटून जातात **शमभाव** शाबूत असला तर सयमाचे बाध पुन्हा साधता येतात पण शमभावाचीच राख करणाऱ्या वैराग्नीला धरबध राहात नाही **आत्मतत्त्वाची ओळख नसणाऱ्यालाच इतर जीव तुच्छ दिसतात** हा असमजसपणा जसा पोसवत जातो तसा वैरभाव दृढावत असतो त्यातून उद्‌भवणाऱ्या सघर्षात खरा नाश होतो तो मानव्याचाच **आत्मतत्त्वाच्या समान गुणामुळेच समता जन्मास येते** समजसपणा, सहिष्णुता, मैत्री, उपकार इत्यादी जीवन-साधक तथ्याचे सगोपन होत राहते. जीवनातील हानी-क्षती सपुष्टात येते क्षात्रधर्माची साधना जमते **हिंसकवृत्ती व आसुरी प्रवृत्ती जिंकणे हाच क्षात्रधर्माचा स्थायीभाव** याच भावनेच्या शीतल छायेत मानवी जीवनाला शाततेची पालवी फुटते समाज सुस्थिर होतो विश्वास, मैत्री इत्यादी मानवी गुण एकत्र नादतात साधेभोळे, निरुपद्रवी, दीनदुर्बल, असहाय, बाल-वृद्ध इत्यादिकाना जीवन सुसह्य वाटेल अशी सामाजिक अवस्था चालू ठेवणे आणि आकस्मिक अघटिताचा परिहार करणे हाच सामर्थ्याचा खरा विनियोग ! अनर्थाचा परिहार हाच अर्थाचा सदुपयोग सघर्ष टाळणे, रोखणे व त्यामागील हिंसक वृत्ती मुळापासून नष्ट करणे हाच क्षत्रियाचा बाणा बलात्कार, मदाधता, सत्तालोलुपता इत्यादी जीवनविघातक बाबीना प्रोत्साहन मिळत राहिले तर जीवनदायी तथ्यावर आघात होत राहतात. अशा वेळी अनुशासनाची दण्डाच्या प्रयोगाची निग्रहणाची गरज भासत असते. म्हणून प्रजेचे पालन व दुष्टाचे निग्रहण हे क्षत्रियाचे कर्तव्य ठरते.

पण या विरुद्ध मार्गाने बळाचा वापर करणे हा अधर्मच ती क्षत्रियता नसून क्षतिप्रियता होय म्हणून मानवी जीवनाच्या सवर्धनासाठी, त्यावरील अतिक्रमणाच्या परिहारासाठी, समाजसस्थाच्या सगोपनासाठी समरप्रसग उद्‌भवला असताना, सामादी मार्ग निरुपयोगी ठरल्यावर लढाई करणे मात्र क्षात्रधर्माची विराधना नव्हे कारण ती लढाई देखील मानवतेची साधनाच असते त्यामुळे शील, सस्कृती, सद्धर्म आणि न्याय अशा श्रेष्ठ गुणाचे आपत्तीपासून रक्षण होते. म्हणून अशी लढाई बाधक नसून साधकच ठरते. अशा वीराणुयोगामुळे शत्रूचा पाडाव करणे, त्याचे गूढ गाडून टाकणे मुळीच अवघड नाही.

## संग्रामतंत्र

'अनागसि प्रहर्तुं न ते शस्त्र. ।' शस्त्राच्या उपयोगासंबंधीचा हा मूलमंत्र सर्वांनाच मान्य आहे म्हणूनच शस्त्र उपसण्याच्या अगोदर प्रत्येकजण, ज्याच्यावर शस्त्र चालवावयाचे असते तो पापी आहे याची खात्री करीत असतो. निदान त्याला पापी ठरविण्याचा प्रयत्न तरी खासच करतो असा प्रयत्न कदाचित चूक असेल किंवा अधुरा असेल पण पाप घडले नसताना स्वच्छंदपणे किंवा केवळ बळ अधिक आहे म्हणून कोणीही शस्त्राघात अगर दुसरा कसलाही प्रहार करण्यास सहसा धजत नाही **अहिंसा देखील अनागसताच होय.** कारण हिंसेलाच पाप, आगस, क्षती किंवा हानी असे संबोधतात पण दुसऱ्याच्या पापाची कल्पना स्वैर नसावी पापाचे स्वरूप नियतच असते स्वैर शत्रुबुद्धीच मुळी पापी असते अहिंसा म्हणजे कोणतेही पाप टाळणे होय घाताच्या संदर्भात वध्याची भूमिका घेणे नव्हे। **अहिंसा केवळ स्वसंरक्षणाचे तंत्र नव्हे तर समाजहिताचा व मानव्याचा सनातन मंत्र आहे**

क्षत्रियाच्या सामर्थ्यवादाचे विवरण करताना प्रहरणाचा अव्हेर मुळीच केलेला नाही पण प्रहरणातील मूलमंत्र जपण्याचा प्रयत्न मात्र प्राणपणाने केलेला आढळतो—

**ण हि कुट्टिओ त्ति सूरो, किं तु पढमं जो ण पहरइ ।**

— कुमारपालप्रतिबोध ३, शीलवतीदृष्टान्त

केवळ हाणामारीवरून कोणीही शूर ठरत नाही तर जो प्रथमत प्रहार करीत नाही तोच शूर होय यास्तव आक्रमण नव्हे तर संरक्षणच सामर्थ्यवादाचे आद्य तत्त्व ठरते अशी श्रद्धा बाळगण्यात जीवनमूल्ये आणि जीवनातील मांगल्ये पुष्ट होतात या तत्त्वाला अनुकूल वर्तन केल्यास सामाजिक जीवन संपन्न व सुखी होते. म्हणून या मानवी श्रद्धाचा आणि आचरणाचा आदर भरतसंस्कृतीने आदिम काळापासून अव्याहत केला आहे

जैनाचारातील विरक्तीचाही अर्थ गैर स्वीकारण्यात काहीच तथ्य नाही विरक्ती म्हणजे पापाची, गुणहानीची, क्षतीची भावना सोडून देणे होय मग ती हानी वैयक्तिक असो किंवा सामाजिक असो, अंतर्गत असो वा बाह्य असो, गुप्त असो वा व्यक्त असो **कोणत्याही प्रकारच्या क्षतीपासून स्वत चे व इतरांचेही संरक्षण करणे हा क्षात्रवृत्तीचा आत्मा होय** म्हणूनच अहिंसा व क्षत्रियता एकत्र असू शकतात एवढेच नव्हे तर त्यांचा **आत्माच मुळी** एक आहे. यास्तव अहिंसेमुळे क्षात्रवृत्ती मंदावते असे म्हणणे ही स्वत.चीच प्रतारणा होय ती केवळ मात्सर्याची

मळमळ, वाचेची वळवळ आणि नाकर्तेपणाचा विरगुळा होय कार्याची तळमळ नव्हे !

आक्रमण देखील हिंसाच आहे तिचे निराकरण करणे, कल्याणकारी व्यवस्था प्रस्थापित करणे म्हणजे अहिंसेचे पालन करणे होय. केवळ क्रौर्यकर्माला पराक्रम किंवा क्षात्रतेज समजणे मोठी भूल होय गुणाची चाड व अवगुणाची चीड व्यक्त करून त्यासाठी झटत असताना काटकपणा व सहनशीलता धारण करण्याची क्षमता असणे म्हणजेच क्षमावृत्ती होय नामर्दपणाने आघात गिळून टाकणे क्षमा नव्हे **क्षमा ही सामर्थ्याची माता आहे** म्हणूनच **क्षमा वीरस्य भूषणम् ।** असे म्हटले आहे शत्रूवर तुटून पडणे, कार्य तडीस नेण्यासाठी तडफ, त्वेष, आवेश, धडाडी बाळगणे आणि **युवराज नेमिनाथांप्रमाणे** चढाई करण्याचे नेतृत्व स्वीकारणे (हरिवंशपुराण, सर्ग ५१) अशा सर्व क्षात्रगुणाचा अंतर्भाव जैन क्षत्रियतेत एकवटलेला आढळतो

**म गांधीजींचा** सत्याग्रह म्हणजे एक महान युद्धतंत्रच होते स्वत नि शस्त्र अवस्थेत असूनही शस्त्रास्त्रधारींना जिंकण्यासाठीच ते अवलंबिले होते त्यात जयही मिळाला केवळ शस्त्राच्या तीक्ष्ण धारेला मानवी बळी देणे म्हणजे युद्ध करणे नव्हे शत्रूंना त्याची शस्त्रे वापरू न देता माघार घेण्यास भाग पाडणे हे केवढे मोठे युद्धतंत्र ! यापरते उपादेय काय आहे ? हे युद्धतंत्र वावगे असते तर शस्त्राचा पुरस्कार करणाऱ्या **वीर सावरकारांनी** नि शस्त्र प्रतीकार करण्यासाठी **भागानगरचा** कार्यक्रम स्वीकारलाच नसता **ब्रह्मदेशातून** केलेल्या भाषणात **नेताजी सुभाषचंद्रांनीही गांधीजींच्या** धोरणाला उघड मान्यता दिलेली आहे प्रसंगानुरूप मार्गानेच **सुग्रीवसेनेला रावण** जिंकता आला या प्रसंगानुरूप मार्गामुळे कुणाचीही क्षात्रवृत्ती हीन ठरत नाही तरी पण अशा प्रकारांना शस्त्रवादी, केवळ निरुपायाने स्वीकारलेले एक युद्धाचे धोरण, असे मानतात व आपद्धर्म म्हणून त्यातील मंत्राकडे दुर्लक्ष करतात ही तत्त्वच्युती होय सनातन तत्त्वे नियत असल्याने त्याचा उपयोग व्यवहाराप्रमाणे निश्चयमार्गातही करता येत असतो **अहिंसा, क्षमा** या तत्त्वाचा उपयोग आत्मविकासाच्या मार्गातही होतो म्हणून काही ती केवळ सन्यासासाठीच असतात असे नव्हे सन्यासमार्गात ज्याचा उपयोग होतो त्याचा व्यवहारात त्यागच करावा असे नाही नाहीतर अमृततुल्यच नव्हे तर लौकिक जीवनातील एकमेव अमृत असे ज्ञानही त्याज्य ठरेल !

## पुरुषव्रत

सर्व क्षत्रिय महान जीवनवादी असतात बाह्य समृद्धी व मानसिक समाधान या दोन्ही अंगाची ते साधना करतात जीवनोपायाची कमतरता आणि अतिरेक

या दोन्हीमुळे जीवनस्वास्थ्य विघडते मानसिक विकार आणि शत्रुत्व भावना वळावतात तेव्हा जीवनातील समतोलपणा साभाळणे कठीण असते. मात्र ते साभाळण्यासाठीच खरे क्षत्रिय सर्व अर्थाने पात्र आणि सर्वच क्षेत्रात समर्थ असतात आणि जीवनातील स्वास्थ्य साभाळण्यासाठीच आपल्या सामर्थ्याचा विचारपूर्वक उपयोग करतात सामर्थ्य असले तरी ते शत्रुभावना वाळगीत नाहीत ते रोगाचा नाश करतात, रोगीजीवाचा नव्हे ! मात्र क्षमता, उदारता इत्यादी मानवी धर्म पाळत असले तरी ते रोगाकडे काणाडोळा करीत नाहीत सग्रामनीतीमध्ये अपाय टाळण्यात ते अत्यन्त दक्ष असतात

**अनपायमयैस्तैस्तैरुपायास्त्रैर्निरंतरम् ।**
**युध्द्वा युध्द्वा विजेतव्यास्तदमी वैरिणो नृभिः ॥**

— त्रिषष्टि० चरित, १/३/८३२.

परतु त्याच वेळी अविवेकी आक्रमकाकडून पराभूतही होत नाहीत दया ही आपण करावी मात्र स्वत दयेची भिक्षा मागू नये पराधीनतेत श्रेष्ठ जीवन जगता येत नाही म्हणून स्वत च्या पुरुषार्थसिद्धीमध्ये सदैव तत्पर असावे–

**जीवितात्तु पराधीनाज्जीवानां मरणं वरम् ॥**

— क्षत्रचूडामणि, १/४०.

कातडी वचावण्याच्या मागे न लागता क्षत्रियाने कीर्तिधनाने समृद्ध होण्याचा प्रयत्न करावा कारण शरीरापेक्षा यशोधन श्रेष्ठ आहे विजयामध्येच जयश्रीचा लाभ होतो ही यश श्रीची लढाईच महान् फळ प्रसवणारी असते–

**कलेवरमिदं त्याज्यम् अर्जनीय यशोधनम् ।**
**जयश्रीर्विजये लभ्या नाल्पोदर्को रणोत्सवः ॥**

— महापुराण, ३५/१४४

**शौण्डीरदोष्णां समरेष्विदं हि पुरुषव्रतम् ॥**

— त्रिषष्टि०, १/५/३३९.

यावरून जैन क्षत्रियानी रणोत्सवासवधी व त्यातील पुरुषव्रतासवधी कोणता दृष्टिकोण वाळगावा याचे स्पष्ट ज्ञान होते मात्र ते स्वत च्या अतुलनीय सामर्थ्याचा उपयोग योग्य कारणासाठी व योग्य ठिकाणीच होईल याची दक्षता पूर्णपणे घेतात आपल्या शस्त्रास्त्राची मर्यादा साभाळून असतात पूर्ण विचारातीच त्याचा उपयोग करतात–

य: शस्त्र-वृत्ति-समरे रिपुः स्यात्
य: कण्टको वै निजमण्डलस्य ।
अस्त्राणि तत्रैव वीराः क्षिपन्ति
न दीन-कानीन-शुभाशयेषु ॥

— यशस्तिलकचम्पू (उत्तरार्ध), आ० ४,
निर्णयसागर (१९०३), पान ९६.

जो शस्त्रसज्ज होऊन रणागणात उभा ठाकला आहे, पायात बोचणाऱ्या काट्याप्रमाणे जो स्वदेशाला त्रासदायक ठरला आहे अशाच शत्रूवर शस्त्र उगारणे हा वीराचा धर्म आहे दीन-दुबळे, असहाय आणि ज्याचा आशय शुभ असतो अशा जीवावर मुळीच नव्हे ।

या ठिकाणी निजमण्डलाची अट फार महत्त्वाची आहे त्यामध्ये दुसऱ्याच्याही स्वातंत्र्याची कदर बाळगलेली आहे प्रत्येक परराष्ट्राच्या बाबतीत शत्रुत्वाची कल्पना केली तर रणागणाला गगनागणही पुरणार नाही आणि जीवनापेक्षा मरणानेच जग व्यापून जाईल ! याच सैद्धान्तिक आधारामुळे जैन क्षत्रियानी परराष्ट्रावर कधी आक्रमण केले नाही जगा आणि जगू द्या हा मन्त्र त्यानी समर्थ असूनही सर्वच क्षेत्रात पाळून दाखविला हा मानवी आदर्श महान नव्हे काय ?

## सतत जागृती

आपण दुसऱ्यासबंधी हितबुद्धी धारण केली तर त्याच्या मनातील शत्रुभाव नष्ट होईलच याची खात्री नाही कारण तो त्याच्या सस्काराचा प्रश्न असतो असे काही परकीय शत्रू जिवत असले तरी त्याच्या सबंधी हीनबुद्धी बाळगू नये आणि आपल्याही हिताला धोका पोहोचू देऊ नये आपण नेहमी सावध राहिले की काम भागते अशी जागृती सपली की नाश ओढवलाच रणोत्सव नसतानाही अशी जागृती सतत धारण करणे एक कठीण व्रत आहे तरी त्या व्रतपालनात आपले शत्रूच न कळत मदत करतात आपण प्रमादी बनताच शत्रूच्या हालचालीने आपल्याला जाग येते म्हणून शत्रूच्या अस्तित्वाचाही आपल्यावर न कळत उपकारच होतो—

**जीवन्तु मे शत्रुगणाः सदैव
येषां प्रयत्नेन निराकुलोऽहम् ।
यदा यदा मां भजते प्रमादः
तदा तदा मां प्रतिबोधयन्ति ॥**

माझे शत्रू नेहमीच जिवत राहोत त्याच्या विरोधी हालचालीमुळेच मी सदैव सावध राहात असल्याने माझे क्षेम–कुशल वर्तते जेव्हा जेव्हा माझ्या ठायी प्रमादी अवस्था निर्माण होत असते तेव्हा तेव्हा ते मला जागृत करीत असतात।

मात्र अशा प्रमादाचा व रणोत्सवातील विलबाचा परिहार करताना हेमचद्रांनी तीव्रपणे कानउघाडणी केली आहे–

**उपेक्षितव्यो न पर· स्वल्पोऽप्यामयवद् यतः ।**
**तदद्यालं विलंबेन यतध्वं तज्जयं प्रति ।।**

– त्रिषष्टि०, १/५/१३

जैन क्षत्रियसस्था सामर्थ्यशाली असून जीवनातील सर्व कलागानी परिपूर्त आहे सामान्य जनता ७२ जीवनकलागापैकी काही थोड्याच कलाचा अगीकार करु शकते आणि त्या बहुतेक सर्व जीविकानुवर्ती असतात तर क्षत्रिय समग्र कलाचे जे दोन सरदार, त्याचेच अधिपती वनतात म्हणून ते कोणत्याही आपत्तीने खचत नाहीत किंवा सपत्तीने उन्मत्त होत नाहीत हा वीरयोगी सग्रामयोगाने कितीही सतप्त झाला तरी तो जळून जात नाही प्रशमभाव हाच त्याचा मूळधर्म असतो वातावरणातील कालुष्यामुळे पाणी कितीही तापले तरी शीतलता हाच त्याचा स्थायीभाव असतो **अशाच प्रशमभावाच्या योगाचाराला वीर्याणुयोग म्हणता येईल !** याच अनुयोगाच्या प्रभावाने जैन क्षत्रिय जगामध्ये अग्रगण्य ठरतात जग क्षत्रियानुसारी असते तर क्षत्रिय श्रेयानुसारी असतो. तो सदा गुणाच्या अधीन राहतो मात्र परबलापुढे हार जात नाही निर्बलावर बळाचा वापर करीत नाही वीराणुयोगाच्या तत्राने तो सर्व सुखी जनामध्ये ज्येष्ठ व श्रेष्ठ ठरतो अशा वैचारिक जीवन-व्यवस्थेचा पाया **नाभिराजानी** घातला त्यावर **आदिराज ऋषभानी** शुभकर जीवनमदिर उभे केले आणि त्याच्या शिखराची पूर्ती केली **भरत-चक्रीने** दण्डशासनाचे जनकत्व, **चक्ररत्नाचे** स्वामित्व आणि **भरतेश-वैभवाचे** भोक्तृत्व अन्वर्थक करून त्याने समाजव्यवस्थेचा आणि ऐहिक सुखाचाही कळस गाठला

## दिव्यत्वाची प्रचीती

हा क्षात्रयोग एक असिधारा व्रत आहे. वळाचा स्वाभिमानासाठी विनियोग हा एक महान विवेक होय हे एका उदाहरणाने स्पष्ट करता येईल चक्रवर्ती **भरताच्याच** कारकीर्दीतील एक घटना–

एकदा **भरतचक्रीचा** सरसेनापती **जयराज** व भरताचा ज्येष्ठ पुत्र **युवराज अर्ककीर्ती** याचा **काशी** देशाची राजकन्या **सुलोचनेच्या** स्वयवराच्या निमित्ताने

परस्परात खटका उडाला सुलोचनेच्या अभिलाषेने अर्ककीर्ती युद्धास उभा ठाकला तिने तर जयराजाला वरले होते अशा वेळी चक्रवर्तीच्या बलाढ्य सेनापतीने आपल्याच युवराजाच्या विशाल सेनेशी लढाई करावी का ? कशी करावी ? यात आत्मनाश किती व स्वाभिमान किती ? हा एक प्रकारे स्वामिद्रोहच ! त्याचा परिणाम स्पष्ट होता एकनिष्ठ सुलोचनेला देऊन टाकणे किंवा स्वामिद्रोह पत्करणे दोन्ही क्षात्रतेजाला घातकच

पुष्कळ क्षत्रिय वीरानी व स्वत काशीराजाने जयराजाचा पक्ष उचलून धरला व लढण्याचा सल्ला दिला सुलोचना आता केवळ एक कन्या नव्हती ती जयराजाची नियोजित वधू होती तिचे दान करता येत नव्हते की दुर्लक्षही करता येत नव्हते तशी दुष्कीर्ती क्षात्रतेजाला स्वीकार्य नव्हती. तेव्हा त्याने मनातून कीर्तीच्या नाशापेक्षा मूर्तीचा (देह) नाश अगीकारला त्याचे मित्रगण तर लढाईला उत्सुक बनले. तेव्हा त्याने मित्र राजाना बटावले की युद्धासाठी तुमची काय गरज आहे ? सामर्थ्याला वाण नाही तुमच्या निष्ठेबद्दल सतोष आहे तुम्हाला यात भाग घ्यावयाचा असेल तर यातून सर्वांचेच हित साधेल असा मार्ग काढा कापाकापीच करावयाची तर मी एकटाही समर्थ आहे युद्धाचे आव्हान स्वीकारून मीही कृतकृत्य होण्याचे ठरविले आहे तेव्हा तुम्हीही हितसाधनेला मदत करा या विवेकाचा परिणाम असा झाला की अशा प्रसगी सर्व सैन्याचा उपयोग सर्वांनी निषिद्ध मानला आणि छलवादाचा प्रयोग करणाऱ्या अर्ककीर्तीच्या सल्लागारालाच गिरफदार करण्यात आले तेव्हा जी हातघाई घडून आली तीत अर्ककीर्तीचा पक्ष हरला

मात्र भरतचक्रीचा विवेक जागृतच होता त्याने जयकुमार सेनापतीला सन्मानाने बोलावून घेतले तेव्हा झाल्या गोष्टीवर प्रकाश पाडताना जयकुमारने म्हटले– 'स्वामिन् ! जर युवराजाच्या सेनेने आम्हाला सर्व बाजूनी वेढले तर प्रतिकार करणे आमचा धर्मच आहे मी स्वामिद्रोह मुळीच केला नाही महाराज! आपणही स्वाभिमानाला जपता व त्याच्या रक्षणासाठीच लोकशासन करता परतु स्वामीच्या सेनेकडूनच सेवकाच्या अभिमानाचा बळी घेण्याचा प्रयत्न झाला तर आमचा सरक्षणकर्ता कोण ? सेवकाची मानखंडना होऊ नये म्हणून स्वामीनीच दक्षता घ्यावयाची असते उलट सेवकाच्या पत्नीचीच अभिलाषा स्वामीनी बाळगली तर धर्म कोठे उरला ? बरे, युद्धातून पळून येऊन राजाजवळ रडगाणे गाणे देखील वीराचा धर्म नव्हे. म्हणून मला लढण्याचा मार्ग अनुसरावा लागला '

क्षत्रियानुयोगाचे कार्य हे असे आहे वीराणुयोग एक दिव्यतीर्थ आहे ! तेथे बाह्याचार पाळण्यापेक्षा गुणानुराधनाच महत्त्वाची असते हा अनुयोग

उपचारातीत आहे किंवा उपचाराधीन आहे याचा निश्चय अक्षरबद्ध करता येत नाही. व्यावहारिक जाणिवांच्या पलीकडे जाऊन इंद्रियातीत संज्ञेनेच तो जाणता येतो. म्हणून येथे अतिशयतेची किंवा दिव्यत्वाची प्रचीती आवश्यक आहे। ही प्रचीती ज्याना लाभत नाही असे निव्वळ शस्त्रधारी क्षत्रिय आपल्या सत्तेमध्ये इतके दंग होतात की ते अविचाराने नाश ओढवून घेतात त्याना तोल सांभाळता येत नाही अखेर ते मानवी कर्तव्याला मुकतात आणि न्याय्य शासनाचे पावन कार्य त्याना निभत नाही

## हेयोपादेय बुद्धी

या भव्य वीराणुयोगाच्या दिव्य तीर्थाला ज्या गुणाच्या प्राणप्रतिष्ठेची गरज असते अशाची आराधना ग्रंथपरंपरेत अखंड आढळते. महापुराणातील ४२ व्या पर्वाचा आणि भरतेशवैभवातील कविवाक्यसंधीचा उल्लेख या ठिकाणी समयोचित वाटतो. त्यातील क्षात्रधर्मानुसारी गुणवर्णन रोचक आहे त्याच प्रणालीतील काही महत्त्वाच्या गुणाचा परिचय देणे प्रसंगोपात्तच ठरेल।

बौद्धिक पावित्र्याचे रक्षण करणे वाटते तितके सोपे नाही विनाशकाले विपरीत बुद्धि.। हा अध पतनाचा तोल मी मी म्हणणाऱ्या महापुरुषानाही ऐन प्रसंगी सांभाळता येत नाही जावी बुद्धी चळते मग समृद्धी पळते। ही अनवस्था नको असेल तर सन्मतीची आराधना सतत केली पाहिजे. विवेकाची कास धरली पाहिजे विवेकाच्या प्रभावानेच विनाश टळून सर्वंकष जयाची सिद्धी तडीस जाते विवेकामुळेच विषयोपभोग, राजयोग, आत्मयोग, रागरसिकता विरागता, शृंगार, तपश्चर्या, सहजीवन, संग्रामसिद्धी व आत्मसिद्धी अशा परस्पर विरोधी भासणाऱ्या सर्व गोष्टी साधता येतात विवेकाच्या प्रभावानेच राजयोग्याचे शारीरिक भोग शरीरापुरतेच मर्यादित राहतात आणि मन मात्र निरासक्त राहते

इहलोकासंबंधी श्रेयाचा आणि समृद्धीचा मूलाधार संपत्ती आहे पण सम्पत्तीचे मूळ धर्मच असल्याने भोगाची प्रणाली मात्र श्रेयस्करच असावी श्रेय सम्यक्त्वावर आधारित असल्याने उत्तम पुरुष सम्यक्त्वमूल धर्माला अंतर देत नसतो धर्माचरणात सावधपणाने वागणे आणि प्रजापालनात हितैषी असणे हे उत्तम कुलोत्पन्न क्षत्रियाचे लक्षण आहे. संग्रामप्रसंगी वेडर तर पापप्रसंगी डरपोक, मिथ्याचाराच्या संदर्भात अज्ञानी, धर्मपालनात अविचल आणि कलासाधनेत रसिक असणे हा राजधर्म आहे अविवेकी भोग हा भोग नसून भवरोग आहे मात्र विवेकपूर्ण भोग घेणारा राजा केवळ भोगी नसून भोगयोगी ठरतो असे निर्मळ जीवन जगणे एक दु साध्य कला आहे पुरुषांच्या ७२ कलामध्ये श्रेयस्कर जीवन-

योग आणि आत्मोद्धार या दोन कला इतर सर्व कलाचे सरदार आहेत या दोन महान कलांमध्ये पटू असल्याशिवाय राजा राजपदावर शोभू शकत नाही

देहानुसारी भोगबुद्धी बाळगल्यानेच आत्म्याकडे दुर्लक्ष होत असते तो देह मात्र आत्म्याचीच पैदास आहे. ती पैदास उत्तम व श्रेष्ठ हवी असेल तर त्या आत्म्याचा व आत्मगुणाचा विचार अटळ आहे शरीरपोषण बंद न करताही त्या आत्म्याचा विचार सदैव करत राहणे हा विवेक साधनेचा उत्तम मार्ग होय अंतरंग विज्ञानच उपादेय असून कल्याणपर आहे **भोगानी शरीर पुष्ट होत असले तरी उत्तम शरीराची प्राप्ती होणे आत्म्याच्या प्रभावावरच अवलबून आहे.** आत्म्याशिवाय शरीराचे अस्तित्व मुतराम् अशक्य आहे म्हणून **आत्मपोषणाशिवाय शरीरपोषणाची अपेक्षा व्यर्थ होय. आत्मपोषणाची विद्याच अमृतमय विद्या होय.** उत्तम विवेकाशिवाय अशा तथ्याचा बोध होणे असंभवनीय आहे मात्र विवेकपूर्ण भोगी भवरोगी न होता शिवयोगी बनतो सकाम भोग आणि निष्काम भोग यातील फरक कळणे विवेकाधीन असते दग्धबीज पेरूनही अंकुरत नाही त्याप्रमाणे दग्धराग भोगी भोगत असूनही त्याचा भवांकुर पालवत नाही नागलोकात निवास करूनही गरुडाला सर्पविषाची भीती शिवत नाही विवेकी भोगयोगाने आत्मज्ञानीचे नुकसान होत नाही **विवेक हा उभयपक्षी कल्याणसाधक आहे.**

भीती सर्वांनाच असते पण त्या संज्ञेला बळी पडून जिकडे तिकडे शत्रुत्वच कल्पणे ही गुणाची विराधना आहे ती केवळ हतबुद्धी आहे, हितबुद्धी नव्हे ! हानी-क्षतीचे मूलस्थान म्हणजे मरण असून त्या मरणावरील जयच सिद्धविजय होय त्याची प्राप्ती हीच खरी संपत्ती आणि मानव्याची सिद्धी होय उडत्या पतंगाचा दोर सांभाळला नाही तर त्या पतंगाची जी दशा होते तीच विवेक सुटल्याने जीवनाची होते संपत्ती, सामर्थ्य व सत्ता यामुळे जो उन्माद चढतो त्यावर विवेक हा एकच उपाय आहे ! ! अशा कल्याणपर जीवनाचे परिपूर्त ज्ञान म्हणजेच खरा आयुर्वेद ! विवेकी जीवनाची प्राणप्रतिष्ठा भरतचक्रीने साधली म्हणून त्याला **आयुर्वेदो नु मूर्तिमान्** (भरतेशवैभव, भोगविजय, कविवाक्यसंधि) असे म्हटले आहे भोगी असूनही योगीपणा सांभाळणे, इंद्रियसुखाबरोबरच आत्मगुणाचा अनुभव चालू ठेवणे हे एक अद्भुत सामर्थ्य आहे ! ते मत्यनुपालनाच्या साधनेशिवाय दुर्लभ आहे.

मत्यनुपालन म्हणजेच हितबुद्धीची साधना हंसक्षीर न्यायाप्रमाणे अहितातून हित वेचून घ्यावे लागते या वेचक बुद्धीलाच विवेक किंवा सन्मती म्हणतात

**मतिर्हिताहितज्ञानमात्रिकामुत्रिकार्थयोः ।**

— महापुराण, ४२/३१

ऐहिक आणि पारलौकिक हिताहितात्मक तथ्याचे यथार्थ ज्ञान म्हणजेच सन्मती अविद्या, सभ्रम, मोह इत्यादी सक्लिष्ट भावस्थितीचा परिहार केल्याने सन्मतीची धारणा होते ही तत्त्ववुद्धी न ढळू देणे म्हणजेच मत्यनुपालन होय. राजयोगाचे यथार्थ ज्ञान झाल्याने ऐहिक तथ्यासवधीचा सभ्रम नष्ट होतो तर अरिहंतप्रणीत धर्माचा वोध झाल्याने ऐहिक आणि पारमार्थिक श्रेयतत्त्वामध्ये वृद्धी स्थिरावते क्षत्रियतीर्थाची स्थापना करणाऱ्या ऋषभनाथांचे अनुकरण केल्याने महान पदाची प्राप्ती होते अशा क्षत्रियश्रेष्ठाची परपरा म्हणजेच आपली आप्त-परपरा सर्व दोषानी रहित व सर्व अतिशय गुणांनी सहित असणे हीच खरी प्रभुता म्हणून आप्तप्रणीत क्षात्रधर्माची इच्छा असणाऱ्यानी हृतसुज्ञानुकारी तुच्छ विचारपरपराचा परिहार करावा ऋषभाशिवाय वेगळी प्रणाली म्हणजे परवंश समजावा आत्महितरहित विचाराचा त्याग करून मत्यनुपालनाची साधना करावी कारण त्यामुळे क्षत्रियामध्ये स्वरक्षणाची व भूमिरक्षणाचीही पात्रता निर्माण होते. आणि त्याचा क्षात्रधर्म अक्षत राहतो. वुद्धिभेद झाला की जीवन पंगू वनते दुसऱ्याच्या मदतीची अपेक्षा निर्माण होते. परन्तु मत्यनुपालन दृढ असेल तर वुद्धीचा स्थाम वाढतो पराक्रम, वीर्य इत्यादी गुण वळावतात व ते स्वयपूर्ण होतात त्यामुळे तो क्षत्रियजगामध्ये अग्रपदी विराजमान होतो.

सुखभावना ही जीवनातील प्रमुख भावना होय. प्रत्यक्ष व्यवहारात आपली सुखे इद्रियानी मर्यादित म्हणजेच परतंत्र व पराधीन आहेत ही पराधीनता अंतरगातच विद्यमान आहे वीर्यगुणही असाच पराधीन वनला आहे. त्यामुळे अनत वीर्याची प्राप्ती होत नाही आपले इतर सर्व गुण व सामर्थ्येही पूर्णपणे प्रगट होण्यात काही अडसर आहे. ज्या शरीराद्वारे हे भोग, गुण व सामर्थ्य अशत प्रगट होतात ते शरीरही वय, वाढ, रोग, अपघात, उपघात इत्यादी आपत्तीच्या अधीन राहून शेवटी शीर्णच होत असते. आपले सुख, गुण, सामर्थ्य इत्यादी सारसर्वस्वच पराधीन आहे, ते स्वाधीन करून घेणे उत्तम पुरुषाचे लक्षण आहे त्या सर्व गुणामध्ये जी हीनता आली आहे ती नष्ट करून त्याची वृद्धी करण्यातच पराक्रमाची सिद्धी आहे सर्व प्रकारची अधीनता नष्ट करून स्वगुणाची पूर्ती करून घेणे म्हणजेच सपूर्ण स्वातत्र्य ! ! या मौलिक विचारापासून परावृत्त न होता जगातील सर्व परंपरा पारखून, आपल्या चैतन्याला हानीकारक मनप्रणाली वुद्धिवळाने जिकून, जो कोणत्याही गुणहानीपासून स्वत चे व दुसऱ्याचेही सरक्षण करतो तो क्षत्रियश्रेष्ठ ठरतो त्याच्या चारही पुरुषार्थांची सिद्धी साध्य होते--

अशेषपुरुषार्थानां निष्ठा परमसिद्धता ।

— महापुराण, ४२/१०७

आपली हीनता टाळण्यासाठी अन्यथा मताचा मोह टाळावा कारण **मतान्तरेषु दौ स्थित्यम्** । (महापु. ४२/१११) यासाठी आपल्या बुद्धीची स्थापना सन्मार्गात करावी

## क्षत्रियतीर्थ

कृतयुगाच्या प्रारंभकाळी पहिली समस्या उपजीविकेच्या सदर्भात निर्माण झाली त्याच अनुषगाने मानवाची मनोवृत्ती विकारयुक्त झाली त्यातून अनेक नवे प्रश्न निर्माण झाले ते सोडविण्याचा मार्ग शोधावा लागला दुर्बलाना सरक्षण देण्याची गरज भासली आदिराज स्वत लोकत्राता बनले आणि त्यानी त्राणक्षम मानवाची एक नवी सस्था स्थापन केली त्या सस्थेचे आधारस्तभ म्हणजेच क्षत्रिय क्षत्रिय हा जातीयवर्ग नव्हे **सर्वोदय तीर्थ प्रवर्तन करण्यास समर्थ अशा तीर्थंकराची उत्पत्ती ज्या रत्नत्रयाच्या प्रभावाने होत असते ते रत्नत्रयच क्षत्रियाच्या उत्पत्तीचे तत्त्व आहे.** म्हणून क्षत्रिय जन्माधिष्ठित नात्याच्या अतीत असतात **नृपास्तस्मादयोनिजा.** । (महापु ४२/१५) ते जमातीला अनुसरून उद्भवणाऱ्या जातीयवादाच्या अतीत असतात त्याच्या या श्रेष्ठ परपरेला अनुलक्षूनच क्षत्रियाना लोकोत्तम पुरुष म्हणतात ते स्वत न्यायमार्गात अविचल राहून दुसऱ्यानाही त्यात स्थिर करण्याचे महान कार्य करतात म्हणूनच त्याना शासक म्हणतात

अशा शासक क्षत्रियाचा वर्ग लोकोत्तर ठरतो जन्म-जातीवर भरवसा न ठेवता ते कार्यानुकूल मानवाची एक स्वतत्र परपरा तयार करीत राहतात. त्याच परंपरेला क्षत्रियकुल म्हणून प्रसिद्धी मिळाली आहे या क्षात्रधर्मी लोकाची कुलपरपरा वशपरपरेने अखड चालू ठेवण्याचा व्यास घेणे म्हणजेच कुलप्रणीत **तीर्थानुपालन** करणे होय हा क्षत्रियवर्ग गुणश्रेष्ठ असल्याने त्यानी न्यूनभाव कधीही धारण करू नये आपल्यावर इतराचा प्रभाव पडू देऊ नये दुसऱ्याच्या मागे जाण्याचा दीनपणा स्वीकारू नये आपल्या सत्त्वाला आणि महत्तेला हानी पोहोचू देऊ नये नाहीतर हीनता प्राप्त होऊन सभोवती अनेक विघ्ने आणि अरिष्टे याची भुतावळ गोळा होते आपल्याच परपरेतील ज्या ज्येष्ठ पुरुषानी रत्नत्रयाची आराधना पूर्ण केलेली असते त्या स्वधर्मीय राजर्षीच्या शिवाय दुसऱ्याला श्रेष्ठ किवा गुरू मानू नये

## आत्मानुपालन

या जन्मातील व पुढील जन्मातीलही भौतिक, आकस्मिक, आतरिक आणि दैवी अशा सर्व प्रकारच्या अपायापासून आपल्या जीवाचे रक्षण करणे याला

आत्मानुपालन म्हणतात. आत्मानुपालन राज्यपालनापेक्षा श्रेष्ठ आहे कारण राज्यपालन-क्षमता ही आत्म्याच्या प्रभावावरच आधारित असते. संपूर्ण जीविताचे आदितत्त्व आत्माच आहे आत्म्याच्या गुणाची हानी करणाऱ्या सर्व अपायाचा परिहार धर्मामुळेच होतो. धर्मश्रद्धेनेच अभीष्ट फलाची प्राप्ती होते धर्मच इह-परलोकी श्रेयस्कर आहे धर्माच्या प्रभावामुळेच आनंदाचा अनुभव मिळतो (महापु ५/१५). म्हणून आत्मानुपालनामध्ये धर्माचारच मुख्य उपाय आहे धर्माचाराच्या परिपूर्ततेसाठी सर्वपथ्यकर अशा तपोमार्गाचाही अवलंब करावा लागतो तपाचे मुख्य लक्षण त्याग आहे. त्यागामुळे यशाचा आणि अभ्युदयाचा लाभ होतो. आणि मनोव्याक्षेप दूर करण्यासाठी ध्यानासारखा दुसरा उपाय विद्यमान नाही म्हणून जो क्षत्रिय आत्मानुपालन मानीत नाही त्याचा अंत दु:खद होतो जो आत्मानुपालनात पटू असतो तो प्रजापालनामध्ये जन्मोजन्मी यशस्वी होतो

## आत्मानुप्रेक्षा

त्यागमार्गाचा प्रत्यक्ष अवलंब करण्यापूर्वी प्रजानुयोगात रत असतानाही आत्मचिंतन सतत जागृत ठेवणे आवश्यक असते हे चिंतन जीवननौकेला मार्गदर्शन करीत असते त्यावरील लक्ष विचलित झाले की जीवन भटकल्याशिवाय राहात नाही म्हणून उत्तम पुरुष या बाबतीत सदैव दक्ष असतात इंद्रदर्शनानंतर एकदा भरतचक्रीने आपल्या दरबारी श्रावकांना म्हटले की तुम्ही सर्वांनी माझ्या घरातच रोज जेवावे आणि मला 'आपण पराभूत आहात' अशी आठवण द्यावी तेव्हापासून–

> **ते परमण्णं भुंजिऊण रायरायं दाहिणहत्थेण समुस्सवेऊण भणंति– जिओ भवं ति। ततो चिंतेइ– मया सागरहिमवंत-गिरिमेरगं निज्जियं भरहं, को मं जिणइ त्ति। पुणो से समतीए विचारेतस्स एवं मणसि भवइ– सच्चं, जिणंति ममं इंदियविसयपसत्तं अणिवारिया राग-दोस त्ति ॥**
>
> **– वसुदेवहिंडी, आरियवेयउपत्ती, पान १८४.**

परमान्न सेवन केल्यावर ते ( दरबारी श्रावक ) आपला उजवा हात ( आशीर्वाद-मुद्रेप्रमाणे ) उचलून राजाधिराज भरतचक्रीला म्हणत असत की 'आपण पराभूत आहात'. त्यावर त्याच्या मनात– 'मी तर सागरापासून हिमवत पर्वतापर्यंत संपूर्ण भरतवर्ष जिंकला आहे ! मग कुणी बरे मला जिंकले आहे' असा विचार तरंगत असे पुन खोलवर चिंतन केल्यावर त्याच्या मनाला पटले की, 'खरेच आहे ! मी इंद्रियविषयामध्ये गुंतलो असल्यामुळे रागद्वेषरूपी आंतर शत्रूंना आवरू शकत नाही त्यांनीच मला जिंकले आहे !!'

हा वीरयोग पाळणारा महापुरुष इतरत्र शलाका पुरुष म्हणूनही प्रख्यात आहे तो तत्कालीन लोकापेक्षा उच्च स्तरावर अधिष्ठित असतो ही उची अशा चिंतनाने तरल झालेल्या सम्यग्दर्शनाच्या माहात्म्यानेच प्राप्त झालेली असते सम्यग्दर्शन धर्माचा प्राण होय त्याचा प्रभाव वस्तूवर, देहावर, बुद्धीवर, मनावर व आत्म्यावरही पडत असतो म्हणूनच सारे चक्रवर्ती राजे बाह्य वैभवाकडून आतर ऋद्धीकडे प्रगती करीत असतात सौंदर्य-सपत्ती-सामर्थ्य-सत्ता या मार्गाने व्यवहारात, विवेक-समता-क्षमता-दया-शाती या मार्गाने अतरगात आणि शीलाचार-श्रद्धा-ज्ञान-सयमादी मार्गाने आध्यात्मामध्ये, अशा सर्व स्तरावर त्याचे व्यक्तिमत्व उचावत जाते! जेव्हा जीवन-प्रवाहात प्रपात तयार होतो तेव्हा कमीत कमी, विद्युत्तेजाची तरी साधना करावी शरीर तर निश्चित शीर्ण होणारच, तेव्हा त्याच्या प्रसगाने सम्यक्त्वाची सिद्धी का करून घेऊ नये! विजेप्रमाणेच त्या सम्यक्त्वाचे अनेक फायदे आहेत त्यामुळे सपदेकडील आपली धाव सपून सपदेची धाव आपल्याकडे वळते

## सम्यग्दर्शन

आध्यात्म म्हणजे जीवनातील जीवतत्त्वाचा शोध. बॅटरी रीचार्ज करण्यासाठी त्यातील अतर्गत तत्त्वाचा शोध घ्यावाच लागतो. आत्म्याच्या गुणाचा शोधही तसाच आवश्यक आहे कारण जीवनातील सर्व भोग जन्म-मरणाच्या अडकित्त्यात सुपारीप्रमाणे सापडला आहे हा प्रयत्न आदिमकालापासून सर्वत्र चालू आहे भावनिक, वैचारिक, आत्मिक आणि क्रियात्मक अशा सर्व क्षेत्रात तो प्रयत्न परिव्याप्त आहे मानवाच्या जीवनातील या अगाचा वस्तुनिष्ठ इतिहास म्हणजेच आध्यात्मशास्त्र होय ध्यान, ज्ञान, दर्शन व आचार अशा प्रमुख सवोवन क्षेत्रात ते शास्त्र हाताळण्यात येत असते सम्यक्त्वाची महती अगाध आहे—

> देवेन्द्रचक्रमहिमानममेयमान
> राजेन्द्रचक्रमवनीन्द्रशिरोऽर्चनीयम् ।
> धर्मेन्द्रचक्रमधरीकृतसर्वलोक
> लब्ध्वा शिवं च जिनभक्तिरुपैति भव्य. ।।

— रत्नकरण्ड०, १/४१.

सम्यक्त्वाच्या प्रभावाने अतुलनीय व महिमाशाली शक्रपदाची, सर्व पृथ्वी-पतीनाही शिरोधार्य अशा चक्रवर्तिपदाची आणि त्रिलोकातील सारसर्वस्वालाही तुच्छ गणणाऱ्या सर्वातिशायी तीर्थंकरपदाची प्राप्ती होऊन मोक्षाचाही लाभ होतो

त्रिभुवनातील सर्व संपदेला विकारण्याची पात्रता जेथे आविष्कृत होते अशा तीर्थंकरांचे क्षात्रतेज कोणत्या अर्थाने कमी असू शकेल? यापरत्वे श्रेष्ठ क्षमता ती कोणती? क्षात्रतेजाचे पूर्णाविष्ठान म्हणजे तीर्थंकरत्व तेच सम्यक्त्वाधीन असल्यामुळे—

न सम्यक्त्वसमं किंचित् त्रैकाल्ये त्रिजगत्यपि ।

– रत्न०, १/३४.

असे म्हटले आहे अशा सम्यक्त्वाच्या महतीनेच महापुरुषत्वाच्या पदाची प्राप्ती होते आणि—

नवनिधिसप्तद्वयरत्नाधीशाः सर्वभूमिपतयश्चक्रम् ।
वर्तयितुं प्रभवन्ति स्पष्टदृशः क्षत्रमौलिशेखरचरणाः ॥

– रत्न०, १/३८

ते ९ निधी, १४ रत्ने याचे आधिपत्य मिळवून स्ववर्षातील निखिल भूमीवर एकछत्री साम्राज्याचे प्रवर्तन करतात आणि सर्व क्षत्रियांना शिरोधार्य बनतात. सर्वप्रभावी सम्यक्त्ववर्माच्या सान्निध्यानेच वैभव प्राप्ती, रक्षण, वृद्धी आणि अनुकूल विनियोग अशी क्षत्रियाची चतुर्धा नीती सफल होत राहते (महापु० ४२/१३-१४) बीजांकुर न्यायाप्रमाणे क्षत्रियाचे सर्व जन्म मंडलाकार बनतात. सम्यग्दर्शन एक स्वयंचलित इष्टचक्र आहे. त्याचा केन्द्रबिंदू आत्मा असून त्याचे गुण आऱ्याप्रमाणे सर्व दिशेने स्फुरायमान होतात आणि ऐहिक वैभव परिघा-प्रमाणे त्याच्या भोवती सतत फिरत राहते प्रव्रज्या-ध्यान मार्गाने या ऐहिक वैभवाचा भेद झाल्यावर त्याचे आत्मगुण सूर्यकिरणाप्रमाणे विश्वभर फैलावतात! हे जाणून जैन क्षत्रिय योग्यवेळी प्रव्रज्या-ध्यान मार्गाचा अंगीकार करतात. तेथेच त्याच्या आत्मानुयोगाची पूर्तता होते.

### संयम–साम्राज्य

सम्यक्त्व म्हणजे आत्मबल. त्याची प्रेरणा मिळाली की तपोयोगातील सर्व साधना सहजतेने साध्य होतात व जीवन आनंदमय होऊन जाते संन्यास म्हणजे आपली आपल्याच स्वतत्त्वरूप आनंदामध्ये स्थापना जगातील सर्व धर्म आनंदाचा स्वीकार करतात. भोगी जीवाला केवळ क्षोभशमनाचा आनंद मिळतो पण तो क्षोभ संपला की आनंदही संपतो. म्हणूनच योगी न संपणाऱ्या आनंदाकडे वळतो तो ज्ञानानंद मिळवितो ज्ञान स्वतत्त्व असल्याने त्याला अंत नसतो ज्ञान म्हणजेच धर्म. जैन क्षत्रियानुयोग ऐहिक भोगाला वंचित नसतो तो जीवाला

चक्रवर्ती पदावर चढवून मगच स्वर्ग-मोक्षाकडे नेतो वीरयोग काही वैभवाचा प्रतिपक्ष नव्हे तो फक्त आनंदानुवर्ती असतो. निरामय आनद मिळविण्याचा प्रयत्न करतो

वृक्षावरील फळ पिकल्यावर वृक्षाचा सपर्क सपतो सपत्तीची सप्राप्ती झाल्यावर तिच्या समाप्तीची वेळ आपोआप येऊन ठेपते ती अशीच ऐहिक गरजाची पूर्ती झाल्यावर जीवनातील समर्थ ऊर्जा देहाकडून धर्माकडे उड्डाण घेते. शारीरिक गरजांची परिपूर्ती क्षत्रिय जास्त समर्थपणे करतो म्हणूनच तो त्या पुढील टप्पा गाठू शकतो. यामुळेच राजघराण्यातील सन्यासीची सख्या फार मोठी आढळते निवृत्तिपूर्व अवस्था प्रवृत्तिमयच असते सपदेची प्राप्ती झाल्याशिवाय कशापासून निवृत्त व्हावयाचे? प्रवृत्तिमार्गात लालसा असल्याने दीनपणे जीव धनाच्या मागे धावतो निवृत्तिमार्गी मात्र सपन्न असल्याने त्याची धनाभिलाषा गळून पडते व तो गुणविकासाकडे वळतो पण धनाभिलाषा सपली नसेल तर मात्र तो उन्मत्त होऊन दुसऱ्याना पीडा देत देत शेवटी स्वत ही धोका खातो म्हणून सर्व प्रतिनारायण, वीर असूनही, अधोगमन करतात

वीराणुयोगाचे खरे फळ आहे ऐश्वर्यसिद्धी! इद्रियानुयोगाने किंवा बलानुयोगाने केवळ बाह्य ऐश्वर्याची सिद्धी होते पण गुणाच्या ऐश्वर्याची सिद्धी मात्र होत नाही. त्यामुळे ऐश्वर्याच्या अपूर्ण साधनेत वीराणुयोगाची पूर्तता नाही ऋद्धी आणि सिद्धी या दोन्हीच्या सप्राप्तीनेच त्याची पूर्तता साध्य होत असते गुणर्द्धीशिवाय धनसिद्धी चेतनाहीन बनते. कोणत्याही आत्मगुणाप्रमाणेच अनंत वीर्याचीही अतिम सिद्धी ध्यानाशिवाय होत नाही दिग्विजयी पराक्रमाने षट्खडाची राज्यप्राप्ती झाली तरी तेवढ्यातच तृप्त न राहता भरतचक्रीने ध्यानयोगाने कर्मविजय साधून नवखण्ड राज्याची ( नव केवल-लब्धीची ) प्राप्ती करून घेतली कारण लोकराज्यापेक्षा संयम-राज्यातच न संपणारा आनंद असतो याचा विवेक भरतामध्ये जागृत होता. भ. ऋषभनाथाचा—

> अमंदानन्दनिस्यन्द निर्वाणप्राप्तिकारणम् ।
> वत्साः संयमराज्यं तद् युज्यते वो विवेकिनाम् ।।
>
> — त्रिषष्टि०, १/३/८४

उपदेश असाच होता तो भरतानेही इतर भावाप्रमाणेच मन पूर्वक अगीकारला यासाठीच क्षात्रविद्येपेक्षा आत्मविद्या श्रेष्ठ आहे!

याच आत्मविद्येची परपरा जैनांच्या क्षात्रयोगाचारामध्ये अक्षुण्ण राहिली आहे. अमृतचद्र आचार्यांनी हेच आत्मनिरीक्षणात्मक चिंतन आपल्या आत्मानुशासनामध्ये पुढील शब्दात व्यक्त केले आहे---

स्वातन्त्र्यं व्रज यासि तीरमचिरान्नो चेद् दुरन्तान्तक- ।
-ग्राहव्यात्तगम्भीरवक्त्रविषमे मध्ये भवाब्धेर्भवेः ॥ ४९ ॥

तू स्वातत्र्याची प्राप्ती करून घे म्हणजे किनाऱ्याला पोहोचशील नाही तर यमरूपी मगरीच्या मुखाप्रमाणे अतिविशाल आणि खोल असलेल्या दु खमय ससारसागरात फसशील---

आस्वाद्याद्य यदुज्झितं विषयिभिर्व्यावृत्तकौतुहलै-
स्तद् भूयोऽप्यविकुत्सयन्नभिलषस्य प्राप्तपूर्वं यथा ।
जन्तो किं तव शान्तिरस्ति न भवान् यावद् दुराशामिमा-
-मंहः संहतिवीरवैरिपृतना-श्रीवैजयन्तीं हरेत् ॥ ५० ॥

— आत्मानुशासनम्, श्लोक ४९ व ५०

हे क्षुद्र प्राण्या! प्रथम भोगाचा आस्वाद मनसोक्त घेऊन कुतुहलता सरल्यावर इतर भोगीजनानी जे फेकून दिले त्याचीच अभिलाषा तू पूर्वीप्रमाणेच पुन्हा नव्यानें बाळगतोस तुला त्याची किळसही येत नाही! जोपर्यंत पापराशी-प्रमाणे दुष्ट अमणाऱ्या या आशारूपी बलवान सेनेची विजयी पताका तू पायदळी तुडवीत नाहीस तोपर्यंत तुला मन शातीची प्राप्ती होईल काय?

अविवेकी मार्गाने जाऊन फजिती करून घेण्यापेक्षा क्षत्रियानी वेळीच सावध व्हावे आपल्या सामर्थ्याचा उपयोग केवळ धनसग्रहासाठीच करू नये. ही धनरक्षणातील फजिती टाळावयाची असेल तर क्षत्रियानी ऋषभाचा उपदेश व भरताची परपरा डोळ्याआड करू नये या सदर्भात क्षत्रियाचे ब्रीद स्पष्ट करताना जिनसेन आचार्यांनी म्हटले आहे---

यशोधनमसंहार्यं क्षत्रपुत्रेण रक्ष्यताम् ।
निखनन्तो निधीन् भूमौ बहवो निधनं गता ॥

— महापुराण, ३५/१३०

जमीन खणून सपत्ती पुरून ठेवणारे पुष्कळ असतात पण (त्या धनाचा उपयोग न होताच) ते नर्वजण (फुकट) मरून जातात म्हणून प्रत्येक क्षत्रिय पुत्राने कुणालाही हरण करता येणार नाही अशा यशोधनाच्या रक्षणासाठी आपले

जीवित वेचावे म्हणजे आदर्श व निरामय अशा क्षात्रतेजाची प्राप्ती व क्षात्रधर्माची पूर्ती झाल्याशिवाय राहणार नाही ऋग्वेदातील शब्दामध्येही क्षत्रियत्वाचा हाच आदर्श आढळेल--

**अर्हन् बिभर्षि सायकानि**
**धन्वार्हन्निष्कं यजतं विश्वरूपम् ।**
**अर्हन्निद दयसे विश्वमम्वं**
**नवाओ जीयो रुद्र त्वदन्यदस्ति ॥**

— ऋग्वेद, २/३३/१०

हे अर्हत् ! आपण धर्मरूपी बाण, सदुपदेशरूपी धनुष्य आणि अनतज्ञानरूपी अलकार धारण करीत आहात आपणास विश्वातील सर्व वस्तूना ग्रहण करण्यास समर्थ अशा केवलज्ञानाची प्राप्ती झाली आहे आपण या ससारातील सर्व जीवमात्राचे पालक आहात ( क्रोधादिक सर्व शत्रू आपणास वचकून आहेत ) आपल्याशी समतुल्य असा दुसरा कोणीही वीर्यवान विद्यमान नाही

**खरा क्षत्रिय हा पूर्णाकार जीवनाचा शिल्पकार असतो त्याच्या त्याग-मार्गातही लोककल्याणाची भावना उत्कट असते** लौकिक व पारलौकिक अशा दोन्ही मार्गांचे तो नियमन करतो त्याचा त्यागमार्ग हा पलायनवादाचा विषय होऊ शकत नाही पलायनवादाचा व वीर्याणुयोगाचा सुतराम् सबध नाही उलट तो **विजयाच्या समाप्तीचा सोहाळा आहे.** लौकिक सुखाच्या अतिम मर्यादा गाठल्यावर अलौकिक सुखाची प्रतिष्ठा करण्यासाठी, त्रिवर्गाच्या पूर्तीनतर अपवर्गाची सिद्धी करण्यासाठी, मानवधर्माच्या परिपूर्णतेसाठी, आपल्यातील सनातन गुणाच्या अभ्युदयासाठी क्षत्रिय तप पूत मार्गाने पुढे सरसावतात म्हणून त्याच्या समवसरणाला **सर्वोदयतीर्थ** अशी ख्याती लाभली आहे

क्षात्रतेजाला शत्रूची उपेक्षा ही चीज अज्ञात असते अतर्बाह्य दोन्ही प्रकारच्या शत्रूचा पूर्ण नि पात केल्यानेच त्याच्या राज्यात सदैव क्षेम वर्तते पराक्रम, भोग आणि त्याग हा क्षत्रियाचा पूर्णाकार आदर्श होय भोग आणि योग यातील परस्पर विरोध टाळणे हाच त्याचा कटाक्ष तो भोगी आणि योगी एकाच वेळी असू शकतो **ही एक सम्यग्दर्शनसाध्य महत्तम साधना आहे** म्हणून क्षात्रधर्म हा एक अनुयोग आहे तो धर्म महावीरानाच साध्य होतो ही साधना **ऋषभाच्या इक्ष्वाकू** वशात इतकी रुळली होती की त्या वशातील सर्वच्या सर्व कन्या प्रव्रज्या घेत असत--

इक्खागाणं वंसे सव्वकण्णा पव्वयंति ।
— वसुदेवहिंडी, पियगुसुदरीलभो, पान-२८८

### भोगानुयोग

जैन धर्माच्या विचारवलयातील मध्यबिंदू आत्मतत्त्व असल्यामुळे त्यांच्या तत्त्वविचाराचे मौलिक अग आत्मचिंतन आहे त्याचे फलित आहे आत्मकल्याण मात्र ते कल्याण स्वार्थमूलक नाही कारण जैनांचे आत्मतत्त्व अशरूप किंवा विभूरूप नसून प्रत्येकी पूर्णतत्त्व-स्वरूप आहे ते सर्वत्र स्वतंत्रपणे ज्ञानरूप असून सर्वाभूती अखड आहे याच तत्त्वविचाराचा प्रवाह जैन क्षत्रियतेतही अनुस्यूत आहे. म्हणून त्या क्षत्रियतेचा आत्माही वेगळा असून तिचा अविष्कारही निराळाच झाला आहे विकार-विवशतेचा अभाव हे एक फार मोठे वैशिष्ट्य त्यातून आविष्कृत झाले आहे जैन क्षत्रियाचा राजभोग आणि इतर जीवनयोग विषयासक्त नाही विषयाचा भोग इंद्रियद्वारे घडत असला तरी त्यानी स्वत च्या आत्म्याला इंद्रियाच्या अधीन किंवा विषयाचा गुलाम होऊ दिला नाही आत्म्याचे इन्द्रत्व व्यजनत व हेतुत शाबूत राखले आहे त्याची कलासक्तीही भोगात्मक नसून निर्लेप आनद-स्वरूपच आहे म्हणून क्षत्रियतेच्या विचारधारेमध्ये कलेच्या हेतूसबधी सदिग्धता निर्माण करणारे वाद-प्रतिवाद जन्मलेच नाहीत निरामय अभयप्रदान, आनद, सुसस्काराची पूर्तता, स्वत च्या आत्मगुणविकासासाठी अशुभाचा परिहार व शुभाचा अगीकार अशा नियत मार्गाने व्यक्तिविकास साधणे अशाच स्वरूपाचा मार्ग त्यानी चोखाळला आहे ‘सरक्षणासाठी आक्रमण किंवा आक्रमण हा सरक्षणाचा उत्तम उपाय’ इत्यादी सभ्रम निर्माण होण्यास वावच दिला नाही.

मानवामधील आहार, निद्रा, भय व मैथुन या प्राणिजात सज्ञा इतराप्रमाणे क्षत्रियामध्ये तीव्रतेने आविष्कृत होत असल्या तरी क्षत्रियत्वाच्या श्रेष्ठत्वापायी त्या सज्ञापूर्तीची मुक्त मुभा देण्याची कल्पना जैनानी कधीही उचलून धरली नाही. त्यामुळे त्याच्या राजविलासानेही सास्कृतिक कक्षा ओलाडल्या नाहीत त्या चार देहाधिष्ठित सज्ञा आत्म्याचे घटक गुण नसल्याने त्यांच्या भोग्यवस्तूचा अतिरेक किंवा त्याची स्वीकारात्मक आराधना क्षत्रियाच्याही भोगक्षेत्रात जैनानी ग्राह्य मानली नाही यामुळेही जैन क्षत्रियता चटकन वेगळी दिसते ससारी जीव जसा केवळ शुद्ध गुण-स्वरूपात विहरू शकत नाही तसा तो पूर्णपणे देहधर्मावीन होणेही इष्ट नाही अगभूत शक्तींच्या आणि प्रेरणाच्या संयोगामुळे क्षात्रवृत्तीचा जन्म होत असतो आणि क्षात्रतेजाच्या कार्यशीलतेच्या दिशेवरच सामाजिक समतेचा मूलाधार अवलंबून असतो म्हणून क्षत्रियाच्या वर्तणुकीचा फार मोठा प्रभाव

इतरावर पडत असतो सामर्थ्याच्या आणि महत्त्वाकाक्षेच्या साधनेतून मिळालेल्या प्रेरणेमुळेच क्षत्रियानी मानवी, दैवी किंवा आकस्मिक अशा सर्व प्रकारच्या क्षती, ईती, भीती इत्यादिकावर मात केली आहे प्रतिकूल निसर्ग अनुकूल करण्याचा प्रयत्न केला आहे. आणि समताधिष्ठित प्रेरणेमुळेच आदर्शवादाची प्रतिष्ठा केली आहे. याच आधाराने सारा समाज उत्तरोत्तर प्रगत व सुसस्कृत होत असतो

देहधारणेसाठी भौतिक वस्तूची गरज सर्वानाच भासते. पण त्या गरजे-इतकीच अभिलाषा, आवड-निवड, अपेक्षा-उपेक्षा इत्यादी भावना क्षत्रियामध्ये तीव्र असतात ते समर्थ असल्यामुळे त्याच्यामध्ये भोगाधिक्याची भावना अधिक जागृत होत असते विवेकाभावी ते भोगप्रधान व विलासी बनतात. हा विलास मानव्याला घातक असल्याने ते रोखण्याचे कार्य जैन जीवनश्रद्धा सहजतेने करते योग्य संस्कारामुळे भोगभावनेचे इतके उदात्तीकरण होते की भोगाचे रूपान्तरण त्यागात होते. म्हणून जैनातील श्रेष्ठ व ज्येष्ठ क्षत्रिय मुनी झालेले आढळतात त्यांची प्रव्रज्या अतृप्ती, तिटकारा, द्वेष, चीड, अप्राप्ती, अपात्रता, निदान अशा दुर्दैवी भावनेतून किंवा घटनेतून उद्भवलेली नसते तर केवळ शुभकर सवेगाच्या आवेगातून हा वेग प्राप्त झालेला असतो

सक्षम अशा क्षत्रियानाही शाश्वत ज्ञानाची व सुखाची अपेक्षा असल्यास नवल काय ?

**ण य कुसलकम्मकज्जुज्जमं विणा होंति जीवलोयम्मि ।**
**सोक्खाइ हियर्याचतियमणोरहुप्पाइयासाइं ॥ १११ ॥ .**

**इय एवं हियए भाविऊण सव्वेण जीवलोयम्मि ।**
**कायव्वो सोक्खं मग्गिरेण धम्मुज्जमो पढमं ॥ ११६ ॥**

— चउपण्णमहापुरिसचरियं, ५३
पाससामिचरिय, १११ व ११६.

**धर्मो हि मूलं सर्वासां धनर्द्धिसुखसंपदाम् ।**

— महापु०, २/३३.

'जीवाचे कुशल कार्य करण्याचा उद्यम अगीकारल्याशिवाय मानसिक विचारामध्ये उत्पन्न झालेल्या मनोरथाची पूर्ती करणाऱ्या सुखाची प्राप्ती होते असे या जगात आढळत नाही हा विचार लक्षात घेऊन सुखाची अपेक्षा असणाऱ्या सर्व जीवानी धर्माचाराला प्रथम स्थान द्यावे ' सर्व प्रकारच्या सपदा, सुख आणि धनातिशय याचा मूलाधार धर्मच आहे **या दृष्टीने धर्माचार देखील क्षत्रियाचा प्रधान जीवनमार्ग ठरतो.**

**भोग आणि त्याग या दोहोंची परिसीमा गाठण्यास वीराणुयोग समर्थ असतो.** तो ऐहिक जीवनाची वा सुखाची उपेक्षा मुळीच करीत नाही श्रेयाचा मार्ग प्रेयाच्या परिसरातूनच पुढे जातो हे जैनाना पूर्णत सम्मत आहे सम्यक्त्वच उत्तम श्रेय आहे त्या **सम्यक्त्वामुळे पूर्ण सिद्धी मिळेपर्यंत सर्व उत्तमोत्तम प्रेयांची प्राप्ती** होत राहते भरतसंस्कृतीच्या संदर्भात ऐहिक-पारलौकिकवाद निरर्थक ठरतो प्रवृत्ति निवृत्तिपर विवादालाही येथे स्थान नाही यातील कोणताही एक मार्ग हा खरा भरतमार्ग नव्हे भरतचक्रीची जीवनचंद्रिका समग्र कलानी सालकृत होती असमर्थांच्या पराधीन त्यागामध्ये क्लेश संभवत असले तरी भरताचा त्याग शातिप्रद होता त्याचा आत्मा, त्याग व भोग यापैकी एकामध्येच गुरफटून राहिला नाही तो अतीत होता सामान्य पदार्थ जळाल्यावर राख निर्माण होत असली तरी कापूर जळाल्यावर मात्र ती निर्माण होत नाही!

## कल्याणभोग

हतबुद्धीचा नाश करून हितबुद्धीच्या प्रेरणेने राजयोग आणि कल्याणभोग याचा सुरेख संगम साधणे म्हणजेच वीराणुयोगाची सगुणमूर्ती साकार करणे होय **भोग आणि योग हे या वीराणुयोगाचे दोन किनारे आहेत.** आणि उत्तम वीर हा भोग किनाऱ्याकडून योग किनाऱ्याकडे मार्ग आक्रमित असतो तो भोगतटावरील गढूळपणात स्तंभित होत नाही किंवा मध्यतरीच प्रवाह पतित होऊन वाहवला जात नाही स्वत च्या कौशल्याने योगकिनारा गाठून आपल्या उद्धाराचा मार्ग सिद्धीस नेतो हाच पूर्ण क्षत्रियानुयोग होय (१) तरुणींच्या हास्यलहरीत हेलावत असताना आध्यात्मतरगाचा आस्वाद घेणे, (२) विषयवासना विलसत असतानाही विवेकभ्रष्ट न होणे, (३) राजतत्राच भाग घेऊनही आत्मतत्राला बाधा न आणणे आणि (४) हतबुद्धीला लगाम घालून हितबुद्धी जागृत ठेवणे **हा वीरयोगाचा चतुरस्रपणा होय** अशा बहुरगी विवेकाच्या प्रभावामुळे फद-फितुरी, छलवाद, कपट-कूट, वचनभग, प्रणभग, गायाचार, विद्रोह इत्यादी अनिष्टाचाराना वाव मिळत नाही भोगयोगामध्ये रत राहूनही जे मोक्षयोगाची आराधना करू शकतात त्याच्याशी बरोबरी कोण करू शकेल ? **हितसुख नेहमीच सर्वानुभागी असते. तर हतसुख दुसऱ्याच्या दु.खावर आधारित असते.** दिवा दुसऱ्यालाही प्रकाशदान करतो व स्वत.ही प्रकाशमान असतो असेच हितसुख सर्वगत असते. **वीराणुयोग स्वसुखाला व परसुखालाही पोषक असतो.**

जैन क्षत्रिय पृथ्वीचे अधिपती असले तरी त्याची क्षात्रवृत्ती निव्वळ पार्थिव नसते ती हिंसेचा परिहार करीत असल्याने कल्याणवादी असते अविकारी असल्याने गुणाचे प्रतीक असते. आत्मगुणाशिवाय दुसऱ्या कशाचीही साधना

जैनाना उपादेय नसते गुणसाधनेची परिपूर्णता व परमावस्था हेच त्याचे अतिम साध्य म्हणूनच जैन क्षत्रियता धर्मांगी किंवा तदनुरूप प्रेरणेशी मोठ्या प्रमाणात निगडित असते क्षात्रवृत्तीची वाढही धर्माच्या परिसरातच झाली असून तेथेच तिचा परिपोषही झालेला दिसतो जैन क्षत्रियाच्या मनात कल्याणमय भावना अकुरत असल्याने त्याच्या मनात भौतिकवादापेक्षा उच्च अशी काही निराळीच चीज वहरलेली असते। त्यामुळे क्षात्रवृत्ती दिव्यत्वाने भारावून जाते. **भौतिक जीवनाचे उदात्तीकरण हा जैन संस्कृतीचा उद्देश आहे** सर्व प्रकारच्या अतर्बाह्य क्षतीपासून सरक्षण हीच त्या प्रक्रियेतील स्थायी प्रेरणा आहे या उदात्तीकरणाला दृश्यरूप देत असताना **जैनानी शलाका पुरुषत्वाचा कळस गाठला आहे.** त्यानी जगाला दिलेली ही क्षात्रतेजाची उदात्त देणगी महत्तम आहे जैनाना ऐहिक प्रकर्षाची अभिलाषा नसते या आरोपाचा परिहार करण्यास जैन शलाका पुरुषाचा जीवनक्रम सर्वस्वी समर्थ आहे त्यानी हस्तगत केलेला **भरतेश वैभवाचा कळस सर्वोच्च आहे.**

## समाजानुयोग

सामर्थ्य, सदाचार, सयम अशा मानवी गुणावरच वीराणुयोग आधारलेला असतो अशा वीराणुयोगाच्या भावनेने समाजाचा योगक्षेम साध्य होऊन त्यात मागल्याची प्रतिष्ठा करता येते समाजप्रिय मानवाला सहप्रवृत्ती पोषक असतात सहप्रवृत्तीच्या साधनेसाठी सहभोगही विकसित करणे आवश्यक आहे स्वास्थ्य आणि समर्थ सहकारी वृत्ती पोसवण्यासाठी सहिष्णुतेचा अगीकारही तितकाच महत्त्वाचा आहे या सर्व समाजानुकूल गुणामध्ये जो अधिक कार्यशील असतो तो समाजाचा नेता बनतो त्याला वीराणुयोग साधतो म्हणून **वीराणुयोग म्हणजे** सहयोगाचे एक उत्तम उदाहरण होय महापुराणामध्ये अशा सहयोगाची कक्षा पुढील शब्दात व्यक्त केली आहे——

**स्वदुःखे निर्घृणारंभाः परदुःखेषु दुःखिताः ।**
**निर्व्यपेक्षं परार्थेषु बद्धकक्ष्या मुमुक्षवः ॥**

— महापुराण, ९/१६४

जैन क्षत्रिय मोक्षार्थी असूनही स्वत च्या दु खाचे निवारण करण्यामध्ये निष्ठुर राहणे, मात्र त्याचवेळी दुसऱ्याच्या दु खाशी एकरूप होऊन व्यथित होणे आणि परोपकारामध्ये निरपेक्ष वृद्धी बाळगणे यासाठीही कंबर कसून तयार राहतात समाजाच्या सुस्थितीमध्ये अर्थविकासालाही महत्त्वाचे स्थान आहे. प्रेमपूर्ण समाजाच्या घडणीमध्ये समृद्धीलाही फार महत्त्व आहे कारण जीवनानुकूल पदार्थांच्या समृद्धीशिवाय इच्छातृप्तीचा आणि सुखभावनेचा अनुभव येत नाही

आणि अशा समृद्धिपूर्ण सुखी जीवनाशिवाय प्रेमळ व्यवहार संपन्न होत नाहीत. जिनसेनाचार्यांनी—

**इष्टार्थसंपत्तितः कामसुखोदयः । स च संप्रीतये ॥**

— महापुराण, ५/१५.

असा स्पष्ट उल्लेख केला आहे. अशा समृद्ध, सुखी आणि प्रेमळ समाज-जीवनाची शिल्पकारी समर्थ क्षत्रियाना करावी लागते

**प्रजानां प्रीणनम् ।**

— महापुराण, ३/६८.

प्रजेला समाधानी आणि अनुरक्त ठेवणे क्षत्रियाचे आद्य कर्तव्य असते अशी अनुरक्त आणि संतुष्ट प्रजाच प्रेमळ जीवन जगू शकते

**प्रजाः सुप्रजसः ।**

— महापुराण, ३/१६८.

परस्पर प्रेमाचा व्यवहार करणे हाच सहजीवनाचा आणि सामाजिकतेचा पाया आहे

## समंजसपणा

सामाजिक आयुष्यामध्ये समंजसपणालाही मोठे मूल्य आहे जीवनातील भिन्न भिन्न दृष्टिकोण आणि विरोधी मतेही लीलया पेलण्याची पात्रता असावी लागते सामाजिक शांततेचा तुलादण्ड समतोल राखण्याचे कार्य समंजसपणाशिवाय अशक्यप्राय आहे असा प्रयत्न जैन संस्कृतीने जितका केलेला आहे तितका इतरत्र आढळत नाही समाजातील, राष्ट्रातील किंवा मानवी जगातील सहजीवनाचा तोल योग्य रीतीने सांभाळण्यासाठी निर्माण झालेल्या विचारमंथनातून परिग्रहपरिमाण, भूतमात्रावरील मैत्रिभाव, परस्पर सन्मान व सहयोग इत्यादी आचारविषयक आणि बुद्धिजीवी वर्गामधील बौद्धिक समतोल सांभाळून बुद्धिभेदाचा प्रसंग टाळण्यासाठी नयवाद, अनेकान्त, स्याद्वाद इत्यादी तत्त्वविचारात्मक रत्नांची बहुमोल देणगी जैनाकडूनच जगाला मिळाली आहे

बळाचा किंवा दण्डनाचा अतिरेकी उपयोग टाळण्यासाठी व उचित उपयोगाचेही नियमन करण्यासाठी प्रत्येक घटनेचा विचार देश-काल-द्रव्य-भाव या चार तथ्यांच्या अनुरोधाने परिस्थितिपरत्वे करण्याचा सर्वांग परिपूर्ण मार्ग जैन विचारसरणीने स्पष्ट दाखविला आहे दुष्टानुशासन व शिष्टानुपालन यातील

मूलमंत्र म्हणजे समंजसपणा होय मैत्री, प्रमोद, कारुण्य व अलिप्तता यातील तोल साभाळणे कठीण वाटले तरी क्षत्रियाने ते व्रत अगीकारले पाहिजे समजसपणा-मुळेच समता पोसवते व न्यायमार्गाचा बोध होतो दण्डाचा दुरुपयोग टाळता येतो. भरतचक्रीने ज्या ऋषभप्रणीत मार्गामध्ये प्रजेला स्थैर्याचा लाभ करून दिला त्या सर्वोदयतीर्थात जे रत असतात ते शिष्ट होत त्याची विराधना करणारे दुष्ट मात्र दण्डनीय ठरतात

समाज-जीवनामध्ये समजसपणा खोलवर रुजविण्यासाठी व सघर्ष टाळण्या-साठी निर्विकार क्षत्रियतेची जोपासना उपकारक ठरलेली आढळते सास्कृतिक सहकारातील ही देणगी म्हणजे मानवी जीवनमदिराच्या शिखरावरील कळसाची परिपूर्ती होय. मानवता सर्वत्र समानच असल्याने जैनानी आपली क्षात्रवृत्ती मानव्याच्या आराधनेसाठीच राबविली. उग्र, भोग, राजन्य व नाग या सर्व वर्गातील क्षत्रियता एकच या समताभावाच्या भक्कम आधारामुळे त्याच्यामध्ये कधी अतर्गत वर्गकलह माजला नाही कधी कुणाच्या राष्ट्रीयत्वाची हानी झाली नाही केव्हाही कुठल्याही प्रकारच्या मानवी हत्याकाण्डाला वाव मिळू शकला नाही मानव्याच्या विकासाच्या दृष्टीने अशा क्षत्रियतेची साधना आजही उपयुक्तच आहे

## समतानुयोग

स्वत च्या सामर्थ्यावर खूप होऊन मानसिक तृप्तीचा आस्वाद घेणे ठीक असले तरी इतराना कमी लेखणे मात्र शहाणपणाही नव्हे की क्षत्रियताही नव्हे वस्तुत सर्व जीव चेतनाधर्मीच आहेत स्वरूपात्मक तथ्ये एकसारखीच आहेत क्षत्रियादिक सज्ञा कर्तव्यानुसारी असून त्या फक्त क्षमतेच्या अविष्कारापुरत्या मर्यादित असतात जीवतत्त्व काही क्षत्रिय वा अक्षत्रिय असे वेगवेगळे नसते ! आपल्या चातुर्याने समताभावाची प्रतिष्ठा राखणे हाच क्षात्रधर्म होय सपत्ती, सामर्थ्य आणि सत्ता याद्वारे उन्मत्त होणे हा राजकीय गुडगिरीचा मार्ग आहे त्या उन्मत्ततेचा अवलब ही हतबुद्धी होय उलट त्या त्रयीच्या सिद्धीने हतसुखाचे हनन करून हितसुखाचा आस्वाद घेत घेत विवेकाच्या प्रभावाने भोगविजय मिळविणे हाच वीराणुयोगाचा नियत मार्ग होय. अशा विवेकाला धर्मयोग स्वय साध्य होतो.

समताभाव निर्माण होण्यासाठी सबधित तथ्यात समान गुण असणे आवश्यक आहे. समान अशा सर्व जीवाच्या जीवनाचा विचार समानतेने करीत राहिल्याने समभावाची साधना प्रगत होते या समभावाच्या प्रकृष्ट अवस्थेमध्ये तर आत्म-योगातही रत होता येते म्हणून सामायिकाला श्रावक आणि साधू या दोघाच्याही साधनेमध्ये उच्च दर्जाचे स्थान आहे आत्मयोग्याला पुण्यास्रवाचीही पर्वा नसते त्या अतिशयपूर्ण अवस्थेमध्ये साधक पापपुण्याकडे समदृष्टीने पाहू शकतो दोन्हीही

बंधालाच कारण असल्याने तो त्यापलीकडील स्वस्थानी पोहोचतो संपूर्ण समभाव हा निश्चय मार्ग असून त्याचे स्वरूप तत्त्वमय असते म्हणून **'यादृशी भावना यस्य सिद्धिर्भवति तादृशी ।'** असे म्हणतात

जैनांची धर्माराधना ही समतेची साधना आहे. **समभाव-समदृष्टी ही जैन संस्कृतीचे मूलतत्त्व होय.** क्षत्रियानुयोगाचा आत्माही हाच वैयक्तिक, सामाजिक किंवा आकस्मिक घटनेमुळे ही जीवनातील समता जर ढळत असली तर ती सावरणे, तसा प्रामाणिक प्रयत्न करणे हा क्षत्रियाचा बाणा होय. जीवनातील कोणत्याही प्रकारची **विषमता दूर करण्यासाठीच मोठी क्षमता लागते** त्या दृष्टीने पात्रता असल्यामुळेच क्षत्रियाने स्वत ला त्या कार्यासाठी वाहून घेतलेले असते दोन्ही पारड्या समतोल असणे हा तराजूचा स्वाभाविक धर्म होय. काही कारणामुळे तो तोल ढळला तर सच्चा तुलारी पासग वापरून समतोलपणा पुन साधतो. त्याप्रमाणे खरा क्षत्रिय जीवनातील समतोलपणा ढळला असताना आपल्या सामर्थ्याचे पासग वापरून समतेचा तोल सावरतो व विषमतेचा आविष्कार टाळतो

जगाचा व्यवहार फार विचित्र असतो आपल्या मतलबाला अनुसरून लोक वस्तुस्थितीकडे दुर्लक्ष करतात व द्रोह, द्वेष, मत्सर, क्षोभ, सक्लेश अशा मानवता-विरोधी भावनाना बळी पडतात मैत्रिभावाला ओहोटी लागल्यामुळे विश्वामध्ये अशातता निर्माण होत राहते (१) अप्रियवृत्तीमुळे व्यक्ती - व्यक्तीमध्ये, (२) एकागी विचारसरणीमुळे सप्रदायासप्रदायामध्ये, (३) जीवनोपयोगी सामग्रीच्या व्यक्तिगत सचयामुळे समाजसंघटनेमध्ये, (४) हटवादीपणामुळे परस्पर सभापणपद्धतीमध्ये, अशा अनेक मार्गांनी मानवी जीवनामधील समता ढळते आणि विषमतेचा आविष्कार होतो अशावेळी मैत्रिभावाला व शातवृत्तीला पोषक अशा समतेच्या आराधनेशिवाय दुसरा उपाय साध्य होत नसतो. म्हणून समतायोग **हा क्षात्रवृत्तीचा पाया आहे** तात्पुरती ढळलेली समता पुन्हा स्थिरावणे मानवी शक्तीच्या बाहेर नसते. मात्र परिस्थिती आवाक्यात ठेवण्यासाठी **वैचारिक समता दृढ असली पाहिजे.** मनात समता नादत नसेल तर बाह्य प्रयत्न भोगळ ठरतात. कोमलता, मृदुता, ऋजुता, शुचिता, समजसता, निर्लोभता, कार्यप्रेरणा ही मानसिक समतेची बाह्य लक्षणे होत. समता काही भौतिक तथ्य नव्हे ती एक जीवन-भावना आहे, शांतरसाची प्रतीती आहे. त्यामुळे निष्ठुरता, द्वेष, वैरभाव इत्यादी जीवनातील विखार नष्ट होतो **सच्चा वीरयोगी पराजिताचाही परम हितैषी असू शकतो.** अशा हितवुद्धीमुळेच वधुभाव निर्माण होतो केवळ विराधनाच दडनीय असते. **ही अमृतसम समता जैन संस्कृतीचा आत्मा आहे. म्हणून क्षात्रवृत्तीचाही आत्मा समताच आहे.**

## आत्मौपम्य दृष्टी

अहिंसा आणि वीरता या प्रेरक चाकावर धावणारा समतारूपी रथच जीवनातील इष्ट नध्याना योग्य स्थळी पोहोचवितो समतेशिवाय सपूर्ण जीवनक्रिया निष्प्राण ककालाप्रमाणे केवळ स्मशानाकडे गमन करील ! जीवनामध्ये समता साकार करण्यासाठीच झटत राहणे हे क्षत्रियाचे वाण होय. अहिंसेची पहिली पायरी आहे निर्भयता स्वत च्या जीविताची ज्याला भीती वाटत असते तोच कमजोर असतो भीतीच्या पोटीच दुसऱ्याचा विघात करून आपला बचाव होतो का हे ताडून पाहण्यातच तो स्वत. चितेच्या दाढेखाली भरडला जातो त्याच्या मनातील विभीषिका त्याला भयभीत करते ही भीती देखील स्वतःची हिंसाच होय. दुसऱ्याचा घात करून स्वत चा घात टाळण्याचा मार्ग शोधणे म्हणजे आत्मघातकी विचार नव्हे असे मानणे कोणत्या तर्कशास्त्रात बसते ? एकदा 'जगण्यासाठी मारा' हा उपदेश दृढपणे अगीकारल्यावर उपदेशकर्त्याला मारू नये याला कोणताही आधार उरत नाही

जीवन सर्वांनाच हवे असते व दु ख कोणालाही नको असते म्हणून समता आणि अहिंसा या जोड रूळावरूनच जीवनरथ गतिमान केला पाहिजे त्यामुळे भीतीचे कारणच उरत नाही कुठलाही प्राणी एकतर्फी क्रूर वा शत्रू नसतो क्रूरता व शत्रुता या भावना परस्पर उभय पक्षाशी निगडित असतात. भीती नसेल तर दुसऱ्याला क्रूर म्हणण्याचे कारण काय ? भयापाठोपाठ लालूच जन्मते आणि दोन्हीच्या अविष्कारामुळे मैत्रिभाव नष्ट होतो मग त्यापुढील सर्व पापे सभवतात म्हणून मूलतः कोणालाही शत्रू मानू नये.- मात्र आघाताच्या निवारणार्थ व सरक्षणासाठी वीरतेची उपासना करावी हा जीवनाचा शुद्ध आणि शाश्वत मार्ग होय क्षत्रिय याच मार्गावरील आदर्श पाईक असतो त्याच्यासाठी एकमेव प्रेरणासूत्र म्हणजे—

**जं इच्छसि अप्पणतो, जं च ण इच्छसि अप्पणतो ।**
**तं इच्छ परस्स वि एत्तियग्गं जिणसासणयं ॥**

— बृहत्कल्पभाष्य, ४५८४

ही आत्मौपम्य दृष्टी जो बाळगतो त्याला

**सव्वे पाणा, सव्वे भूया, सव्वे जीवा, सव्वे सत्ता न हंतव्वा, न अज्जावेयव्वा, न परिघितव्वा, न परियावेयव्वा, न उवद्दवेयव्वा, एस धम्मे सुद्धे नियए सासए . ॥**

— आचारागसूत्र, १/१२७.

हे मार्गदर्शन, हा उपदेश ग्राह्य वाटल्याशिवाय राहाणार नाही. कारण त्याला भक्कम असा तत्त्वाधार आहे विश्वातील सर्व जीव समान आहेत कारण त्यांच्यातील द्रव्यत्व एक आहे—

**एगे आया ।**

— ठाणंग, १/१.

भगवद्गीतेतही (अ० ६, श्लोक ३२) हीच आत्मौपम्य दृष्टी प्रशंसनीय मानली आहे हा समतायोगच क्षत्रियाची आत्मसाधना होय. आपणा सर्वांच्या जीवनातील साधनेचा मार्गही तोच होय जैनागमामधील—

**अत्तसमे मण्णिज्ज छप्पिकाए ।**

— दसवेयालियं, १०/५

या सूत्रामध्ये विश्वातील सहाही प्रकारच्या समग्र जीवमात्राना आपल्याच जीवात्म्याप्रमाणे लेखावे असा उपदेश दिला आहे

केवळ आजीविकेच्या प्रकारांतरामुळे व्यवहारात मानवसमुहाचे निरनिराळे वर्ग पडत असले तरी अखिल मानवजात तत्त्वत एकच आहे

**मनुष्यजातिरेकैव ।**

— महापुराण, ३८/४५

इतकेच काय जन्माला आलेला प्रत्येक जीव हा आपल्या जीवासमान मानावा

**आयतुले पयासु ।**

— सूयगडग, १/१०/३

या पदामध्येही जीवनाचा हाच दृष्टिकोण स्पष्ट केला आहे हा जीवनक्रम अगीकारणे नावळाचे काम नव्हे त्यासाठी महान वीरत्वाची गरज आहे वीरता ही आत्म्याची, आत्मतत्त्वाचीच विराट साधना आहे. सागराच्या साधनेमध्ये विश्वातील सर्व प्रवाहाना समावून घेण्याची शक्ती आविर्भूत झालेली असते वीरतेच्या विराट दृष्टिकोणामध्येही विश्वातील सर्व जीव सागरातील जलतत्त्वाप्रमाणे एकरूपतेने समाविष्ट होतात महापुराणातील **प्रजा सुप्रजसः ।** (३/१२८) आणि **प्रजानां हितकृत् ।** (३/२०६) इत्यादी पदामध्येही हाच सामाजिक सिद्धात व मैत्रिभावाची चेतना सूचित केली आहे रागद्वेष टाकल्याशिवाय समतेची सर्व-व्यापकता साध्य होत नाही म्हणून हा आत्मौपम्य मार्ग केवळ विजयी वीराचाच आहे, भ्याडाचा नव्हे ! शस्त्रसज्ज हात उगारून भोळ्यांच्या मनात भीती आणि दरारा निर्माण करणारा साहसी प्राणी काही विजयी वीर नव्हे फार तर काही काळ तो खाटकाचे काम करील इतकेच ज्याला सर्वजण प्रेमाने कवटाळतात— **प्रीणनं प्रजानाम् ।** (महापुराण, ३/६८) तोच खरा महावीर

प्रसिद्ध हिंदी कवी 'कै. दिनकर' याच्या पुढील ओळीची स्मृती चाळवल्याशिवाय राहात नाही—

**आदमी नहीं मरता बरछो से तीरों से,**
**लोहे की कडियों की साजिस बेकार हुई,**
**बांधो मनुष्य को शबनम की जजीरों से ॥**

## सर्वोदयी क्षमता

हा जमाना शस्त्रधारी भित्रटाचा आहे त्यानी आक्रमणाच्या भीतीने हाय खाऊन हाती शस्त्र धरले आहे. तरी ते स्वत हून त्या शस्त्राचा उपयोग करण्यास धजत नाही तेवढी हिंमतही होत नाही स्वत च्या प्रेरणेने उगारलेले शस्त्र चालविण्याचा हिय्या नसणे हा भित्रटपणा नव्हे तर काय ? हे असले कुत्सित जीवनाचे दृश्य बदलावयाचे असल्यास वीराचीच वीरता अगी बाणवली पाहिजे त्याशिवाय तरणोपाय नाही

अहिंसा काही अन्याय-अत्याचार मुकाट्याने सहन करण्यास सागत नाही. पण या शस्त्रधारी भित्रटानी आपला नावळेपणा झाकण्यासाठी तिचा अनादर केलेला आहे ती स्वीकारण्याचा मोठेपणा त्याच्यात नाही पण तिच्या आधाराशिवाय ते जगूही शकत नाहीत त्याना हवे ते मिळत नाही म्हणून हा नुसता त्रागा आहे अहिंसेने कायरता शिकविली असे एकही उदाहरण सापडत नाही कारण वीरता हीच मुळी अहिंसेची जन्मभूमी आहे. अन्याय सहन करणे, दैन्यभाव धारण करणे पाप आहे. अन्यायाच्या प्रतिकारासाठीच वीरता हवी कारण त्याशिवाय स्वत चेही रक्षण करणे अशक्य होत असते मग राष्ट्ररक्षणाची काय कथा ? **अन्याय, दास्यत्व इत्यादी क्षती नष्ट करणे हाच स्थायीभाव आहे क्षत्रियतेचा, वीरतेचा आणि अहिंसेचाही. कारण अहिंसा म्हणजेच अक्षती.**

समर्थ गुणानाच जीवनामध्ये मूल्य प्राप्त होत असते अहिंसेची क्षमता मोठी आहे या क्षमतेमुळेच ममता प्रस्थापित होते तत्त्वत सर्व जीव समान असल्याने कोणत्याही जीवाचा विरोध न करता फक्त पापहेतूचा व पापकारणाचाच परिहार करण्याची मर्यादा स्वीकारावी लागते पापी आणि पाप याच्या मर्यादा सामाळून केवळ अशुभाचा व अमगल्याचाच परिहार करावयाचा आणि हे करीत असताना स्वत मात्र अशुभ, अमगळ विकाराना बळी न पडण्याचीही कसोटी कळणे, समता व अहिंसेच्या तत्त्वज्ञानाशिवाय कठीण आहे **या कसोटीला जी शभर टक्के उतरते तीच केवळ सर्वोदयतीर्थीय जिनप्रणीत क्षत्रियता होय.** या क्षत्रियतेने अगीकारलेली राजनीति व दण्डनीति मानवधर्माला पोषक असल्यामुळेच जैन क्षत्रियतेला सर्वांच्या जीवनामध्ये महत्त्वपूर्ण स्थान प्राप्त झाले आहे

या परपरेतील सदेश अमृतमय आहे. अमृतत्वाला आप-पर अशा दोन विरुद्ध बाजू नसतात One man's food is another's poison असा थोटकेपणा किंवा विसगती किंवा अपूर्णता या तत्त्वविचारात मुळीच नाही अहिंसा, वीरता, क्षत्रियता यातील अर्थ सुनियत असतो एकाची अहिंसा ती दुसऱ्याची हिंसा किंवा एकाची क्षती म्हणजे दुसऱ्याची पूर्ती अथवा एका अर्थाने वीर व दुसऱ्या अर्थाने भ्याड असा विस्कळीतपणा सुतराम् सभवत नाही समता ही सर्वत्रच समता असते ती कदापि विषमता होत नसते तसेच जे एका जीवाला कल्याणप्रद असते ते सर्वच जीवाना सदा सर्वकाळी कल्याणप्रदच ठरते **दोन जीवातील आत्मतत्त्व एकच असल्याने एकाला जे हिंसक व हानीकारक असते ते सर्वांना तसेच असले पाहिजे.** यात विभाषा सभवत नाही

म्हणून अपराधी व्यक्तीमध्ये पापाचा जो उद्रेक झालेला असतो त्याचे शमन करण्याचे क्षत्रियाचे कर्तव्य रोग-परिहारार्थ उपचार करणाऱ्या वैद्यासारखेच असते. पापोपशमन करीत असतानाही त्याच्या चेतनागुणाला हानी न पोहोचविण्याची खबरदारी घेतली पाहिजे. मात्र हे कर्तव्य जितक्या प्रमाणात जमेल त्यावरच त्या क्षत्रियाची क्षमता हीनाधिक ठरते पण मूळ तत्त्व अबाधितच उरते त्याच्या स्वत च्या अकुशलतेमुळे, अक्षमतेमुळे व भ्रांतीमुळे दण्डनीय जीवाच्या चेतनागुणाला हानी पोहोचत असेल तर त्याबद्दल दण्डधारी क्षत्रियालाही प्रायश्चित्त घ्यावे लागते. कारण त्याने प्रयोगात आणलेला दण्ड हा मिथ्या असतो किंवा अस्थानी ठरतो राजकारभारात मिथ्यादण्ड पूर्णपणे टाळता येत नाही. म्हणूनच या सस्कृतीतील सर्व सक्षम आणि समर्थ राजे निदान पश्चिम आयुष्यात तरी पूर्ण पापापहारी दीक्षा घेतात, आणि अमृतत्वाची आराधना निश्चयाने करीत राहतात जैन सस्कृतीतील क्षत्रियाच्या दीक्षेच्या साधनेतील सुसगती ही अशी आहे

## विधायक दण्डनीती

**जैन सस्कार म्हणजे मानवी चेतनेचा आविष्कार !** या तर्कसगतीप्रमाणे अनुशासन नीतीतील दण्डशास्त्र म्हणजे हिंसाविधान नव्हे या दण्डनीतीमध्ये सयमनाचा प्रयोग आहे. सयम हा पापहारक आणि भद्र परिणामक असतो हिंसा मात्र पापात्मक व अभद्रच असते तेव्हा दण्डाचार आणि हिंसाचार एक नव्हे ! **दण्डप्रयोगातील त्रास हा विकासपर असावा व तो एक तपोयोग ठरावा.** असा हा उदात्त दृष्टिकोण जीवनदायी ठरत असल्याने दण्डनीतीतील मूलभूत विचार जैन परपरेत इतराहून वेगळा आहे मात्र हे वैशिष्ट्य सूक्ष्म विचारपटलावरच उमटत असल्याने स्थूल विचाराच्या कक्षेत ते दृगोचर होत नाही झोरोष्ट्रियन धर्मात व वैदिक धर्मात अग्निपूजा सम्मत आहे म्हणून ते दोन धर्म व त्यातील

तत्त्वप्रणाली एकच मानण्यात जी विसगती, जो सभ्रम आहे तोच जैन क्षत्रियता व इतर क्षत्रियता एकरूप समजण्यामध्येही अनुस्यूत आहे. शासनसस्था चालविण्याच्या क्रियेव्यतिरिक्त त्याच्या मानवी विचार-प्रणालीत मात्र तात्त्विक समानता आढळत नाही म्हणून या दोन सस्कृती श्रद्धागुणात भिन्न आहेत जैनाच्या दण्डन-रक्षणादी क्रियेत अपरिहार्यतेमुळे अगर अपुऱ्या क्षमतेमुळे बाह्यत हिंसा घडली तरी त्यामागच्या विचारसरणीतील हेतूमुळे त्या द्रव्यहिंसेतही भावस्वरूप अहिंसेची दिव्य चेतना मात्र सुरक्षितच असते

द्वेषाने भरलेला माणूस मात्र क्षुब्ध मनाने नेहमीच सघर्ष करीत असतो. त्याला तृप्ती कधीच मिळत नाही दुसऱ्याचे काही तरी हिरवून घेण्यात तो व्यग्र असतो अभय देण्यात तृप्ती मिळत असते हे कळण्याइतकी त्याची सवेद्यता तरल होत नाही. अतिमहत्त्वाकाक्षी माणूसही असाच एका पदाकडून दुसऱ्या पदाकडे प्रवास करीत राहतो. स्वथानी पोहोचल्याचे सुख त्याला मिळतच नाही तो शान्त होऊ शकत नाही म्हणून अभय देण्यातच खरी क्षत्रियता असते क्षमेची भूमिका निर्विकारी असते क्षमावान शान्तिसुख अनुभवतो स्वातत्र्याचा किंवा सरक्षणाचा सग्राम शस्त्रयुक्त असो वा शस्त्ररहित असो तो हिंसावादाचा प्रतीक मुळीच नव्हे तो अहिंसावादाचाच पुरस्कार होय कारण क्षतीचा मुकाबला करणे हे त्यातील नियत तत्त्व त्या संग्रामातही अनुस्यूत आहे म्हणून क्षत्रियता आणि अहिंसा या एकाच तथ्याच्या दोन बाजू असून सुसगतपणे एकमेकाला परिपोषक आहेत.

## मातृभाव

समता म्हणजे केवळ व्यापारी सग्राहकता किंवा एकलेपणा नव्हे। तो एक दुसऱ्याकडे पाहण्याचा न्याय्य व शान्तिप्रद दृष्टिकोण आहे म्हणून शस्त्राने किंवा अहिंसेने किंवा अन्य कोणत्याही मार्गाने सपूर्ण विश्वामध्ये एकराज्य स्थापणे, सुखद स्वप्नासारखे कितीही रमणीय वाटले तरी ते प्रत्यक्षात उतरणे असभवनीय आहे एकाच प्रकारच्या जीवनव्यवस्थेची इतकी आवड असती तर भाऊ-भाऊ युगारभापासून वेगळे झाले नसते राजघराण्यात, कम्युनिष्ट देशात किंवा कोणत्याही पक्षाच्या व धर्माच्या विहित कार्यात अतर्गत दुफळी माजली नसती, एकाच धर्मात पथभेद निर्माण झाले नसते आपल्याला ज्याचा हव्यास असतो त्याचीच तीव्र अभिलाषा दुसऱ्याच्या मनात निर्माण होत असते। तिच्या पूर्तीमध्येच त्याला जीवनरस लाभतो म्हणून कुणीच कुणाचा विरस करू नये संघर्ष कमी करण्याचा प्रयत्न करून शक्य त्या प्रमाणात दुसऱ्याच्याही जीवनाला आईप्रमाणे अनुकूल बनावे. विरोधाचा प्रसग उद्भवला असतानाही शक्य तो मनगटी बळाचा वापर करू नये भरतादिक शलाका पुरुषाच्या परपरेतील जीवनप्रणालीचा सारभूत सदेश हाच आहे यात कोणता छलवादही नाही आणि दुबळेपणाचा लवलेशही नाही

आक्रमक प्रवृत्ती स्व पर जीवनदायी तथ्याना घातक आहे ती क्षत्रियता नसून क्षतीकारक आहे जैन क्षात्रनीती व्यवहारी आक्रमकतेचाही परिहार करते तर तीर्थंकरांचा उपदेश हिंसेच्या मूलकारणाचा अव्हेर करतो. प्रतिकाराने प्रतिकार शमतो हा आविर्भाव मृगजलाप्रमाणेच व्यर्थ होय अशा मार्गामुळे केवळ सभ्राती मात्र वाढत राहते आणि सहार तीव्रतर होत जातो म्हणून भारतानेच नव्हे तर युनोसारख्या वैश्विक सस्थेनेही शान्तीचा हा ननातन मार्गच पसंत केला आहे हाच भाव दिल्लीच्या दिनकर कवीने—

**ऐसी शान्ति राज करती है, तन पर नहीं, हृदय पर ।**
**नर के ऊँचे विश्वासो पर, श्रद्धा, भक्ति, प्रणय पर ॥**

या शब्दात व्यक्त केला आहे शस्त्रास्त्राचा प्रयोग असो किंवा शान्ति पाठाचा उद्घोष असो मानवाच्या प्रत्येक क्रियेच्या मुळाशी कल्याणभावनाच प्रभावी असली पाहिजे पण ही भावना समतेशिवाय पोसवणे शक्य नाही. समतेचे सवर्धन मातृत्व भावनेतच शक्य आहे म्हणून शासकाचे हृदय केवळ योद्धयाचे असून चालत नाही दण्डाचा उपयोग केवळ अमानवी प्रवृत्तीचा प्रतिबंध करण्यापुरताच मर्यादित राखणे जरूर आहे प्रतिबंध म्हणजे केवळ नाश नव्हे! आणि अशाप्रकारची अहिंसा प्रशासनास निरुपयोगी कधीच नसते सर्व जैन किंवा अहिंसाप्रेमी राजे यशशाली झाले हेच याचे ऐतिहासिक उदाहरण

## अहिंसेची व्यापकता

अहिंसा, समता याचा स्वीकार शब्दामध्ये तरी साऱ्या विश्वानेच केला आहे अत्यत हिंसक योद्धयानाही नाकारण्याचे धैर्य झालेले नाही, किंवा अशाचे औद्धत्य टिकू शकले नाही मात्र जैन क्षत्रियानी त्याचा अगीकार मनापासून करून ती आचारातही आणली. आणि ती आचार-परपरा स्वत च्या कर्तबगारीवर सवर्धित केली. म्हणून ही क्षत्रियता वेगळी व विशेष आहे अनेक मानवी गुणाचे नामकरण म्हणजे या अहिंसेचाच आविष्कार होय पण्हावायरणं या आगमग्रथात दया, क्षमा. अभय, सेवा इत्यादी साठ (६०) शब्द अहिंसेचे समानार्थी म्हणून नोदलेले आहेत यावरून अहिंसेच्या भावनेचा व आचाराचा आविष्कारात्मक इतिहास व सस्कृती दृगोचर होतात

भाषाशास्त्राच्या दृष्टीने अहिंसा शब्द निषेधवाचक असला तरी तो केवळ निवृत्तिपर आहे अशा भ्रमात कोणी पडू नये सस्काराची आणि धर्माचाराची पहिली पायरी सयमस्वरूपच असल्याने दमनाच्या प्रेरणेसाठी त्याला निषेधवाचक शब्दाचे आवरण परिस्थितिपरत्वे दिलेले असते त्यातील मूळ भावना प्रशमरूपात

स्वभावधर्मात्मक आहे. त्यात चेतना धर्माचे अधिष्ठान आहे या भावाविष्काराचे अनेक अंग आहेत, अनेक पैलू आहेत त्यापैकी संयमनाचे निदर्शक अंग अहिंसा या शब्दात अनुस्यूत आहे **रागादीना प्रवृत्तिः हिंसा ।** अशी परिभाषा हिंसेच्या आविष्कारासाठी वापरल्यामुळे त्या हिंसेचा त्यागदर्शक शब्द निषेधवाचकच असणार ! रागद्वेषादिक विकार चेतनाधर्म नव्हे चेतना सुख-शान्तिपर असल्याने अहिंसेतील विचार साधकच आहे निषेधक नव्हे **प्रवृत्ति-निवृत्तीमध्ये अन्योन्याश्रय संबंध असल्याने अहिंसेतही निषेधाप्रमाणेच विधीही अंतर्भूत आहे** याचप्रमाणे क्षत्रियता देखील केवळ प्रतिकारात्मक नसून आविष्कारात्मकही आहे ! हानीचा प्रतिकार व क्षमतेचा आविष्कार अशा उभयधर्मात्मक **क्षत्रियतेचा आचार साध्य करून जैन संस्कृतीने जगाला जीवनसाधनेचा एक नवा आदर्श दाखविला आहे.** ज्यानी केवळ संघर्षप्रधान अर्थ स्वीकारला त्यानी क्षात्रधर्माचा आत्माच पारखला नाही त्यामुळे त्याची साधना अपूर्णच राहून गेली आणि त्यातून भ्रांतीचा उदय झाला चेतना मंदावत जाऊन उद्धटपणा फैलावत राहिला

**यो न हन्ति न घातेति न जिणाति न जापते ।**
**मित्तं सो सव्वभूतेसु वेरं तस्स न केनचीति ॥**

**— इतिवुत्तक, पान २०.**

या विधानाला किंवा महाभारतातील—

**न हिंस्यात् सर्वभूतानि मैत्रायणगतश्चरेत् ।**
**नेदं जीवितमासाद्य वैरं कुर्वीत केनचित् ॥ ५ ॥**

**— महाभा., शान्तिपर्व, २७८/५.**

या आदेशाला अनुसरून आपला आचार साध्य केला तो जैन क्षत्रियानीच. बोलणे आणि करणे यात जितके अंतर असते तितकेच अंतर क्षत्रियतेच्या दोन प्रणालीमध्ये आहे 'जो घात करीत नाही, मारीत नाही, जिंकत नाही, पराभूतही होत नाही, त्याचा मैत्रिभाव संपूर्ण प्राणि-विश्वात आविष्कृत होत राहतो आणि त्याच्या बाबतीत वैरभाव कोणत्याही प्रकारे शिल्लक उरत नाही'. ही जीवनधारा मान्य झाल्याने विश्वाला सुख-शांतीचा अनुभव चिरकाल मिळाला असता पण अन्यथा श्रद्धेच्या जीवनामध्ये युद्धापाठोपाठ युद्धेच उद्भवली आणि मानवी जीवन त्या वैराग्नीत होरपळून निघाले

## आक्षेप-प्रवृत्ती

क्षात्र-धर्माशी खऱ्या अर्थाने एकरूप होण्यामध्ये जैनाइतके यश ज्याना मिळाले नाही त्याच्या मनातील मळमळ आक्षेपाद्वारे ओघळत असते. ती कधी कधी

वेगाने उच उफाळली तरी तितक्याच वेगाने विरून गेलेली आढळते त्यांच्या नाकर्तेपणाच्या किंवा पराभवाच्या वेळीच त्याना जैनाच्या अहिंसेची आठवण येते जणु काही हिंसा हीच जयाची माता असावी असे त्याना भासते

पुरून गेलेल्या विक्रमादित्याच्या सिंहासनावरील मातीच्या ढिगाऱ्यावर बसलेला, कथेतील गुराख्याचा पोरही जसा उत्कृष्ट न्यायनिवाडा करतो तसा अहिंसेच्या टीकेवर आरूढ झालेला कुणीही शूरत्वाच्या वल्गना करतो अगीकृत सग्रामातील विजयापेक्षा टीकेच्या पळवाटीमधील आनद त्याना जास्त चटकदार वाटतो आधळ्या टीकेच्या आवाजाने कुठेही हाकून न्यावी अशी मुकी बिचारी मेंढरे बनून राहण्यात ज्यांना धन्यता वाटते त्यांचा आवळेपणा जसा लोकशाहीला तसा क्षात्रवृत्तीलाही घातक आहे टीकाकार आपला आवाज टिकविण्यासाठी स्वत ची तिळाएवढी गोष्ट गगनासमान लेखतात इतकेच नव्हे तर दुसऱ्याच्या गगनाएवढ्या विशाल कर्तृत्वाचे श्रेयही स्वत च्या तिळाएवढ्या यशानेच मापतात आणि जे केवळ कानाने जगतात ते त्याचीच तळी उचलून धरतात व टाळी वाजवितात. मात्र त्या श्रेयाचे खरे हक्कदार बाजूला फेकले जातात!! समजसपणा, समता इत्यादी आवश्यक गुणानी व श्रद्धेनी युक्त असे सैनिक व सेनापती तयार करण्याचे कार्य समाजाने केले नाही तर केवळ सरक्षणात अपेक्षाभग होतो, एवढेच नव्हे तर प्रत्यक्ष क्षात्रधर्माचीच अवहेलना होते आणि परपरेने राष्ट्रियत्व भगते

जग जिंकू इच्छिणाऱ्या शिकदरालाही ज्या मगधाचा नाद सोडून द्यावा लागला तेथेही अहिंसाप्रणालीतीलच साम्राज्य नादत होते ज्याचा आदर्शवाद भारताने आजही मान्य केलेला आहे तो सम्राट अशोक अहिंसावादीच होता. केवळ अहिंसेमुळे केव्हा कोठे बाधा आली होती? अहिंसेमुळे क्षात्रवृत्तीची पीछेहाट झाली ही हाकाटी आत्मवचनात्मक आहे कारण हिंसावादीही सदैव विजयी होत नाहीत. जपानादी देश आज पुढारलेले आहेत पण त्याना कधी अहिंसा आड आली नाही, त्याच्या पराक्रमालाही खोट बसली नाही. जैनधर्मीय किंवा अहिंसामार्गीय इतके सम्राट, राजे, सेनापती, मत्री यशस्वी होऊन गेले त्यांच्या जयाचे मर्म काय? या हाकाटीत वैदिकांची तळी उचलून धरण्यात अर्थ नाही कारण वैदिकता आणि क्षात्रवृत्ती याचे समीकरण माडता येत नाही त्याचीही पीछेहाट झाली आहे तर त्यापूर्वीचा भारतही क्षात्रधर्मात सरस होता वैदिकतेचा आकस्ताळेपणा स्वत च्याच नैराश्याचा आणि निष्क्रियतेचा परिपाक आहे दुसऱ्याच्या नावाने जळत राहिल्याने कोणतीही सुधारणा होत नसते. केवळ अहगडाने आणि वाशिक वरिष्ठतेच्या दर्पोक्तीने भारावून गेल्यामुळे काय होते याचे सम्यग्दर्शन कालच्या हिटलरी जर्मनीने साऱ्या जगाला घडविले आहे

प्रत्यक्ष वैदिक इंद्राचीही किती तरी फजिती झालेली आहे दुसऱ्याच्या मदतीशिवाय तो वृत्राचा पराभव करू शकला नाहीच अखेरपर्यंत ! ( महाभारत, शांतिपर्व, वृत्रासुर प्रकरण ) पाण्डय इत्यादी दूरवर्ती दक्षिण भारतातील अवैदिक राजे काय कमी पराक्रमी होते ? शौर्य केवळ शौर्यासाठीच असू शकत नाही आणि केवळ स्वार्थी प्रेरणेसाठी ते दीर्घकाळ वापरताही येत नाही मारा आणि जगा हा संदेश वैश्विक हिताचा होऊ शकत नाही.

युद्धविमुख झालेल्या अर्जुनाला 'युद्धाय कृतनिश्चयः' करण्यासाठी श्रीकृष्णालाही रणांगणावरच गीता गावी लागली व पुढेही केवळ सारथ्य करण्यावरच स्वतःचा कार्यभाग उरकावा लागला पण जरासंध द्वारकेवर चालून आला असताना मात्र तीर्थंकरप्रकृतीचे नेमिनाथही पुढे सरसावले व ऐन मोक्याच्या वेळी त्यांनी जरासंधाचा चक्रव्यूह आपल्या गरुडव्यूहाने भेदून टाकला तेव्हा श्रीकृष्णाने त्यांना आलिंगन दिले ( हरिवंशपुराण, सर्ग ५१ ) मग कोठे आहे अहिंसा धर्माचा आणि क्षात्रतेजाचा विरोध ? इतर जैन राजांपैकीही कोणाचे क्षात्रतेज प्रत्यक्षात कमी पडले होते ?

## क्षत्रियता आणि वर्णवाद

साम्राज्य स्थापनेच्या आणि राष्ट्र-रक्षणाच्या क्षेत्रात अहिंसावादी राजाची आणि सैनिकाची कर्तबगारी कितीही उदात्त असली आणि इतिहासकाळात त्यांनी कितीही वाहवा मिळविली असली तरी वैदिकतेच्या लेखी त्या कशालाच फारसे मोल नसते कारण ती स्वतःच्या विशिष्ट वर्णभावनेत मशगूल असते व जेव्हा ती जागी होते तेव्हा मत्सराने जळत असते आज श्रेष्ठता अर्थाधीन आहे अर्थ व्यापार-उदीमाधीन असून काही व्यापार-उद्योग जैनाधीन असल्याने सारेच जैन तिला केवळ वैश्य भासतात आणि वैदिक वर्णकल्पनेप्रमाणे वैश्य क्षत्रिय नसतात इंग्रज मात्र व्यापारी असूनही पक्के क्षत्रिय वाटतात त्यांचे कंपनीराज्य इतिहास प्रसिद्ध आहे तरीही जैनत्व आणि क्षत्रियत्व यांचे सान्निध्य त्यांच्या कल्पनेत बसू शकत नाही मात्र जैनांच्या वर्गकल्पनेत ते चपखल बसते

जैन धारणेप्रमाणे ऋषभराजांच्या कारकीर्दीत सर्वच प्रजा क्षत्रिय होती ( चउपण्ण०, १ रिसहसामिचरिय, पान-३९ ) पुढे कारणपरत्वे आदिराजांनी त्या क्षत्रियांची उग्र, भोग, राजन्य व नाग अशा चार गणामध्ये वर्गवारी केली ( वसुदेवहिंडी, ४ उसहरज्जाभिसेओ, पान-१६२ ) राजा तर सर्वांचा अधिपती म्हणून क्षत्रियाग्रणी ! तेव्हा समाजातील एखाद्या विभागामध्ये क्षात्रतेजाच्या प्राकृतिक अभावाची कल्पना स्वीकारणे जैन दृष्टिकोणात बसत नाही वर्ण-श्रेष्ठत्वाचा दर्प आणि नियत उच्चतावाद याच्या आहारी जाऊन अहिंसा, क्षमा

अशा उच्च श्रद्धामूल्याना जे कोणी हीन लेखतात ते स्वत मोठे पराक्रमी असतात असे नव्हे

जैनाचे पराक्रम इतिहासात सुवर्णाक्षरानी नोंदलेले असले तरी चक्रनेमिक्रमेण आज त्याच्याही पराक्रमाला ओहोटी लागलेली आहे हा काळाचा महिमा त्याना टाळता आलेला नाही त्यांच्या आजच्या अवस्थेतही ते श्रद्धाभ्रष्ट मात्र झालेले नाहीत व दुसऱ्यावर आक्षेपही घेत नाहीत पराक्रमाच्या परपरेचे जुने खाते बद होऊन पडले आहे आणि नवे पराक्रम नोंदवायला आज क्षेत्र उपलब्ध होत नाही यामुळे पराक्रमाच्या सदर्भात जैनांचा हिशेब कोणीच करीनासा झाला आहे ते उपेक्षित, दुर्लक्षित आणि नगण्य झाले आहेत हेही खरे आजच्या घडीला हे सर्व अटळच दिसते तरी पण त्याच्या तत्त्वप्रणालीला मात्र दोषार्ह ठरविण्यात अर्थ नाही अहिंसा आणि गाधीवाद याची सागड कोणीही कशाही घालतो महात्माजींनी प्रत्येक मत किंवा प्रसगी त्यानी केलेली चूक म्हणजे काही अहिंसातत्त्व नव्हे की जैननीती नव्हे ! प्रत्यक्ष जैनानी केलेली चूकही धर्माचार किंवा तत्त्वप्रणाली नव्हे ! !

## सुसूत्र साधना

भरतवर्ष एक पराक्रमी राष्ट्र असूनही आक्रमकाना बळी पडला अनेक प्रकारे त्याचा तेजोभग होत राहिला तरी पण हिरमुसलेपणा किंवा चेतोग्लानी यावयास नको होती खऱ्या क्षात्रधर्माच्या अभावामुळेच अशी स्थिती प्राप्त झाली तेव्हा चिडून न जाता खऱ्या क्षात्रतत्त्वाची साधना केली पाहिजे साधनामत्रातील बीजाक्षरात थोडाही फरक झाल्याने इष्ट विद्यासिद्धी होत नाही किंवा विरुद्ध शक्तीच्या राक्षसाचा प्रादुर्भाव होतो. हा धोका टाळून खरी क्षत्रियता साध्य करावयाची असेल तर आपल्या वैचारिक साधनेत थोडीही चूक करता कामा नये. जैन क्षत्रियतेला मात्र अशा तत्त्वश्रद्धेचा भक्कम आधार आहे ती स्वयं परिपूर्ण आहे. ती दुसऱ्याविरुद्ध आक्रोश करीत नाही वसंत ऋतूतील आम्र-मजरीच्या प्रभावामुळे कोकिळेचे कूजन पंचमस्वराच्या माधुर्याने आपोआप भारावून जात असते मात्र स्वतत्त्वाच्या अभावामुळे ज्यांची साधना सिद्धीस जात नाही ते रोगपीडिताप्रमाणे व्यग्रचित्त होऊन कावकाव करीत राहतात.

समरागणात सैनिकांनी व सेनानीनी आपल्या पराक्रमाने विजयश्री खेचून आणावी पण त्या विजयश्रीच्या गृहप्रवेशाच्या वेळी गृहज्येष्ठानी तिचे तेजोहरण करावे ही परपरा आपल्या भूमीवर युधिष्ठिर-काळापासून चालत आली आहे असेच प्रसग वारवार उद्भवलेले दिसतात. युद्धात जे जिकले ते तहात हरायचे ही आपली नीती परपरागत चालू आहे म्हणून असन्तुष्टपणे अहिंसेच्या व क्षमेच्या

नावाने खडे फोडण्यात काय अर्थ आहे? अशा चुका जैनत्त्वाच्या कपाळी मारण्यात कोणता पराक्रम आहे? जैन क्षत्रियत्वाच्या आविष्कारातील मानवतावाद, समता, विघायकता इत्यादी गुणापासून योग्य धडा घेण्याऐवजी त्याना हिणवीत राहिल्याने कोणताही कार्यभाग साधणार नाही. जैन हे भारताचे किंवा भारतीयत्वाचे शत्रू कधीच नव्हते युद्धात तडाखा मिळाला म्हणजेच क्षात्रधर्माची आठवण होत असते इतर वेळी क्षात्रतेज कशाशी खायचे ते समजेनासे होते म्हणून क्षत्रियता म्हणजे निव्वळ कापाकापी अशी हीन कल्पना त्यागली पाहिजे वर मागितलेल्या क्षत्रियत्वाच्या सर्व गुणाचे ग्रहण केल्यास ती सर्वांग परिपूर्ण होऊन कोणत्याही वेळी निरुपयोगी ठरणार नाही खरा क्षात्रधर्म केवळ युद्धासाठीच नसतो सपूर्ण जीवनामध्ये अनुस्यूत असे ते एक आंतरिक तत्त्व आहे.

टिळकांवर प्रेम करणे म्हणजे केवळ गांधींची निंदा करणे नव्हे तसेच सावरकरांच्या सैनिकीकरणाचे कौतुक करणे म्हणजे अहिंसेची टवाळी करण्याचा हक्क वजावणे नव्हे! त्यात शूरपणा तो कोणता? मोगली साम्राज्यात अल्लोपनिषद् रचण्याइतकी आणि 'दिल्लीश्वरो वा जगदीश्वरो वा' अशी पदवी परकीय बादशहाला वहाल करण्याइतकी स्वाभिमानशून्य लाचारी स्वीकारणाऱ्यानी ( वसत दिवाळी अक, १९७२, पान. ६४ ) अहिंसा-क्षमेच्या सूर्य-चद्रावर थुकण्यात का अभिमान वाळगावा? एरवी मात्र हिंदुत्वाची निष्ठा व्यक्त करण्यासाठी मुसलमानाचा द्वेष करणे हे एकच काम ज्याना जमते त्यांना इतरानी भीक का घालावी? खरे तर त्याचा परस्पर द्वेष हा भावकीच्याच क्षेत्रातला असल्याने इतरानी तिकडे फारसे लक्ष देऊ नये

अहिंसेला जीवनतत्त्वांचा भक्कम आधार आहे. तिच्यावरील आक्षेप अस्थानी व खोटे ठरतात अहिंसा वीरत्तेशिवाय आविष्कृत होत नाही म्हणून जैन अहिंसकाची धाव अनंत वीर्याच्या लब्धीनतरच संपते! क्षात्रतेजाला अहिंसेमुळे बाधा पोहोचणे अशक्य आहे अहिंसेत एक दर्शन-प्रणाली निहित आहे तेथे व्यवहारातील कोणत्याही कल्याणकारी क्रियेचा निषेध नाही. कमीत कमी हानी आणि जास्तीत जास्त हित हेच सूत्र सर्वत्र अनुस्यूत आहे ज्यात चेतनातत्त्वाची हानी नाही आणि जो काही आत्मगुणाच्या रक्षणाचा उपाय असेल अशा कोणत्याही क्रियाचा आणि व्यवहाराचा निषेध त्यात कोठेही आढळत नाही योग्य प्रसगीची आत्माहुतीही साधनाच ठरते तेव्हा साधक असलेल्या अहिंसेतील सद्भूत गुणाचा निषेध अधपणे कल्पून गुणनिष्ठ वीर्य–धैर्य–पराक्रमादी प्रवृत्तीना मुकणे म्हणजे स्वत च खावाला मिठी मारून– 'खांब मला सोडीत नाही'– असे बडबडण्यासारखेच ते विसगत आहे त्यात अवघड काही असेल तर दार्शनिक तत्त्वापासून च्युत न होण्याची मर्यादा पाळणे होय मर्यादाचे पालन समर्थांनाच शक्य असते ते येऱ्या

गवाळ्याचे काम नव्हे। केवळ शस्त्रसंग्रहाने किंवा इतर हिंसा-सामग्रीच्या आधिक्याने वृत्ती उद्धट, अमर्यादशील, अतिचारी, सत्तापिपासू व हिंस्र बनत असते म्हणून केवळ अनावश्यक प्रसंगी क्रूरसाधनाचा निषेध करण्यात येत असतो.

जैन क्षत्रियानुयोगाच्या परिचयामुळे भरत-संस्कृतीच्या मौलिक प्रेरणा व आराधना याचे ज्ञान होण्यास मदत होते ऋषभ-प्रणालीचे एक अव्यक्त अंग साकार होते. आणि आपल्या संस्कृति-संवर्धनाचे उदात्तीकरण साधण्यामध्ये भरतादी जैन क्षत्रियानी पार पाडलेली महत्तम कामगिरी प्रत्ययास येते विविध राजवंश व सामान्य जनता याच्यावर जैन क्षात्रवृत्तीचा प्रभाव प्राचीन काळापासून पडलेला प्रत्ययास येतो त्याची आध्यात्मिक भूमिका, नैतिक धारणा, व्यवहारी जीवनातील समंजसपणा, समता, उदात्तता इत्यादी गुणाचा ठसा भारतीय जीवनावर खोलवर उमटलेला आहे प्रसंगी विरोधी वाटणाऱ्या साधनेतील सुसंगती त्यांनी साध्य करून दाखविली आहे म्हणूनच आजच्या जगामध्ये अपेक्षित असलेल्या सहकारी जीवनाला आणि कल्याणकारी कारभाराला जिनाच्या सर्वोदयी उपदेशामृताची नितांत गरज आहे अथर्व वेदामध्ये याच अर्थाने ऋषभदेवाना सर्वांचा त्राता म्हटले आहे-

**यासामृषभो दूरतो वाजिवीवान्त्सधः सर्वान् लोकान् पर्यैति रक्षन् ॥**

— अथर्ववेद, ४/३८/५.

क्षात्रधर्म सर्वांचा त्राता आहे म्हणून तो सर्वश्रेष्ठ आहे उदारमनाने ज्याना लोकाचे हित साधावयाचे असेल त्यानी हा अनंत वीर्यशाली धर्म पाळावा मात्र या विरुद्ध वर्तन केल्यास मत्स्यन्यायाने प्रजेचा नाश होईल-

**एववीर्यः सर्वधर्मोपपन्नः क्षात्रः श्रेष्ठः सर्वधर्मेषु धर्मः ।**
**पाल्यो युष्माभिर्लोकहितैरुदारैर्विपर्यये स्यादभवः प्रजानाम् ॥**

— महाभारत, शान्तिपर्व, ६५/१.

: १३ :

# नामकरण आणि संस्कृती

यथाविभवमत्रेष्टं देवर्षिद्विजपूजनम् ।
शस्तं च नामधेयं तत् स्थाप्यमन्वयवृद्धिकृत् ।।

— महापुराण, ३८/८८

# १३ नामकरण आणि संस्कृती

## नामसंस्कृती

'या क्षणी चमकले आणि त्या क्षणी मालवले' अशा कोटीत आपण पडू नये असे मानवास तीव्रपणे वाटत असते आपल्या जीवितकृती, आज तशाच उद्याही आणि परवाही, सर्वांची मने निरन्तर आकर्षित करून घेण्यास समर्थ राहाव्यात अशी सहज तळमळ मानवाच्या मनात प्रत्यही जागृत असते प्रत्येक सृष्ट वस्तूची विलयावस्था देखील उत्पत्ती इतकीच यथार्थ असते, हे तत्त्व माहीत असूनही आपली किर्ती अजरामर व्हावी असे मानवी मनाला वाटत असतेच म्हणून मानवी जगात नाम-कीर्तनाच्या रूपाने आपली कीर्ती अखण्ड ठेवण्याचा प्रयत्न अनादी कालापासून सतत चालू असलेला दिसतो पूर्वसूरीची कीर्ती सदैव कानावर येत असल्यामुळे तर अमर कीर्तीची ही आस आदिम कालापासून सतत तेवत राहिलेली दिसते

पूर्वदिव्यत्वाची कीर्ती अजिबात जिवत राहीली नव्हती असा कालखण्ड मानवी सस्कृतीत शोधूनही आढळत नाही हजारो वर्षांपूर्वी होऊन गेलेल्या कीर्तिधराच्या नावाभोवतालचे तेजोवलय अजूनही कायम असल्याचे जेव्हा जाणवते, पूर्वदिव्यत्वाच्या प्रतिमा अजूनही कृतज्ञाच्या अत करणातील मखरात विराजत असलेल्या जेव्हा आढळतात आणि त्याबद्दल सज्जनाच्या मनात एकप्रकारची लालसा निर्माण होत राहते हे जेव्हा प्रत्यक्ष अनुभवण्यास मिळते तेव्हा त्या गुणाच्या आकर्षणावरोबरच नामरूपाने मागे शिल्लक राहण्याची भावना तेवत राहतेच त्याची प्रतिक्रिया म्हणून पहिल्या पावलीच त्या कीर्तिशाली नावाचा व नामकरणविधीचा अगीकार होत असतो यादृष्टीने देखील मानवी सस्कृतीचा, ध्येयाविष्काराचा आणि लक्ष्यविंदूचाही मूलाधार नामकरणच आहे

प्रत्येक सस्कृतिप्रणालीमध्ये आपापल्या परपरेतील काही सुविश्रुत नावाचे जतन मोठ्या प्रेमाने केलेले आढळते त्या त्या सस्कृतीला लाभलेल्या विपुल वैभवातून आणि त्यावर कोसळलेल्या विविध विपत्तीच्या अग्निपरीक्षेतून तावून सुलाखून निघालेल्या नामावलीतून रुचतील ती तेजस्वी रत्ने आपल्या मडणासाठी स्वीकारण्याचा मोह आवरता येत नसतो जी नावे ओजाने दिव्य असून गुणाने भव्य असतात ती स्वीकार्य ठरतातच केवळ त्यामुळेच त्या नावाची परपरा अखडितपणे टिकून राहते मानवी सस्कृतीमध्ये अनेक क्रान्त्या व उत्क्रान्त्या जन्म पावतात व कालाच्या उदरी विलीनही होऊन जातात राज्यपद्धतीही पालटतात धर्माचार बदलतात सामाजिक जीवनात स्थित्यतरे घडतात लोकाची आचार–विचार–पद्धतीही नवाळते. तरी पण या निवडक नावाच्या परपरेवरील लोकाचे प्रेम अव्याहत टिकलेले आढळते

अशा सस्कृतिसपन्न नावाना एकप्रकारे राष्ट्रीय सपत्तीचे स्वरूप प्राप्त होते. खरे तर सास्कृतिक सपत्तीच राष्ट्राची एकमेव सपत्ती होय यामुळे राष्ट्रातील आबाल-वृद्ध मानव अशा नामसवारणेकडे ‘राष्ट्रीय संस्कृतीतील जिवतपणाचा एक अमूल्य भागाश’ या दृष्टीनेच पाहू लागतात म्हणून प्रत्येक राष्ट्रात अशी नामकरणपरपरा सदैव जिवत राहात असते कारण त्याबद्दल वाटणारी गोडी कधी सपतच नाही हे सहज तथ्य लक्षात घेता, असेही म्हणावे लागेल की जी नामकरणे एका सस्कृतिपरपरेत अमर म्हणून नादत आलेली असतात त्याचे कोणत्याही दुसऱ्या सस्कृतिप्रणालीने देखील सदैव जतन करीत राहावे कारण त्यातील अमरत्व सर्व प्रकारच्या निकषावर टिकून उजळलेले असते, त्यातील योग्यताच इतकी सर्वातिशायी असते! केवळ एका विवक्षित सस्कृतीलाच अशा नावाविषयी आपुलकी वाटावी असे नव्हे, तर एकदर मानव जातीलाच त्याविषयी जिव्हाळा वाटावा असा एखादा दिव्यत्वाचा अश तेथे सदैव विलसत असतो

प्रसगोपात्त व स्थल-कालपरत्वे मानवामानवामध्ये जे अनेक प्रवाहभेद निर्माण झालेले आहेत, त्यातील गढूळ पाण्याखाली कमलपत्राप्रमाणे शोभणाऱ्या आणि अखिल मानवजातीच्या अत करणाचे एकत्व सिद्ध असल्याची साक्ष पटविणाऱ्या गोष्टी या ससारातील विचित्र व्यवहारात फार थोड्या आढळतात. पण त्या दुर्मिळ गोष्टीतील अतिशय महत्त्वाची आणि अत्यत प्रभावी बाब कोणती असे विचारले तर अमर कीर्तीच्या पदवीला पोहोचलेली नामकरणाची परंपरा असेच उत्तर द्यावे लागेल ! प्रथमदर्शनी या प्रकाराचे काहीसे आश्चर्य वाटले तरी योग्य दृष्टीकोण प्राप्त होताच आश्चर्याचे रूपातर प्रथम नवलाईमध्ये आणि त्यानतर नवप्रकाशामध्ये झाल्याशिवाय राहणार नाही मानवी जीवनातील शाश्वत मूल्याना नामकरणामुळेच आकार प्राप्त होतो. अन्वय व व्यतिरेक स्वरूपाचा तोडावळा

ओळखता येतो आणि व्यक्तित्वाचा आविष्कार साधता येतो अमर ठरलेली नामकरणे अशा शाश्वत मूल्याच्या आणि मानवतेच्या अधिष्ठानावर प्रतिष्ठित झालेली आढळतात म्हणून त्यापासून मिळणारा आनद कोणाही सुसस्कृत मानवास केव्हाही मिळू शकतो अशा रीतीने ती थोर नामकरणे जरामरणाच्या सीमेपली-कडे जाऊन अमरत्वामध्ये स्थिरावतात.

## नामलक्षण

नाव निराकार वस्तूला साकार करण्याचे कार्य करते नावाच्या अभावी त्या तथ्याचे अस्तित्व देखील अनत विश्वात विलीन होऊन जाते नावामुळेच तथ्याला व्यक्तित्व लाभते

**म्नायते अभ्यते नम्यते अभिधीयते अर्थोऽनेन वा ।**

अर्थातच ज्यावरुन अस्तित्वाचा, अर्थाचा, लक्षणाचा व व्यक्तित्वाचा बोध होतो त्याला नाव म्हणतात

अमरकोशात ( प्रथम काण्ड, ३२५-२६ ) नावाला आह्लव, आख्या, आह्ला, अभिधान, नामधेय इत्यादी पदानी सबोधिले आहे तर यास्काचार्यांनी नावाचे लक्षण पुढील शब्दात मागितले आहे-

**शब्देनोच्चारितेनेह येनं द्रव्यं प्रतीयते ।**
**तदक्षरविधौ युक्तं नामेत्याहुर्मनीषिणः ।।**

**- निरुक्तम् ( आचार्य विश्वेश्वर प्रत) पान २०.**

ज्या शब्दाचा उच्चार करताच तथ्याचा प्रत्यय अनुभवास येतो अशा अक्षर विधानाला तज्ञ ' नाव ' असे म्हणतात

मनुस्मृति, आपस्तम्बीय, बोधायन, अश्वलायन, मानव, गोभिलीय पारस्कर इत्यादी गृह्य सूत्रात व मिताक्षरा ग्रथात नावासबधी शास्त्रीय विवरण विस्तृतपणे केले असून त्याबद्दलचे शास्त्रीय विचार स्पष्ट प्रगट केले आहेत आणि काही सिद्धान्तही माडले आहेत

मानवाच्या सस्कारक्षमतेतून ज्या काही उपयुक्त तथ्याची निर्मिती झालेली आढळते त्यात नामकरणाला फार मोठे महत्त्व आहे नामकरणातून निष्पन्न झालेले नाव तथ्याशी अस्तित्वकालापर्यंत एकरूपतेने सलग्न होऊन राहते या शिवाय महत्त्वाच्या व्यक्तित्वाशी तर ते मृत्यूनतरही प्रामाणिकपणे चिरकालपर्यंत एकनिष्ठतेने चिकटून राहते. व्यक्तित्वाला जगविण्याची किमया आयुष्यापेक्षा

नावामध्ये किती तरी मोठी आहे. आयुर्मर्यादा सरल्यावरही नाव दीर्घकाळ मागे उरते आणि पुढील पिढ्याना स्फूर्ति-प्रेरणा देत राहते हे मानवी कार्य निश्चितपणे अनमोल आहे. मृत्यूनतर उरणारे मानवी तथ्य कोणते या प्रश्नाचे उत्तर बृहदारण्यक उपनिषदामध्येही 'नाव' असेच दिलेले आहे. आणि प्रत्यक्षात अशी अजरामर नावे किती तरी आढळतात

नावामध्ये भाव प्रगट करण्याचेही सामर्थ्य मोठे असते महावीर, बुद्ध, येसू ख्रिस्त, महमद पैगंबर इत्यादी नावे म्हणजे समूर्त सहृदयताच होय त्यामुळे अशा नावाच्या आठवणीने मानवी मनाला मनस्वी आल्हाद मिळत राहतो. थोडक्यात नावाचे लक्षण पुढील श्लोकात सागता येईल—

> नामाखिलस्य व्यवहारहेतुः शुभावहकर्मसु भाग्यहेतुः ।
> नाम्नैव कीर्ति लभते मनुष्यस्ततः प्रशस्तः खलु नामकर्म ॥
>
> — बृहस्पति, वी. मि स भाग १, पान २४१

## 'भरतवर्ष' नामकरणाचे आकर्षण

या अप्रतिहत कालचक्रामध्ये त्या त्या घटनाचक्राला अनुसरून समाजातील संस्थाची आणि व्यक्तीचीही नामाभिधाने बदलत आलेली आहेत एकाच परपरेतील धर्मसस्थेची नावेही कालमानानुसार बदललेली आढळतात जिनप्रणीत जैन धर्माला वेळोवेळी निर्ग्रंथ धर्म, आर्हत् धर्म, दिगंबर धर्म, केवली धर्म, सनातन धर्म, वीतराग धर्म, आर्ष धर्म, मोक्षमार्ग, सर्वोदय तीर्थ, अहिंसा धर्म, सामायिक धर्म इत्यादी अनेक नावानी प्रसिद्धी मिळाली आहे असे जैन साहित्याच्या आधारे सप्रमाण सागता येते वैदिक परपरेचीही हीच कथा आहे— वैदिक धर्म, ब्राह्मण धर्म, श्रौतधर्म, स्मार्तधर्म, पुराणधर्म, गीताधर्म, वर्णधर्म, आश्रमधर्म, संन्यासधर्म, योगधर्म, हिंदुधर्म, यज्ञधर्म, उपासनाधर्म, भक्तिमार्ग, ज्ञानमार्ग, आनंदमार्ग, कर्ममार्ग इत्यादी ही अशा प्रकारची नावे प्रमुख धर्मग्रथ किंवा धर्मतत्त्व याच्या प्रभावनेला अनुसरून त्या त्या काळी प्रसिद्ध पावली साहित्याच्या अभ्यासाने या सर्व नावामागील घटनाची उकल होते परन्तु आपली ही परपरागत भूमी, हा आपला देश, आपल्या जीवनाचे, धर्माचे, सस्कृतीचे अधिष्ठान असलेला आपला हा भरतवर्ष किंवा भारत मात्र नामाभिधानाच्या दृष्टीने एक सास्कृतिक समस्या होऊ पाहात आहे भरतवर्ष हे नाव अप्रतिहत असतानाही त्यावर विनाकारण आघात होत असतात ती एक समस्या आहे असा भास तयार करण्यात येत असतो ती सोडविण्यासाठी नशोधनात्मक सामग्री कमी आहे अशी तक्रार नोदविण्यात येते या प्रवृत्तीमागे सक्लिष्ट मनोवृत्ती व अभिचारात्मक हेतूच

कारणीभूत आहेत. स्वार्थी अभिप्राय व दुरभिनिवेश हीच खरी अडचण आहे परन्तु निर्मळ मनाच्या संशोधकाला ही आभासमय वेगडी अडचण मुळीच रोवू शकत नाही

## नावाचे सांस्कृतिक महत्त्व

नामधेय हे एक सस्कृतीचे अंगभूत व स्वरूप-निदर्शक असे लक्षण असल्याने त्याला विचारसरणीत मोठे स्थान आहे नावाकडे दुर्लक्ष केल्याने पुष्कळ वेळा सशोधनाचा पोरखेळ होतो **नावावरून सस्कार-मार्गाचा बोध होतो** जीवनातील आयासाचा आशय कळतो प्रयत्नाची दिशा प्रगटपणे दिसते जीवनातील दार्शनिक तत्त्वाचे आकलन होते साध्य-साधनाचा परिचय होतो शुभाशुभ प्रवृत्ती, त्यातील विधि-निषेध समजून विवेकमार्गाचे मर्म समजते स्वकीय-परकीयाची माहितीपूर्ण ओळख होते. स्वत्वाची जाणीव निर्माण होण्यास प्रेरणा मिळते स्वत च्या परपरेचा सार्थ अभिमान निर्माण होतो जीवनात चैतन्याचा लाभ होतो आपल्या जीवनमार्गाची गती व दिशा समजते चुका सुधारण्याची पात्रता येते प्रयत्नाचा वेग वाढविता येतो या सर्व गोष्टी जीवनाला पूरक आणि साध्याला प्रेरक असल्याने आपल्या सस्कृतीला उपयुक्त आहेत या आपल्या जीवनव्यापारात आपल्या देशाला— मूळ निवासाला फार मोठे स्थान आहे **कारण देशच संस्कृतीचा मूलाधार असतो.** आधाराशिवाय आधेय टिकत नाही म्हणून आपणास आपली सस्कृती टिकवावयाची असेल तर आपल्या स्थानाचा मूलगामी परिचय असणे आवश्यकच आहे निर्वासितासारखी, उपन्यासारखी किंवा भाडेकरूसारखी मानसिक आणि परिस्थितीजन्य अवस्था असेल तर प्रेरणा कमी पडते व प्रयत्न ढिला होतो जीवनातील चैतन्य मरगळते. म्हणून वरील प्रकारच्या सज्ञेची जागृती आवश्यक आहे

## 'भरत' संज्ञेतील राष्ट्रीय निष्ठा

मानव्याची जडण-घडण करीत असताना काही प्रेरणा इतक्या उपयोगी असतात की त्याशिवाय मानव्यातील अतस्थ चेतना चेतविता येत नाहीत की असलेली चेतना अधिक उजळ करता येत नाही या आतरिक प्रक्रियेसाठी अस्मितेची ठिणगी चमकावी लागते निष्ठा जेव्हा तेजाळनात तेव्हाच नवा इतिहास घडतो भारताचा इतिहास अशा अप्रतिहत निष्ठेतून घडलेला आहे ह्या निष्ठाच मानवातील अव्यक्त गुणाना जागृत करीत असतात त्यामुळेच व्यक्तीला तेज चढते याला केवळ व्यवहारी महत्त्व नसून, त्या आत्मप्रत्ययकारी निष्ठा म्हणजे मानवधर्माचे पचप्राण होत श्रद्धा भ्रष्ट झाल्या तर मानवी जीवन घडविणे अवघडच नव्हे तर असंभवनीयही आहे

सामाजिक जीवनातही काही श्रद्धास्थाने आवश्यक ठरतात मात्र श्रद्धा शून्यात्मक किंवा फक्त नकारात्मक असू शकत नाहीत ती श्रद्धामय मानसिक अवस्था स्वयप्रत्ययकारीच असते काही निश्चित गुण किंवा फक्त अनुभूत घटनाच श्रद्धेला आधार देतात म्हणून खऱ्या गुणाचा आविष्कार आणि सत्य घटना निष्ठेचा पाया असल्याने त्या घटनाचा इतिहास निरस्त होऊ कामा नये हा इतिहास मावळला की श्रद्धा निराधार होऊन नष्ट होते श्रद्धाशून्य जीवन तेजस्वी असू शकत नाही आणि तेजाशिवाय मानवी जीवनाला आणि संस्कृतीला अर्थ उरत नाही महत्कार्याची ऊर्मीच निर्माण होत नाही. मग मानव्याचे आदर्श मंदीर कसे साकार होणार ? अशा निस्तेज समाजाचे राष्ट्र जिवत भासत नाही जीवनातील आकस्मिक व नैमित्तिक सकटे झेलण्याची पात्रता उरत नाही. सकटानी खचलेल्या व दु खानी पीडलेल्या अवस्थेत मानवाचे जीवन सार्थपणे मानवी राहात नाही ते केवळ प्राण्यासमान बनेल !

अशी स्फूर्ती परत मिळविण्यासाठी इतिहासातील प्राचीन महापुरुषाची कामगिरी आठविणे म्हणजे निष्ठेची - श्रद्धेची विझत आलेली ज्योत पुन तेजाळविणेच होय. हे कार्य क्रमप्राप्तच आहे. विझत चाललेल्या अग्निकणाना तेज येण्यासाठी पुन पुन फुकरणे आवश्यक ठरते महान व्यक्तीच्या जीवनदर्शनाने हे तेजस्वी कार्य साधते. नवी स्फूर्ती लाभते नव्या प्रेरणा उत्तेजित होतात संस्कृतीला नवे तेज चढते नव्या तेजाने व नव्या जोमाने नवे महत्कार्य साध्य होते नवा इतिहास निर्माण होतो

कित्येकदा प्राचीनकाळी होऊन गेलेल्या व्यक्तीचा इतिहास त्याच्या स्मारकामध्ये सापडतो स्मारकाचे अनेक प्रकार असले तरी नामरूप स्मृती सर्वात महत्त्वाची आहे कालप्रवाहात वस्तू चिरन्तन राहू शकत नाहीत परतु देशाची धर्माची नावे मात्र दीर्घकाळ टिकतात संस्कृतीची बलवत्तर प्रतीके तीच असतात. आपल्या देशाचे नावही अशाच एका थोर संस्कृतीचे प्रतीक आहे !

## नामस्मृतीच व्यक्तित्वाची स्फूर्ती

आपल्या पूर्वजानी असे काही अचाट पराक्रम केले आहेत की त्याची जाणीवपूर्वक स्मृती ठेवली म्हणजे मनगटात सतत जोम खेळत राहतो मन धीट राहून ते कार्योत्सुक बनते स्वत्वाची जाणीव वाढीस लागते स्वत्व व पात्रता वाढविण्याची ऊर्मी जिवत राहते. मानवी गुण जोपासले जाऊन कर्तबगारी समाजोन्मुख बनते राष्ट्राभिमान तेवत राहतो अवगुणाची व अन्यायाची चीड आणि गुणाची, न्यायाची व समतेची चाड अगी बाणते स्वातन्त्र्याची आवड निर्माण होऊन तिची वाढ होत राहते त्याग, भक्ती, शिस्त, कर्तव्य याचे धडे

अप्रत्यक्षपणे मिळत राहतात अशा गुणाबद्दल असलेला आदर व अभिमान दुणावतो मानवी गुणाबद्दल आदरभाव आणि अन्यायाविरुद्ध झगडण्याची वृत्ती जन्माला येते ती प्रवृत्ती वाढीस लागते अखिल मानवाची मानवतेच्या दिशेने वाटचाल साध्य करता येते अशा मानवी कार्याच्या सिद्धीसाठीच ज्याच्या पराक्रमाचे चौघडे सहस्रावधी वर्षे अखंड वाजत आहेत व पुढेही चिरकाल वाजत राहणार आहेत अशा थोर विभूतींच्या पराक्रमाची पूजा बांधणे, गुणगान करणे प्रत्येक मानवाचे मानवी कर्तव्यच आहे

## अस्तित्वाचा व व्यक्तित्वाचा बोध

नावात काय आहे हा अगदी सहज उद्भवणारा सामान्य प्रश्न पण त्याचे समाधानकारक उत्तर चटकन देणे वाटते तितके सहज सोपे नाही तत्त्वाच्या दृष्टिकोणातून अभ्यास करणाऱ्याना सुद्धा नावाच्या अस्तित्वाची दखल घेतल्या-शिवाय पुढे सरकता येत नाही न्यायशास्त्राच्या पद्धतीने विचार करणाऱ्या प्रज्ञावतानी **'समस्ति वचनं वाच्यमिति ।'** असे म्हटले आहे कारण नावामध्ये नामधारकाचे अस्तित्वच सामावलेले असते नावाच्या स्वरूपावरून ते नाव धारण करणाऱ्या तथ्याचे बोध होण्यास नाव हे प्रमुख साधन म्हणून उपयोगी पडते म्हणजेच नाव बोधवाचक आहे कोणत्याही तथ्याचे ज्ञान करून घेण्यासाठी किंवा त्यासबधी असलेले ज्ञान वाढविण्यासाठी नावासारखे मूलगामी असे दुसरे निश्चित साधन उपलब्ध नाही. कोणत्याही अपेक्षित तथ्याचा नुसता अस्पष्ट विचार करावयाचा झाला तरी पहिली गरज भासते ती नामकरणाचीच. तथ्याचा बोध अपूर्ण असतानाही बोध करून घेण्याचा एक मुळारभ म्हणून देखील नामकरणाची पहिली पायरी चढावीच लागते. तथ्य संपूर्णपणे साकार होत नाही तोपर्यंत त्याला अवयवशून्य सामान्य आकार देण्याचा पहिला प्रयत्न होत असतानाच जेव्हा नामकरणाचा प्रसग उद्भवतो तेव्हा त्या प्रथमावस्थेत अवयवशून्य असे केवळ अ, ब, क इत्यादी कक्षारहित निराकार संज्ञा देण्याची आवश्यकताही टाळता येत नसतेच. पुढे त्या तथ्याची कक्षा जसजशी दृष्टिक्षेपात येऊ लागते त्या त्या प्रमाणात त्या तथ्याला आकारात्मक संज्ञा प्राप्त होत राहतात त्या विशिष्ट आकारमानाला अनुसरून दिलेल्या नावामुळे त्या ज्ञेय तथ्याची अभिव्यक्ती साकार होत जाते

याच हेतूच्या सिद्धीसाठी प्रत्यक्ष भेट देऊन पाहणी करण्याच्या अगोदरही दुर्बीणीच्या दृश्याला अनुसरून चंद्रावरच्या निरनिराळ्या स्थलाना, त्याचा प्रत्येकी अलग अलग बोध होण्यासाठी, निरनिराळी नावे देण्यात आली आणि अलिकडे नग मगळावरील काही स्थलानाही अरबाची खाडी, मोत्यांची खाडी अशा प्रकारच्या

प्रथमाववोधदर्शक नावाचा उपयोग करण्यात आला आहे त्यावरून त्या त्या ठिकाणाच्या स्वरूपाचे यथार्थ ज्ञान झाले नसले तरी त्याच्या वेगवेगळ्या अस्तित्वाचा वोध होण्यास निश्चितपणे मदत होते. त्याचे अस्तित्व दुसऱ्या तथ्यापासून वेगळे जाणवते. असा वेगळेपणा प्राप्त झाल्यावर त्यातील गुणाचा अधिक वोध होत राहतो शेवटी त्यातील विशिष्ट गुणावरून किंवा इतर काही वैशिष्टयावरून त्याला स्वतत्र असे वेगळेच अस्तित्वदर्शक किंवा गुणदर्शक अभिधान प्राप्त होते आणि त्या विशिष्ट नावावरून पुढे त्याची ओळख पटत राहते त्यातील उपयोगिता प्रत्यक्षात आणणे सोपे जाते त्याचे ज्ञान दुसऱ्याला करून देताना देखील त्याच्या त्या विशिष्ट नावापासूनच सुरवात करावी लागते तेव्हा नावामध्ये जे काही आहे ते हेच– त्या त्या तथ्याचे वैशिष्ट्यपूर्ण अस्तित्व. म्हणून अस्तित्वाला जे काय महत्त्व आहे तेच महत्त्व नावाला व नामकरणविधीलाही आहे

## 'भरत' नामकरणाचा उपयोग

ज्ञेय तत्त्वाचे स्वरूप पूर्णपणे आकलन होण्यासाठी अस्तित्व, सख्या इत्यादी ज्ञानमार्ग सर्वमान्य झाले आहेत त्यामध्ये **क्षेत्राभिधानही** तितकेच महत्त्वाचे असते क्षेत्राच्या नावाच्या ज्ञानाशिवाय मूळ तथ्याच्या अस्तित्वालाच धोका निर्माण होतो निवासभूमीसवधी जो विवाद निर्माण होतो त्याचा परिहार करण्यासाठी तथ्याच्या निवासक्षेत्राचे विवरण अटळच असते म्हणून '. **निवासविप्रतिपत्तेः क्षेत्राभिधानम्।'** या पायाशुद्ध ज्ञेयमार्गाचा अवलव आवश्यक आणि क्रमप्राप्तच आहे यामुळेच कशाचेही ज्ञान परिपूर्ण होऊन तत्त्वरुची, मनाचा निश्चय आणि कार्यप्रेरणा इत्यादी-रूपाने ते सफल होते वाझ आशा आणि आळशी प्रयत्न अशा प्रकारची आपत्ती नष्ट होते

अशा रीतीने नामकरणाचे वैचारिक आणि व्यावहारिक असे दोन्ही उपयोग सर्वमान्य आहेत. अचेतन वस्तूपेक्षा सचेतन व्यक्तीच्या नावाला निराळेच महत्त्व प्राप्त होत असते कारण त्या नावामध्ये त्या व्यक्तीचे व्यक्तिमत्व उतरत असते त्याचे महत्त्व व मूल्य अनेकप्रकारे वाढत असते. ओज आणि आकर्षण ही दोन त्याच्या मूल्यमापनाची साधने जे नाव व्यक्तीवरोवर नष्टप्राय होते त्या नावाची किंमत उरत नसते हे खरे असले तरी जे नाव लौकिकाच्या रूपाने मागे उरते, स्वत च्या ओजोगुणाने मागच्याना चेतना देत राहते, ज्याचे नव्याना सदैव आकर्षण वाटत राहते, ते नाव स्मृतीच्या रूपाने कायम वाढतच राहते कारण त्या नावाला सास्कृतिक मूल्य प्राप्त होते मानव सस्कृतिप्रधान असल्याने तो अशा नावापासून स्फूर्ती स्वीकारीत असतो **अशी नावे स्फूर्तीची व चेतनेची उगमस्थाने वनून**

राहतात म्हणून अशा नावाना ऐतिहासिक व सांस्कृतिक महत्त्व प्राप्त होत असते व ते सारखे वाढतही राहते आणि मनोग्लानी निर्माण होत असताना तिचे निवारण करून पुढील पिढीला त्यातील चेतनेचा फायदा होण्यासाठी तिला उजाळा देत राहणे हे सुसंस्कृतपणाचे एक महत्त्वाचे लक्षण आहे

असा उजाळा देण्याचाच हा एक अल्पसा प्रयत्न प्रस्तुत आहे कारण **भरत हे नाव तितकेच महत्त्वपूर्ण** आहे आज लाखो वर्षे त्या नावाची कीर्ती टिकून राहिली आहे त्या नावाचे आकर्षणही कमी झालेले नाही परंतु त्यापाठीमागील व्यक्तित्व जाणून बुजून पुसट करण्याचा प्रयत्न सतत होत आहेत. कधी त्या नावाला वेगळाच मुखवटा घालण्यात येतो, कधी त्याचा काल व कर्तबगारीही विपर्यस्त करण्यात येते, तर केव्हा त्या नावाचा एखादा तोतयाच निर्माण करण्यात येतो बुद्धिपुरस्सर वस्तुस्थितीकडे डोळेझाक करणे तर नित्याचेच होऊन बसले आहे एकप्रकारे हा पूर्वीपासून चालत आलेला सांस्कृतिक उच्चतेचा झगडा आहे पण आजच्या युगात उच्चतेच्या नुसत्या वल्गना करून चालत नाही ज्याच्या त्याच्या मानवी कर्तबगारीवर उच्चता आपोआपच ठरत जाते म्हणून खऱ्या कर्तबगार व्यक्तीचा खरा परिचय करून देण्याचा हा मानस

## संस्कृतीतील ओजस्वी प्रक्रिया

कधी कधी तर नावाला इतके महत्त्व प्राप्त होते की केवळ त्या नावामुळेच एखाद्याचे अस्तित्व सिद्ध होते ज्याचे नाव अज्ञात असते ती व्यक्तीही अज्ञातच राहते **नावाशिवाय तथ्याचे अस्तित्वच धोक्यात येते.** नावामध्ये निराकार वस्तू साकार करण्याचे सामर्थ्य आहे सामाजिक जीवनामध्ये तर नावाला फारच महत्त्व असते नावाच्या अभावी सामाजिक हक्क व महत्त्व प्राप्त होत नाहीत. कित्येक वेळा व्यवहारसुद्धा सिद्ध होऊ शकत नाही गुण व कर्तृत्व मोठे असले तरी नावाच्या अभावी सामाजिक, राष्ट्रीय व राजकीय अस्तित्व उरत नाही, तेथील व्यक्तित्व नष्ट होते, त्याचे अस्तित्व विशाल जनसमुदायामध्ये विलीन पावते या अनादि-अनंत कालप्रपंचामध्ये निर्माण होत असलेल्या अफाट जनसमुदायातून विशिष्ट व्यक्तीला वेगळे काढून दाखविणे नावामुळेच शक्य होते **सामान्यापासून विशेषत्वाकडे जाण्यासाठी नामकरण एक प्रक्रिया** आहे नाव हेच व्यक्तीचे किंवा वस्तूचे पहिले वैशिष्ट्य असते

**अर्थाचा बोध करून देण्याचे एक तत्त्व म्हणजे नाव** नामकरण म्हणजे याच तत्त्वाचे अनुकरण अर्थ-बोधात्मक पदावली अनेक प्रकारचीही असू शकते परंतु सामान्य ग्रहणासाठी सामान्यत निर्देश्य तत्त्वाच्या केवळ निर्देशनासाठी ज्या पदाची वारवार पुनरावृत्ती होत असते त्या पदाला वा शब्दाला नाव असे म्हणतात

नामशब्द सांकेतिक व सार्थक असतो त्यात एक किंवा अनेकही पदे असतात त्यामुळे विशिष्ट वस्तूचा वा व्यक्तीचा परिचयात्मक बोध होतो नामकरण हा एक सांस्कृतिक जीवनामधील अत्यंत उपयुक्त प्रकार आहे बोधप्रिय संस्कारी मानवांनी त्याचा उपयोग सतत केला आहे नावाची व नामगत वस्तूची संलग्नता कायम राखण्याकडेच सामान्यत कल असतो व्यक्तीचे जीवन संपल्यावरही स्मृतीच्या आधारासाठी नाव महत्त्वाचे कार्य करीत असते. म्हणून नाव कीर्तिदायक व स्मृतिप्रद आहे नाव अजरामर होणे हे लोकप्रियतेचेच नव्हे तर त्यातील संस्कारात्मक जीवनमूल्याचेही प्रतीक आहे

जीवन आनंदमूलक आहे तर अशी ओजस्वी नावे आनंददायक असतात. नामजपामध्ये आणि गुणकीर्तनामध्ये हृदयाची कोमलता आणि गुणवत्सलता प्रगट होत असते प्रत्येक समाजामध्ये या प्रकाराला मानवी दृष्टिकोणातून महत्त्व देण्यात येते या सर्व भावना व्यक्त करण्याचे मुख्य साधन म्हणजे नाव. व्यक्तिवाचक, समाजवाचक, समूहवाचक, कुलवाचक, व्यवसायवाचक, गुणवाचक, प्रवृत्तिवाचक, व्यंगवाचक, पदवाचक अशी अनेक प्रकारची नावे आढळतात ती सांस्कृतिक जीवनाच्या व्यापारातून व्यवहाराच्या उपयोगासाठीच निर्माण झालेली असतात भारतीयता स्पष्टपणे व्यक्त करणाऱ्या काही नावांचा अभ्यास करणे इतिहासाच्या दृष्टीने उपयुक्त ठरल्याशिवाय राहात नाही कारण अशा नावात अमूल्य अशी आपली पूर्व संस्कृती अदृश्य स्वरूपात विखुरलेली असते नावे म्हणजे संस्कृतीचे प्रतीकात्मक अवशेषच होत. भारतीय संस्कृती व तिचा तथ्यरूप इतिहासच या नामलिपीमध्ये कोरलेला आढळतो -या नावाचा जन्म विशिष्ट प्रकारच्या जीवनपद्धतीतून झालेला असतो म्हणून त्या जीवनपद्धतीच्या अभ्यासाला ती उपयुक्त माहिती पुरवितात. निरनिराळ्या संस्कृतिप्रवाहाच्या दिशा उमजतात, त्यातील संघर्षाची मूल तत्त्वे कळतात, त्यांची संगमोत्सुकता दृष्टोत्पत्तीस येते सांस्कृतिक जीवनाच्या विविधतेचे व एकतेचेही सूचक विधाने आढळतात नावावरून प्रादेशिक स्थानाचाही सांस्कृतिक अभ्यास करता येतो नावाच्या अर्थाचा मूलाधार स्वीकारून उच्चारभेदांचा अभ्यास केला तर भाषेची विविध रूपे ओळखू येतात भाषाशास्त्रीय अभ्यासाला भक्कम पाया लाभतो. थोडक्यात लोकांची नावे ही त्यांच्या त्यांच्या संस्कृतीचो जिवंत स्मारकेच असतात आणि त्यातूनच स्थळांचीही नावे प्रादुर्भूत होत असतात यापैकीच एक भरतवर्ष !

## वर्षनामकरणाचा इतिहास व संस्कृतीचा अभ्यास

आज जगातील कोट्यावधी नव्हे अब्जावधी लोक आपल्या या भूमीची भारत ही संज्ञा जाणतात. परंतु या भूमीच्या अशा प्रकारच्या नामकरणाचा खरा अर्थ आणि त्याचा इतिहास किती लोकांना माहीत आहे ? काहीजण प्रयत्न

करतात पण त्यापैकी पुष्कळाचा प्रयन्न यथार्थ नसतो खरा इतिहास बाजूला सारून त्यामध्ये अघटिताचा अर्थ घुमडविण्याचा प्रयत्न करतात परतु त्यातील सत्य खऱ्या जिज्ञासूना खुपल्याशिवाय राहात नाही प जवाहरलाल नेहरू एकदा म्हणाले होते– राजेरजवाड्याचा इतिहास, सस्कृतीला उपयोगी अशा शोधघटनाचा इतिहास, साहित्याची परपरा इत्यादी सगळ्या प्रकारचे इतिहास लिहिले जातात पण चहा, कापूस इत्यादी मानवी गरज-वस्तूचा इतिहास कोणीच लिहीत नाही असा इतिहास लिहून काढणे म्हणजे पर्यायाने मानवी सस्कृतीचाच इतिहास लिहिल्यासारखे होईल ! यात्र दृष्टीकोणातून आपल्या देशाच्या नामकरणाचा इतिहास हा आपल्या सस्कृतीचाच इतिहास आहे या नावाची चर्चा प्रसगोपात्त केलेली आढळते पण ते सर्व त्या त्या लेखकाच्या मनाचे अदाज आहेत त्यात खऱ्या घटिताचा इतिहास नाही अदाज करण्यामागे त्याचे मनही स्वच्छ नाही आणि तो अदाज अभ्यासाच्या तत्त्वाला अनुसरूनही नाही म्हणूनच आपल्या मातृभूमीच्या नावासबधी सुसबद्ध व पुराव्यानी परिपुष्ट अशी विस्तृत माहिती सर्वांना ज्ञात नाही तेव्हा ही अज्ञानाची दरी ओलाडून पार करण्याचा हा प्राजळ प्रयत्न आहे.

कोणतीही भूमी प्रसिद्धीस येते, तिला पोसण्यात येते, तिचे प्राणपणाने रक्षण करण्यात येते तेव्हा मानवाला मानवी सस्कृतीच्या दृष्टीने ती उपयोगी असते म्हणूनच सास्कृतिक प्रगतीसाठी व मानवी सुखासाठी सत्य, मनाचा सरळपणा, शाति-समाधानाला पोषक असा सुदृढ आचार, त्या त्या गुणाच्या पोषणासाठी महान तपश्चर्या, सतत प्रयत्न व त्या प्रयत्नाची कठोर दीक्षा, यथार्थ ज्ञान, नम्र आराधना इत्यादी गोष्टी अत्यत आवश्यक असतात अशा गोष्टी जेथे अखड परपरेने साभाळलेल्या असतात ती भूमी सुसस्कृत मानवाला प्राणप्रिय ठरते कारण मानवाला आवश्यक असणाऱ्या गुणाची व त्याच्या अतूट परपरेची बीजे धारण करण्याचे कार्य ती भूमीच करीत असते त्या बीजाना तेथेच नवा अकुर फुटतो, तो अकुर पालवतो, तरारतो, बहारतो, फुलतो व फलतोही आणि त्या फळातील बीजे पुन्हा त्या भूमीत मुरतात, अकुरतात आणि नवी फळे धारण करतात अशा चक्र-परिवर्तनाच्या परपरेसाठी केवळ भूमीच सर्वसमर्थ असते अशा गुणाची धारक व सर्व जीवाची पालक अशी जीवनदायी भूमी कोणाला प्रिय वाटणार नाही ? म्हणून अथर्व-वेदातसुद्धा म्हटले आहे की–

> सत्यं बृहदृतमुग्रं दीक्षा तपो ब्रह्म यज्ञः पृथिवीं धारयन्ति ।
> सा नो भूतस्य भव्यस्य पत्न्युरुं लोकं पृथिवी नः कृणोतु ॥
>
> – अथर्ववेद १२/१/१.

भूमी अशा गुणाची धारक व पालक असली तरी त्या गुणाचे पितृत्व व विधातृत्व मात्र लोकोत्तर पुरुषाकडेच असते भूमी सर्वांना आधार देत असते परतु हा आधार-आधेय-सबध वेगळा काढता येत नाही एकमेकाशिवाय शिल्लक उरलेल्याचे अस्तित्व देखील जाणवणार नाही **म्हणून भूमीच्या नावाचा इतिहास म्हणजे त्या नावाचा स्वामी असलेल्या गुणश्रेष्ठ पुरुषोत्तमाचाच इतिहास होय.** आपल्या भूमीच्या नावातील '**भरत**' या सज्ञेचा धारक **ऋषभपुत्र भरत** आहे तो सर्व दृष्टीने उत्तम पात्र असून आवश्यक अशा सर्व गुणाचा आधारस्थान आहे **या भूमीवरील संस्काराची परंपरा त्याचीच आहे** यात तिळमात्र शका असण्याचे कारण नाही पण हा सर्व इतिहास ज्याना माहीत नाही अशाच्या माहितीसाठी आणि ज्याना पुरावे, पुराव्याची अखड परपरा आणि त्यातील सुसगत एकवाक्यता प्रत्यक्ष पहावयाची आहे त्याच्यासाठीच हा प्रमाणभूत पुराव्याचा ठेवा सादर करीत आहे

भारतीय सस्कृति-निदर्शक अशा थोर नावामध्ये भरताचे नाव अग्रगण्य आहे. पण सध्याच्या युगामध्ये त्या नावाला ग्लानी आली आहे त्या नावाच्या सास्कृतिक महिमेचा एक थड गोळा होऊन पडलेला आहे. त्या नावाला चेतना देण्यासाठी सतत विचार करीत असताना आणि त्या नावाच्या इतिहासाचा शोध घेत असताना जी माहिती विविध ग्रथामध्ये उपलब्ध होऊ शकली तिचे येथे सपादन केले आहे

## भरतस्मृती एक प्रेरणाशक्ती

दारिद्र्याने सस्कृतीचे अकुर होरपळतात. त्यागी आणि गुणज्ञ माणसांचा अभाव तीव्रतेने जाणवू लागतो त्याचप्रमाणे पूर्व इतिहास माहीत नसेल तर स्वत्वाची जाणीव निर्माण होत नाही. पारपरिक गुण विकसत नाहीत मालक असूनही गुलामाची अवस्था प्राप्त होते उपकारक असूनही उपकृताची दयनीय दशा येते उपकृताचेच उपकार मानण्यात मन जडावते त्याची चेतना मदावते ही चेतना उत्तेजित करण्याचे कार्य प्रेरणेशिवाय होत नाही सर्व गति-प्रगतीच्या मुळाशी स्वत्वाची जाणीव व प्रेरणा अत्यावश्यक असतात मेंढ्याच्या कळपात वाढणाऱ्या सिंहाच्या छाव्याला सिंहनाद ऐकल्यामुळे प्रेरणा मिळून त्याला स्वत च्या सत्त्वगुणाची जाणीव होते सिंहनाद स्वत काढण्याची जबर ऊर्मी उसळून येते तो मेंढ्यापेक्षा वेगळी क्रिया करण्यास प्रवृत्त होतो त्याला सिंहनाद जमतो त्यामुळे तो त्या क्षुद्र कळपातून मुक्त होऊन वनाचा राजा बनतो **तसेच नराचा नारायण होणे असेल तर ही प्रेरणाशक्ती जपली पाहिजे** हा सस्कृतीचा वारसा पुढील पिढीपर्यंत पोहोचविला पाहिजे. हेच तत्त्व आपल्या निवासभूमीच्या

नावाच्या चिकित्सेमध्ये सामावलेले आहे ही भरत-प्रेरणाच या प्रयत्नामागील मनोदय आहे

या शोधाने आनुषगिक अशा अनेक अगोपागाची माहिती होऊन अनेक दृष्टीने त्याचा फायदा होतो आजचे युगच सशोधनाचे आहे चार-पाच अब्ज वर्षांपूर्वी घडलेल्या विघिघटनेमुळे 'आपली पृथ्वी आणि सूर्यमालिका तयार झाली असावी' या कल्पनेसवघी महत्त्वाची माहिती मिळविणे हाच हेतू अपोलो १५ आणि इतर सर्व अतराळ वीर याना उत्क्षेपित करण्यामध्येही आहे अशा वेळी आपल्या भूमातेच्या नावाची चिकित्सा केली तर ती सुसह्य व्हावी ही अपेक्षा

## 'भरत' संज्ञेच्या वारसाहक्काचा झगडा

परिणमन हा काळाचा मोठा प्रभावी धर्म आहे त्याच्या कक्षेतून कोणतेच तथ्य सुटत नाही मग देश त्या कालपरिणामापासून कसा मुक्त राहील ? आपल्या देशाच्या स्थित्यतराची जी गोष्ट तीच या देशाच्या नावाचीही आपल्या देशाचे नाव निश्चित करण्याचे अनेक प्रसग उद्‌भवले. त्या त्या वेळी आपापल्या हेतूप्रमाणे अनेकानी विविध नावे प्रस्तुत केली त्यातील सर्वात मोठा प्रसग म्हणजे **घटना-समितीने** आपल्या स्वतत्र देशाची पहिली घटना तयार केली त्यावेळचा अनेक विचारप्रणालीतून **इंडिया** अर्थात **भारत** अशी जोड नावे स्वीकृत ठरली त्यातील **भारत** किंवा **भरतवर्ष** या नावामागे आपल्या सास्कृतिक जीवनाची फार मोठी परपरा विद्यमान आहे त्या परपरेचे सामर्थ्य इतके मोठे आहे की, ते प्रयत्न करूनही टाळता येत नाही आणि स्वीकारतानाही त्यातील हक्कदाराचा वारसा कित्येकाच्या मनाला पीळ पाडल्याशिवाय राहात नाही म्हणून या पीळ पडलेल्या मन स्थितीतूनच काही दुराग्रह उद्‌भवलेले आहेत प्रत्येक चागल्या गोष्टीवरचा हक्क आपला असावा असे प्रत्येकालाच वाटत असते परतु ज्याचा त्याचा खरा वारसा हक्क मान्य करणे हा आपल्या सस्कृतीचा मूलगुण आहे त्यासाठी मन मोठे करण्याची एक प्रकारची पात्रता असावी लागते तथापि सध्याच्या सवच भारतीयाचे मन एवढे उदात्त बनले आहे असे नाही त्यामुळेच आपल्या निवास भूमीच्या नावाच्या इतिहासाची ओढाताण चालू आहे

'**भारत**' ह्या नावाचा आधार **भरत** आहे हे मात्र सर्वमान्य आहे याच भरतवर्षामध्ये **भ महावीर** जन्मास आले आणि त्यानी आपले अमोल कर्तृत्व मागे ठेवून पारपरिक प्रणालीमध्ये नावानुरूप भर घातली आहे आपलाही वारसा तोच आहे भ **महावीराचा** जन्म त्याच **इक्ष्वाकू** वशामध्ये झाला की ज्या वशाची सुरवात भ **ऋषभनाथापासून** झाली आहे. त्याच **ऋषभनाथाचा** या जगातील पहिला अभिषिक्त राजा असा उल्लेख सर्वच पूर्व साहित्यात मिळतो त्यापूर्वी

त्यांचे वडील नाभिराज हेही प्रजापालनाच्या दृष्टीने त्याच्या पूर्वीच्या सर्व कुलकराप्रमाणे समाजधारणेचे कार्य करीतच होते. पण कालमानाला अनुसरून दण्डनीती, समाजधारणा, जीवनोपायाची पूर्ती, कर्तव्यकर्मातील श्रमविभागणी, जीवनाची प्रगती इत्यादी बाबीतील समाजप्रमुखाचे कार्य कालपरिणतीला अनुसरून जास्त वाढल्याने प्रजापालनाबरोबरच प्रशासनाच्या महत्त्वाच्या क्षेत्रातील जबाबदारी हा, मा, धिक् या राजनीतीच्या त्रिकोणी कक्षेपेक्षा जास्त वाढली. आणि परिभाषणा, बध, प्रक्षेप, आणि छविच्छेद या दण्डनीतीच्या मर्यादेपर्यंत ती क्रमाक्रमाने वाढत गेली. तेव्हा अभिषिक्त व मुकुटबद्ध राजाची गरज भासली

म्हणून लोकाच्या गरजेला अनुसरून नाभिराजाने समारंभपूर्वक राज्याभिषेक करून श्री ऋषभ कुमाराची स्थापना राजपीठावर करण्यास संमती दिली हीच राज्यसंस्थेची सुरवात होय नंतर या राज्यसंस्थेचा उत्कृष्ट आविष्कार ऋषभपुत्र भरत याच्या शासनकाळी झाला या इक्ष्वाकू कुळातील हा दुसराच राजा आपल्या पराक्रमाने व राज्यनीतीमधील कौशल्याने लवकरच सागरान्त भूमीतील षट्खण्डातर्गत सर्व देश-प्रदेश जिंकून पहिला षट्खण्डाधिपती चक्रवर्ती राजेन्द्र बनला याच महान राजामुळे या आपल्या भूमीला भरतवर्ष असे नामाभिधान प्राप्त झाले भरतानंतर त्याच्याच कुळामध्ये राजे, महाराजे, नारायण-वासुदेव, चक्रवर्ती इत्यादिक असंख्य राज्यकर्ते होऊन गेले त्याच परंपरागत इक्ष्वाकू वंशातील सिद्धार्थ राजाच्या पोटी भ महावीरांचा जन्म झाला त्याना मिळालेला वारसा त्याच्याच पूर्वजाचा आहे मात्र त्याबरोबर ते ऋषभदेवांच्या परंपरेतील शेवटचे तीर्थंकर होत नी क्षत्रिय श्रमणाची परंपरा तुटल्याने एक नवे युगपरिवर्तन घडून आले आहे

या नव्या परिवर्तनाला अनुसरून या देशाचे नामपरिवर्तन घडवावयाचेच असे मनात आल्यास या भरतवर्षाला वीरवर्ष म्हणावे लागेल! नाभिवर्ष-> भरतवर्ष-> वीरवर्ष अशी परंपरा केवळ सुसंगतच नव्हे तर युगानुसारी ठरेल! वैदिक पशुयज्ञाच्या पार्श्वभूमीवर भ महावीराचे कार्य केवळ युगप्रवर्तकालाच शोभेसे आहे अखिल मानवसमुहासाठीच नव्हे तर यच्चयावत प्राणिमात्रासाठी त्यांनी स्थापिलेले सर्वोदय तीर्थ आणि मानवी कल्याणासाठी त्यांनी सांगितलेली (१) परिग्रहपरिमाण, (२) परस्पर सहकार आणि उपकार, (३) मैत्रिभाव, (४) करुणाभाव आणि (५) परस्पर मत्सररहित अविरोधात्मक प्रगती ही पाच मूल्ये मानवाच्या जीवनामध्ये युगानुरूप नवा बदल घडवून आणण्यास सर्वसमर्थ आहेत या जीवनदर्शनामुळे स्वराष्ट्रीय समाजवाद साध्य होणे किती सुकर आहे! म्हणूनच ते खऱ्या अर्थाने या काळातील नवे युगकर्ते शोभतात आणि हे सध्य कालीन चालू तीर्थ वीरतीर्थच आहे भ. महावीर यांच्याबरोबरच पूर्वजन्मातील

भरतपुत्र असल्याने त्याना भरताच्या या वर्षातील नावाचाही वारसा मिळणे रास्तच आहे आपल्या देशाच्या नामांतरामध्ये सामान्य माणूस गोंधळून गेला तरी त्याचा पूर्वापर संबंध जाणून घेण्यामध्ये सुज्ञ अभ्यासूना निश्चित यश लाभते

## नामकरणाचा नाश=मूळ संस्कृतीचा नाश

अमेय कालाच्या दृष्टीने आपला इतिहास अगदीच बाल्यावस्थेत आहे त्याची कक्षा फारच त्रोटक आहे म्हणूनच इ सनपूर्व ३०० किंवा ५०० वर्षापेक्षा प्राचीन कालखंडाला आपण इतिहासपूर्वकाल म्हणतो इ सनपूर्व ५०० वर्षापासून मोगलकाळापर्यंत या देशावर उत्तरेकडून व पश्चिमेकडून आक्रमणे भरपूर झाली त्यापैकी जी स्थिरावली त्याचा येथील जीवनावर खोलवर परिणाम झाला संस्कृती, धर्म, विचारसरणी यात मोठी स्थित्यंतरे घडून आली या जीवनसंकराच्या प्रभावामुळे आपल्या आम्नायाचे, परंपरागत संस्कृतिरूप महावस्त्राचे ताणे आणि वाणे विस्कळीत होऊन त्याचा एक गुंता होऊन बसला तो सोडविता सुटत नाही मती गुंग होते त्या गुंगीतून बाहेर पडून शुद्धीवर येण्यास पूर्व साहित्य जरूर उपयोगी पडते मात्र त्याचा योग्य उपयोग करून घेण्याचे चातुर्यच नव्हे तर मनाचा सरळपणाही असणे आवश्यक आहे

भारतावरील आक्रमकामध्ये **ग्रीक, शक, हूण, मोगल-मुसलमान, पोर्तुगीज-फ्रेंच-इंग्रज** हेच प्रमुख आहेत असे नव्हे तर सर्वात प्रमुख **वैदिक आर्यच** होत ते इ सनपूर्व २००० वर्षाच्या सुमारास येथे आले असावेत ज्ञात इतिहासाप्रमाणे सर्वात अगोदर तेच आले त्यानी एतद्देशियाचा इतर सर्वापेक्षा जास्त पाडाव केला ज्याचा करता आला नाही अशाना शत्रुत्वामुळे हीन ठरविले त्याच्या संस्कृतीचे हनन करण्यासाठी त्याचा अनार्य, दस्यू, दानव इत्यादी प्रकारे कुत्सित उल्लेख करून या भूमीतील मूळ संस्कृतीची हत्या करण्याचा प्रभावी प्रयत्न केला इतकेच नव्हे तर ते स्वत च केवळ या भूमीचे एकमेव मालक अशा सोईस्कर समजूतीने मूळ प्रजेला परकीय ठरविण्याचा प्रयत्न केला या संग्रामात त्यानी साहित्य सामग्रीचा यशस्वी प्रयोग केला. जे कोणी नष्ट झाले नाहीत किंवा ज्याना परकीयही ठरविता येईना अशा वृत्रादिकाना राक्षस, दास, नीच, रानटी मानून त्याच्या जीवनाचा, संस्कृतीचा व परंपरेचा घात केला

त्याच्यानंतर जे कोणी **यवन-तुर्कादिक** आक्रमक आले त्याचा परकीय म्हणून द्वेष करता करता येथील जी मूळ प्रजा तीही त्याची शत्रू बनली होती त्याचा आणि येथे जी मूळची प्रभावी संस्कृती नांदत होती तिचाही परकीय म्हणून उल्लेख करण्यास प्रथम त्यानीच सुरवात केली आपले सर्व शत्रू दुष्ट व असंस्कृत आणि जे शत्रू ते सर्व परकीय हा नवा विचार किंवा जीवनसिद्धांत प्रस्तुत केला

तो पोसवलाही आपल्या साहित्यातून त्याची जोपासना केली जिताची संस्कृती जिवत राहणे तर दूरच राहो पण त्याचे केवळ मृत अवशेषही शिल्लक राहणे दुरापास्त होते विजयाचीच मशाल तेवत राहते तर पराभूताचा नंदादीपही सग्रामीय-शत्रुत्वाच्या झझावातामध्ये विझून जातो मग विजयी मशालीलाच प्रतिष्ठा प्राप्त होते. लोक कालातराने त्यालाच नदादीप म्हणू लागतात हा मानवी इतिहास आहे अशा रीतीने प्रतिष्ठा पावलेल्या वैदिक आर्यांच्या साहित्याला चागला काळ लाभला त्याला उजाळा मिळाला त्याच प्रकाशातून जे कोणी या भूमीची मूळ सस्कृती वाचतात त्यांना, त्या मूळ पणत्या फुटक्या झाल्याने, तेथे स्नेह सापडत नाही. तीच अवस्था आज भारतीय जीवनाची झाली आहे पण आकाशात तेजोगोल असख्य आहेत त्याप्रमाणे मूळ सस्कृतीच्या ज्योतीही आपल्या ओजोगुणाने अनेक ठिकाणी तेवत आहेत त्या कदाचित् आपल्या दृष्टिक्षेपाच्या पलीकडे असतील ! म्हणून त्या नाहीतच असे म्हणणे ही घुवडाची प्रवृत्ती होय कोणी तरी केवळ टोळे-झाक केल्यामुळे ज्योतीचा प्रकाश फैलावल्या-शिवाय कसा राहील ? दृष्टीची झेप वाढवा म्हणजे असेल तेथून ते दिसेल !

## नामकरणद्वारे मूळ संस्कृतीचे पुनरुज्जीवन

या सस्कृतिहननाचाच एक मोठा परिणाम म्हणजे जैनधर्म हा एक हिन्दु-धर्माचाच उत्तरकालीन पथभेद ठरविण्याचा अट्टाहास भ महावीर युगादिराज भ ऋषभाच्याच इक्ष्वाकू वशातील एक राजकुलीन महापुरुष आणि जैनतीर्थ-परपरेतील २४ वे तीर्थंकर हे सूर्यप्रकाशाइतके स्पष्ट असतानाही महावीरानाच प्रथम जिन समजून विपरीत इतिहास घडविण्याचा व तो प्रस्थापित करण्याचा सततोद्योग आजही पूर्णपणे थावलेला नाही वस्तुत जैन हे मूलत च या थोर देशाचे रहिवासी ते कधीही कोठूनही आले नाहीत ते कोणत्याही अर्थाने कोणत्याही काळी परकीय नव्हेत व आजही नाहीत ते केवळ भारतीयच आहेत सपूर्ण भारतात सर्वत्र स्थायिक आहेत हा त्याचा स्वत चाच देश आहे जी युगादिराज ऋषभांची भूमी, जिला भरत चक्रवर्तीच्या नावाने पुरातन कालापासून ओळखण्यात येते, तीच ही भूमी महावीराची आहे म्हणूनच या भूमीचा नव्याने उल्लेख वीरवर्ष असा करण्यात अभिमान वाटतो त्यामुळे जैनाच्या सस्कृतीवर व जैनाच्या युगादी परपरेवर मोठा प्रकाश पडतो सध्य कालीन जैनसस्कृती ही महावीरप्रणीत आहे. जैनांची चालू तीर्थपरपरा महावीराच्या विहारकाळी उदयास आली आहे म्हणून या तीर्थपरिवर्तनाला अनुसरून या परपरागत भरतवर्षाला वीरवर्ष हे नाव शोभून दिसण्यात प्रत्यवाय नसावा

पारशी लोक 'स' चा उच्चार 'ह' करीत असत त्याना आपल्या या देशाचा परिचय साहजिकपणे सिंधू नदीवरूनच झाला त्यामुळे त्यानी त्या प्रदेशाचे

नाव हिंदू असे रूढ केले. त्याच मार्गाने सपर्कात येणाऱ्या ग्रीकानी त्याचे आपल्या परीने रूपान्तर इंडू असे केले कालातराने या भूमीला इडिया, हिंदुस्थान, हिंदोस्तान अशा नव्या नावांनी परकीय लोक ओळखू लागले तरी एतद्देशियाच्या दृष्टीने या भूमीला भरतवर्ष एकच नाव अव्याहत आहे त्या नावाला कोणताच प्रत्यवाय नाही यामुळेच भरत या नावातील व्यक्तित्वच बदलण्याचे फुटकळ प्रयत्न होत आहेत. पण युगादिराज ऋषभपुत्र भरताशिवाय दुसऱ्या कोणत्याच अर्थाला किंवा व्यक्तित्वाला मुळीच आधार सापडत नाही वैदिक सस्कृतीच्या परपरेतही भरत या नावाला काही स्थान आहे हे खरे असले तरी त्यापैकी कोणत्याही व्यक्तीच्या नावाने ही भूमी ओळखली जात नाही कारण--

(१) ऋषभपुत्र भरतापेक्षा वाकीचे सर्व तथाकथित भरत नावाचे राजे वा वश कालमानाने फारच अर्वाचीन आहेत, तर या भूमीचे भरतवर्ष हे नामाभिधान त्या सर्वांपेक्षा फार पुरातन आहे

(२) शिवाय दुसरा कोणीही भरत या भूखडातील सपूर्ण षट्खडाचा अधिपती झाला नाही चक्ररत्नाची प्राप्ती झाली नसल्याने खऱ्या अर्थाने इतर कोणीही भरतसम्राट चक्रवर्ती झाला नाहीच ते सर्वजण लहान-मोठ्या प्रमाणात प्रादेशिक राजे किंवा महाराजे किंवा सम्राट एवढ्याच पदाला चढले ऋषभपुत्र भरत ज्या अर्थाने सपूर्ण वर्षप्राय भूमीचा एकमेव अधिपती झाला तसा दुसरा कोणीही भरत इतिहासाला माहीत नाही केवळ प्रशसार्थक एकछत्री राजा या पदाला कोणताही ऐतिहासिक किंवा घटनात्मक अर्थ उरत नाही

(३) आणि या अनेक भरतापैकी कोणाही एकाच्या नावाने ह्या भूमीचे नामकरण घडून आले असा कोणताही सशयातीत व खणखणीत पुरावा कोणत्याही स्वकीय किंवा परकीय ग्रथात सापडत नाही

(४) पूर्वकाळीच नव्हे तर आजही 'भरत' नाव धारण करण्याची सास्कृतिक धारणा जैनामध्ये जितकी अभिष्ट आहे तितकी ती वैदिक परपरेतील वशावळीत आढळत नाही त्या नावाचा आदर जैनानीच मनापासून केला आहे म्हणून भरतवाचक सज्ञा फक्त जैन व्यक्तीच्या व सस्कृतीच्या आविष्कारातच विद्यमान असलेली आढळते

(५) त्यापूर्वीचे नाव काही वेगळे असल्याचेही विधान वैदिक परपरेत मिळत नाही पश्चातकालीन इतर सर्व भरत नावाचे राजे व त्याचे पूर्वजही भरतवर्षातच राहात असत. उलट ऋषभपुत्र भरताच्याच नावाने ही भूमी प्रख्यात झाली असे स्पष्ट उल्लेख ऐतिहासिक घटनाचक्राला अनुसरून पाहिजे तेवढ्या

प्रमाणात भारतीय साहित्यात पुष्कळ ठिकाणी आढळतात अशा प्रकारचा वृत्तात आर्ष, प्राकृत, सस्कृत, हिंदी, कन्नड इत्यादी सर्वच भारतीय भाषेत नोदलेला आहे. प्राचीन ग्रथापासून अर्वाचीन साहित्यापर्यंत ह्या विधानाची परपरा अतूट आढळते.

(६) असे पुरावे फक्त जैनप्रणीत ग्रथातच मिळतात असेही नव्हे तर बौद्ध, आर्य, ब्राह्मण, हिंदू इत्यादिकाच्या साहित्य सस्कृतीमधूनही अव्याहत सापडतात अशाच काही साहित्याचा पुरावा आपल्या समोर सादर करीत आहे त्यामुळे वाचकाना व अभ्यासूना विचार करण्यास व योग्य त्या तथ्याचा अगीकार करण्यास खासच मदत होईल !



: १४ :

# स्थलनामकरण : एक दृष्टिक्षेप

लोकोद्देशनिरुक्त्यादिवर्णनं यत्सविस्तरम् ।
लोकाख्यानं तदाम्नातं विशोधितदिगन्तरम् ।।

– महापुराण, ४/४.

# १४ स्थलनामकरण : एक दृष्टिक्षेप

## नामकरणातील परंपरागत श्रद्धा

या प्रकरणामध्ये, कोणत्या ना कोणत्या प्रकारे जैनत्वाचे प्रतिबिंब ज्यामध्ये उमटलेले आहे, जैन संस्कृतीचा ठसा ज्यामध्ये आजही स्पष्ट दिसतो, ज्याचा केवळ उच्चार होता क्षणीच जैनत्वाची, जैनमय संस्काराची प्रतीती येते अशा प्रदेशाची व स्थलाची सुमारे ७-८ शे नावे वाचकासमोर केवळ परिसर-दर्शनासाठी सादर करीत आहे केवळ या वर्षप्राय देशाचेच नव्हे तर त्यातील काही देशविभागाची, स्थलाची, नगर-पेठ गावाची नावे जैन श्रद्धापरपरेतून चालत आलेल्या संस्काराचे प्रतीक ठरतील अशा पद्धतीने ठेवण्याची प्रवृत्ती या देशातील सामाजिक जीवनामध्ये एकरूप झाली आहे ती जी संस्कारात्मक प्रणाली निर्माण झाली त्यातही तीच स्फूर्ती आहे, तीच स्मृतिप्रियता आहे की जी **भरतवर्ष** किंवा **भारत** या अभिधानामध्ये अनुस्यूत आहे या सर्व नामकरणाच्या हेतूमागे एक निश्चित श्रद्धा आहे ती नामकरणाची संस्कृती काही एकाकी, अवचित, फुटकळ किंवा लहरीवजा घडलेली घटना नव्हे ! पुढील स्थलाची नावे नजरेसमोर स्थिरावली की भारताच्या स्थलनामकरणातील अतूट अशी एक सुनिश्चित ऐतिहासिक परपरा दृष्टीसमोर चटकन साकार होईल !

## वर्गीकरण

वाचकाच्या सोयीसाठी या नामावळीचे 'भ', 'र', 'त' असे तीन विभाग करून त्याची माडणी केल्याने वाचकाच्या विचाराला व प्रतिक्रियेला योग्य दिशा लाभण्यास मदत होईल अशी अपेक्षा आहे भरतवर्षाचा प्रादेशिक व्याप मोठा असल्याने त्या त्या नावाच्या मागे असलेले अधिष्ठान चटकन उमजण्यासाठी प्रत्येक

वेळी त्याची प्रातागणिक विभागणी केली आहे त्यामुळे या जैन नामसस्कृतीने एकूण किती प्रदेश व्यापला आहे, साधारणत प्रत्येक प्रातात त्याचा विस्तार किती कमी-जास्त प्रमाणात विद्यमान आहे हेही लक्षात येईल आणि जैन सस्कृती ही एका विशिष्ट भूभागाशीच निगडित नसून तिचे अस्तित्व भारतभर सर्वगामी आहे ही वस्तुस्थिती आणि त्यामागची मनोभूमिकाही स्पष्टपणे लक्षात येईल । ।

**भ** विभागामध्ये फक्त भरतस्मृतिवाचक स्थल नावेच सकलित केलेली आहेत आणि **र** विभागामध्ये वीर ( महावीर—वर्धमान ) – स्मृतिवाचक नावाचा सग्रह आहे वीराशी सबधित असलेल्या नावामध्येही सामान्यत व्यक्तित्वदर्शक किंवा व्यक्तिवाचक अशीच नावे स्वीकारली आहेत विशेषणात्मक वीर-युक्त नावे येथे स्वीकारलेली नाहीत कारण ती प्रवृत्तिदर्शकही असू शकतात. उदाहरणार्थ **वीरचद्र, वीरसिंह, वीरभद्र, वीरधवल, वीरराज, वीरनारायण, वीरदासपट्टी, वीरनाइकपट्टी** इत्यादि.

आणि **त** विभागामध्ये इतर सर्व जैनत्वदर्शक स्थलनामे सग्रहित केली असून त्यांचे पुन उपविभाग करून (१) व्यक्तिवाचक ( वीर आणि भरत वगळून ), (२) संस्कृतिसूचक आणि (३) विचारार्ह असे तीन प्रकारचे वर्ग पाडले आहेत या तिसऱ्या विचारार्ह नावाच्या उपविभागातील नावाचा सस्कृतिदर्शनाच्या दृष्टीने खरोखरच विचार करणे महत्त्वाचे आहे । । त्यातून जी संस्कृती निदर्शनास येते ती कोणत्या परपरेतील असावी या दृष्टीने अधिक अभ्यास होणे आवश्यक आहे. त्या अभ्यासातून अनेक गोष्टी नव्याने नजरेसमोर येतील आणि जैन संस्कृतीला पुष्टी आणतील अशी खात्री आहे म्हणून वाचकाना नम्र विनती आहे की त्यानी व इतर अभ्यासकानीही त्यावर खोल विचार करावा तेही एक सस्कृतीच्या सवर्धनाचे व सरक्षणाचेच कार्य आहे. व्यक्ति—वाचकामध्येही अगदी ठळक नावाचीच नोद घेतलेली आहे अशा प्रकारचा सास्कृतिक अभ्यास आजपर्यंत झालेला नाही हा पहिलाच प्रयत्न असल्याने त्यातील सविस्तृतपणाची मोठ्या प्रमाणात अपेक्षा नसावी । सस्कृतिसूचक सग्रहामध्येही जैन सस्कृतीची छटा जेथे स्पष्टपणे जाणवते अशीच नावे नोदविण्याकडे कल आहे उदाहरणार्थ भद्रशाल, जैनापूर, श्रवणबेळगूळ इत्यादि

**मर्यादीकरण**

विशेष म्हणजे जेथे जैन वा जैनेतर सस्कृतीचा ठसा स्पष्टपणे वेगळा करता येत नाही, किंवा जी नावे दोन्ही सस्कृतीमध्ये समान असणेही शक्य असेल, किंवा ज्याच्या बाबतीत विवाद निर्माण होऊ शकेल, अशी नावे सपूर्णपणे वगळलेली आहेत त्यातील चर्चात्मक अभ्यास येथे प्रस्तुतही नाही व अभिप्रेतही नाही तो

अभ्यास स्वतन्त्रपणे व्हावा ही अपेक्षा म्हणून अनंत, अशोक, मल्लि-मल्ल, गौतम, पद्म, सुमेरु, धर्म, देव, तीर्थ, सागर, राम, लक्ष्मण, सीता, बलभद्र-बलदेव, भद्र, कृष्ण, चक्र, सिद्ध, जंबू, शान्ति, सनत्, चद्र इत्यादीच्या सदर्भातील किंवा त्या परिसरातील नावे येथे अतर्भूत केलेली नाहीत

तरी पण काही नावातील अर्थाचा विचार प्रेरक ठरल्याशिवाय राहात नाही त्याच्या बाबतीत भाषाशास्त्रीय व सांस्कृतिक अशा दोन्ही दृष्टिकोनातून अभ्यास होणे आवश्यक आहे त्यासाठी अधिक सशोधनाची व चिकित्सेची गरज आहे. काही शब्द जैन प्रणालीचे एखादे ठळक वैशिष्ठ्य दाखवितात त्यातील निहित धारणा प्रेरकही असतात त्याकडे दुर्लक्ष करणे परवडणार नाही आज त्याचा वापर ज्या परिसरात होतो त्या ठिकाणी त्याचा प्रवेश का व कसा झाला असावा हा चितनाचा प्रमुख विषय ठरतो अर्थात हा अभ्यास अधिक व्यापक आहे. त्यासाठी अधिक कष्ट आवश्यक आहेत पण ते कष्ट उपमल्यास निश्चित सार्थकी लागतील ! वाया जाणार नाहीत !! वाणगीदाखल दोन-चार नावे प्रस्तुत करतो— बसव ( वृषभ ), बसई-बशी ( जैन मदिर ), अष्टी-ष्टे, मानपूर-मानभूम-माण-माणदेश, चउद्वार, विरौनी, वर्धा-वर्धापूर, बडनेरा इत्यादि

विशेषत. आन्ध्र-म्हैसूरमध्ये बसवपाटन, बसवपूर, बसवेश्वर इत्यादी बसव व्यक्तीवरून प्रचलित झालेली स्थलनामे किती तरी आढळतील ! बसव-सस्कृती ही वीरशैव लिंगायतांची प्रणाली म्हणूनच परिचित आहे इतिहासावरून हे स्पष्ट आहे की बसवेश्वरापासूनच त्या शैव-शाखेला चागला काळ लाभला पण बसव हे नाव व त्या नावाची प्रणाली त्याहून फार जुनी आहे. त्या नावातील सस्कृतीच्या प्रवाहावरून वृषभाची आठवण तीव्रतेने झाल्याशिवाय राहात नाही. अभ्यासूना त्यातून फार पुरातन काळाशी सपर्क साधणारा निश्चित दुवा सापडला तर त्याला निराळेच महत्त्व प्राप्त झाल्याशिवाय राहणार नाही !

मात्र ज्या नामकरणाच्या अभिप्रायामध्ये जैनत्वदर्शक असे तथ्य सापडतेच असे नाही तरी देखील ती नावे अर्थवाही असूनही त्यातील अर्थवाहित्व या ठिकाणी अभिप्रेत नसल्याने त्या स्थळ नामाचा या यादीत समावेश केलेला नाही पण यापैकी काही स्थळवाचके जैन सस्कृतीची अधिष्ठाने म्हणून दीर्घकाल प्रसिद्ध आहेत तेथील जैन घटनाचा इतिहास सर्वांना ज्ञात असून मान्य झालेला आहे तरी त्याच्या नामघटनेमध्ये मात्र जैनत्वाचे दर्शन होत नाही म्हणून या सकलनामध्ये— उदयगिरी, खडगिरी, हाथीगुफा, बराबर टेकडी, बडगोहाळी, पावा, चपा, हळेबीड, तीर्थहळ्ळी, मूडबिद्री, कुथलगिरी, कुडल, देवगड, तारंगा, अबू, शत्रुंजय, पालीठाणा, गिरनार-रैवतक, भारहूत, खजुराहो अशा नावापैकी फारच थोड्याचा

समावेश केलेला आहे कारण ही अशी यादी फारच मोठी होण्याची भीती आहे शिवाय मूळ उद्देश तो नसून ज्या स्थलांच्या नावाचीच निष्पत्ती मुळी जैन सस्कृतीच्या प्रभावातून प्रादुर्भूत झाली आहे अशाच स्थलनामकरणाचा विचार येथे प्रधान आहे, स्थलाचा इतिहास नव्हे ! नामकरणात्मक इतिहासाशी प्रत्यक्ष संबध असणे हेच एकमेव मूल्यमापन असल्याने बाकीची नावे प्रस्तुत अभ्यासाच्या कक्षेबाहेरचीच ठरतात

त्याचप्रमाणे मथुरा, काशी, मीरत अशा तीर्थक्षेत्राच्या नावानाही हाच न्याय. त्या ठिकाणी जैनत्वाचे दर्शन कितीही मोठ्या प्रमाणात होत असले तरी आणि ती स्थळे जैन इतिहासाशी– सस्कृतीशी निगडीत असली तरी, त्या स्थळाच्या नामकरणाचा इतिहास काही जैनमय नाही किंवा तसे सिद्ध झालेले नाही यास्तव अशी नावे येथे मुळीच विचाराधीन नाहीत

## सामग्रीचा अभाव

याशिवाय काही गावाची नावे नव्याने सुधारून त्याना सस्कृत स्वरूप देण्याचा प्रयत्न होत असतो नाद-ध्वनीला अनुसरून तो बदल पूर्वरूपाला जवळचा वाटला तरी सस्कृतीच्या अभ्यासाच्या दृष्टीने त्यात फार मोठा बदल घडत असतो तो वरवर पाहणाऱ्याच्या लक्षात सहजपणे येत नाही. एका अर्थाने ते संस्कृत रूप अगदी विकृतही होत असते. उदाहरणार्थ वऱ्हाडातील जुन्या चिखलदरा या गावाचे नवे नामकरण कीचकदरा असे केलेले आहे. त्याचप्रमाणे कुडिनपूर याचे नवे रूप कौंडिण्यपूर इत्यादि अशा फरकामुळेही मूळ रूपे सशोधकाला उपलब्ध होत नाहीत त्यामुळे ज्या गावाची अशी नवी रूपे प्रचलित झाली आहेत, पण ज्याची पूर्व रूपे नाम-सस्कृतीच्या दृष्टीने महत्त्वाची ठरली असती, अशी नावेही येथे नोंदता आली नाहीतच

माझ्या हातात सदर्भासाठी असलेल्या साधन–सामग्रीमध्ये अतर्भूत नसल्याने पाकिस्तान व बागला देश यामधील प्रदेश मी तपासून पाहू शकलो नाही विशेषत बागला देश, पजाब, सिंध, पेशावर इत्यादी ठिकाणी जैनत्वदर्शक नामसस्कृतीचा काही सुगावा लागणे शक्य आहे नेपाळ, भूतान, सिक्कीमचा प्रदेशही तपासणे याच कारणासाठी जमले नाही निदान नेपाळमध्ये तरी जैनत्वदर्शक नामसस्कृती आढळणे सहज शक्य आहे ! ऋषभनाथ–भरतचक्रीच्या कालापासूनच कैलास–अष्टापद भागाचा आणि राजधानी अयोध्येचा संबध फार जवळचा आहे भरतचक्रींचा तो एक नेहमीचाच तीर्थयात्रेचा मार्ग होता त्याचा कैलास-यात्रेचा मार्ग त्याच प्रदेशातून जात होता असाच सपर्क दीर्घकाळ टिकून राहणे अनैसर्गिक नव्हे ! तसे काही नसते तर निर्युक्तिकार आचार्य भद्रबाहू (इ. सनपूर्व ३–४ थे

गतक) एका विशिष्ट तपश्चर्येसाठी तिकडे गेलेच नसते !! आजही नेपाळच्या प्रदेशामध्ये भरतपूर, महावीर अशी स्थलनामे निश्चित आढळतात अशी नावे ठळकपणे जैन संस्कृतीची स्मृतिचिन्हे ठरतात

प्रत्यक्ष हाताळलेल्या प्रातापैकी काही प्रदेशातही, तेथील रूढ प्रादेशिक भाषेत एखाद्या नामाचे झालेले खास रूपान्तर ओळखणे मला कठीण गेले आहे कारण मी दक्षिणेकडील भाषा जाणत नाही म्हणून अशी नावे या ठिकाणी सादर करता आली नाहीत अशाच प्रकारची अडचण विशेषत आसाम, नागाप्रदेश, त्रिपुरा, मणिपूर, केरळ, काश्मीर, रोहिलखड, तामिळनाडू, तेलगण इत्यादी दूरवरच्या प्रान्तातील नावे तपासत असताना जास्तच जाणवते त्या अभ्यासासाठी त्या त्या भाषेचा विशेष अभ्यासू जाणकार जास्त उपयोगी ठरेल !

यापेक्षाही महत्त्वाची गोष्ट म्हणजे ज्या ठिकाणी पोस्ट ऑफिस नाही अशा हजारोच नव्हे तर लाखो स्थळाची नावे या प्रकारच्या निरीक्षणातून बाजूलाच राहिली आहेत त्याचा शोध घेणे स्वतत्र काम आहे त्याला इतर काही साधनाचीही गरज आहे पण तो अभ्यास करून पाहण्यासारखा आहे त्या अभ्यासाच्या प्रेरणेसाठीच मी हा प्राथमिक प्रयत्न येथे प्रस्तुत केला आहे म्हणजे ही नामस्वरूप जैन सस्कृतीदर्शक नावे फक्त नमुन्याचीच आहेत ही बाब विसरता येणार नाही !

शिवाय आपली सस्कृती विशाल–भारतीय बनली होती हे तथ्य आज इतिहासमान्य झाले आहे त्यामुळे भारताच्या भौगोलिक मर्यादेच्या बाहेरही अशी जैनसस्कृतीच्या प्रातिनिधिक नावाची उपस्थिती आढळणे शक्य आहे ! आदम सेतू (पाल्क सामुद्रधुनी), आदम डोगर (श्रीलका) मर्तबान (रगून खाडी), मानार खाडी (श्रीलका), मानार गाव (श्रीलका) इत्यादी नावाचा शोध घेणे शक्य होण्यासारखे आहे परतु हा अभ्यास दूरचा ठरतो प्रस्तुत अभ्यासाच्या मर्यादा इतक्या विशाल नाहीत

पुढील सर्वच नावाच्या सकलनासाठी The classified list of Indian Post offices and R M S. offices and Sections, Part I (April, 1966) या एकमेव साधन-सामग्रीचा विशेष उपयोग केलेला आहे यापेक्षा आधुनिक सामग्री मला दुष्प्राप्य ठरली आणि काहीही केले तरी अशी सामग्री अगदी अद्यावत ठरतच नसते अभ्यास नेहमीच मागे पडत असतो कारण पूर्वी घडलेल्या घटनाचा मागोवा घेणे हेच त्याचे कार्य असते म्हणजे गेल्या ७–८ वर्षांच्या कालावधीत जवळ जवळ दुपटीने वाढलेल्या पोस्ट ऑफिसाची नावे या निरीक्षणातून सुटून गेली आहेत नाही तर अशी नावे शेकड्यानीच नव्हे तर हजारोनी वाढली असती !!!

## पहिला विभाग

भ या पहिल्या विभागामध्ये जैन सस्कृतिदर्शक अभिधानापैकी फक्त भरत-स्मृति-लक्षणात्मक नावेच सग्रहित केली आहेत त्याची माडणी निरनिराळ्या प्रान्तानुसार केली असून त्या त्या इच्छित स्थळांच्या नावापुढे कंसामध्ये त्या त्या विभागातील मुख्य पोस्ट ऑफिसाचे नाव नोदविले आहे–

### – आसाम –

भरतसार दरबारी (आगरताला)

### – उत्तरप्रदेश –

भरतपूर (अलिगड)
भरतनगर (अलाहाबाद)
तडवा भरतपूर (अझमगड)
भरतेशगड (बरैच)
भरतहान (बालिया)
भरतकूप (बादा)
भरतवारी (बस्ती)
भरतौरा (मुरादाबाद)
भरतलमदपूर (मुरादाबाद)
भरतहान (इटावा)
भरतकुंड (फैजाबाद)
भरत (गाझीपूर)
भरतगार (गोरखपूर)
भरत (जोनपूर)
भरतपूर दरवाजा (मथुरा)
भरतीय (मथुरा)
भरत (सीतापूर)
भरतकलान (वाराणसी)

### – नेपाळ –

भरतपूर (काठमाडू)

### – ओरीसा –

भरतपूर (केन्द्रपारा)

### – काश्मीर –

भारतीपूर (अनतनाग)
भरतण्ड (उधमपूर)
भरोत (जम्मू)

### – केरळ –

भरतनऊर (त्रिवेन्द्रम्)

### – प बंगाल –

भरतगड (अलिपूर)
भरतपूर (बेरामपूर)
भरतपूर (बाल्रूरघाट)
भरतपूर (मिदनापूर)

## — पूर्व पंजाब —

भरतनगर (दिल्ली)
भरतगड (चंदिगड)
भरत खुर्द (जालंदर)
भरोत (मंडी स्टेट)
भरतनगर (लुधियाना)
भरोत (कर्नाळ)

## — विहार —

भरतखण्ड देवरी (भागलपूर)
भरतखंड नयावाद (भागलपूर)
भारथू (गया)
भरतपूर (पूर्णिया)
भरतपूर (छप्रा)

## — मध्यप्रदेश —

भरत-भारती (वैतुल)
भरतपूर (जवलपूर)
भरतपूर (रेवा)
सुखा भरतपूर (जवलपूर)

## — म्हैसूर —

भरतेश गुरुकुल (चिकोडी)
भारतीपूर (शिमोगा)

## — राजस्थान —

भरतपूर (जिल्हा)
भरतून (भरतपूर)
खर्डा भरत (जोधपूर)
भरत का गाव (जोधपूर)

## दुसरा विभाग

या दुसऱ्या र विभागामध्येही फक्त एकाच प्रकारची स्थलनामे संकलित केली असून ती सर्व **वीर-महावीर-वर्धमान** स्मृतिवाचक आहेत. वडगाव (<—वर्धगाव), वडवाणी (<—वर्धमाणी किंवा वर्धवाड – वाडी), वीड (<—वीर) अशा नावाची किती तरी मोठी यादी सादर करता येईल पण त्यासाठी ध्वनिशास्त्राचा अभ्यास करणे आवश्यक आहे. तो अभ्यास येथे प्रस्तुत नसल्याने असा प्रान्त वगळावा लागत आहे त्याशिवाय **मानवत, मानपूर, मर्तबान भानार, माण, माणदेश, मानेवाडी, माणगांव** यासारखी नावे मोठ्या प्रमाणात आढळतात। त्याचा संबंध वर्धमान या नामाशी असणे अगदीच अशक्य वाटत नाही त्याचाही अभ्यास होणे आवश्यक आहे आपण **महावीरतीर्थामध्ये** राहत असल्याने साहजिकच **वीरसंबंधी** नावाचा ठसा अधिक स्थळावर उमटलेला दिसणे कालानुसारी आहे संकलनाची पद्धत पहिल्या विभागाप्रमाणेच आहे—

## — आन्ध्र —

| | | | |
|---|---|---|---|
| वीरनाड-नड्डी | (अदिलाबाद) | वीरण्णकोलू | (कावळी) |
| वीरपुरम् | (अनतपूर) | वीरूर | ,, |
| वीरावासरम् | (भीमावरम्) | वीरेपल्ले | ,, |
| वीरागी | (चित्तूर) | वीरोळ | (खमाम) |
| वीरकनेल्लोर | ,, | वीरावळ्ळी | (नालगोडा) |
| वीरप्पनयुनिपल्ले | (चूडाप्पा) | वीरावोलू | (नद्याळ) |
| वीरावळ्ळे | ,, | वीरपुरम् | (नरसरावपेट) |
| वीरपालेम | (एलूरू) | वीरूर | (नेल्लोर) |
| वीरम्माकुत | ,, | वीरयपालेम | (ओनगोळे) |
| वीरण्णपेट | (हणमकोडा) | वीरण्णपालेम | ,, |
| वीरवल्ली | ,, | वीरावरम् | (राजमहेंद्री) |
| वीराराम | ,, | वीरमपालेम | ,, |
| वीरव | (काकिनाडा) | वीरघाटम् | (श्रीकाकुलम्) |
| वीरवाद | ,, | वीरलपालेम | (तेनाली) |
| वीरावरम् | ,, | वीरकुप्पम् | (तिरुपती) |
| वीरपुर | (करिमनगर) | वीरपानेनीगुडेम | (विजयवाडा) |
| वीरलपल्ली | ,, | वीरावळ्ळी | ,, |
| वीरावाम | (भीमावरम्) | | |

## — आसाम —

वीरेमा (कोहिमा)

## — उत्तरप्रदेश —

| | | | |
|---|---|---|---|
| वीरहार | (आगरा) | वीर | (बादा) |
| वीरथला | ,, | वीरदपूर | (बस्ती) |
| वीरपूर | (अलिगड) | वीरपूर | (गाझीपूर) |
| महावीरगंज | ,, | वीरहान | (कानपूर) |
| वीरपूर | (अलाहाबाद) | वीरहर | ,, |
| वीरपूर | (बरैंच) | वीरहान | (लखनौ) |
| वीरपूर | (बालिया) | वीरपूर | (प्रतापगड) |

## — ओरिसा —

| | | | |
|---|---|---|---|
| बरहान | (बल्मोरे) | वीरमाल | (नवळपूर) |
| वीरवाटी | (कटक) | वीरवीरा | ,, |

| | | | |
|---|---|---|---|
| वीरोल | (कटक) | वीरजाम | (सवळपूर) |
| वीरसाल | (ढेंकानाल) | वीरमित्रपुर | (सुदरगड) |
| महावीरोद | ,, | वीरकेश | ,, |
| वीरवाडी | (पुरी) | वीरद | ,, |

**— काश्मीर —**

| | | | |
|---|---|---|---|
| वीरपूर | (जम्मू) | वीरवाह | (श्रीनगर) |

**— केरळ —**

| | | | |
|---|---|---|---|
| वट्टमानपुरम् | (ओट्टापलम्) | वीरनकावू | (तिकौडा) |
| वीरमगलम् | ,, | | |

**— गुजरात —**

| | | | |
|---|---|---|---|
| विरमगाम | (अहमदाबाद) | वीरपूर | (हिंमतनगर) |
| वीरपूर | (अमरेली) | वीरपूर | (जुनागड) |
| वीरपूर | (आनद) | वीरनगर | (राजकोट) |
| वीरसाद | ,, | वीरपारद | ,, |
| वढवान | (भावनगर) | वीरपूर | ,, |
| वढवान | (वडोदा) | वीरपूर | (मोरवी) |
| वढवानीया | (वारडोळी) | वढवान | (सुरेन्द्रनगर) |
| वीरपूर | (भावनगर) | वीर | (भूज) |

**— नेपाळ —**

| | | | |
|---|---|---|---|
| वीरगज | (काठमाडू) | महावीर | (काठमाडू) |

**— प. बंगाल —**

| | | | |
|---|---|---|---|
| वीरकुलती | (असनसोल) | वीरखाम | (वकुरा) |
| वरद्वान अरह | ,, | वरद्वान | (वकुरा) |
| वरद्वान शिवपूर | ,, | वरद्वान | (जिल्हा) |
| वरद्वान | (राजभाटी) | वीरपूर | (कृष्णनगर) |
| वरद्वान | (विद्यापीठ) | वीरमपूर | (मालदा) |
| वीरमपूर | (हावरा) | वीरभूम | (पुरुलिया) |
| वीरपारा | (जलपैगुरी) | मान वझार | ,, |
| वीरनगर | (कृष्णनगर) | वीरभूम | (जिल्हा) |

## – पूर्व पंजाब –

| | | | |
|---|---|---|---|
| वीरपुरकलान | (भतिंडा) | वीर | (मंडीस्टेट) |
| वीरखुर्द | (लुधियाना) | वीरगड | (रामपूर) |
| वीरक | ,, | वीरवन | (रोहतक) |
| महावीर पार्क | (बहादुरगड - रोहतक) | | |

## – बिहार –

| | | | |
|---|---|---|---|
| महावीर आस्थान | (बकीपूर) | विरौली | (लहरियासराई) |
| वीरपूर | (बेगुसराई) | वीर | (पाटणा) |
| वीर | (गया) | वीरपूर | ,, |
| वीरनी | (हजारीबाग) | वीरनगर | (पूर्णिया) |
| वीरतपूर | (लहरियासराई) | वीरपूर | ,, |
| वीरपूर | ,, | वीरबकी | (रांची) |
| वीर शहर | ,, | वीरू | ,, |

## – मद्रास –

| | | | |
|---|---|---|---|
| वीरपण्डी | (कोईमतूर) | वीरकुडी | (नागापट्टिनम्) |
| वीरकेरलम् | ,, | वीरनामपलयम् | (नामक्कल) |
| वीरचोळगम् | (कुडालोर) | वीरगळपट्टी | (पोल्लाची) |
| वीरानदपुरम् | ,, | वीरपण्डी | (पाण्डीचेरी) |
| वीरमुदयनायम् | ,, | वीरनाम | ,, |
| नाडुवीरपट्टू | ,, | वीरमूर | ,, |
| वीरनामूर | ,, | वीरपेरुमानलूर | ,, |
| वीरपुरम् | ,, | वीरसोलापुरम् | ,, |
| वडाचल्लम् | ,, | वीरपट्टी | (पुडुकोट्टाई) |
| वीर मळाई | (धर्मपुरी) | वीरचिलाई | ,, |
| वीरक्कल | ,, | वीरनाम | (सालेम) |
| वीरपल्ली | ,, | वीरगणळर | ,, |
| वीरक्कल | (दिंडीगुल) | वीरगळ ळर | (तिरुचिरापल्ली) |
| वीरचिन्दपट्टी | ,, | वीराजी मगलम् | (तिरुपूर) |
| वीरमगलम् | (कांचीपुरम्) | वीरनामपलयम् | ,, |
| वीरनायळर | ,, | वीरमानदपलयम् | ,, |
| वीरलूर | (करूर) | वीरपण्डी | ,, |
| वीरनाम | (कोविलपट्टी) | वीरनदाल | (तिरुवन्नमलाई) |

वीरगनऊर (मदुराई)
वीरघनऊर ,,
वीरपण्डी ,,
वीरलऊर (तिरुवन्नमलाई)
वीरम्वकम् पुडूर ,,
वीरवामपेट (वेलोर)

## — मध्यप्रदेश —

वीरपूर (भोपाळ)
वीरखेरी चचाई (मोरेना)
वीरकोना (विलासपूर)
वीर (नीमच)
वीरकोनी (विलासपूर)
वडनूर (वैतुल)
महावीरगज (रायगड)
वीर (खाडवा)
वीरगाव (रायपूर)
वर्धवाह (लष्कर)
वीरकोनी (रायपूर)
वीर (लष्कर)
वीरगुडी (रायपूर)
वडवान (मदसौर)
वदनावर (धार)
वर्धारू (सागर)
वदनावर (महुआ)
वर्धा (सागर)
वीर खाडी (मोरेना)
वीरसेल (सिंदखेडा)
वीरगाम (मोरेना)

## — महाराष्ट्र —

वीरवाडी (अकोला)
वडवानी (परभणी)
वीरवाडी (अलिबाग)
वीर (पुणे)
वीरगाव ,,
वीरगाव (औरगाबाद)
वीरवडे (सातारा)
वीरवडे (सोलापूर)
वीरऊर (चादा)
वीरगाव (श्रीरामपूर)
वीरगाव (चादा)
वीर (रत्नागिरी)
वढोना (चादा)
वीरवाडी (ठाणे)
वीरसोला (गोंदिया)
वर्धा (विदर्भ)
वीरवडे (जळगाव)
वडापूर (सोलापूर)
वर्धमान नगर (वर्धा)
वीर धरणगाव (नासिक)
वीरवडे (कऱ्हाड)
वीरगाव (नासिक)
वीरकरवाडी (माण-सातारा)
वीर (चिपळूण)

## — म्हैसूर —

वीरपुरम् (वेल्लारी)
वीरन्न हळ्ळी (हासन)
वीरन हळ्ळी (चित्रदुर्ग)
वीरावळ्ळी (म्हैसूर)

वेणी वीरपुरम् (वेल्लारी)
वीरव्वी (होसपेट)
वीरावल्ली (वेल्लारी)
वीरनोळी (कारवार)
वीरपुरा (चन्नपट्टण)
वीरेश्वरपूर (मड्या)
विरूर (चिकमगळूर)
विराजपेट (मरकेरा)
वीरन गट्टी (चिकोडी)
वीरुनानी (मरकेरा)
वीर नावेनावल्ली (शिमोगा)

दोड्डवीरन् हळ्ळी (चित्रदुर्ग)
वीरनपुरा (नजनगुड)
साळे वीरन हळ्ळी (गुलवर्गा)
वीरकम्वा (पुट्टूर)
वीरन हळ्ळी (गुलवर्गा)
वीरपापूर (रायचूर)
वीरनूर (गुलवर्गा)
वीरगन हळ्ळी (टुमकूर)
हुडे वीरन हळ्ळी (गुलवर्गा)
वीरसाद्र (टुमकूर)
वीरनहळ्ळी (शिमोगा)

**— राजस्थान —**

वीर (अजमेर)
विराथिया खुर्द (मारवाड)
वीरमपुर (भरतपूर)
वीरवाडा (मारवाड)
वीरोंदा (भरतपूर)
वीरलोक (नागौर)
वीरारु (भरतपूर)
वीरानीय (नासिरावाद)
वीरमाई (मारवाड)
शान्तिवीरपूर (भरतपूर)
विरोदिवाडी (सिकार)

विराण (विकानेर)
वीरौल (सिकार)
वीरमी खालसा (विकानेर)
वीरवन (विकानेर)
वीराई (जोधपूर)
वीरघोलिया (उदेपूर)
वीरोल (मारवाड)
महावीरजी (भरतपूर)
वीरना (सिकार)
विराथिया कलान (मारवाड)

## तिसरा विभाग

पुढील व या तिसऱ्या विभागामध्ये इतर सर्व प्रकारची जैनत्वदर्शक स्थलनामे प्रस्तुत करण्याचा प्रयत्न केला आहे या अखेरच्या विभागातील नामाचे पुनर्वर्गीकरण करून (१) व्यक्तिवाचक (भरत-महावीर खेरीज), (२) संस्कृतिदर्शक आणि (३) विचारार्ह असे तीन उपविभाग पाडले आहेत मांडणी वरील प्रमाणेच—

## – आंध्र –

(१) व्यक्तिवाचक–

आदिवरम् पेट (करीमनगर)

(२) सस्कृतिसूचक–

जिन्नूरू (भीमविरम्)
जैन (करीमनगर)
जिन्नामग्रहारम् (विजयनगर)

(३) विचारार्ह–

अण्टा (अदिलावाद)
मानूर (अनतपूर)
मल्लावरम् (भीमावरम्)
मल्लेला (चितूर)
मल्लानूर (चितूर)
मल्लूर (कुडाप्पा)
कल्याणी (विदर)
मल्लयपालेम (गुटूर)
मल्लापूर (करीमनगर)
मल्लेपल्ली (मेहवूवनगर)
मल्लम् (नेलोर)
मल्लाराम (निझामावाद)
पारसेली (श्रीकाकुलम्)
नाथावरम् (विशाखापट्टण)
वसाडी (विजयनगर)
मल्लिविद्रू (विजयनगर)

## – आसाम –

(१) व्यक्तिवाचक–

ऐदेव पुखुरी (शिवसागर)
चद्रनाथपूर (सिलचर)

(३) विचारार्ह–

शातिपूर (गोहत्ती)
सुमेर (शिलाग)
जयसागर (शिवसागर)

## – उत्तर प्रदेश –

(१) व्यक्तिवाचक–

रखवगज (आगरा)
अरकलान (अलाहावाद)
पारस देहरिया (वहरीच)
आदो (वडा)
पारसवन (वस्ती)
पारस खुर्द (वस्ती)
अरह (वस्ती)
पारस (वस्ती)
पारसपूर (गोडा)
पारस (कानपूर)
वृषहपूर (मिर्झापूर)
पारसिया (पिलिभित)
शीतलगज (प्रतापगड)
पारसपट्टी (सुलतानपूर)

(२) सस्कृतिसूचक–

जैनागरा (आगरा)
जैनाल (अलमोरा)
पूर्व जैन (इटावा)
जैन (गाझीपूर)
अरहन्पूर (जोनपूर)
जैनपुरा (वनारस)
जोनपूर (जि )
खडेलवाल (अलिगढ)
अर्हत् टाऊन (डेराडून)
समण (गाझियावाद)
जैनपूर (गोरखपूर)
अहिछत्र (पाचाल देश)
जिनपूर (अझमगड)

(३) विचारार्ह–

वदाऊन
छाता (मथुरा)
मानपूर (अलाहावाद)
वारद्वारा (वडा)
पारसौनी (देवरिया)
मानपूर (हरदोई)
मानपूर (जोनपूर)
अष्टा (झाशी)
पारसौळी (मुजफ्फरनगर)
वासीपूर (मोरादावाद)
वावनपुरा (विनोर)
सुमेरा (अलिगढ)
वर्घा (अझमगड)
वस्ती (गोरखपूर)
मानौरा (एटा)
मानपूर (सीतापूर)
मानपूर (झाशी)
पारसौळी (कानपूर)
मानौर (मिर्झापूर)
माना (पाऊरी)

## –ओरीसा–

(१) व्यक्तिवाचक–

आदिया (भद्रक)
वराग (कटक)
पारसखोल (भवानी पटना)

(२) संस्कृतिसूचक–

जैनताल (वालगीर)
भद्रशाल (वालगीर)
समण (भद्रक)
जैनापूर (पुरी)

(३) विचारार्ह–

वलद्वान (वलसोरे)
छत्रपूर (वलसोरे)
पासुदा (वारीपाडा)
केसरीपोडा (वेहरामपूर)
अष्टी (वलसोरे)
केसरीपूर ( ,, )
पासना(ह) (वारीपाडा)
मानपूर (भद्रक)

पचमपूर (भवानी पटना) चउद्वार (कटक)
हर्यन्त (कटक) नाथसाही (जाजपूर)
मुनिगुडा (बालगीर) हत्तुमुनिगुडा (बालगीर)
विमलगड (सुदरगड) केसरामल (सुदरगड)
छत्रपूर (गजम)

## काश्मीर –

(१) व्यक्तिवाचक–

अरह (अनतनाग) मानपूर (रावी खोरे)

(३) विचारार्ह–

मानकोट (काराकोरम) जिनध्रा (जम्मू)
मनावर (जम्मू)

## – केरळ –

(१) व्यक्तिवाचक–

चद्रगिरी (कन्नानोर) वावुलीयपुरम् (पालघाट)
पपादि (त्रिचूर)

(२) संस्कृतिसूचक–

तिरुवाणीयूर (कोचीन) अष्टमीचार (इरिंजालकुडा)
पचपदम् (पालघाट)

(३) विचारार्ह–

चक्कमपूजा (कोट्टायम) श्रीकोठामगलम् (कोट्टायम)
वट्टमानपूर (ओटपलम्)

## – गुजरात –

(१) व्यक्तिवाचक–

राजुला (अमरेली) नमिसार (वडोदा)
आदिपूर (भूज) आदेसर (भूज)
खारवेल (वलसाड) लूणवाडा (गोध्रा)
सिद्धराजनगर पाटण (मेहसाना)

(२) संस्कृतिसूचक–

जिनाज (आनद) भद्रवाडी (भावनगर)
नदीसर (भूज) चोवीसी (वलसाड)

देलवाडा (गोध्रा)
पावागड (गोध्रा)
देलवाडा (हिंमतनगर)
वसई (जामनगर)
समण (जामनगर)
देलवाडा (जुनागड)
देलवाडा (मेहसाना)
सोलाइया (मेहसाना)
वीसनगर (मेहसाना)
वसई (मेहसाना)
नाथपुरा (पालनपूर)
जैनावाद (सुरेन्द्रनगर)

(३) विचारार्ह–

सिद्धपूर (मेहसाना)
श्रीनाथगड (राजकोट)
वसवाड (राजकोट)

## –नेपाळ–

(३) विचारार्ह–

मुक्तिनाथ (गोरखा)
भद्रपूर (इल्लाम)
पारस (काठमांडू)

## –प. बंगाल–

(१) व्यक्तिवाचक–

राखालपूर (अलिपूर)
पारीसनाथपूर (वेहरामपूर)
नवीपूर (वेहरामपूर)
पारीश (वरद्वान)

(२) संस्कृतिसूचक–

पचस्तूपी (वेहरामपूर)
चैत्यपूर (वेहरामपूर)
दिगंवरपूर (कृष्णनगर)
सूरी (वीरभूम)

(३) विचारार्ह–

समुक्तला (जलपैगुरी)
अरह (वकुरा)
पारसोला (वकुरा)
कुंडल (वेहरामपूर)
मानावारी (जलपैगुरी)
विरुलिया (मिदनापूर)
अरह (पुरुलिया)
वारभूम (पुरुलिया)
मानवझार ( ,, )
मानभूम ( ,, )

## –पू. पंजाब–

(१) व्यक्तिवाचक–

नाभा (पतियाळा)
नाभा (सिमला)
रिखवगज (दिल्ली)

(२) संस्कृतिसूचक–

समण (भतिंडा)
समण (कर्नाळ)
समण (रोहतक)
छत्तरपूर (दिल्ली)
समण कलान (चंदिगड)
समण (पतियाळ)
जैनपूर (रोहतक)

(३) विचारार्ह–

मानपुरा (चंदिगड)
वचना (कर्नाळ)
निदान (रोहतक)
अर्हल (सिमला)
अरकोट (सिमला)
वासा (अमृतसर)
मानक (कपूरथळा)
मान (लुधियाना)
कुंडल (रोहतक)
सुमेरकोट (सिमला)
खेमकरण (अमृतसर)
मानाजी (दिल्ली)

## –बिहार–

(१) व्यक्तिवाचक–

शीतलपूर (वेगुसराई)
पारसपट्टी (मुझफ्फरपूर)
पासोपूर (वेगुसराई)
पारसौनी (मुझफ्फरपूर)
पारसगड (छप्रा)
पारसवान (पाटणा)
अरदेव (छप्रा)
पारस (पाटणा)
अरराज (वेनिया)
शीतलपूर (दुमका)
शीतलपूर (पूर्णिया)
पारस (लहरीसराई)
पारसवाणी (पूर्णिया)
पारसवान (मोंघीर)
पारसगढी (पूर्णिया)
शीतलपूर (मोतीहारी)
पारसनाथ (हजारीवाग)

(२) संस्कृतिसूचक–

अरहन्पूर (गया)
नाभपूर (राची)
अरह (गया)
अरहा (पूर्णिया)
कमठ (पाटणा)
केसरिया (मोतीहारी)
सम्मेदशिखरजी (हजारीवाग)
देवकुलिया (मोतीहारी)
अरगाम (हजारीवाग)
नाथनगर (भागलपूर)

(३) विचारार्ह–

आरा(ह) (शहावाद)
समस्तीपूर (दरभंगा)
मल्लेपूर (मोंघिर)
छपरा (जि. छपरा)

वारिसवान (आरा)
पावापुरी (पाटणा)
मुक्तियारपूर (दरभगा)
छत्रपूर (टाटटनगज)

## — मद्रास —

(१) व्यक्तिवाचक—

मरुदेपल्ली (धर्मपुरी)
आदिनूयू (डिडिगुल)
शांतिपलयम (एरोडे)
शीतलूर (पाडिचेरी)
शातिनाथपुरम् (धर्मपुरी)
शीतलन गुडी (डिडीगुल)
पासूर (एरोडे)
सतनाथपुरम् (पुडुकोट्टाई)
पारसऊर (तिरुवन्नमलाई)

(२) सस्कृतिसूचक—

नदीश्वरमगलम् (कुडालोर)
केसरिमगलम् (एरोडे)
गोहिलपुरम् (मदुराई)
जिनकाची (चिंगलपट्ट)
समणपल्ली (घरमपुरी)
विरागनऊर (मदुराई)
विरागनऊर (सालेम)

(३) विचारार्ह—

नाथम् (चिंगलपट्ट)
नायपट्टी (डिडिगुल)
अभिविरतीश्वर (नागपट्टीनम्)
शीतलपक्कम् (चिंगलपट्ट)
गगपुरम् (एरोडे)
गगइकोंडापुरम् (तिरुचिरपल्ली)
वीसऊर (कुडालोर)
स्वामीनाथपुरम् (एरोडे)
जबूनाथपुरम् (तिरुचिरपल्ली)
नाथम् (कुडालोर)
छत्रपट्टी (विरुधुनगर)
शीतलराई (तिरुचिरपल्ली)
आदमसेतू (पाल्क सामुद्रधुनी)
आदम डोगर (श्रीलंका)

## — मध्यप्रदेश —

(१) व्यक्तिवाचक—

गोशालपूर (जबलपूर)
पारसगुडी (रायगड)
पारसवाह (सागर)
पारसोनी (भिंड)
पारस (हुशगाबाद)
पारसिया (छिदवाडा)

(२) सस्कृतिसूचक—

समणपूर (बालाघाट)
छत्तरपूर (जबलपूर)
वस्ती बाराद्वार (रायगड)
केशिया (बैतूल)
कमठारी (मोरेना)
जिनवहार (रायगड)

वसई (भोपाळ)
सिंगीवहार (रायगड)
वाराद्वार (रायगड)
सामण्ण (सागर)
अहिछत्र (पाचालदेश)
छत्तरपूर (नौगाँग–रेवा)
सगई (छिंदवाडा)
छतेरा (रायपूर)
छत्तरपूर (जि छत्तरपूर)

(३) विचारार्ह–

चदना (वालाघाट)
पारसोली (छिंदवाडा)
पारसवारा (वालाघाट)
पारसिया (छिंदवाडा)
पारसवाड घाट (वालाघाट)
नाथपुर (नौगाँग-रेवा)
मानपूर (इदोर)
मानपूर (अंविकापूर)
पारसोडा (वैतूल)
वर्धा (सागर)
पारसवारा (भोपाळ)
वडनगर (उज्जयिनी)
पारसवाणी (विलासपूर)
वडनावर (धार)
मानपूर (धार)
मानपूर (दुर्ग)

## –महाराष्ट्र–

(१) व्यक्तिवाचक–

पारस (अकोला)
नेमिनगर (नासिक)
केसरियाजी (जळगाव)
वाहुवली (कोल्हापूर)
आदिनाथनगर (करमाळे-सोलापूर)
पारसवाडा (गोदिया)
आदिनाथनगर (पुणे)
पारसपूर (अमरावती)
राणी सावरगाव (परभणी)
आदिवरे (चिपळूण)

(२) संस्कृतिसूचक–

जैनपूर (अमरावती)
सावरगाव (जुन्नर-पुणे)
वीसपूर (चादा)
वशी (सागली)
जैनापूर (कोल्हापूर)
विसापूर (सागली)
विद्यासागर (कोल्हापूर)
विसापूर (सातारा)
सावरगाव (उस्मानावाद)
समणपूर (श्रीरामपूर)
जैनवाडी (करमाळा-सोलापूर)
सावरगाव (भूम)
वशी (रत्नागिरी)
सावरगाव (तुळजापूर)
विसापूर (रत्नागिरी)
वशी (उस्मानावाद)
वासी (वर्धा)
वसई (ठाणे)
सावरगाव (यवतमाळ)
जैनवाडी (पढरपूर)
सावनेर (नागपूर)

(३) विचारार्ह–

वडनेर (नगर)
वडवानी (परभणी)
वासीम (अकोला)
कुडल (सागली)
वडनेरा (अमरावती)
कुडलपूर (सांगली)
मानार (औरगावाद)
वडगाव (सोला-कोल्हा-पुणे)
मानवत (औरगावाद)
मनमाड (नाशिक)
माण (सातारा)
वीरदेल (धुळे)
कल्याणी (वीदर)
वीड (मराठवाडा)
वधने (धुळे)
पोदनपूर (वोरीवली-मुवई)
वडनेर (नासिक)
वर्धानगर (वर्धा)
वढोना (उस्मानावाद)
श्रीवर्धन (अलिवाग)
मानेगाव (सोलापूर)
वडवाणी (वीड)
मानवत (वीड)
मानवत (परभणी)
मानेवाडी (सोलापूर)
कल्याण (ठाणे)
वडवळ (मोलापूर)

## – म्हैसूर –

(१) व्यक्तिवाचक–

शातिनगर (वगलोर)
आदिगाव (कारवार)
पारिसवाड (वेळगाव)
पारसगड (सौंदत्ती)
धर्मसागर (वेल्लारी)
वराग (पुट्टूर)
शातिग्राम-जयपूर(चिकमगळूर)

(२) संस्कृतिसूचक–

मूळसावळगी (विजापूर)
समणवल्ली (सागर-शिमोगा)
जैनापूर (विजापूर)
हुमचा (सागर-शिमोगा)
जिननाथपूर (हासन)
जैनापूर (चिकोडी)
जिन आगर (टुमकूर
जिन्नेन हळ्ळी (हासन)
स्तवनिधी (चिकोडी)
श्रवणवेळगूळ (हासन)
सावळगी (विजापूर)
जिनहळ्ळी (सागर-शिमोगा)
नगरवस्तिकेरी (कारवार)

(३) विचारार्ह–

आदिवाल (चित्रदुर्ग)
वसवपटना (हासन)
मल्लिपटना (हासन)
मल्लापूर (रायचूर)

मल्लाबाद (गुलबर्गा)
मल्लिगेरे (मड्या)
मल्ली (गुलबर्गा)
मुनियाळ (पुट्टूर)
बीदर (जि बीदर)
हळे बेळगूळ (हासन)
आदापन ऊर (रायचूर)
मल्लदेवरपूर (हासन)
भद्रपूर (शिमोगा)

## — राजस्थान —

(१) व्यक्तिवाचक—

पारसनेऊ (बिकानेर)
अर (उदेपूर)
अजितगड-अमरसार (सभारलेक)
अजित (जोधपूर)
शांतिवीरपूर (भरतपूर)
अजितपुरा (श्रीगगानगर)
नाभावाला (जयपूर)
रिसभदेव (उदेपूर)
रखबदेव (उदेपूर)

(२) संस्कृतिसूचक—

देलवाडा (अजमेर)
जिनी (शिकार)
जैन गुरुकुल (अजमेर)
वसी (उदेपूर)
केशरपुरा (अजमेर)
देलवारा लोकिया (उदेपूर)
वसा (अजमेर)
समोना (भरतपूर)
केमरियावाड (उदेपूर)
केशवाना (जोधपूर)
केसरियाजी (उदेपूर)
सावन (जोधपूर)
पणवस्ती (अजमेर)
देलवाडा (,,)
जैनपूर (,,)
देलवारा (उदेपूर)
जिनमाता (शिकार)

(३) विचारार्ह—

मानपूर (जयपूर)
पारसोल (उदेपूर)
मानपुरा (नासिराबाद)
सुमेरपूर (अजमेर)
वीरलोक (नागोर)
वीरतिया (नासिराबाद)
वीरथिया (अजमेर)
मानपूर (उदेपूर)
शीतल (शिकार)
वीरना(थ) (शिकार)

## चवथा विभाग

पुढे काही रेल्वे स्टेशनाची नामावली प्रस्तुत करीत आहे. ही नामावली प्रान्तानुसार विभागणी करून माडलेली नाही कारण उघड आहे प्रान्ताऐवजी

त्याच्यापुढे रेल्वे–विभागाचा निर्देश केला आहे ही लहान–मोठी स्टेशने पोस्टाच्या ऑफिसची ठिकाणे नसल्याने त्याचा उल्लेख वेगळा केलेला आहे. ही नावे दुर्लक्ष करण्यासारखी तर नाहीतच उलट अगदी उल्लेखनीय आहेत त्यांच्या उच्चारातच सास्कृतिक महत्त्वाचे जे काय आहे ते स्पष्टपणे बोधप्रद आहे–

(१) व्यक्तिवाचक–

(i) भरतपूर (E R)
भरतवाडा (C R.)
भरतकूप (C R)
भरताली (W. R)

(ii) वीरपूर (N R)
वीरधवल (N. R.)
वीरपूर (S R)
वीरापडी रोड (S R.)
वधवाना (W R)
विडवानी (W. R)
वीरवाणिया (W. R)
वीरशिवपूर (E. R)
वढोना (N. E R)

(iii) अभयपूर (E R)
आदिरगम् (S R)
नाभिनगर (E. R)
पारश्वर–जमतारा (E. R)
मल्ली (S. R)
चिन्नकुतापल्ले (S R)
आदिना(थ) (N. E R)
गजपुरा (E R)
नाभाराम–जाधवपूर (E R.)
पारस (N E R)
खुवगाव (वर्धा) (C R)

(२) संस्कृतिसूचक–

दयावस्ती (N R)
जिनधारा (N E R)
केसरी (N R)
देवरगुड्डा (S R.)
गौतमधारा (E R)
कल्याण (C R)
नाथपुरा (W R)
पर्चापिपलिया (W. R)
सुमेर (C R)
देसर रोड (W R)
केसरपुरा (W R)
चउद्वार (E R)
धवलास (C. R)
कलकुड (W R)
नाथनगर (E R)
पचग्राम (N. E. R)
सावरकुंडल (W. R)

**पाचवा विभाग**

याशिवाय काही सकीर्ण नामावली पहा–

कोडकुडपूर-कोडकुद-कोडकोड (गुटकल)
ऊर्जयंत (सौराष्ट्र)
शत्रुंजय (सौराष्ट्र)
रैवतक (सौराष्ट्र)

अचलपूर (अबू)
रत्नत्रयपुरी (अयणी)
वराग (कारकल)
चंद्रगुफा (जुनागड)
चद्रगिरी (हासन)
गोम्मटगिरी (म्हैसूर)
मुक्तागिरी (बैतुल)
जैनपूर (जेसोर-बांगलादेश)
नऊलखा (मारवाड)
विमलवसही (अबू)
महावीर—अचलगढ (अबू)
वासुकुड (वैशाली-बिहार)
कुडलपूर (दमोह-म प्रदेश)
कुभलमेरु (मेवाड)
गजपथ (नासिक)
तीर्थहळ्ळी (शिमोगा)
ज्वालामालिनी (शिमोगा)
पार्श्वनाथहळ्ळी (हळेबीड—बेलूर)
चौबारा डेरा (खरगोण-म प्रदेश)
चूलगिरी (म. प्रदेश)
पचस्तूप (मथुरा)
पावा (पाटणा-बिहार)
मुनिसुव्रत-स्तूप (वैशाली-बिहार)
सुवर्णगिरी (झासी)
जावालीपूर (जालोर-राजस्थान)
देवगढ (झासी)
द्रोणगिरी (फालोदी-राजस्थान)
नौलखामदिर (मारवाड)
पचकूटवस्ती (शिमोगा)
लाडपुरा (नागपूर)
लोमसऋषिगुहा (बराबर-बिहार)
कोटिशिला (कलिंग)
बडे बाबा मदिर (दमोह-म प्र)

कुथलगिरी (उस्मानाबाद)
कालका (पजाब)
बावनगजा (म प्रदेश)
हाथीगुफा (पुरी-ओरिसा)
विंध्यागिरी (हासन)
सित्तन्नवासल (पुडुकोट्टाई-मद्रास)
भरहूत-भारहूत (म प्रदेश)
बदनावर (धार)
ओसिया (जोधपूर)
प्रौढदादा (अबू)
अहिछत्र (पाचालदेश)
कुण्डपूर—कुण्डल—कुण्डलपूर (बिहार)
कुण्डल (सागली)
क्षत्रियकुण्ड (मुजफ्फरपूर-बिहार)
गुड्ड (तीर्थहळ्ळी-शिमोगा)
घटाइ मडप (खजुराहो)
चित्रकूट (चितोड)
सर्वतोभद्र (पहाडपूर—पूर्व बंगाल)
पावागिरी (खरगोण)
सिद्धवरकूट (मध्यप्रदेश)
इंद्रसभा (वेरूळ)
बसाड (मुजफ्फरपूर-बिहार)
तुगिगिरी (खानदेश)
सिद्धवरकूट (मध्यप्रदेश)
नवमुनिगुहा (उदयगिरी-ओरिसा)
देवसेनपाडा (अहमदाबाद)
विजयपार्श्वनाथ (द्वारसमुद्र-म्हैसूर)
वर्धमानपूर (मध्यप्रदेश)
वटगोहाली (पहाडपूर-बगाल)
पोम्बूर्चा (तीर्थहळ्ळी)
सोनभडारगुहा (राजगीर-बिहार)
कुण्डलपूर (दमोह-मध्यप्रदेश)
विश्व-झोपडी गुहा (बराबर-बिहार)

## सहावा विभाग

वरील पाच विभागानंतरही एक छोटासा विभाग सादर करण्याची अभिप्सा आवरणे कठीण आहे या ठिकाणी खास ऋषभपुत्राच्या नावावरुन रूढ झालेल्या प्रदेशाची नामावली सादर करीत आहे ऋषभपुत्राच्या नामावलीसाठी परिशिष्ट क्रमांक एक पहा ऋषभपुत्राच्या अनंतर काळामध्ये त्याच किंवा तत्सम नावांचे राजे पुष्कळ होऊन गेले हे अमान्य नाही. तरी पण त्या नावाच्या सांस्कृतिक परंपरेचे मूळसुद्धा या ऋषभपुत्रांच्या नामप्रणालीमध्येच असणे जास्त संभवनीय। या आणि अशाच सांस्कृतिक जिज्ञासेच्या आवेगाने पुढील नामावली स्वतंत्रपणे संग्रहित केली आहे मात्र येथे टपालखात्याची पद्धती स्वीकारता आली नाही तरी वाचकाची संदर्भजिज्ञासा खंडित होऊ नये म्हणून नावापूर्वी कल्पसुबोधिका-अभिधानराजेन्द्र-प्रणीत नामक्रमांक नोंदविला आहे–

(१) भरतवर्ष, भरतक्षेत्र, भरतखंड, भारत
(२) वहली, वाल्हीक, वाल्हीक, वाल्हे, वल्लव, पल्लव
(८) चित्तगाग, चितोड, चित्रकूट
(११) सागर, समुद्रक

(१४) रथावर्त, आरट्ट (१५) कामरूप, कामशेत (१७) वत्स (१९) शूरसेन (२१) कुरुक्षेत्र, कुरुजांगल (२२) अंगदेश (२३) वंगदेश, वंग, वंगाल, वांगला (२४) कोसल, (कौशल), महाकोसल, सुकोसल (२५) सुवीर, सिंधुसौवीर (२६) कलिंग (२७) मगध (२८) विदेह (२९) संगम (प्रयाग) (३०) दशार्ण, आनर्त (३४) राष्ट्र, (महाराष्ट्र), राष्ट्रिक, राष्ट्रकूट (३५) सुराष्ट्र, सौराष्ट्र (४३) ब्रह्मदेश, ब्रह्मावर्त, ब्रह्मगिरी (५५) सुसुमार (वन,) सुसुमार (६१) आनंदवन (६५) हरिपूर, हरिद्वार, हरिवर्ष (६६) जयपूर, जयनगर, जयराष्ट्र (६७) विजयगिरी, विजयवाडा (७१) माणदेश, मानार (७४) मेघालय (८१) श्रीशैल (८५) नागालय, नागपूर (८६) काश्मीर, काशी

### भागवतानुसारी–

येथे नावापूर्वी भागवतपुराणानुसारी नामक्रमांक दिला आहे–

(२) कुशावर्त, हिंदुकूश (३) इलावर्त (४) ब्रह्मावर्त (५) मलय, मालव, माळवा (९) विदर्भ (१७) द्रुमिळ, द्रमिळ, दमिळ, तामिळ

याशिवाय ऋषभांच्या इतर नातलगासंबंधी–

(१) कच्छ, भरुकच्छ, भडोच, बृहत्कच्छ, महाकच्छ (२) हस्तिनापूर

: १६ :

# उ प न य

सर्वापदाम् अन्तकरं निरन्तम् ।
सर्वोदयं तीर्थमिदं तवैव ॥

— युक्त्यनुशासन, ६१.

# १५ : उपनय

(१) आपल्या बहुरंगी भारतात गटबाजी, हेवादावा, संघर्ष, विषमता, जातीयता यांचा उद्रेक सहज भासला तरी तो मानवतेला मारकच असतो त्या आविष्कारामागे संख्याबळाचा आधार घेतला जातो हे खरे असले तरी साधकाला निराश होण्याचे कारण नाही कारण ओजस्विता गुणातच असते, संख्येत नव्हे ! ही ओजस्विता वाढविण्यासाठी मात्र तात्कालिकतेच्या पलीकडे जाऊन सनातन सत्याचा शोध घ्यावा लागतो आपल्याला मिळालेला सांस्कृतिक सत्त्वगुणाचा वारसा महान प्रभावशाली आहे त्याची जोपासना करणे आपले जीवितकार्य आहे त्या वारसाचा कायम हक्कदार राहावयाचे असल्यास आपली कार्यशीलता अखंड टिकवावी लागते उलट स्थितिप्रियता अवतरली तर परकीय प्रभाव त्रासदायक झाल्याशिवाय राहात नाही **सांस्कृतिक ओज टिकविण्यासाठी स्वसाहित्याची जोपासना व वृद्धी करणे हा उत्तम उपाय आहे.** संस्कारी क्षमतेची वाढ होण्यासाठी व ऐतिहासिकता टिकविण्यासाठी साहित्याइतका जोमदार असा दुसरा अभियोग मानवाला आज तरी अवगत नाही

प्रासंगिक अद्यतनापेक्षा सनातनत्वाचा अंगीकार केल्याने अंगभूत स्थाम वाढतो व जीवनात स्थैर्याचा लाभ होतो ही सनातनता कालगुणातीत असल्याने ती अभिजात वाङमयामध्ये आणि इतिहासामध्ये जास्त प्रमाणात प्रत्ययास येते **प्राचीन प्राकृत भाषा सनातन तथ्याचे मंदीर होय.** त्याच्या संरक्षक तटाचे सामर्थ्य वाढवीत राहिले पाहिजे आपले **पूर्व साहित्य आपल्या संस्कृतीची ध्वजा आहे.** त्यातील सांस्कृतिक मूल्य विवादातीत आहे अस्सल **भारतीयता ही प्राकृतचीच देणगी आहे** यज्ञहिंसेला व वर्णधर्मातील जातीय वरिष्ठतेला वाहिलेल्या संस्कृतची नव्हे ! जीवतत्त्वाच्या समानतेची दार्शनिक प्रणाली आणि समणाची आचारपद्धती उपेक्षिली गेली तर मानवातील मानवताच धोक्यात येईल ! आपल्या संस्कृतीतील

भारतीयताच नष्ट होईल !! जैन साहित्याच्या अभ्यासाच्या अभावी मानवी गुणाना पोषक अशा तत्त्वावबोधाचा विपर्यास होईल !!!

प्राचीनकाळी प्रगतीची गती राजपुरस्कृत प्रेरणेवर गतिमान होत असे आता तो आधार नसलेला आहे या लोकशाहीत लोकानी आपला आपणच लोकसभेत प्रवेश मिळवावा व शासनसंस्थेच्या सामर्थ्याचा फायदा घ्यावा आपल्या सामाजिक संस्था बलवत्तर कराव्यात संस्कृतीचा वारसा संस्थाद्वारेच अवतरत असतो. जीवधारणेला शरीराची जितकी गरज तितकीच समाजाच्या अस्तित्वाला संस्कृतीची गरज आहे आत्मगुणाचा प्रभावच संस्कृतीची आदिम शक्ती होय ही शक्ती वाढविणे हा मानवी हक्क आहे त्या अभावी गुलामगिरी ओढवल्याशिवाय राहणार नाही मानवी जीवनात संस्कृतीळा दुसरा कोणताही पर्याय नाही.

(२) भारतीयतेची अंगोपागे आज कितीही बहुरंगी दिसत असली तरी तिच्यातील मूलस्रोत भरत-परंपराच आहे. म्हणून या भरताच्या वारसाहक्कासाठी प्रत्येकजण झटत असतो एखाद्या समाजाला पोरका ठरवून त्यावर आपले स्वामित्व गाजविणे त्या वारसाहक्कामुळेच साधते राजकारणातील हा एक कुटिल डाव आहे. तेव्हा जागृत राहणे अटल आहे. ज्याला इतिहास नसतो तो पोरका ठरतो पोरकेपणा नष्ट करून प्रतिष्ठा देणारा इतिहासासारखा प्रभावी वाली दुसरा विद्यमान नाही म्हणून इतिहासाचे जतन करणे जीवितकार्य ठरते हा इतिहासही साहित्याच्या खाणीतच जन्मत असतो पूर्व साहित्याचा अभ्यास हा संस्कृतीचा पाळणा असून तेथेच इतिहासाला बाळसे येते आजच्या तरुणाचा भावी काळ उज्ज्वल होण्यासाठी पूर्वदिव्याचे ओज त्याच्यापर्यंत पोहोचले पाहिजे. विजेचा प्रवाह लाभल्याशिवाय त्याच्या मेंदूचा गोळा पेटणार नाही ! त्यासाठी अभ्यासाच्या ओजवाही तारा खेचण्याचे कार्य संपन्न केलेच पाहिजे

ज्याचे आयुष्य उपरे – भटके असते त्याना ओज वाहून आणणाऱ्या ताराचा संपर्क लाभलेला नसतो त्याच्या जीवनात प्रकाश नसतो ऋषभांच्या जनित्रामधून आपल्यापर्यंत त्या चेतनेचा प्रवाह अखंडित राखण्यासाठी जैनाचार्यांच्या श्रुताभ्यासाच्या तारा विपुल प्रमाणात उपलब्ध आहेत चेतनेचा सप्लाय भरपूर आहे फक्त आपल्या मेंदूचा स्विच ऑन करण्याचीच वाण आहे हा जीवनप्रकाश लोकाना दिसला नाही तर ते आपणास उपरे व घोटके नाही समजणार तर काय ? दिवा लावा आणि उजेडात जगा सुदैवाने आपणास या ओजाचा मोठा पुरवठा लाभला आहे आपण तो साऱ्या विश्वाला पुरवू शकतो तेव्हा मालक असून निर्वासिताचे जीवन जग नका एखाद्या प्रसंगी फ्यूज उडाला किंवा गोळा जळला

तरी चेतना शिल्लक असतेच तेव्हा संकटाने किंवा एखाद्या पराजयाने खचून जाण्यात अर्थ नाही

चिरंतनत्व प्रसंगातीत असते, तशीच ऋषभसंस्कृती प्रसंगातीत आहे. तिला भटकेपणाचा संसर्ग कधीच घडला नव्हता आताही नाही भ ऋषभदेवांच्या सर्वोदय नीतीच्या पूर्तीसाठी अवतरलेली पहिलीच सिद्धहस्त मानवी विभूती म्हणजे प्रथम चक्रवर्ती ऋषभेय भरत होय नाभि-ऋषभ-भरत याच्या कुलपरंपरेतील प्रजापालनाची, आराधक शासनसंस्थेची, सर्वोदयवादी तीर्थाची, मानवी पराक्रमाची आणि गुणानुसारी जीवनपद्धतीची गाथा पोटातून ओठात घोळवीत हा आपलाच पूर्वेतिहास आपल्या समोर दीपस्तंभासारखा उभा आहे त्यातील ओजाचा स्वीकार केला तर जीवन संपन्न आणि शुभलक्षणी होईल भरताच्या या घरच्या भूमीवर स्फूर्तिस्थळाचाही तुटवडा नाही कोठूनही प्रेरणा स्वीकारा आणि प्रकाशमान व्हा.

(३) प्रगतिरूपी रथाला वेग येण्यासाठी मानवतेच्या गगनस्पर्शी प्रेरणेची आणि पूर्वानुभवाच्या इतिहासरूपी आधारभूमीची गरज असते स्वातंत्र्य, समता, न्याय, लोकशाही इत्यादी विचारधनाची उसनवारी करता येत नाही हा चेतनेचा विषय आहे ही चेतना इतिहासाच्या बॅटरीत साठवलेली असते आपला प्राचीन इतिहास राजाधिष्ठित असला तरी त्या काळच्या सामाजिक जीवन-व्यवस्थेचा बोध करून घेणे अवघड जात नाही त्याकाळी सामाजिक जीवनही राजानुसारीच असल्याने राजाची क्रिया व त्यावरची प्रतिक्रिया समाजजीवनामध्ये प्रतिबिंबित होत असे प्राचीन काळातील भारतीय राजापेक्षा युरोपीय राजे वेगळे होते. ते स्वत ला समाजापेक्षा वेगळा असा एक दैवी अंश मानीत असत त्यामुळे शासनसंस्था राजापासून मुक्त करण्याचा त्याचा इतिहास आणि त्यामागची कार्यशक्ती भारतीयाना गैर लागू आहे भारतीय ऐतिहासिक दृष्टी भारतीय परंपरेतच शोधता येते— जीवनक्रियेतील संभ्रम नाहीसा करणे, कार्याच्या विचारपद्धतीतील शल्य दूर करणे, घटित दृष्टातानी जाणीवा दृढ करणे, सत्कार्यनिष्ठा संस्थापित करणे, बुद्धीचा प्रकर्ष साधणे, पुरुषार्थाच्या चारी क्षेत्रात जीवन व्यापून टाकणे हेच इतिहासाचे मुख्य कार्य आहे याची जाणीव ठेवल्याने पूर्वकाळीही इतिहासाला भारतीय अभ्यासक्रमात श्रेष्ठ स्थान लाभले होते कदाचित स्वतंत्रपणे इतिहासग्रंथ लिहिण्याचे तंत्र त्यानी अवलंबिले नसेल पण इतिहासाच्या अभ्यासातील मंत्र त्यानी जपला होता तेव्हा भारतीयाना इतिहास-दृष्टीच नव्हती असे म्हणणे अज्ञानप्रदर्शन होय

प्राचीन युरोपीय समाज जितका राजाधिष्ठित होता तितका भारतीय समाज कधीच नव्हता त्यामुळे इतिहासाची व्याप्ती देखील वेगळी आहे भारतीय

इतिहासाच्या परिसीमा युरोपीय राजवलयापेक्षा त्याकाळीही अधिक विशाल होत्या त्यात राजनैतिकच नव्हे तर सांस्कृतिक घडामोडीनाही स्थान होते. तरी पण हा महत्त्वाचा अभ्यास मागे पडला कारण पूर्वभाषा जाणण्याची अडचण दूर करणे विविधभाषी भारताला कठीण गेले. त्यामुळेच आपणास इतिहास क्षेत्रात वावरणे कठीण होऊन बसले आहे यावर मात केल्याशिवाय तरणोपाय नाही. पौराणिक साहित्य आजच्या अभ्यासकाला गोंधळात पाडते कारण त्यातील घटनाच्या नोंदीमध्ये दार्शनिक विवादाची व अंधश्रद्धात्मक प्रवृत्तीची खिचडी मिसळलेली दिसते इतिहास हा साहित्याचा स्वतंत्र प्रकार मानलेला नव्हता पण ही अडचण वैश्विक आहे ग्रीक इतिहासकार हिरोडोटसलाहि त्यातूनच मार्ग काढावा लागला हंसक्षीरन्यायाच्या बळावर यातूनही पुढे सरसावले पाहिजे हाय खाऊन उपयोगी नाही

जैन पुराणातील इतिहासाची वाट मात्र पुष्कळच अनुकूल आहे. त्यातील घटना अवतारप्रधान नसून लोकजीवनानुवर्ती आहेत मानवी घटितावर दैवी आरोप नाहीत. दैव-मानुषी अद्भुत घटनाची नोंद नाही विसंगती, मतभेद, अन्तर्गत विरोध किंवा अंधश्रद्धेचा प्रभाव आढळत नाही हजारो वर्षांच्या कालखंडातील अनेक ठिकाणच्या, अनेक भाषाच्या आणि विरोधी पंथाचारातीलही शेकडो ग्रंथकारामध्ये सातत्याने टिकलेली **घटनाविधानातील सुसंगती हीच ऐतिहासिकतेची मोठी साक्ष होय.** या ग्रंथातील विषयही नानाविध असून ते संस्कृतिक्षेत्रात सर्वस्पर्शी आढळतात म्हणून अशा अभ्यासासाठी हे **ग्रंथ इतिहासाला अनुकूल व उपयुक्त आहेत.** तेव्हा त्यावरून केलेला अभ्यास अन्य संस्कृतीच्या ग्रंथातील विधानाशी ताडून पाहिल्यावर जर सुसंगत ठरत असेल **तर त्यातील विश्वासार्हता नक्कीच महनीय ठरते.** प्रस्तुत **नाभि-ऋषभ-भरत-संस्कृतीचा** हा अभ्यास याच श्रेणीचा आहे

(४) देशवाचकातील **वर्ष** हे पद जैनप्रणालीचे एक खास वैशिष्ट्य आहे **भरतवर्ष** हे संस्कृत संज्ञापद **भरहवास** या प्राकृत पदापासून प्रचलित झाले आहे त्याचा अर्थ **भरताचा देश** असा सुनिश्चित आहे **वर्ष** आणि **विजय** या दोन्ही संज्ञेतील संस्कृती जैनत्वदर्शक आहे **भरतवर्ष** संज्ञेतील **भरत** हा **ऋषभदेवांच्या** ज्येष्ठ पुत्राशिवाय दुसरा कोणताही चक्रवर्ती नव्हे ! महाभारतातील भारत शब्द केवळ वंशवाचकच आहे, देशवाचक मुळीच नव्हे ! दुष्यंतपुत्र भरत असा अर्थ तर मुळीच घेता येत नाही आर्य टोळीतील 'भरत' व्यपदेशाचीही सुसंगती जमत नाही **डॉ.** अग्रवाल इत्यादी संशोधकाचा भ्रमपरिहार पूर्णपणे झालेला आहे तर **प्रि.** आर. डी करमरकरासारख्या तज्ञ संशोधकानी **भरतवर्षातील भरताची ऋषभपरंपरा** भ्रमातीत राहून मान्य केली आहे.

ऋग्वेदीय आर्यांच्या आगमनापूर्वी येथे वृत्रादी बलाढ्य राजाची शासन-सस्था राजकीय, सामाजिक व सास्कृतिक क्षेत्रातही कार्यप्रवण होती. नतर आलेल्या आर्यांचे ते प्रतिपक्ष म्हणून इद्रानुयायी आर्यांनी त्याचा मन पूत द्वेष व द्रोह केलेला आहे अखेर वैदिक इद्राचा त्या युद्धात जय झाला तरी येथील मूळच्या संस्कृतीचा प्रभाव इंद्रपक्षीय वैदिकांवर पडल्याशिवाय राहिला नाही. सुदासाच्या किंवा भरताच्या आर्य टोळीला सर्वप्रभावी व्यक्तिमत्व कधीच लाभू शकले नाही 'भारत' पदातील सभ्रम टाळण्यासाठी पूर्वापरता तपासून पाहणे कठीण नाही. जैनाचा इतिहास फारच पुरातन आहे नवीनाची दृष्टी दिल्ली दरवाजात व कर्मठाची श्रद्धा कुरुक्षेत्रातच गुतून गेल्याने, त्यापलीकडील काल-क्षेत्राची मर्यादा आणि या देशाची व्याप्ती, अजून त्याना समीचीन मार्गाने दिसली नाही चोवीस तीर्थंकरांच्या व्यक्तित्वासबधी भ्रम बाळगण्यात अर्थ नाही ऋषभनाथाचा इतिहास जैन ग्रंथातच नव्हे तर वैदिक ग्रंथपरपरेतही पूर्णत सुसंवादीच आढळतो. या प्राचीनतेला जैनेतर भारतीय व युरोपीय सशोधकही ऐतिहासिक मान्यता देतात. या सर्व परिक्षणावरून ऋषभपुत्र भरतच या वर्षक्षेत्राच्या नामकरणाचा एकमेव स्वामी ठरतो

(५) जैन सस्कृति-प्रणालीला अनुसरून वर्षनामकरण-चर्चेचा उपोद्घात, त्या नामकरणाचा काल व प्रसग, त्याची पूर्वपरपरा व उत्तर-परपरा, त्या घटनेच्या इतिहासाचे जैन श्रुतागम ग्रथावलीतील सातत्य, त्यापुढील काळातील आगमाग-पुराण-चरित्र-काव्य आणि ज्ञानकोश इत्यादी सर्व प्रागणातील प्राचीन साहित्यामध्ये सद्भावाने आढळणारा त्या घटनेचा अखण्ड प्रभाव, आणखी सस्कृत-प्राकृतोत्पन्न हिंदी-मराठी-कन्नड इत्यादी प्रादेशिक नवभाषेमधूनही वर्ष-नामकरणाच्या त्याच इतिहासाची अतूट अनुवृत्ती आणि प्रदीर्घ कालातरामध्ये टिकून राहिलेले अक्षुण्ण सुसवादित्व वाखाणण्यासारखे आहे त्यातील एकमुखी साक्ष आणि सुसगती लक्षात घेता आश्चर्य वाटल्याशिवाय राहणार नाही

(६) इतकेच नव्हे तर जैनेतरांपैकी अगदी विरोधी सस्कृतिप्रवाहातील वैदिक ऋषिप्रणीत श्रुति-स्मृति-पुराणादिक साहित्य-महितेची परपरा आणि त्याच्या भाषानुवादातील विवरण-पद्धती तथा सशोधन क्षेत्रातील देशी-विदेशी अभ्यासू तज्ञाचे विविध सिद्धान्त व अभिप्राय या सर्वांना अनुसरून भरतवर्ष हे नामकरण पूर्णपणे जैनत्वदर्शकच आहे हे स्पष्ट होते या विशाल कालखडातील विविध ग्रथावलीमध्ये किंवा ग्रथ-सशोधन-प्रातातही या वर्षक्षेत्राच्या नामकरण-विधानाला व त्यामागील घटनेला एकमुखी पुरावा उपलब्ध होतो. या एकसधी पुराव्याच्या सातत्यामध्ये कोठेही खण्ड पडलेला नाही ही सुसगतता, हे सातत्य केवळ

विस्मयजनकच नव्हे तर विलोभनीय आणि स्वयप्रकाशीही आहे !! हा सार्वत्रिक इतिहासाचा वारसा खासच अभिमानास्पद आहे !

(७) वैदिक आर्यांची सस्कृती भटक्या अवस्थेतून प्रादुर्भूत झालेली असली तरी येथील मूळ निवासी भारतीयाची जीवनस्थिती भटक्या अवस्थेतून कधीच भरकटलेली नव्हती त्याचा अवतार जास्तीत जास्त सत्ययुगातून कृतयुगामध्ये होत राहिला आहे तेही फक्त या अवसर्पिणी कालगतीच्या सदर्भापुरतेच सत्य आहे त्याच्या देशाचे भरतवर्ष हे नामाभिधानही अवचित अवतरलेले नाही त्यापाठीमागे महान परपरा विद्यमान आहे नाभिराजपर्यंतच्या सर्व कुलकरानी पत्करलेल्या मानवी सत्कार्याच्या महान अनुयोग-साधनेतूनच या देशाचे उन्नयन झालेले आहे नाभिवर्ष-ऋषभवर्ष अशी नामकरणाची सगतवार परपरा निदान कृतयुगाच्या आरभकालापासून तरी प्रचलित झालेली आहे मानवी हितचिंतनशील अशा ह्या सस्कृतीची प्रत्यक्ष घडणावळ ऋषभ-भरतासारख्या नाभिराज-वंशातील आदिम क्षत्रियांच्या कर्तवगारीतून साकार झालेली आहे.

(८) मानवी जीवनातील सुविधीचा प्रथमकर्ता भ. आदिनाथ त्याचे सारे कर्तृत्व शुभातिशुभ तीर्थंकर प्रकृतीतून अवतरले आहे तेथे मानवी कल्याणाचा स्रोत ओतप्रोत भरलेला असतो. दुसऱ्याला कमी लेखणे, त्याना त्रास देणे, त्याची विराधना करणे अशा कुटिल नीतीचा त्यात लवलेशही नसतो जे आहे ते सर्व गुणानुसारी व मगलमय !! केवळ चैतन्याचेच अधिष्ठान त्याच्याच सर्वोदयी तीर्थातून समता, उदात्तता, सहयोग इत्यादी जीवनानुकूल स्रोत सर्वप्रथम प्रवाहित झाले आहेत ही गुणभक्ती व जीवनश्रद्धा अद्वितीय असल्याने जैन संस्कृती आपल्या श्रेष्ठत्वाने जगात उठून दिसते. सर्व स्तरावरील मानव्याच्या प्रतिष्ठेचा सधारक व गुणसवर्धक अशा अनुरूप जीवनक्रमाला क्षत्रियानुयोगाची दीक्षा याच तीर्थंकर ऋषभांनी आरभकाळीच देऊन ठेवली जीवनातील सर्व अनुकूल तथ्याची परिपूर्ती त्यानीच केली म्हणून आजही एकमेव पुरुदेव म्हणून त्याचीच कीर्ती अखडित राहिली आहे सर्वांवर इष्टतेचा वर्षाव करणारे वृषभनाथ त्या अर्थाने एकमेवाद्वितीयच ! म्हणून जैनाचा क्षत्रियानुयोग देखील आजही त्यातील गुण-वैशिष्ट्यामुळे वेगळा दिसून येतो. तीच अनुयोगात्मक क्षत्रियता सर्व जैन राजानी प्रत्यक्षात अनुसरली व आजच्या कलिकालापर्यंत प्रवाहित केली यापुढील जबाबदारी आपली आहे

भगवान ऋषभदेवांच्या परज्योतीचा प्रभाव सर्वव्यापी असल्यामुळे भरत-वर्षात उतरलेल्या वैदिक आर्यांनीही त्याची स्तुती भरपूर केलेली आढळते ती ऋग्वेदापासून अखेरच्या पुराणग्रथापर्यंत अव्याहत सापडते हा सुसगत व सुसबद्ध स्तवनप्रवाह सामान्याना चकित करणारा असला तरी तज्ज्ञाना चागलाच

बोधकारक आहे ऋग्वेदकालीन आर्यांची प्रधान देवता इन्द्र असली तरी त्या इद्राचा प्रभाव सार्वत्रिकही नाही व सार्वकालिकही नाही ऋषभाचा मात्र पुराण-कालाच्या अतापर्यंतच नव्हे तर हिंदीसारख्या इतर अर्वाचीन साहित्यातही सर्वगामी आढळतो ऋषभाइतकी सनातनता, सर्वव्यापकता व प्राचीनताही हिंदूच्या कोणत्याही दैवताला लाभलेली आढळत नाही.

(९) जगातील सर्व वर्षक्षेत्रामध्ये आपला भरतवर्ष पापहरण करण्यात सर्वापेक्षा जास्त पावनप्रद, पुण्यशील आणि सुखानुगामी असून याशिवाय शुभकर भोगसिद्धीला अनुकूल, समग्र पुरुषार्थ-साधनेची आधारभूमी, सौदर्य सपन्न आणि वैभवशाली आहे म्हणून भगवान परमेश्वरानीही आपले सर्व जन्मावतार याच भूमीवर घेतलेले आहेत भगवद्भक्त जनताही याच क्षेत्रात निवास करते इद्र, कुबेर, किन्नर, यक्ष, गधर्व, विद्याधर, सिद्ध आणि इतर दिव्य योनीतील सर्व पिशाचगण आपल्या भोग-विहारासाठी याच भरतवर्षाकडे धाव घेतात येथेच निरनिराळचा वनप्रदेशात दीर्घकाल रमतात मदनाची विहारभूमी देखील हीच शंकर-पार्वतींचे निवासही -याच वर्षात ! त्याचे सर्व गणसमूहही येथेच रमत असतात युगायुगातील असख्य तीर्थंकराच्या देशना-विहारामुळे अधिकाधिक पावनप्रद होत असणारा हा भरतवर्ष सर्वार्थाने महन्मगल आहे सामान्य जनाच्या ऐहिक दृष्टीनेही या भरतवर्षात जी पुण्यशीलता अवतरली तीही ऋषभ-भरत यानी शिकविलेल्या जीवन-मूल्याच्या प्रभावामुळेच यश-जय-पराक्रम-कीर्तीच्या रूपाने सस्कृतीतील मानव्याचे मागल्यही त्याच्याच व्यक्तित्वामधून प्रवाहित झाले आहे एकूण आपल्या सस्कृतीचे आद्य शिल्पकार तेच पिता-पुत्र होत या वर्षक्षेत्राच्या एकदर स्पृहणीयतेला आणि विश्ववद्यतेला याच ऋषभ-भरत पिता-पुत्राची महनीयता कारणीभूत ठरली आहे

(१०) जन्मानेच नव्हे तर भौतिक, दैविक, आनुयायिक, तैर्थिक इत्यादी सर्व अतर्बाह्य अर्थानेच भरत हा ऋषभाची संतती होय ऋषभेय जीवन-मार्गामध्ये भरताचा आत्मा पार मोक्षापर्यंत तदैक्य पावलेला आहे तो देहाने-जन्माने वेगळा असला तरी मनाने ऋषभमय होता त्याच्या प्रत्येक क्रियेत ऋषभत्वाचे प्रतिबिंब साकारलेले असे ऋषभस्रोतातील ज्या तीर्थावर तो जगला तेच तीर्थ त्याने आपल्या सततीमध्ये व प्रजेमध्येही प्रवर्तमान ठेवले आणि मानवतेच्या साफल्याचा एक उच्चतम आदर्श निर्माण केला. ऋषभनाथ ज्या अभिप्रायाने पुरुदेव ठरले त्याच अर्थाने भरत नावानुरूप समग्र गुणभृत ठरला म्हणून त्याची शुभ्रतम कीर्ती अनश्वर ठरली तीच दिव्य कीर्ती भरतवर्ष या नामकरणात त्याच्या अनुयायींनी गोवून ठेवली आहे. हा भरत राजा प्रजेच्या भरण-पोषणासाठी इतका गुणभृत ठरला की आगामी कालामध्ये जो जो राजा तशा गुणाचा धारक म्हणून श्रेष्ठ

ठरला त्या त्या प्रत्येक राजाला **भरत** अशी संज्ञा किंवा उपाधी प्राप्त होऊ लागली तुलसीदासांनी आपल्या सुविख्यात रामचरितमानस या ग्रंथात भरत या संज्ञेची परिभाषा देताना म्हटले आहे की--

**विस्वरभरन पोषण कर जोई।**
**ताकर नाम भरत अस होई ॥ ७ ॥**

— बालकाण्ड, २२९/७.

जो कोणी राजा सर्व प्रजेचे भरण-पोषण वैश्विक रीतीने करण्यात श्रेष्ठ ठरतो त्यास **भरत** असे नाव प्राप्त होत असते आणि जो महामानव अशा विपुल गुणांनी संभृत असतो त्याला **भरताचीच** उपमा देण्याची पद्धत रूढ झाली-

**निरवधि गुन निरुपम पुरुषु भरतु भरतसम जानि ॥**

— अयोध्याकाण्ड, २८९.

**भरत** या संज्ञेचा जनक ठरणारा **भरतचक्री** राजपदाचा मुकुटमणीच नव्हे तर **इंद्रमणी** शोभला त्यांनी योजलेली हा, मा, धिक्, परिभाषणा, मंडलबंध, चारग आणि छविच्छेद अशी सात प्रकारची दण्डनीती दिगंतात प्रसिद्ध पावली त्या नीतियोजनेत आजतागायत नवी भर पडू शकलेली नाही ! एवढी ती त्याच वेळी सर्वांग परिपूर्ण बनली होती भरताच्या वैभवाला सूर्याप्रमाणे उदय, अस्त, ग्रहण इत्यादी उपघात नसल्याने **भरताचा प्रभाव सूर्यातिशायी आणि दिव्यानुभावी ठरला** याच **भरताच्या** छत्राखाली श्री आणि सरस्वती प्रथमच एकत्र प्रेमाने नांदू शकल्या त्याची राजनीती **ऋषभतीर्थानुसारी** असल्याने या पृथ्वीतलावर सर्वत्र कुशल वर्तत होते (त्रिपष्टि०, १/५/८७) भरतेशवैभवामध्ये विलसत असूनही राजभोगाच्या नीतीमधील स्वतःच्या वैशिष्ट्यामुळे रत्नाकर कवीच्या शब्दात तो 'उण्ड उपवासी' व 'बळसि ब्रह्मचारी' ठरला भोग आणि योग यांचा दुर्लभ असा संगम आपल्या जीवनात नित्य संभवनीय ठरवून जगामध्ये **भोग-योगाचा एक नवा आदर्श त्यानेच निर्माण केला** म्हणून त्याची अतुलनीय महत्ता स्पष्ट करताना गुणभद्र आचार्यांनी केवळ '**कैस्तुला व्रजेत्**' एवढ्याच पदाची योजना केली त्याच्या सर्वकल्याणकारी शासनाला उद्देशून जिनसेन आचार्यांनी-

**अप्रतिशासनं भरतस्य शासनं शिरसा दध्वम् ।**

— महापुराण, ३१/१३६

एवढाच आदेश दिला आहे तर हेमचंद्र आचार्यांनी-

**आखण्डल इवाऽसि त्वं षट्खण्डे क्षोणिमण्डले ।**

— त्रिपष्टि०, १/४/४५२.

या शब्दात त्याना इन्द्रत्व बहाल केले आहे

(११) अनपायकारी जीवनमुल्यावरील श्रद्धा दृढावण्यासाठी, समता-सहयोगाचा अंत स्रोत प्रवाहित राखण्यासाठी, चेतोबल देणाऱ्या ओजाच्या दीप्तीसाठी आणि हिंस्र शल्य दूर होऊन कार्यप्रवणतेला प्रेरणा मिळण्यासाठी भरताच्या इतिहासाच्या परिशीलनाची नितात गरज आहे हे ओळखून आजचे सत्ताधारी स्वच्छदपणे स्वमतानुकूल इतिहास नव्याने लिहून घेण्याचा हव्यास धरतात कालातराने तोच अनिष्ट इतिहास पुढच्या पिढीच्या हाती पोहोचतो या बाबतीतही दक्षता बाळगण्यासाठी इतिहासाच्या अतरगाच्या अनुप्रेक्षेची गरज आहे पक्षाभिमानी इतिहास पारखावा लागतो इतिहासाचा कालखडात्मक आरभ बदलत असतो एखाद्याने घेतलेले निर्णय सापेक्ष ठरतात म्हणून नव्या शोधाबरोबर रूढ इतिहासही सुधारून घ्यावा लागतो मानवधर्म केवळ तर्काच्या ढगावर पोसवत नाही त्याला प्राकृतिक, आतरिक आणि प्रासगिक घटनाभूमीचा आधार शोधावा लागतो ह्या विस्तृत घटना कोणत्याही पूर्वग्रथात सुसगतपणे सापडत नसतात नटाप्रमाणे त्याचे मुखवटे वेळोवेळी बदलले आढळतात तेव्हा या मुखवट्याच्या आतील आत्मा ओळखणे आणि भावी विकासासाठी त्याच्या मौलिक गुणाची कास धरणे यासाठी योग्य मार्गदर्शन स्वीकारणे हाच इतिहासाचा खरा बोध होय. आणि या दृष्टीने जैनानी केलेली प्रगती भूषणावह आहे त्याची आत्मगुणाची पारख आणि व्यवहारातील भद्रता चोख आढळते

ग्रहाच्या गतीवर वातावरणाचा परिणाम होतो तसाच मानवी जीवनव्यवहारावर भौगोलिक स्थितीचाही परिणाम होत असतो कालाचा परिणाम तर सुस्पष्ट आहे या सर्वाहून वशभेदाचा प्रभाव जास्त क्लेशदायक असतो कारण मानवी समता धोक्यात येऊन विषमता वाढते वशाविष्ठित सत्ता प्रस्थापित होते मग गुणाच्या व पात्रतेच्या कल्पना सत्तेच्या वळावर बदलून घेण्याचा प्रयत्न होतो नीतिमूल्येही सत्तेच्या कवजात वावरतात. मग मागे उरतो तो फक्त सत्तासघर्ष त्यातून 'मारा व जगा, जगायचे असेल तर मारा, जो बलिष्ठ असतो तोच जगतो' अशा हानीकारक कल्पना पोसवतात वरिष्ठतेची भावना उचावत जाऊन ते स्वत ईश्वरी अश, अवतार किंवा दैवी प्रतिनिधी या स्वरूपाचे स्थान पटकावतात अर्थातच इतरांना गुलामगिरी पत्करावी लागते वर्णभेद बोकाळतो

याविरुद्ध सर्व मानवाना फक्त मानव म्हणून समानतेने जगू देणारी प्रेरणा मात्र शुभकर सस्कृतीला जन्म देते जीवाच्या नैसर्गिक गुणाच्या वाढीला उपयुक्त अशी जीवनपद्धती रूढ होते इतिहासाचे हे दोन वेगळे स्रोत आहेत. पण त्यातून नेमका बोध कोणता स्वीकारावा हा मनाच्या पात्रतेचा प्रश्न असतो यातून जैनानी

स्वीकारलेला ऐतिहासिक बोध अर्थातच वरीलपेक्षा वेगळा आणि सर्व जीवांच्या ज्ञान, सुख इत्यादी मौलिक गुणाना अनुरूप आहे जैनाचा हा बोध महत्त्वाचा असल्याने त्याच्या जीवनाचा इतिहासही वेगळा आहे कारण त्याच्या जीवनातील श्रद्धा, क्रिया, मनोभाव, परस्परभाव इत्यादी जीवनमूल्ये निराळी आहेत

प्रसगाधीन ऐतिहासिक मूल्ये देश–काल–परिस्थितीच्या त्रागड्यातून आविष्कृत होतात म्हणून ती सनातन असू शकत नाहीत मानवतेचे खरे अग किंवा घटकमूल्ये शोधण्यासाठी प्रसगातीत दृष्टी प्राप्त व्हावी लागते केवळ निरनिराळ्या अवस्थेतील प्रासगिक रूपे पाहून जलतत्त्वाचा खरा बोध होत नाही त्याप्रमाणे आत्मतत्त्वाचा बोध कठीण असला तरी मानवी विकासार्थ अपरिहार्य आहे. त्याशिवाय शासनसस्थेची गती व दिशा ठरविता येत नाही मग जो गोधळ माजेल त्याचा तथाकथित इतिहास काय कामाचा ? म्हणून आज उपलब्ध असलेला पुष्कळसा इतिहास प्रसगाधीन व अभिनिवेशाधीन आढळतो त्याचा परिहार होण्यासाठीही भरतकालीन सस्कृतीच्या इतिहासाची गरज तीव्रतेने भासते

(१२) क्षत्रियता म्हणजे केवळ शारीरिक सामर्थ्य, शौण्डीर्य किंवा क्रौर्य नव्हे। तसेच जर समजले तर केवळ शस्त्राच्या तीक्ष्णतेच्या अभावीच नव्हे पण आजार, अपघात, अपगावस्था, म्हातारपण, ध्यानमग्नता इत्यादी प्रसगीही क्षत्रिय व्यक्ती गुणानी श्रेष्ठ व वरिष्ठ असूनही क पदार्थ ठरेल।। जैन क्षत्रियानुयोगातील गुणवत्ता तर शारीरिक व्याधीतही वाढविता येते त्याच्या सिद्धीने जरा-मरणावर देखील विजय मिळविता येतो म्हणून मुनिपर्यायात देखील जैन क्षत्रियानुयोग पूज्यच ठरतो त्याची साधना मुनिधर्माचाराशी किंवा कोणत्याही गुणाराधनेशी विरोधी नसतेच कारण त्याचा मूलाधार देहधर्म नसून आत्मवीर्य आहे. कर्मनाश केल्यावर अनत ज्ञानाप्रमाणेच अनत वीर्याचीही सप्राप्ती सिद्ध होत असते. अनतवीर्य हा गुणच क्षत्रियतेचे परम अधिष्ठान होय. या आत्मगुणाला सोडून वेगळ्या व विरोधी शक्तीना शौर्यगुणात किंवा मानवतेच्या साधनेत स्थान नाही. म्हणून क्षत्रियता केवळ शारीरिक गुण असू शकत नाही. केवळ शरीरधर्माच्या आविष्कारात परम गुणाच्या आराधनेला स्थान मिळू शकत नाही हे मानवी अनुभूतीच्या इतिहासाने स्पष्ट केलेले आहे कमळाच्या पाकळ्या कितीही प्रकटपणे दृष्टोत्पत्तीस येत असल्या तरी कर्णिकेच्या अगभागी आतर भागामध्ये विराजणाऱ्या पिवळ्या धमक परागमय सारद्रव्यालाच अग्रिम वरिष्ठता लाभत असते–

**सो जयइ जस्स केवलणाणुज्जलदप्पणम्मि लोयालोयं ।**
**पुढ-पडिबिबं दीसइ वियसिय-सयवत्तगब्भगउरो वीरो ।।**

– कसायपाहुड, जयधवला, मगलायरण, ३.

गुणधरकृत कसायपाहुडावरील जयधवला टीका विख्यात आहे वीरसेनांची लेखनी नेहमीच प्रभावकारी व विपुल अर्थवाही असते म्हणून यात फक्त भगवान महावीरांचाच गौरव आहे असे नव्हे तर विजयी वीराची व्याख्याही अनुस्यूत आहे " जो लोकालोकातील समग्र जीवमात्रामध्ये असणारे चेतनातत्त्व एकरूपच आहे हे आपल्या समीचीन दृष्टीने जाणतो त्याच्या प्रसन्नभावाला जगातील सर्व लोक कमळाच्या पाकळ्याप्रमाणे सभोवती फेर धरून पूजतात तोच परम वीर सदा सर्वदा जयशाली असतो "

ऋषभदेवांचे क्षत्रियतीर्थ आणि भरतचक्रीचा क्षत्रियानुयोग यातून परिपूर्त झालेली क्षात्रवृत्ती व मानवी संस्कृतीच पुढील सर्व जिनानुयायींनी स्वत: अंगीकारलेली आणि पुरस्कारलेली आहे त्यामुळे त्यातील सर्व गुण मूळ प्रणेत्या-प्रमाणेच प्रभावशाली व सर्वातिशायी ठरले आहेत भगवान महावीरही याच आम्नाय-परंपरेतील एक अविस्मरणीय वीर ! त्याची वीरता व इतर सहभावी धारणा त्याच क्षत्रियकुण्डातून प्रवाहित झाल्या आहेत मैत्री-प्रमोद-कारुण्य-माध्यस्थ्य इत्यादी सामाजिक सहजीवनानुकूल भावना आणि प्रत्यक्षात प्रशम-संवेगात्मक आचारधारा यामुळे त्यांच्या क्षत्रियानुयोगात विश्वोद्धारकता अवतरली आहे. इतरत्र अशक्यप्राय वाटणारा क्षात्रविद्या व आत्मविद्या यांचा संगम येथे केवळ सहगामीच नव्हे तर एकरूपतेने साकार झाला आहे येथे गणलेली विजयाची मूल्ये नवख्याला विचित्र वाटली तरी प्रत्यक्षात मात्र केवळ तीच जीवनदायी ठरतात त्याचा अष्टगुणी विजय जगाच्या आठवणीत विश्वाच्या अतापर्यंत राहण्यासारखा आहे शासनातील दण्डनीती दण्डनानुगामी नसून ती संयमनानुगामी आहे. त्याची सामनीती केवळ शत्रूसाठी नसून ती विश्वजनीनार्थ आहे संग्राम-तंत्रातील पुरुषव्रत अनपायमयी आहे त्याच्या विवेकात दिव्यत्वाची प्रतीती आढळते क्षत्रियकर्मालाही त्यांनी तीर्थाचे पावनत्व प्राप्त करून दिले आहे. हे सर्व यथार्थतेने जमले आहे कारण तो त्याच्या सम्यग्दर्शनाच्या दिव्यत्वाचा प्रभाव आहे त्याचा भोगानुयोग केवळ शरीराच्या नव्हे, तर त्या शरीराचा खरा जनक जो जीव त्याच्याही कल्याणासाठी असतो हितसुख आणि हृतसुख यातील नेमका भेद ओळखण्यास त्याचा अनुप्रेक्षात्मक विवेक पूर्ण समर्थ असतो म्हणून–

न तत्सुखं यत्परद्रव्य–संबंधादुपजायते ।
नित्यमव्ययमक्षय्यम् आत्मोत्थं हि परं शिवम् ॥

– महापु०, २१/२०९

परद्रव्याच्या संपर्कापासून जे सुख निर्माण होते ते यथार्थ नसते. उलट ज्याची उत्पत्ती आत्म्यापासून होते तेच सुख शाश्वत, अविनाशी व क्षयरहित असल्यामुळे परम पवित्र असते या सुखधारणेवरील त्याची श्रद्धा अढळ असते

'प्रजानां प्रीणनम् ।' हा समाजानुयोगातील मत्र त्यानी पूर्णत आत्मसात केला आहे समता, आत्मौपम्य दृष्टी, क्षमता, दण्डनीतील मातृतुल्य विधायकता, अविरोधी प्रगती, जात्यतीत भावना, विरोधातील सुमूनता इत्यादी प्रमुख मानवी गुणाच्या एकनिष्ठ आराधनेतून त्यानी सहजीवनातील यशाची परिसीमा गाठली आहे. त्याच्या क्षात्रतेजाच्या वर्धनासाठी त्यानीच स्थापन केलेली ती एक गुणाधिष्ठित सस्था आहे, केवळ यत्रणा नव्हे !! त्यातील मूळ प्रेरणा सामाजिक कल्याणाशी निगडित आहे ती ईश्वरी किंवा नैसर्गिक अथवा जन्म–जात्यनुसारीही नाही सामाजिक पुरुषार्थाच्या साधनेसाठी उभी केलेली ती अेक क्रियाशील योगपरपरा आहे त्याची वरिष्ठता कार्य-साधनेवरच आधारित आहे त्यामुळे तेथे वर्णकल्पनेला किंवा जातीय भावनेला मुळीच स्थान नाही वैदिक कल्पनेतील ब्राह्मणापेक्षा हा क्षत्रिय कोणत्याही अर्थाने कमी दर्जाचा नाही उलट ब्राह्मणाच्या आध्यात्मिक क्षेत्रातही तो त्या ब्राह्मणापेक्षा ज्येष्ठ, श्रेष्ठ व वरिष्ठ आहे.

वैदिकाच्या कल्पनेप्रमाणे जैनांनी क्षत्रियासाठी एखादी विशिष्ठ योनी किंवा जन्मस्थान कधीच कल्पिलेले नाही. क्षत्रियानाच नव्हे तर कोणालाही केवळ जन्मस्थानामुळे कोणतेही पद किंवा गुण अथवा वैशिष्ठ्य प्राप्त होत नसते. व्यक्तीतील आत्मगुणांचा आविष्कार केवळ सम्यक्त्वामुळेच होतो अन्यथा नव्हे. लौकिकदृष्ट्या सर्वश्रेष्ठ असलेली क्षत्रियत्वाची पात्रता देखील सम्यक्त्वामुळेच लाभत असल्याने क्षत्रियाना अयोनिज म्हटले आहे. या परिभाषेत त्याच्या सामाजिक जबाबदारीचीही सूचकता नोदलेली आहे नृपास्तस्मादयोनिजाः ।। (महापु०, ४२/१५) म्हणून राज्यसस्थेचे चालक जातीयतेच्या अतीत असतात. विशिष्ट वशावळीच्या बाहेर पडून निव्वळ पात्रतेवर आधारलेल्या क्षात्रतीर्थाची ते दीक्षा घेतात. सर्व जैन क्षत्रिय दीक्षित असतात, तीर्थस्नात असतात.

जन्माच्या दृष्टिकोणातून पाहिल्यास समस्त मानव एकसारखाच आहे. एगा मणुस्सजाई । ( चउपन्न०, १ रिसह, पान ३९ ). वसुदेवहिंडीमध्ये (उसहसिरिरज्जाभिसेओ, पान १६२ ) तर सामाजिक कार्याच्या जबाबदारीच्या विभागणीसाठी ऋषभदेवांनी पूर्वकालीन अेकसधी प्रजेचे प्रथमत चार वर्ग पाडले. पढमं राइणा विभत्ता चत्तारि गणा । त्या वर्गांना स्पष्टपणे गण म्हटले आहे. त्या चार गणाच्या सहकार्याने (गणसमग्गो) राज्यपालन केले. या प्राचीन ग्रथात लोकाच्या विभागाना गण किंवा वर्ग अशी सज्ञा दिली आहे ती लक्षणीय आहे तेव्हा 'जरी ब्राह्मण झाला भ्रष्ट तरी तो तिन्ही लोकी श्रेष्ठ' अशा प्रकारची जात्यधता जैनाना निखालसपणे अमान्य आहे

समता-अहिंसेचा प्रधान सदेश आहे– 'सगच्छध्वम्, सवदध्वम्।' प्रतिवधात्मक उपाय सहजीवनाला पोपक असले तर मात्र त्यात हिंसा घडत नसते अहिंसा सदैव उत्कर्षदायिनी असून ती एक मानवी मनाची पवित्र व निर्मळ अवस्था आहे. मानवाच्या चेतनेची ती एक अभिभावात्मक प्रक्रिया आहे, एक महान साधना आहे याच साधनेतून विश्वशांती आणि विश्वबंधुता साकार होतात उलट याच्या अभावामुळे जगप्रसिद्ध फ्रेंच क्रातीतील याच अर्थाचे सर्व पुकार व्यर्थ ठरले आहेत!

उदात्त भावना आणि उदार वागणूक भारतीय सस्कृतीची वैशिष्टये होत त्यामुळेच एवढा विविध-स्वरूपी देश एकछत्री होऊ शकला, केवळ शस्त्राच्या प्रयोगाने नव्हे! जागतिक एकतेच्या कल्पनेला हाच एक वास्तव आधार आहे!! या भूमीवरील श्रेणिक, नंद, खारवेल, चद्रगुप्त, अशोक, हर्षवर्धन, अमोघवर्ष, अकवर, शिवाजी इत्यादी प्रसिद्ध राजानी स्वत चा धर्म वेगळा असूनही इतर धर्मासबधी उदात्त भावना वाळगली व प्रत्यक्षात इतराना उदारतेने वागविले काहीनी तर परधर्माची सेवा प्रत्यक्षही केली सास्कृतिक जीवनातील विचारप्रणाली मध्ये रामकृष्ण परमहस आणि म. गाधी किंवा अमेरिकेतील डॉ किंग या सारख्यानी मानवी क्षेत्रात जी भरीव कामगिरी केली तिचा मूलाधारही भारतीयते-तच आढळेल! सस्कृतिसंवर्धन करणाऱ्या साहित्याची प्रतिष्ठा उचविण्यामध्ये जैनाचार्यानी आपली अग्रिमता सतत टिकविली आहे विचार, उच्चार आणि आचार या तीनही क्षेत्रातील भारतीय जीवन त्याच्या प्रभावाने भारावून गेले आहे उच्च सास्कृतिक आदर्शांचा विचार करताना प्राचीन साहित्यात समण–माहण किंवा श्रमण–ब्राह्मण असा सयुक्त उल्लेख येतो या पदावलीमध्येही समणाना आद्य व आदरणीय स्थान आहे पाली साहित्याला जैनाचे वा वैदिकाचे सोयरसुतक पाळण्याचे कारण असभवनीयच तरीही तेथे समण शब्दाचा मोठा आदर आढळतो भारतीय सस्कृती समण संस्थेला विसरू शकत नाही हेच खरे.

विचार प्रणालीच्या या उच्चतम पातळीमुळे पुष्कळ तिऱ्हाइताना वाटते की ही विचारधारा अगीकारल्यास क्षात्रधर्म पाळणे, दण्डसंस्था हाताळणे, राज्यसस्था चालविणे अशक्यच आहे, त्यामुळे क्षात्रतेजाला अवरोध प्राप्त होतो पण तो केवळ त्याच्या समजूतीचा कोतेपणा आहे त्यात तथ्य नाही इतिहासाला ज्ञात असलेले जैन प्रणालीतील सर्व राजे सर्व अर्थाने समर्थ प्रशासक होते युगारभीच्या आदिराजांपासून इ सनपूर्व आठव्या शतकापर्यंतचे जीवंधर–करकण्डू इत्यादी पुराणकालीन राजे, किंवा अनतरकालीन श्रेणिक, लिच्छवी, नाथ, मल्ल, नद, खारवेल इत्यादी प्रागैतिहासिक राजे व राजवश, अथवा इतिहासकालीन अशोक, चद्रगुप्त, कूणिक, सप्रती, चालुक्य, राष्ट्रकूट, आध्र, गग, शिलाहार, होयसळ, सातर, इत्यादी श्रेष्ठ प्रतीचे अनेक राजे, राजवश आणि सामतगण, तसेच

अभयकुमार, भामाशाह, विमलशाह, श्रुतकीर्ती, सिंह, मृगेश, चामुण्डराय, टोडरमल इत्यादी अनेक धुरधर मत्री व सेनापती, शिवाय सिंहनंदी, विजयकीर्ती, देवनदी, अजितसेन, सोमदेव, जिनसेन, जिनप्रभसूरी, हीरविजयसुरी, इत्यादी कित्येक राजकारणपटु जैनमुनी आणि त्या सर्वांनी बजावलेली भारतीय जीवनातील उच्चतम कामगिरी विचारात घेतली तर अलिकडील मानवाची मती थक्क होते. जैन क्षत्रियतेचा विचार म्हणजे केवळ पुराणातील वागी नव्हे याचा पूरेपूर प्रत्यय आल्याशिवाय राहात नाही

दूरस्थ व्यथेची कथा कितीही रंजक भासली तरी ती रक्तरजक असल्याने तिची जवळीक कोणालाही नको असते कारण प्रत्येक प्राणी जीवनप्रिय असतो आणि व्यथा जीवनाला प्रतिकूल असते प्राणव्याघाताचा सहार जीवनपर कसा असणार ?

**निविशते यदि शूकशिखा पदे**
**सृजति सा कियतीमिव न व्यथाम् ।**

पायात जरी कुसळ बोचले तरी व्यथेची मुसळ किती मोठी ! मारा आणि जगा हा दृष्टिकोण कुसळाइतकाच क्षुद्र असला तरी तो जीवनातील सारी भद्रता नष्ट करतो वस्तुत सर्व प्राण्याचे जीवनतत्त्व एकच असल्याने स्वन च्या जीवनासाठी निराळा मतलब व दुसऱ्यासाठी निराळा तर्क स्वीकारता येत नाही ! ! शिवाय वरील आदेशातून ' मला मारा आणि जगा ' किंवा ' मारा व मरा ' असा आत्मघातकी किंवा सर्वघातकी अर्थही सभवतो, तो यथार्थ नव्हे. ' जगा व जगू द्या ' हा मत्र स्वीकारूनही जीवनातील सर्व सग्राम नष्ट होतीलच याची खात्री नसली तरी सग्रामाचा सभव मात्र कमी होतो सग्राम झालाच तर तो आपद्धर्म ठरतो ! नित्यधर्म नव्हे ! उपायपूर्वक त्याचा मुकाबला केल्यावर आपद्धर्माकडून सद्धर्माकडे चटकन परत फिरता येते हा काय कमी फायदा आहे ? सग्राम ही सहारक्रीडा आहे ती जीवनपर कशी ठरणार ?

सुसस्कारित जीवन जगणे हा मानवाचा स्थायीभाव आहे त्याला सहाराची घृणा आहे जीवन जगण्यातच आनंद पोसवत असतो. निसर्गत च त्याचा कल सहारापासून दूर जाण्याचा असतो तो आपली नखेसुद्धा छाटून टाकतो. तीक्ष्ण नखधारी प्राणी हिंस्र असतात माणूस त्यापासून सावध राहातो जीवनलालमा तीव्र असते शस्त्रप्रवृत्ती नागरी आवरणात वावरली तरी ती आतून विपारीच असते म्हणून ती जीवनव्याघाती योजना प्रसवत राहाते सधी मिळताच दुसऱ्याच्या गळचाला नख लावण्यास उद्युक्त होते या क्रौर्याच्या अस्तित्वामुळे अनेक शस्त्रास्त्रांचा नवा आविष्कार होतच राहतो आणि शस्त्राचा भरवसा येत नसल्याने जगावर

शीत युद्धाची छाया सदैव पसरलेली राहते सुयाचे उत्पादन कपडे शिवण्यासाठी असते पण बदूकीच्या गोळीची निर्मिती मात्र दुसऱ्याला मारण्यासाठीच होत असते शिवण्यासाठी सुई आणि सुईमुळे शिवण्याची क्रिया चक्राकार चालू राहाते ! आवश्यकताच आविष्काराची जननी असली तरी पुढे मुलगीही जननकार्य करीत राहते ! तेव्हा मारण्यासाठी शस्त्र आणि शस्त्रामुळे मारणे चालूच राहणार, ते तसे सपणार नाही शत्रुवुद्धी सपल्याशिवाय क्षमा नादत नाही.

मानवी मनात क्षमाभाव पोसविण्याऐवजी सूडभाव उराशी वाळगणे म्हणजे शेतात अन्यधान्य पिकविण्याऐवजी अफूची पैदास करणे होय जीवनातील आनद खुलविण्याऐवजी दु खाची खाई खोदण्यात जीवित वेचणे होय सूड भावना, तिची साधने, प्रयोगाची क्लृप्ती इत्यादीचा आविष्कार मानवी कारणासाठी नसतोच त्यातील विनाशाची दिशा स्पष्ट दिसते मानवी शक्तीचा व्यय जीवनाच्या विनाशासाठी जितका होत असतो तितका विकासासाठी जेव्हा होत नाही तेव्हा मानवी मूल्येही मरतात, सामाजिक जीवनापेक्षा साग्रामिक हानीच वाढत जाते या सग्रामातील भयानक खेळ ज्याना आवडतो ते मात्र मैदानात येऊन मरत नसतात सग्रामाची कारणे शिजविणारे राजकारणी नेहमी वदुक दुसऱ्याच्या खाद्यावर लादत असतात तेच लोक मानव जातीचे खरे शत्रू होत

ज्वालेने जळजळ सपत नाही इधनाचा पुरवठा, वाऱ्याची मदत यामुळे ज्वाला अधिक उफाळतात, तिच्या सर्वभक्षी स्वभावामुळे साऱ्या विश्वाची राख-रागोळी होते **तसेच युद्धाने युद्ध सपत नाही.** ' शाततेसाठी युद्ध ' ही घोषणा एक विश्ववचना आहे सग्रामातील शक्ती कमी पडल्याने घटकाभर मदावलेल्या लढाई-वरून शत्रुत्व सपल्याची कल्पना विपरीत आहे प्रतिकार कधी स्थायी ठरत नसतो कारण स्थायीभाव गुणात्मक असतो जीवनातील स्थायीभाव प्रसन्नता आहे, सूड नव्हे ! प्रसन्नता क्षमेच्या उदरी जन्मते व मैत्रीच्या भावनेत पोसवते **या प्रसन्नतेचे सरक्षण करण्याची पात्रता म्हणजेच ऋषभप्रणीत क्षत्रियता.** प्रतिकाराने दावून टाकलेली आग वारा लागताच भडकून उठते **असा अपुरा व फसवा मार्ग ऋषभ-भरताच्या परंपरेत वसू शकत नाही**

त्याची वैशिष्ट्यपूर्ण **दण्डनीती, राजनीती** व **युद्धनीती** अगदी सूर्यप्रकाशा-प्रमाणे स्पष्ट दिसते ती आपल्या भूमीवरील पहिल्याच युद्धाच्या पार्श्वभूमीवर सास्कृतिक जीवनाच्या दृष्टीने या **भरत–बाहुबलीच्या** युद्धाला फार मोठे महत्त्व आहे ! तेथे युद्धकारण, युद्धपद्धती, जय, पराजय, लाभ, हानी यासबधीच्या सर्वच कल्पना एकदम निराळ्या असल्याचा प्रतिभास होईल. इतरत्र अधिक प्रसिद्ध असलेले **कौरव–पाण्डवाचे** महाभारत युद्ध क्षात्रतेजाच्या तुलनेत कदाचित युद्धही ठरणार नाही कारण त्यातून सर्वनाश उद्भवला तर पहिल्या युद्धापासून कोणतीच

हानी उद्भवली नव्हती दोन्ही युद्धे भावाभावांमध्येच लढली गेली पण पहिल्यातून लहान भाऊ अधिक पूज्य ठरला तर मोठ्या भावाचे वैभव अधिक वाढले जयाच्या उदीरणेची परिसीमा प्रत्यक्ष अनुभवण्यास मिळाली तर पांडवाच्या युद्धात अखेरपर्यंत खऱ्या जयाची उदीरणा झालीच नाही. जयाचा अनुभव घेण्याची तीव्र हाव बाळगणारा कोणीही योद्धा शिल्लकच राहिला नाही सर्वच सोंगट्या पटावरून दूर गेल्या या दोन युद्धामध्ये जो विशिष्ट फरक आहे त्याच्या आविष्कारामागे विशिष्ट जीवनश्रद्धाच कारणीभूत आहे या मानवी मूल्यामुळेच जैन क्षत्रियतेमध्येही विशेषता आढळते तिचा उद्देश वेगळा म्हणून हेतुसिद्धीही वेगळीच हा सर्व त्या सर्वोदय-तीर्थाचाच प्रभाव आहे ! त्या तीर्थप्रणालीतील कोणतेही जीवित-कार्य उभयपक्षी आपत्तिहारक, संपत्तिदायक आणि अभ्युदयकारकच असते !!! केवळ याच तीर्थातील क्षत्रियधारेतून-

**उत्तिष्ठेद् यद्यशो तस्मात्तस्य शान्तिः कुतोऽन्यतः ।**
**घ्नन्ति शत्रुमपि नो यशोधनाः ।**

हे यशाचे सूत्र प्रत्यक्षात आविर्भूत होणे शक्य आहे

जैन क्षत्रियानुयोगाला ऐहिक सुख-संपत्तीचा विटाळ होतो असे मानण्याचे कोणतेही कारण नाही सर्वोदय-तीर्थाच्या प्रवर्तनामध्ये भौतिक वैभवाचाही पूर्णाविष्कार सिद्ध आहे म्हणूनच जैन तीर्थंकरांच्या समवसरण-रचनेतील अखिल दैवी व मानवी वैभवाचा कळस साऱ्या त्रिलोकामध्ये वरचढ असतो वैभवसंपन्नते-कडे वाकड्या नजरेने पाहण्याचे काहीच कारण नाही धनतत्परता ही प्रशस्तच आहे महापुराणकारानी धनतत्परतेला **धनोच्छनचुञ्चता** (३५/१२२) म्हटले आहे शिवाय **अहो कष्टा दरिद्रता ।** (२६/४९) दारिद्र्य सर्व प्रकारच्या कष्टाचे माहेर असल्याने धनार्जनाला उत्तेजन दिलेले आढळते याच २६ व्या पर्वातील संपन्न जीवनाचे वर्णन महापुराणातील आर्थिक जीवनाचे दर्शन घडविण्यास समर्थ आहे आभरण-अलंकार-वस्तूंच्या वैपुल्यामुळे समृद्धीचे प्रदर्शन साकार होते विविध वाहनाच्या सोई जीवनातील आर्थिक प्रगती दाखवितात **अक्षीणमहानस** (३६/१५५) यासारखे उल्लेख भोगसमृद्धीचे आणि भोगमय जीवनाचे उत्तमोत्तम प्रतीकेच होत जीवनातील **गुणवृद्धी** आणि विविध **विद्यासिद्धी** वैभवसंपन्नतेबरोबरच सांस्कृतिक श्रेणीचीही त्रिमिती दाखवितात **शिल्पशाला** (Factories), **आयुधशाला**, शयनासन-उपकरणे, वास्तुशाला, नगर-रचना, ग्रामव्यवस्था, वस्त्रशाला, इत्यादी उद्योगसंस्था भरतचक्रीच्या राज्यात भरभराटीस आलेल्या होत्या विविध व विपुल स्त्रीभोग-प्रकारावरून (३७/११० ते १४१) आणि इतर दशविध भोगोपभोग-विवरणावरून (३७/१४३) त्याची आरोग्यसंपन्नता व उपभोगपात्रता, **अवतंसकादी**

अलकरावरून (३७/१५३) सौंदर्यप्रियता, सिंहाटकादी (३७/१६४) शस्त्रावरून अस्त्र-प्रवीणता, सूर्यप्रभ छत्रादिकावरून (३७/१५६) तेजस्विता, कालनिधीवरून ( ३७/७५ ) साहित्यशीलता, पाण्डुक निधीवरून ( ३७/७८ ) अन्नसमृद्धी इत्यादी त्या काळच्या विविध जीवनक्षेत्रातील अनेक बाबींचे परिज्ञान होते अर्थशास्त्रातील सुप्रसिद्ध स्थगित (आपत्कालासाठी राखीव) भोगोपभोगाचा प्रकार तर त्याच्या सास्कृतिक प्रगतीचा आदर्श टप्पा दाखविल्याशिवाय राहात नाही ऐहिक कल्याणाचा मूलाधार म्हणून अर्थाची महती सर्वत्र मानलेली आहे दु:खनाश आणि श्रेयसिद्धीबरोबरच प्रेय-समृद्धीची सुगमता हा सम्यग्दर्शनाचा प्रारभिक परिपाक मानलेला आहे मानवी कल्याणामध्ये सुख (Happiness), आनद (Pleasure) आणि तृप्ति (Contentment) अशा सर्व शुभ भावाचा अतर्भाव होत असतो या सर्वांनी सपन्न अशा भरतचक्रीच्या समृद्धीचे चित्र पुढील शब्दावली-मध्ये साकार झालेले आहे–

> **नानारत्ननिधानदेशविलसत्सम्पत्तिगुर्वीमिमां**
> **साम्राज्यश्रियमेकभोगनियतां कृत्वाऽखिलां पालयन् ।**
> **योऽभून्नैव किलाकुलः कुलवधूमेकामिवाङ्कस्थितां**
> **सोऽयं चक्रधरोऽभुनक् भुवममूमेकातपत्रां चिरम् ॥**
>
> **– महापुराण ३७/२०२**

हे विधान अक्षरश खरे आहे कारण ऐहिक आणि आत्मिक सपदेचा मूलाधार अेकच आहे–

> **धर्मो हि मूलं सर्वासां धनर्द्धिसुखसंपदाम् ।**
>
> **– महापुराण, २/३३**

(१३) नामकरणविधीवरून जीवनातील सस्कारी प्रवृत्तीचा आणि श्रद्धा-पूर्तीचा बोध होत असल्यामुळे चागल्या नामस्मृतीचा वारसा आपल्याकडे यावा असे सर्वांनाच वाटते म्हणून पूर्वीपासूनच भरतवर्षाच्या नामकरणाचे आकर्षण दुर्दमनीय झालेले आढळते. देश हाच सस्कृतीचा मूलाधार असतो म्हणून भूमीच्या झगड्या-इतकाच त्या नावातील सास्कृतिक तथ्याचा झगडा तीव्र होत असतो भरतवर्षाच्या सदर्भात हा अनुभव तीव्रपणे प्रत्ययकारी आहे हे अभिधान एक महान श्रद्धास्थान असल्याने आपल्या तेजस्वी जीवनासाठी त्याचा आधारस्थानासारखा उपयोग होतो त्या नामस्मृतीमधील महान व्यक्तित्वाची स्फूर्ती उमेदवाराना हवीहवीसे वाटते म्हणून महती वाढत जाते सास्कृतिक नावे ओजाची उगमस्थाने असतात नामकरणातील प्रक्रियेची ऊर्जा प्रगतीला प्रेरणा देते नावामुळे स्मृतिरूपाने अमर

होण्याची इच्छा तृप्त होते. नावाचा इतिहास म्हणजेच नामधारकाच्या संस्कृतीचा इतिहास हे समीकरण जमत असल्याने नावाना संस्कृतीइतकेच मूल्य प्राप्त होते. भूमीवरील नामसंस्काराची परंपरा वारसाहक्काचे निदर्शक आहे अशा सर्व थोर नावामध्ये भरताचे नाव अग्रगण्य आहे त्यातून नराचा नारायण होण्याची प्रेरणाशक्ती लाभते त्यातील जीवनदर्शनामुळे राष्ट्रीय ऐक्याची सिद्धी साकार होते मात्र ती राष्ट्रीयता आपल्या प्रभुत्वाखाली आणण्याची स्वार्थी भावना जागृत झाल्याने प्रस्तुत झगडा तीव्र भासतो व तो उन्मार्गी बावतो. तेव्हा ह्या उन्मार्गाचे निराकरण करण्यासाठी मौलिक इतिहास अभ्यसनीय ठरतो. या सर्व सांस्कृतिक महत्तेचा मालक ऋषभेय भरत आहे हे सर्व प्रकारच्या पुराव्यानी सिद्ध होते

(१४) स्थलनामकरणावरील दृष्टिक्षेपामुळे सांस्कृतिक स्मृतींना साकार होण्यास मदत व्हावी ही अपेक्षा । या अभियोगातून एक संवेदनशील Kaleidoscope (चारुदर्शक) सादर केला आहे वाचकानी तो मन पूत वापरावा आणि त्यातून मन चक्षूसमोर प्रतिबिंबित होणाऱ्या बहुरंगी भावतरंगाना स्वत च्या कल्पनेतून निसृष्ट होणारी रंगपुटे चढवावीत त्या प्रतिक्रियेत जे काही साकार होईल त्याचा मनापासून अनुभव स्वत घ्यावा आणि जे साध्य होईल ते दुसऱ्याच्या संवेद्यतेला चालना देण्यासाठी प्रकाशात आणावे एवढीच प्राथमिक भावना

वृषभाय नमोऽशेषस्थितिप्रभवहेतवे ।
त्रिकालगोचरानन्त–प्रमेयाक्रान्तमूर्तये ।।

— महापुराण, प० ४२, पुष्पिका १



# प रि शि ष्ट

आइक्खामि विभावेमि किट्टेमि पवेदेमि सअट्ठं ।
सहेउं सणिमित्तं भुज्जो भुज्जो उवदंसेमि ।।

— सूत्रकृतांग, श्रुतस्कंध २, सूत्र ७

## परिशिष्ट १

# ऋषभदेवांच्या १०० पुत्रांची नामावली

श्री आदिराज ऋषभदेवाच्या १०० मुलाची व २ मुलीची नाममालिका समग्रपणे तपासणे एक स्वतंत्र काम आहे. पण पुढील किरण-कवडसा वाचकाना प्रकाश दिल्याशिवाय राहणार नाही—

| | | | |
|---|---|---|---|
| १ भरत | २ बाहुबली | ३ शख | ४ विश्वकर्मा |
| ५ विमल | ६ सुभक्षण | ७ अमल | ८ चित्राग |
| ९ ख्यातकीर्ती | १० वरदत्त | ११ सागर | १२ यशोधर |
| १३ अमर | १४ रथवर | १५ कामदेव | १६ ध्रुव |
| १७ वच्छ | १८ नन्द | १९ सुर | २० सुनन्द |
| २१ कुरु | २२ अङ्ग | २३ वङ्ग | २४ कौशल |
| २५ वीर | २६ कलिंग | २७ मागध | २८ विदेह |
| २९ सगम | ३० दशार्ण | ३१ गभीर | ३२ वसुचर्मा |
| ३३ सुवर्मा | ३४ राष्ट्र | ३५ सुराष्ट्र | ३६ बुद्धिकर |
| ३७ विविधकर | ३८ सुयश | ३९ यश कीर्ती | ४० यशस्कर |
| ४१ कीर्तिकर | ४२ सूरण | ४३ ब्रह्मसेन | ४४ विक्रान्त |
| ४५ नरोत्तम | ४६ पुरुपोत्तम | ४७ चण्डसेन | ४८ महासेन |
| ४९ नभ सेन | ५० भानू | ५१ सुकान्त | ५२ पुष्पयुत |
| ५३ श्रीधर | ५४ दुर्धर्ष | ५५ सुसुमार | ५६ दुर्जय |
| ५७ अजेयमान | ५८ सुधर्मा | ५९ धर्मसेन | ६० आनदन |
| ६१ आनन्द | ६२ नन्दसेन | ६३ अपराजित | ६४ विश्वसेन |
| ६५ हरिषेण | ६६ जय | ६७ विजय | ६८ विजयन्त |
| ६९ प्रभाकर | ७० अरिदमन | ७१ मान | ७२ महाबाहू |
| ७३ दीर्घबाहू | ७४ मेघ | ७५ सुघोष | ७६ विश्व |
| ७७ वराह | ७८ सुसेन | ७९ सेनापती | ८० कपिल |
| ८१ शैलविचारी | ८२ अरिंजय | ८३ कुजरबल | ८४ जयदेव |
| ८५ नागदत्त | ८६ काश्यप | ८७ बल | ८८ धीर |
| ८९ शुभमती | ९० सुमती | ९१ पद्मनाभ | ९२ सिंह |
| ९३ सुजाती | ९४ सजय | ९५ सुनाभ | ९६ नरदेव |
| ९७ चित्तहर | ९८ सुरवर | ९९ दृढरथ आणि | १०० प्रभजन |

— अभिधानराजेन्द्रकोश, उसभ, पान ११२९.

ऋषभदेवाच्या पुत्राच्या नामावली-सग्रहामध्ये उपलब्ध झालेली हीच सर्वात मोठी आणि परिपूर्ण यादी होय याला जंबूदीवपण्णत्ति आणि कल्पसुबोधिका या ग्रथाचा आधार आहे याशिवाय सुप्रसिद्ध भागवतपुराणामध्येही एके ठिकाणीच १०० पैकी १९ पुत्राची नावे उपलब्ध होतात हेही एक वैशिष्टचच होय

> आत्मजानामात्मसमानाना शतं जनयामास। येषां खलु महायोगी भरतो ज्येष्ठ ... । तमनु कुशावर्त इलावर्तो ब्रह्मावर्तो मलय केतुर्भद्रसेन इन्द्रस्पृग्विदर्भः कीकट इति नवनवति प्रधाना ।
>
> कविर्हरिरन्तरिक्षः प्रबुद्धः पिप्पलायनः ।
> आविर्होत्रोऽथ द्रुमिलश्चमसः करभाजनः ॥
>
> — भागवतपुराण, ५/४/९-१२.

या सदर्भस्थळावरून १०० ऋषभपुत्रापैकी पुढील १९ नावे उपलब्ध होतात–

| | | | |
|---|---|---|---|
| १ भरत | २ कुशावर्त | ३ इलावर्त | ४ ब्रह्मावर्त |
| ५ मलय | ६ केतू | ७ भद्रसेन | ८ इन्द्रस्पृक् |
| ९ विदर्भ | १० कीकट | ११ कवी | १२ हरी |
| १३ अंतरिक्ष | १४ प्रबुद्ध | १५ पिप्पलायन | १६ आविर्होत्र |
| १७ द्रुमिल | १८ चमस | आणि | १९ करभाजन |

तसेच महापुराणातील सोळाव्या पर्वापैकी दुसऱ्या व तिसऱ्या श्लोकात १ भरत, २ बाहुबली हे दोन सर्वविख्यात पुत्र आणि १ ब्राह्मी व २ सुदरी ह्या दोन कन्या मिळून चार अतिप्रसिद्ध नावाशिवाय पुढील ६ नावे एकत्र आढळतात–

(३) वृषभसेन, (४) अनतविजय, (५) अनतवीर्य, (६) अच्युत, (७) वीर आणि (८) वरवीर

याशिवाय इतरत्र सकीर्णतया (९) हरी, (१०) जय इत्यादी अनेक नावे आढळतात संपूर्ण यादी तयार करणे हे एक स्वतत्र काम आहे

कुठल्याही यादीमध्ये साधारणत भरत व बाहुबली ही दोन प्रमुख नावे समान आढळतात. पण प्रसिद्ध भागवतपुराणात मात्र बाहुबलीचे नाव निदान वरील सदर्भस्थळी तरी आढळत नाही हे कुतुहलजनक असले तरी समग्र ग्रथ सूक्ष्मपणे निरीक्षिल्याशिवाय निश्चित निर्णय घेता येत नाही. मात्र प्रथम पुत्राचे केवळ भरत हे नावच नव्हे तर त्याचे ज्येष्ठत्व, चक्रित्व आणि एकूण भावाची १०० ही

सख्या, तसाच त्याचा उत्तराधिकारी अशा सर्व प्रमुख बाबी मात्र सर्वत्र सुसगत व एकमुखीच आढळतात

भागवत पुराणातून उपलब्ध झालेल्या १९ नावामधील फक्त एक भरत सोडून दुसऱ्या एखाद्याही नावाचा महापुराण अगर जबूदीवपण्णत्ति-कल्पसुबोधिका-प्रणीत अभिधानराजेन्द्र यातील यादीशी मेळ जमत नाही मात्र भागवतातील १२ वे हरी आणि १४ वे प्रबुद्ध या दोन नावाची, अनुक्रमे अभिधानराजेन्द्रमधील ६५ व्या हरिषेण आणि ३६ व्या बुद्धिकर या नावाशी असलेली जवळीकता सहजतया लक्षात येण्यासारखी आहे

(१) महापुराणात उपलब्ध होणाऱ्या भरत, बाहुबली, वृषभसेन, ब्राह्मी व सुदरी या पाच अतिप्रमुख नावाशिवाय इतर नावापैकी वीर, हरी, जय, कुरू अशा काही नावाचा अभिधानराजेन्द्रमधील नावाशी सामान्यत मेळ जमतो. वरील यादीमध्ये मात्र वीर हे एकच नाव समान आहे

(२) बाकीची ५ नावे मात्र समान दिसत नाहीत

(३) यास्तव दिगबर जैन प्रणालीतील सपूर्ण १०० नावाचा शोध घेतल्याशिवाय या सदर्भात जास्त बोलता येत नाही

(४) नामकरणाच्या पद्धतीच्या दृष्टीने पाहिल्यास महापुराणात वीर व वरवीर तर अभिधानराजेन्द्रमधील सुर (१९) आणि सुरवर (९८) ही नावे एकाच शैलीची दिसतात

(५) जैनागमात किवा भागवत पुराणात आढळणाऱ्या ऋषभपुत्राच्या नावानुसार आणि त्याच्या इतर सबधीजनाच्या नावानुसारही काही नगर-क्षेत्र-देश-प्रदेश इत्यादी स्थळाची नावे चिर रूढ झाली आहेत

(६) महापुराणातील पर्व १६ मध्ये श्लोक १५२ पासून पुढे सुकोशल ते केकयपर्यंत जवळ जवळ ५२ देश-प्रदेशाची नामावली दिलेली आहे तीही या दृष्टीने तपासून त्याची हरिवशपुराणात किवा त्रिषष्टिशलाकापुरुषचरितामध्ये आढळणाऱ्या अशाच नावाशी तुलना करण्यास बाव मिळण्यासारखा आहे

# परिशिष्ट २

# राज्यकर्त्या स्वपुत्रांना ऋषभजिनांचा उपदेश

भागवत पुराण, पचमस्कध, अध्याय ५ मध्ये मुनी ऋषभांनी आपल्या मुलाना जो उपदेश दिलेला आहे तो लक्षवेवी आहे. ‘ स्वपुत्रेभ्यो धर्मोपदेश ’ यातील तपोराज्याचे विधान जैन धर्मातील मुनीच्या आचारमार्गाला आणि श्रद्धास्थानाला अनुरूप आहे त्यातील तात्पर्य ६ व्या प्रकरणात दिलेला आहेच अगदी त्याच स्वरूपाचा उपदेश जिनसेन आचार्यांच्या महापुराणातही (पर्व ३४/११४ ते १२४) आढळतो

दिग्विजयाची पूर्ती करण्यासाठी भरत चक्रीने जेव्हा आपल्या सर्व भावानाही शरण येण्यासाठी निरोप पाठविला तेव्हा त्यांना भरताचे आधिपत्य मान्य झाले नाही कारण ते सर्वजण बलशाली, मानशाली व वीर्यशाली होते ऋषभदेवां-शिवाय दुसऱ्यास प्रणाम करणे त्यांना माहीतच नव्हते. त्यामुळे बाहुबलीशिवाय बाकीचे सर्व ९८ भाऊ सल्ला घेण्यासाठी सरळ ऋषभदेव तीर्थंकराकडे गेले. त्याप्रसगी त्यानी दिलेला हा उपदेश ! भरताला चक्ररत्नाची प्राप्ती झाल्यामुळे न मिटणाऱ्या झगडयापासून स्वपुत्र राजकुमाराना परावृत्त करून अविनाशी अशा मोक्षमार्गामध्ये त्याचे चित्त स्थिर करण्यासाठी भगवान ऋषभदेव म्हणाले—

> “ महा मनस्वी, उत्तम देहधारी, तरुण आणि सत्त्वगुणसंपन्न अशा गंधहस्तीप्रमाणे सर्वथैव स्वतत्र जीवन जगणाऱ्या मुलानो, तुम्ही दुसऱ्याचे सेवक होणे कसे सभवेल ? हे अध्रुव राज्य, जीर्णशील आयुष्य आणि ऐश्वर्य-आवेग-उन्माद यानी दूपित झालेले तारुण्य यांच्याशी तुम्हाला काय कर्तव्य आहे ? परसामर्थ्याने पराभूत होणाऱ्या सैन्यदलाचा काय भरवसा ? ज्याचे अपहरण होणे शक्य आहे अशा वैभवाचा काय उपयोग ? तृष्णाग्नी प्रदीप्त करण्यासाठी इंधनाचे स्वरूप धारण करणारे धन तृप्तीदायक नसून तापदायक आहे. विषयास्वाद हा विषास्वादच होय. ज्याचा आस्वाद अनेक वेळा घेऊनही परम सतोष लाभत नाही त्याची पुनरावृत्ती करण्यात काय मौज आहे ? उलट ज्या भोगामध्ये शस्त्रास्त्राशी मैत्री करावी लागते, जेथे बांधवच शत्रू होतात,

पूर्वीच्या क्षत्रियांनी भोगून सोडलेल्या पृथ्वीचाच जेथे उच्छिष्ट भोग घ्यावा लागतो त्या राज्यपदाचा धिक्कार करणेच सर्वस्वी श्रेयस्कर !

भरताचा पुण्योदय चालू आहे तोवर तो राज्यश्रीचा भोग खुशाल घेवो तुम्हाला द्वेष करण्याचे काही कारण नाही. भरतालाही ते राज्यवैभव सोडावे लागणारच आहे तेव्हा तुमची ईर्षा व्यर्थ आहे ही स्पर्धा पुरे कधीही म्लान न होणाऱ्या दयारूपी भावसुमनांनी डवरलेल्या आणि शाश्वत सुखाचे फळ देणाऱ्या या धर्मवृक्षाचा आश्रय घ्या ज्यामध्ये दुसऱ्याच्या आराधनेचे दैन्य मुळीच नाही, मात्र जे स्वत सदैव आराधनीय असते असे हे तपोराज्यच तुमच्या स्वाभिमानाचे रक्षण करण्यास समर्थ आहे जेथे दीक्षा परम रक्षक आहे, आत्मगुण खरे सेवक आहेत, दयाभावच आवडती अवस्था आहे, असे हे तपोराज्य ज्येष्ठ आणि श्रेष्ठ असल्याने श्लाघ्य आहे ”

– महापुराण, पर्व ३४ (आधारित).



# परिशिष्ट ३

# ऋषभ-संस्कृतीचा भारतीय आविष्कार

जीवनाचे एक समग्र दर्शन, दैनंदिन व्यवहाराकडे पाहाण्याचा एक दृष्टिकोण या दृष्टीने महाभारतातील 'ऋषभगीता' आणि 'सगर-अरिष्टनेमि-संवाद यातील मूळप्रेरणा एकदर ऋषभ-संस्कृतीशी किती सुसगत व समरूप आहे! कदाचित जैन क्षत्रियानुयोगाची सैद्धान्तिक बाजू येथे स्पष्टतया दृगोचर होणार नाही, पण त्या सिद्धान्ताची मूळबीजे अंकुरण्यास आवश्यक अशी भूमी आणि बापसा या दोन्ही गोष्टी या बोधविवेचनात विद्यमान आढळतात त्याचे आंतर्दर्शन अनुभवणे रुचल्याशिवाय राहणार नाही.

कषायविजयातच क्षात्रविजयाची परिपूर्ती, आत्मबोधीतूनच विश्वबोधनाचा मार्ग, भोगसामर्थ्यातूनच निरासक्ती, नि.सगतेतून मुक्ती, आत्मौपम्य दृष्टीतून अहिंसापर क्षात्रवृत्ती, शुभानुयोगातून कल्याणकारी सपत्ती, आत्मविवेकातून मन शाती इत्यादी गुणरूप ऋषभ-संस्कृतीच्या मार्गावरील प्रगतीचे काही ठळक ठळक टप्पे (Mile Stones) जैनसाहित्याप्रमाणे महाभारतासारख्या इतर पुरातन ग्रथातही समातरच नव्हे तर अगदी एकरूप झालेले दिसतात. ही एकरूपता लक्षणीय आहे या साहित्यधारेमध्ये अतिप्राचीन इतिहास, मानवी जीवनातील कल्याणाची आदिम तत्त्वे, सयमप्रधान सस्कृती इत्यादी मानवी तथ्यावर जसा तसाच जैन क्षत्रियानुयोग आणि शासनसस्था यावरही फार मोठा बोधनशील प्रकाश पडतो असे अनेक प्रसग महाभारतात, विशेषत शान्तिपर्वात ठिकठिकाणी आढळतात! त्याच्या अतरगावर वाचकानीच मनसोक्त विचार करावा.

पितामह भीष्माना धर्मराजाने दुर्योधनासबधीची आपली आशा निवेदन करून, त्यामुळे आपल्या मनाला कृशता आल्याचे सागितले तेव्हा ती मनोग्लानी दूर करण्यासाठी भीष्मानी ऋषभ-गीतेच्या प्राचीन उदाहरणाने धर्मराजाच्या मनाला शाती देण्याचा प्रयत्न केला. तत्सबधीचा उपदेश महाभारतामध्ये ऋषभ-सुमित्र-सवाद अथवा ऋषभ-गीता या नावाने प्रसिद्ध आहे

या उदाहरणात्मक आख्यानातील ऋषभ ऋषी कोण व तो कोणत्या काळी होऊन गेला याचा इतिहास येथे सागावयाचा नाही मात्र हा ऋषभ मुनी म्हणजे प्रथम प्रजापती नाभेय ऋषभनाथ नव्हे हे उघड आहे हा सुमित्र-उपदेशक ऋषभ कितीही अनद्यतन असला तरी तो युगादिराज ऋषभदेवाइतका पुरातन मुळीच नाही. स्पष्टत तनु ऋषी या ऋषभापेक्षाही पूर्ववर्ती आहे ऋषभ तीर्थंकर

निश्चितपणे ज्ञातकाळातील सर्वप्रथम ऋषिमुनी असून इतर सर्व ऋषिमुनींचे आद्यगुरु होत त्यामुळेच **ऋषभ** हे नाव देखील एका विशिष्ट संस्कृतीचे निदर्शक आहे एवढेच नव्हे तर याही ऋषभगीतेतील संवादाचा आत्मा विशिष्टच आहे! यातील वैशिष्ट्यावर कोणतीही चर्चा न करता त्याचा विचार स्वतंत्रपणे व्हावा म्हणून ते क्षेत्र वाचकाच्या हवाली मूकपणे करीत आहे

**मन्वंतरकालीन ऋषभ-संस्कृतीची प्रभावळ भीष्मकालाच्या फार प्राचीन कालापासून विद्यमान होती.** आणि तिचे धर्ममय स्वरूप वैदिक आर्यांच्या ऋग्वेदीय उपासनेपेक्षा किंवा **यजुर्वेदीय** यज्ञ-यागापेक्षा अगदी वेगळे होते **ते परम पारमार्थिक व आत्मनिष्ठ असून आर्यपूर्वकालीन भरतवर्षातील आदिम निवासींच्या प्राग्वैदिक संस्कृतीशी समानधर्मी आहे.** या ऋषभ-गीतेतील चर्चा शब्द-रचनेच्या दृष्टीने संवादबहुल असली तरी तिचे आंतरस्वरूप मात्र चिंतनशील, संबोधनात्मक व आत्मशोधनपर आहे असे प्रगट चिंतन स्व-पर-प्रकाशदायी असते!! हा असला महाभारतातील भाग विचारप्रणालीच्या दृष्टीने वेदकाळापेक्षा निश्चितपणे पुरातन व सनातन आहे हे त्याच्या अंगभूत स्वरूपावरूनच सिद्ध होते या समीचीन संस्कृतीचा हा जो आविष्कार आजही महाभारतात अक्षुण्ण राहिला आहे त्याचा स्वतंत्र अभ्यास करता येण्याइतका तो सविस्तृत आहे

या अविकारी, कषायविजयी व वीतरागानुकूल संस्कृतीचा मूलस्रोत ऋषभनाथ तीर्थंकराच्या तीर्थानुष्ठानाशी एकरूप असलेल्या तीर्थपालनाच्या परंपरागत प्रणालीतच सापडणे शक्य आहे प्रसिद्ध **उत्तरज्झयणसुय** या आगमाच्या मूलसूत्रातील–

**आसा हु आगाससमा अणंतिया ॥**

( ९/४८ ).

**दुप्परिच्चया इमे कामा णो सुजहा अधीरपुरिसेहिं ॥**

( ८/६ ).

**सल्लं कामा, विसं कामा, कामा आसीविसोवमा ।**
**कामे पत्थेमाणा अकामा जंति दोग्गइं ॥**

( ९/५२ ).

अशा विधानाशी ऋषभगीतेतील तात्पर्याचा संबंध किती घनिष्ट व अकाट्य आहे!! आणि 'सगर-अरिष्टनेमि-संवाद'मधील विषय आणि आशय यांच श्रुतागमातील–

रागद्दोसादओ तिव्वा नेहपासा भयकरा ।
ते छिंदित्ता जहाणायं विहरामि जहक्कमं ।।

(२३/४३).

अशा स्नेहपाशाच्या भयकरपणाच्या विधानाशी व त्यातील मूळ तत्त्वाशी अथवा गुणभद्र आचार्यांच्या–

जन्तो किं तव शान्तिरस्ति न भवान् यावद्दुराशामिमा-
-मंहः संहृतवीरवैरिपृतना–श्रीवैजयन्तीं हरेत् ।।

– आत्मानुशासनम्, ५०.

या आत्मानुचिंतनाशीही किती समरूप व एकरूप आहे ! शिवाय यातील आशेच्या आशयानुसारी परिशीलनात अनुस्यूत असलेले कर्म-सिद्धान्त, कर्म-बधानुकूल स्थिती, कर्मविपाक आणि ससारी जीवाची कर्माधीनता या चक्राकार भ्रमणातून बाहेर पडण्यासाठी भेदविज्ञान, चेतनामय स्थितीचा आत्मप्रत्यय, मोहविजय आणि अनत गुणसाधनेची परिपूर्ती अशा तीर्थंकर-मार्गाची सपन्न प्रतिष्ठा लक्षवेधी आहे डावा व उजवा हात निरनिराळ्या दिशेला असले तरी त्या शरीरातील आत्मतत्त्व मात्र एकमेवच असावे इतकी अद्वैतता त्यात आढळते ! !

## ( अ ) ऋषभ - सुमित्र - संवाद ( ऋषभगीता )

हैहय कुळातील मित्र राजाला सुमित्र नावाचा पुत्र होता तो राजा झाल्यावर एकदा मृगयेसाठी वनात गेला तेथे त्याने एका मृगाला आनतपर्व बाणाने विद्ध केले तरी तो मृग बाण शरीरात घेऊन तसाच पळून गेला राजाने पाठलाग केला. तो कधी दिसे तर कधी दृष्टीआड होत असे राजाने अनेक बाण मारले. तरी ते सर्व बाण घेऊन तो पळतच राहिला मोठ्या आशेने पाठलाग करीत असताना राजा सुमित्र एका आश्रमात येऊन पोहोचला (१२५)

तेथील ऋषींनी त्याचे स्वागत केले आशेचा भग झाल्याने कांती नष्ट होऊन थकवा आला, त्यामुळे विश्रांतीसाठी आपण आश्रमात आल्याचे सागून, आश्रमवासीना त्रास झाल्याबद्दल राजाने दु ख व्यक्त केले आणि नतर मन शांती-साठी सुमित्र राजा तेथील ऋषींना म्हणाला–

'महासागर किंवा कुलपर्वत कितीही मोठा असला तरी त्याला सपूर्ण आकाश व्यापता येत नाही तसेच मी मोठा आशावन्त असलो तरी मला त्या आशेचा अत सापडत नाही म्हणून हे ऋषिजन हो ! मला आशा आणि आकाश

या दोहोपैकी कोणाचे प्रमाण अधिक मोठे आहे, त्याचे कारण काय आणि त्याचे सामर्थ्य कशात आहे ते समजावून सागा (१२६) '

राजाचा हा प्रश्न ऐकल्यावर त्या ऋषीमधील ज्येष्ठ ऋषी ऋषभ म्हणाला– हे नृपश्रेष्ठा, मी तीर्थाटन करीत करीत नरनारायणाच्या आश्रमामध्ये गेलो होतो तेथून जवळच असलेल्या एका दुसऱ्या आश्रमामध्ये मला तनू नावाचे एक ऋषी भेटले ते उच, कृश आणि उग्र तपोधारी होते त्यानी धर्म व अर्थ या विषयावर उपदेश केला तितक्यात तेथे वीरद्युम्न राजा आपल्या परिवारासमवेत आला तो पुत्रवियोगामुळे दु खी झाला होता त्याचा पुत्र अरण्यातच कोठेतरी हरवला होता पुत्रदर्शनाची तीव्र आशा त्याला पीडा देत होती त्यानेही ऋषीना आशेच्या विशालतेवद्दल प्रश्न केला तेव्हा तनू ऋषी त्याला म्हणाले– तुझ्या मुलाने एक सुवर्ण कलश व वल्कले मागणाऱ्या एका याचक महर्षीचा अवमान केला होता तेव्हा त्या मुनीचा मनोभग झाला ते ऐकून वीरद्युम्न अधिकच निराश झाला. इतर ऋषिजनानीही त्याला आश्रमात येण्याचा हेतू विचारला (१२७)

तेव्हा वीरद्युम्न म्हणाला– मी भूरिद्युम्न नावाच्या माझ्या एकुलत्या एका कुमार वयातील मुलाचा शोध करण्यासाठी अरण्यात आलो आहे पण मला तो कोठेच सापडेना तेव्हा मी त्याच्या शोधासाठी भ्रमण करीत आहे

मात्र त्या वीरद्युम्न राजाचा प्रश्न ऐकूनही त्या तनू ऋषीने उत्तर न देता मौन धारण केले कारण पूर्वी एका राजाने तनू ऋषीचा मनोभग केला होता त्यामुळे कोणत्याही राजावर कसलाही प्रतिग्रह करावयाचा नाही असे त्याने ठरविले होते तरी परतु ' आशा एकदा मनात स्थिरावली म्हणजे तिचा विस्तार सतत वळावतच जातो आणि आशाधारी मनुष्य कितीही लहान असला तरी ती त्याला सतत धडपड करावयास लावते. यास्तव मी त्या आशेलाच हाकून लावतो ' असा त्याने त्या ध्यानावस्थेतच निर्धार केला.

त्याच वेळी ' आशाखोर असणाऱ्या मानवासारखे कृशत्व (लघुता) दुसऱ्या कोणाचे ठायी आहे व या भूतलावर दुर्लभ असे काय आहे, याचे मला कथन करावे ' अशी विनती वीरद्युम्नाने पुन एकदा तनू ऋषीला केली

तेव्हा मात्र ऋषीनी म्हटले– हे राजन्, आशेसारखा कृशपणा दुसऱ्या कशामध्येही नाही त्या आशेला विषयभूत असलेले पदार्थ दुर्लभ असल्याने मीही त्याच्या प्राप्तीसाठी अनेक राजाकडे याचना केली होती

राजा वीरद्युम्न पुन म्हणाला– हे ब्रह्मन्, कृश कोण आणि अकृश कोण याचे मला ज्ञान झाले आशेला विषयभूत असलेले पदार्थ दुर्लभ आहेत हेही मान्य तरीही माझ्या सशयाचे निरसन अधिक करावे

त्यावर तनूने उत्तर दिले– हे राजन्, वैर्यसपन्न याचक दुर्लभ असो किंवा नसो तथापि जो याचकाचा अवमान करीत नाही असा पुरुष मात्र अत्यत दुर्लभ होय १) याचकाचा आदर करून, प्रथम त्याला आशा दाखवून नतर मात्र दानसामर्थ्य असतानाही पात्राच्या योग्यतेप्रमाणे दान न देणाऱ्या पुरुषाच्या सवधाने केली जाणारी, आणि प्रत्येकाच्या मनात सदैव वसत असणारी जी आशा ती माझ्यापेक्षाही कृश आहे. २) कृतघ्न, क्रूर, आळशी आणि अपकारी माणसाची आशा देखील माझ्याहून अत्यत कृश आहे ३) पुत्रदर्शनासाठी व्याकूळ झालेल्या माणसाची आशाही माझ्याहून अत्यत कृश आहे ४) आणि संततीमवयी स्त्रियाना, पुत्रप्राप्तीसाठी वृद्धाना, वैभववृद्धीची श्रीमताना व प्रेय वराची उपवर कन्यकाना जी आशा असते ती माझ्यापेक्षा कितीतरी कृश होय

हे विवरण ऐकून त्या वीरद्युम्न राजाने आपल्या परिवारासह तनू ऋषीच्या चरणी साष्टाग प्रणिपात घातला आणि म्हटले– भगवन्, मजवर प्रसन्न व्हा अनुग्रह करा मला पुत्राची भेट व्हावी अशी तीव्र आशा आहे मला निराश करू नका

अशी विनती ऐकल्यावर तनू मुनीने प्रसन्न होऊन, तप व ज्ञानाच्या बलाने राजाच्या भूरिद्युम्न पुत्राला त्याठिकाणी सत्वर हजर केले राजाला पुत्रदर्शन घडविले नतर आपल्या धर्ममय स्वरूपाचे दर्शनही तनू ऋषीने त्या राजाला घडविले आणि तो निष्पाप व क्रोधशून्य मुनी वनात पुन सचार करु लागला

शेवटी ऋषभमुनी सुमित्र राजाला म्हणाले– हे राजन्, वरील सर्व घटना मी प्रत्यक्ष पाहिली आहे आणि तो उपदेशही ऐकला आहे तेव्हा तूही अत्यत कृशकारक अशा ह्या आशेचा सत्वर त्याग कर

उदाहरणरूपाने हा सर्व इतिवृत्त युधिष्ठिर राजाला निवेदन केल्यावर पितामह भीष्मानी म्हटले– हे कुंतीपुत्रा, ऋषभमुनीने आशेचे विवरण केल्यावर त्या सुमित्रराजाने देखील अत्यत क्लेशकारक आणि कृशकारक अशा आशेचा त्याग केला आता तूही माझा उपदेश ऐकून हिमालयाप्रमाणे स्थिरचित्त हो आणि मनस्ताप टाकून दे (१२८)

महाभारत, शांतिपर्व, अध्याय १२५ ते १२८
(आधारित)

## (ब) सगर-अरिष्टनेमि संवाद

धर्मराज:– पितामह, आपण अहिंसादिक तत्त्वाचे जे विवेचन केले ते सर्व खरे आहे परंतु आम्हां राजाना ते कसे साधावे? आमच्यासारख्या क्षत्रिय राजानी या जगात कोणत्या तत्त्वाची आराधना करावी आणि कोणत्या गुणावर अखंड लक्ष ठेवून वागावे म्हणजे विषयसंगरूपी पाशातून आम्ही मुक्त होऊ हे मला सांगा

भीष्म:– हे धर्मा, पूर्वी पृथ्वीपती सगर राजाने भगवान अरिष्टनेमींना असाच प्रश्न केला होता तेव्हा त्यांनी त्याचे जे उत्तर दिलेले आहे, तोच पुरातन इतिहास या कामी तुला उपयोगी आहे म्हणून मी सांगतो ऐक–

समस्त शास्त्रवेत्त्यामध्ये वरिष्ठ असलेल्या आणि सर्वात उत्कृष्ट संपत्ती कोणती याचा पूर्ण बोध झालेल्या भगवान अरिष्टनेमींना सगर राजा म्हणाला– 'भगवन्, इहलोकी कोणती उत्तम गोष्ट केल्याने मनुष्याला सुख प्राप्त होऊन तो शोक आणि क्षोभ याच्या तडाक्यातून सुटतो ते समजावे अशी माझी इच्छा आहे' त्यावर भगवान अरिष्टनेमी म्हणाले–

"बाबा रे, खरे सुख म्हणजे मोक्षसुख होय पुत्र, पशु, धन, धान्य याच्या व्यवसायात जो गढून गेला आहे अशा मूढाला हे सुख प्राप्त होत नाही कारण स्नेहपाशात सापडल्यामुळे जो मोहमूढ झाला आणि बाह्य पदार्थाच्या ठिकाणी बुद्धी आसक्त झाल्यामुळे ज्याच्या मनाला शांती कशी ती शिवत सुद्धा नाही, अशाला मोक्षाची कल्पना येतच नाही आता हे सगरा! स्नेहसंबंधापासून पाश कसे तयार होतात ते सांगतो ते विवरण सूज्ञालाच रुचणारे आहे–

"पुत्र, पत्नी इत्यादी नातेवाईकाशी संबंध व भोगविषयाचे सेवन असा कोणताही व्यवहार, प्रीती किंवा अप्रीती यापैकी कोणताही भाव मनात न बाळगता करावा असाच मानव सुखी होतो अशी निरपेक्षबुद्धीच मोक्षाला कारणीभूत ठरते. जे नि संग असतात तेच येथेही निर्भय राहून सुखाने विहार करू शकतात. उलट जे कोणी विषयासक्त असतात ते नाश पावतात संचित द्रव्याने किंवा अर्जित धनाने सर्वजण सुखी होतातच असे नाही कर्मबंधाचा जसा संबंध असेल तसेच घडत असते सुख-दुःख कर्मानुसारीच असते पोटापाण्याची तजवीज कर्मानुसारच करता येते तेव्हा स्वतःच्या अगर इतराच्या पोषणाची व रक्षणाची अतिचिंता वाहू नये. मृत्यूवर कोणताही इलाज नसतो अशा स्थितीत आत्मजागृतीच सर्व श्रेष्ठ होय तू जिवंत असलास अगर मृत झालास तरी पुत्रादी तुझ्या स्वजनास त्यांच्या त्यांच्या शुभाशुभ कर्माची फळे चुकत नाहीत त्यात आपण कोणतीच टवळाटवळ करू शकत नाही हे उघड दिसत असल्यामुळे भेदविज्ञान संपादून

स्वकल्याण साधावे यातच शहाणपणा आहे या जगात कोणी कोणाचा नव्हे हे लक्षात घे आणि मन मोक्षाकडे लाव

**ज्याने क्षुधा, तृषा, क्रोध, लोभ व मोह यांवर विजय मिळविला तो मुक्तीपर्यंत येथेही सुखी होतो.** जो द्यूत, मद्यपान, परस्त्री, मृगया या चार व्यसनात पडत नाही, जो सदैव आत्मविवेकाने वागतो, ज्याला इहजन्माचे मूळ कारण समजते, कोठारांचा त्याग करून जो जगण्यापुरतेच अन्न स्वीकारतो, जो अवाढव्य राजवाडा सोडून फक्त साडेतीन हात जागा पुरेशी समजतो, तोच समाधानी राहू शकतो जो अल्पसंतोषी राहून या विश्वाकडे भोक्ता (आत्मा) व भोग्य (पदार्थ) अशा भेदविज्ञान दृष्टीने पाहतो, त्याला सुख-दुःखादी मिथ्या विकार बाधा देत नाहीत ज्याला रेशमी वस्त्र आणि वल्कल सारखेच भावते त्याला सुख-दुःख, लाभ-हानी, जय-पराजय, प्रेम-द्वेष, भय-उद्वेग ह्या भावना जिंकता येतात. जो शरीराचे मूलतत्त्व (**नामकर्म**) जाणतो त्याला तारुण्य-वृद्धावस्था, पौरुषत्व-अपौरुषत्व, इंद्रियबलाची हानी-वृद्धी इत्यादी कोणतीही अवस्था विकारी करू शकत नाही श्रुताभ्यासाने व जीवनातील चेतनानुभूतीने जागा होऊन जो आत्मकल्याण साधतो. तोच परमसुखी होतो म्हणून माझे हे सर्व सांगणे ध्यानी घे आणि क्लेशरहित हो "

**भीष्म :–** हे युधिष्ठिरा, भगवान अरिष्टनेमींचा हा सर्व उपदेश लक्षपूर्वक ऐकून त्या पृथ्वीपती सगर राजाने मोक्षमार्ग अनुसरला आणि तो कृतार्थ झाला

– महाभारत, शान्तिपर्व, अध्याय २८८ (आधारित).

## (क) जैन मुनींचा कल्याण-विहार

जैन मुनीसंबंधी सामान्य परिचय, त्यांची धर्मपरायणता, लौकिक पूजनीयता, पर्यायावस्था, नामप्रसिद्धी, आत्मिक अर्हता, शुभ-प्रदेयता, मंगलदायी पात्रता, कल्याण-विहार इत्यादी विषयाचा सूत्रमय परिचय आतापर्यंत झाला आहे तोही येथे स्थिरीभूत होईल तसाच त्यांचा श्रोतृवर्गावरील प्रभाव देखील निश्चितपणे विस्मयकारी व परिणामकारी असल्याचा आत्मप्रत्यय येईल ! याशिवाय त्यांच्या तपःपूत संयमनाचा आंतरिक अभिभाव, दीक्षा-मार्गातील प्रहर्ष आणि प्रभावना, नारदाश्री घटनानुगामी जैन दीक्षा, त्यांचे स्वयप्रेरित निवेदन, **जैनधर्माची अतुलनीयता व सनातनता** त्याचप्रमाणे तेथील राजाला नारदाने केलेले मार्गदर्शन आणि परिणामी त्या राजाचेही दीक्षाग्रहण अशा घटनाप्रचुर व प्रभावकारी जैन मुनींच्या प्रत्ययकारी विहाराचे समग्र दृश्य साकार करणारे एक घटना-चक्र शिवमहापुराणासारख्या हिंदू धर्मग्रंथात एका टप्प्यात अनुभवण्यास मिळते याचे

नवल वाटल्याशिवाय राहणार नाही पुढील अनुच्छेद मन पूर्वक वाचा आणि आतर्निहित तत्त्वबोधाचा ध्यास घ्या—

आदिरूपं च तन्नाम पूजत्वात्पूज्य उच्यते ।
ऋषिर्यतिस्तथाचार्य उपाध्याय इति स्वयम् ।। २९ ।।

इमान्यपि तु नामानि प्रसिद्धानि भवंत्विति ।
ममापि च भवद्भिश्च नामग्राह्यं शुभं पुनः ।। ३० ।।

अरिहन्निति तन्नामधेयं पापप्रणाशनम् ।
भवद्भिश्चैव कर्तव्यं कार्यं लोक-सुखावहम् ।। ३१ ।।

ये ये गतास्तदा तत्र ते ते दीक्षामुपागताः ।
ये ये पश्यन्ति तास्तत्र मोहमायापरायणाः ।। ३४ ।।

अभूवंस्तत्क्षणादेव दर्शनान्मायिनामपि ।
नारदोऽपि तदा मायान्नियोगान्मायिनः प्रभोः ।। ३५ ।।

प्रविश्य तत्पुरं तेन मायिना सह दीक्षितः ।
ततश्च नारदो गत्वा राज्ञे सर्वं न्यवेदयत् ।। ३६ ।।

कश्चित्समागतश्चात्र यतिर्धर्म-परायणः ।
दृष्टाश्च बहवो धर्मा नैतेन सदृशाः पुनः ।। ३७ ।।

वयं च दीक्षितास्तत्र दृष्ट्वा धर्मं सनातनम् ।
तवेच्छा यदि वर्तेत ग्राह्या दीक्षा त्वयाऽधुना ।। ३८ ।।

तदीयं तद्वचः श्रुत्वा राजा तत्र जगामह ।
नारदो दीक्षितो यस्माद् वयं दीक्षामवाप्नुमः ।। ३९ ।।

— शिवमहापुराण, अध्याय २१,
श्लोक २९ ते ३१ व ३४ ते ३९

## परिशिष्ट ४

# काही अवतरणे आणि अभिप्राय

जैनधर्माची सनातनता, प्राचीनतमता, महत्ता आणि ऐतिहासिकता यासबधी मन व बुद्धी स्वच्छ तथा सुस्पष्ट होण्यासाठी अन्य धर्मीय काही प्राचीन अवतरणे आभिप्रायार्थ येथे सादर करण्यात येत आहेत त्याचा दर्जा, सशोधनात्मक महत्त्व आणि याथातथ्यतेबद्दलचा निर्णय वाचकानी घ्यावयाचा आहे

ऋग्वेद हा भरतवर्षातीलच नव्हे तर अखिल जगामधील प्राचीनतम उपलब्ध ग्रथ समजला जातो जैन तीर्थंकरांचा काल त्याहूनही कितीतरी पूर्ववर्ती असल्याने त्याचा उल्लेख कोणत्या ना कोणत्या प्रकारे भारतामधील सर्व क्षेत्रातील समग्र परपरागत प्रणालीमध्ये आढळल्याशिवाय, प्रतिभासित झाल्याशिवाय कसा राहील ? ऋग्वेदादिक सर्व वैदिक धर्मग्रथामध्ये ऋपभादी जैन तीर्थंकराचा उल्लेख निरनिराळ्या सदर्भात नजरेस येतो पुष्कळवेळा भक्तिभावाने केलेली त्याची स्तुती आणि आराधनाही आढळते त्यापैकीच पुढील काही अवतरणे वाचा आणि त्यावर विचार करा--

**ऋग्वेद--**

ऋषभं मा समानाना सपत्नानां विषासहिम् ।
हंतारं शत्रूणां कृधि विराजं गोपतिं गवाम् ॥

(१०/१६६/१)

स्वस्ति न इन्द्रो वृद्धश्रवाः स्वस्ति नः पूषा विश्ववेदाः ।
स्वस्ति नस्तार्क्ष्यो अरिष्टनेमिः स्वस्ति नो बृहस्पतिः ॥

(१/८९/६).

तं व रथं वयमाद्या हुवेम स्तोमैरश्विना सुविताय नव्यम् ।
अरिष्टनेमिं द्यामियानि विद्या मेष वृजन जीरदानुम् ॥

(१/१८०/१०)

मुनयो वातरशनाः ... .

(१०/१३६/२).

## सामवेद–

ऋग्वेदातील वरील सर्व ओळी सामवेदातही आढळतात याशिवायही त्यातील १४२, १२३४, १३९५, १८४९ इत्यादी सूक्तेही लक्षवेधी आहेत

## कृष्णयजुर्वेद–

मरुत्वन्तं वृषभं वावृधानमकवारिं दिव्यँ शासमिन्द्रम् ।
विश्वासाहमवसे नूतनायोग्रँ सहोदामिह तँ हुवेम ।
उपयामगृहितोऽसीन्द्राय त्वा मरुत्वत एष ते
योनिरिन्द्राय त्वा मरुत्वते (१) ॥

– कृष्णयजुर्वेदीय तैत्तिरीय सहिता, १/४/१७.

स्वस्ति न इन्द्रो वृद्धश्रवाः ।
स्वस्ति नः पूषा विश्ववेदाः ।
स्वस्ति नस्तार्क्ष्यो अरिष्टनेमिः ।
स्वस्ति नो बृहस्पतिर्दधातु ॥

कृ० य० तै० स० प्र० १, अनु० १ व ३२.
तथा शुक्लयजुर्वेद, अध्याय २५, कडिका १९

याशिवाय शुक्ल-यजुर्वेदातील पुढील सर्व भागाचा अतर्भाव कृष्णयजुर्वेदामध्ये झालेलाच आहे

## शुक्लयजुर्वेद–

स्तोकानामिन्दुं प्रति शूरं इन्द्रो वृषभायमाणो वृषभस्तुराषाट् ।
घृतप्रुषा मनसा मोदमाना स्वाहा देवा अमृतामादयन्ताम् ॥

२०/४६.

वाजस्य नु प्रसव आवभूवेमा च विश्वा भुवनानि सर्वतः ।
स नेमिराजा परियाति विद्वान् प्रजां पुष्टिं वर्धयमाणो अस्मै स्वाहा ॥

– अध्याय ९, कडिका २५.

मरुत्वाँ इन्द्र वृषभो रणाय पिबा सोममनुष्वधं मदाय ।
आसिञ्च जठरे मध्व ऊर्मिं त्वं राजासि प्रतिपत्सुतानाम् ।
उपयाम गृहीतोऽसीन्द्राय त्वा मरुत्वत एष ते योनिरिन्द्राय त्वा मरुत्वते
— अ० ७, कं० ३८.

**अथर्ववेद—**

त्यमूषु वाजिनं देवजूतं सहोवानं तरुतारं रथानाम् ।
अरिष्टनेमिं पृतनाजिमाशुं स्वस्तये तार्क्ष्यमिहा हुवेम ॥
(७/८५)

यासामृषभो दूरतो वाजिवानसधः सर्वान् लोकान् पर्यैति रक्षन् ।
स न ऐतु होममिमं जुषाणोऽन्तरिक्षेण स वाजिवान् ॥
— अथर्व०, अध्याय ४/३८/५.

ऋषभनाथ, अजितनाथ आणि अरिष्टनेमी या तीन जैन तीर्थंकराचा उल्लेख यजुर्वेदामध्ये आढळतो असे भूतपूर्व राष्ट्रपती डॉ. राधाकृष्णन् यानी स्पष्टपणे म्हटले आहे परंतु मला उपलब्ध झालेल्या यजुर्वेदाच्या प्रतीमध्ये अजितनाथ तीर्थंकराचे नाव सापडले नाही डॉ राधाकृष्णन् यानी यजुर्वेदाचा नामोल्लेख केलेला असला तरी त्यातील ततोतत संदर्भ दिलेला नाही त्यामुळे आणखी पुढे शोध घेण्यात अडचण आली वैदिक संहितामध्ये या दृष्टीने जे उल्लेख मला सहजासहजी सापडले ते नमुन्यादाखल वर दिलेले आहेत

मात्र वैदिक ग्रथातील सर्वच्या सर्व मूळ भागाची उपलब्धी आजमितीला मुळीच होऊ शकत नाही कारण कालौघामध्ये पुष्कळसा भाग नष्टही झालेला आहे असे मानतात जैन ग्रथकाराच्या परपरेतून अशी काही वैदिक अवतरणे इतस्तथा टिकून आहेत मल्लिषेणाचार्याच्या स्याद्वादमजरीतील काही अवतरणाची हीच स्थिती आढळते इ सन १७३३ सालाच्या सुमारास प टोडरमल यानी लिहिलेल्या मोक्षमार्गप्रकाशक या उच्चतम श्रेणीच्या अत्यत प्रसिद्ध ग्रथात पुढील वैदिक अवतरण आढळते त्यात मात्र अजितनाथ तीर्थंकराचेही नाव सापडते डॉ. राधाकृष्णन् याचा सदर्भ हाच असणे अगदीच असभवनीय नव्हे ! पण अशा अवतरणाची अधिक प्रमाणात समीक्षा करता येणे कठीण आहे प्रस्तुत उतारा यजुर्वेदातील असल्याची ग्वाही दिली आहे यातील 'स्वस्ति न इन्द्रो' पासून 'स्वस्ति नो बृहस्पतिर्दधातु' पर्यंतचा भाग शुक्लयजुर्वेदातील अध्याय २५, कंडिका

१९ मध्ये आणि त्याशिवाय कृष्णयजुर्वेदातील प्रपाठक १, अनुपाठ १ व ३२ मध्ये आजही समाविष्ट आहे त्यामुळे उरलेला भागही खरा असणे संभवनीय वाटल्यास नवल नव्हे !

> **ॐ नमो अर्हंतो ऋषभो । ॐ ऋषभपवित्रं पुरुहूतमध्वरं यज्ञेषु नग्नं परमं महासंस्तुतं वरं शत्रु जयन्तं पशुरिन्द्रमाहुरिति स्वाहा । ॐ त्रातारमिन्द्रं ऋषभं वदन्ति । अमृतारमिन्द्रं हवे सुगतं सुपार्श्वमिन्द्रं हवे शक्रमजितं तद्वर्धमानपुरुहूतमिन्द्रमाहुरिति स्वाहा । ॐ नग्नं सुधीरं दिग्वाससं ब्रह्मगर्भं सनातन उपैमि । वीरं पुरुषमर्हन्तमादित्यवर्णं तमसः परस्तात् स्वाहा । ॐ स्वस्ति न इन्द्रो वृद्धश्रवाः, स्वस्ति नः पूषा विश्ववेदाः, स्वस्ति नस्तार्क्ष्यो अरिष्टनेमिः, स्वस्ति नो बृहस्पतिर्दधातु । दीर्घायुः स्वायुर्बलायुर्वा, शुभजातायुः । ॐ रक्ष रक्ष अरिष्टनेमिः स्वाहा । वामदेवः शान्त्यर्थमनुविधीयते सोऽस्माकं अरिष्टनेमिः स्वाहा ॥**
>
> — मोक्षमार्गप्रकाशक, ४ थी
> आवृत्ती (मुंबई), पान २१२

(१) पुरुहूत म्हणजे इंद्रसंबोधित प्रत्येक अरिहंत तीर्थंकराची पहिली स्तुती इंद्रानेच केलेली असते त्याच्यामध्ये ऋषभ प्रमुख म्हणून मुख्यत्वे त्यानाच पुरुहूत म्हटले आहे या ठिकाणी तर वर्धमान-महावीर स्वामीनाही हे संबोधन वापरले आहे (२) इतरत्र ऋषभानाच ब्रह्म म्हटलेले आढळते येथे वर्धमान महावीरानाही ब्रह्मगर्भ म्हटले आहे (३) सर्वांनाच येथे इंद्र अथवा शक्र म्हटले आहे हा इंद्र वैदिक वृत्रहा नव्हे हे कालगणनेवरून सुस्पष्ट आहे जिनेन्द्र (जिन + इन्द्र) मधील इंद्र आणि वरील इंद्र ही समान पदे आहेत । (४) आणि सर्वांनाच विश्ववेद (केवलज्ञानी) म्हटले आहे (५) या वेदवाक्यात ऋषभ, अजित, सुपार्श्व, अरिष्टनेमी आणि वर्धमान-महावीर या ५ तीर्थंकराची स्तुती केली आहे केवळ उल्लेखच नव्हे तर त्याची केलेली उपासनाही स्पष्टपणे नजरेत भरते अधिक विमर्श वाचकानीच करावा.

याशिवाय आणखी काही ओळी या मोक्षमार्गप्रकाशक ग्रथात आढळतात तिकडेही लक्ष वेधल्याशिवाय राहात नाही—

ऋग्वेदांतर्गत–

ॐ त्रैलोक्यप्रतिष्ठितान् चतुर्विंशति तीर्थंकरान् ऋषभादि-
वर्धमानान्तान् सिद्धान् शरणं प्रपद्ये। ॐ पवित्रं नग्नमुपवि-
प्रसामहे येषां, नग्ना जातिर्येषा वीरा ॥ इत्यादि–

– मोक्षमार्गप्रकाशक, पान २१२

मनुस्मृतीमध्येही–

कुलादिबीजं सर्वेषां प्रथमो विमलवाहनः।
चक्षुष्मान् यशस्वी वाभिचंद्रोऽथ प्रसेनजित् ॥
मरुदेवी च नाभिश्च भरते कुलसत्तमाः।
अष्टमो मरुदेव्या तु नाभेर्जात उरुक्रमः ॥
दर्शयन् वर्त्म वीराणां सुरासुरनमस्कृतः।
नीतित्रितयकर्ता यो युगादौ प्रथमो जिनः ॥

– मोक्षमार्गप्रकाशक, पान २११.

हे तीन श्लोक याच स्वरूपात स्वामी कर्मानन्द याच्या 'धर्म का आदि प्रवर्तक' नावाच्या पुस्तकातही आढळतात. त्यावरूनच साहित्याचार्य पन्नालाल यांनी त्याच्या महापुराण भाग १ (बनारस, १९४४) मधील प्रस्तावनेत पान २८ वर उद्धृत केले आहेत अशा परपरागत वस्तुस्थितीवरून त्यांच्या मौलिकतेची खात्री पटण्याची संभावना निर्माण होते प्रभासपुराणातही पुढील ओळी आढळतात–

भवस्य पश्चिमे भागे वामनेन तपः कृतम्।
तेनैव तपसाकृष्टः शिवः प्रत्यक्षतां गतः ॥
पद्मासनसमासीनः श्याममूर्तिर्दिगंबरः।
नेमिनाथः शिवेत्येवं नाम चक्रेऽस्य वामनः ॥
कलिकाले महाघोरे सर्वपापप्रणाशकः।
दर्शनात् स्पर्शनादेव कोटियज्ञफलप्रदः ॥

या ठिकाणी वामनाला तीर्थंकर नेमिनाथाचे दर्शन झाले आणि त्याची तपश्चर्या सफळ झाली, असे सांगितले आहे वामनाने त्यानाच शिव असे संबोधिले आहे नेमिनाथच सर्वपापहारक असून त्याच्या दर्शनानेच केवळ एक कोटी यज्ञ

केल्याचे फळ मिळते अशी ग्वाही दिली आहे आणि ही विधाने जैन सस्कृतीला अत्यत निकटवर्ती असून यज्ञसस्कृतीला विरोधी आहेत

जैनधर्माच्या प्राचीनतमतेबद्दल खात्री पटण्यासाठी आणि सदिग्धतेचा पूर्ण निरास होण्यासाठी पुढील काही जगप्रसिद्ध साक्षी-पुरावे आणि अभिप्राय पहा--

युरोपातील रहिवासी असूनही भारतीय विद्येचे प्रकाण्ड विद्वान म्हणून मान्यता पावलेले डॉ यकोबी म्हणतात--

There is nothing to prove that Pars'va was the founder of Jainism. Jain Tradition is unanimous in making Rishabha, the first Tirthankara ( as its founder ). There may be something Historical in the tradition, which makes him the first Tirthankar.

अर्थात् पार्श्वनाथांना जैनधर्माचा सस्थापक ठरविण्यासाठी कोणताही पुरावा उपलब्ध होत नाही जैनप्रणाली एक मुखाने ऋषभांनाच प्रथम तीर्थंकर मानते. या आम्नाय-परपरेत ऐतिहासिक तथ्य असणे सभवनीय ठरते

– Indian Antiquary, vol IV, P. 163.

यावरील बॅ चपतराय याचे मतव्य पहा–

If this is not history and Historical confirmation, I do not know what else would be covered by these terms.

अनेक जैनेतर प्रमाण देखील ऋषभदेवानाच प्रथम जैन तीर्थंकर मानतात तेव्हा त्यात ऐतिहासिक तथ्य निश्चितच असले पाहिजे असे मानले नाही तर ऐतिहासिक तथ्य दुसऱ्या कशाला म्हणावयाचे ?

– Rishabha - Deva, P. 66.

केवळ साहित्यिक परपरेतच नव्हे तर उत्खनन, स्तूप, स्तंभ, गुहा, मूर्तिलेख आणि शिलालेख यामध्येही जैनधर्माची पुरातनता स्पष्ट दिसते मथुरा येथील जैन स्तूप आणि उत्खननातील सामग्री जैन प्राचीनता अधिक प्रकाशात आणून अकाटच प्रमाण उपस्थित करण्यास समर्थ आहे या सामग्रीच्या विश्लेषण-लेखामध्ये श्री विंसेंट ए स्मिथ म्हणतात–

The discoveries have to a very large extent Supplied Corroboration to the written Jain Tradition

and They offer tangible incontrovertible proof of the antiquity of the jain religion and of its early existence very much in its present form. The series of twenty-four pontiffs (Tirthankaras), each with his distinctive emblem, was evidently firmly believed in at the beginning of the christian era.

– The Jain Stup ..Mathura Intro, P. 6.

या शिलालेखापेक्षाही प्राचीन आणि महत्त्वपूर्ण शिलालेख ओरिसा प्रातातील खडगिरी-उदयगिरीवरील हाथीगुंफेजवळ प्राप्त झाले आहेत. ते कलिंग सम्राट खारवेल राजाने खोदविले होते. त्याना अनुसरून मगधविजयाचे मानचिन्ह म्हणून त्याना मिळालेली भगवान ऋषभनाथ तीर्थंकराची मूर्ती इ सनपूर्व ८-९ शतकातील निर्मिती आहे थोडक्यात या विषयावरील डॉ. राधाकृष्णन् याचाच निर्णय पहा–

There is no doubt that Jainism prevailed even before Vardhamana or Parsvanatha. The Yajurveda mentions the names of three Tirthankaras— Risabha, Ajitanatha and Aristanemi. The Bhagavata Purana endorses the view that Risabha was the founder of Jainism Whatever be the truth of it all, the Jains believe that their system had previously been proclaimed through countless Ages by each one of the Succession of Great Teachers.

'भ वर्धमान महावीर आणि भ पार्श्वनाथ याच्याही पूर्ववर्ती कालखण्डामध्ये जैनधर्म प्रवर्तमान होता यात मुळीच शका नाही भ ऋषभ, अजितनाथ आणि अरिष्टनेमी या तीन तीर्थंकराचा उल्लेख यजुर्वेदामध्येही केलेला आढळतो भ. ऋषभदेवानीच जैनतीर्थ पहिल्या प्रथम प्रवर्तित केले हे विधान भागवत पुराणालाही सम्मत आहे या (वेद-पुराणप्रणीत) विधानातील तथ्य कसेही असले तरी जैनाचा मात्र असा विश्वास आहे की अगणित कालखण्डापासून चालत आलेल्या तीर्थप्रणालीमध्ये प्रत्येक तीर्थंकरानी आपापल्या कालखडात जैनधर्माच्या तीर्थाचे प्रवर्तन पुन पुन केलेले आहे'

– Indian Philosophy, vol. I (ch-) 6, Page 287.

डॉ विमलचरण झा याचेही जैनधर्माच्या प्राचीनतमतेबद्दल असेच मत आहे त्यानी आपल्या मताच्या आधारासाठी भागवतपुराण, स्कध ५, अध्याय २, सूत्र ६ आणि वैदिक साहित्यातील ऋषभनाथ, नेमिनाथ इत्यादी जैनधर्माच्या प्रवर्तकाची नावे आणि त्याच्या जीवन-चरिताचा उल्लेख केला आहे तसेच डॉ सकलिया यानीही वरील विधानाला पुष्टी देऊन पुढे ऋषभनाथांच्या ऐतिहासिकतेबद्दल खात्री दिली आहे मानवी जीवनमूल्ये निश्चित करण्यात आणि मानवतेचा स्तर उचविण्यात त्यानी पार पाडलेल्या महत्कार्यांची योग्य ती सभावना करून तेच जैनाचे प्रथम तीर्थंकर आणि आद्य धर्मप्रवर्तक असल्याची ग्वाही दिली आहे

भारतीय आणि विदेशीय विश्वविख्यात विद्वानाचे अभिप्राय सादर करून ऋषभनाथ तीर्थंकर, त्यानी प्रवर्तित केलेला जिनधर्म, त्याच्या आध्यात्माचा उपनिषदावर पडलेला प्रभाव आणि भारतातील प्राचीन जैन राजाचा उल्लेख करून या प्रकरणाचा शेवट करीत आहे-

## (१) डॉ. लुई रेनाऊ (पॅरिस)-

नवे धार्मिक आदोलन करण्याची आवश्यकता नाही जैनधर्मात समस्त जीवाचे हित करण्याचे पूर्ण सामर्थ्य आहे त्याचा ऐतिहासिक आधार सारभूत आहे अहिंसेचा प्रथम प्रचार जैनधर्मानेच केला आहे नतर इतर धर्मानी तिचा स्वीकार त्याच्यापासूनच केला आहे तीर्थंकराची मान्यता अत्यत प्राचीन आहे हे मथुरा येथील पुरातत्त्वाच्या आधारे सिद्ध होते भ महावीर त्या परपरेतील अतिम तीर्थंकर होत

— रिलिजन्स ऑफ एन्शिएट इडिया,
पान १११-११२.

या डॉ रेनाऊच्या म्हणण्याला भागवताचाही आधार आहे ऋषभावतार व इतर अवतार यामध्ये जो फरक आहे तोच नेमका जैन व वैदिक धर्मातही आहे. पहा-

"शुकदेवजी कहते है कि भगवानने अनेक अवतार धारण किए। परंतु जैसा संसारके मनुष्य कर्म करते है वैसा किया। किंतु वृषभदेवजीने जगतको मोक्षमार्ग दिखाया, और खुद मोक्ष गए। इसलिए मैने वृषभदेवको नमस्कार किया है।"

— भागवत भाषा टीका, पान ३७२

### (२) डॉ. याकोबी (जर्मनी)–

या जर्मन विद्वानाने अत्यंत दृढतेने सांगितले आहे की जैनधर्म पूर्णतः मौलिक आणि स्वतंत्र असून दुसऱ्या कोणत्याही धर्मापासून तो वेगळा आहे. भारतातील प्राचीन दर्शनाच्या आणि धार्मिक जीवनाच्या अभ्यासासाठी व बोधग्रहणासाठी त्याचा अभ्यास आवश्यक आहे–

'In conclusion let me assert my conviction that Jainism is an Original System, quite distinct and independent from all others; and that, therefore, it is of great importance for the study of Philosophical thought and religious life in ancient India.'

– The Transactions of the Third International Congress for History of Religions, Vol II, P. 66, Oxford, 1908.

### (३) लोकमान्य बाळ गंगाधर टिळक–

"अहिंसा परमो धर्म" इस उदार सिद्धान्तने ब्राम्हणधर्मपर चिरस्मरणीय छाप मारी है। पूर्वकालमे यज्ञके लिए असंख्य पशु-हिंसा होती थी। इसके प्रमाण 'मेघदूत काव्य' आदि अनेक ग्रंथोमे मिलते है।... परंतु इस घोर हिंसाका ब्राह्मण-धर्मसे विदाई ले जानेका श्रेय जैनधर्मके हिस्सेमें है।

– मुंबई समाचार, १०-१२-१९०४.

### (४) डॉ. म. म. गंगानाथ झा–

जबसे मैंने शंकराचार्य द्वारा जैनसिद्धान्तका खण्डन पढा है, तबसे मुझे विश्वास हुआ कि स्याद्वाद सिद्धान्तमे बहुत कुछ है, जिसे वेदान्तके आचार्योंने नहीं समझा। और जो कुछ मैं अबतक जैनधर्मको जान सका हूं उसमे मेरा यह दृढ विश्वास हुआ है कि यदि वे (शंकराचार्य) जैनधर्मको उसके असली ग्रंथोंसे देखनेका कष्ट उठाते तो उन्हे जैनधर्मके विरोध-करनेकी कोई बात नही मिलती।

– जैनशासन, पान १७७.

### (५) प्रा. फणिभूषण अधिकारी–

विद्वान् शंकराचार्यने स्याद्वाद-अनेकान्त सिद्धान्तके प्रति अन्याय किया है। यह बात अल्प योग्यतावाले पुरुषोमें क्षम्य हो सकती थी, किंतु यदि मुझे कहनेका

अधिकार है तो मैं भारतके इस महान् विद्वान्में सर्वथा अक्षम्य ही कहूगा, यद्यपि मैं इस महर्षिको अतीव आदरकी दृष्टिसे देखता हूँ। ऐसा जान पडता है कि उन्होने इस धर्मके दर्शनशास्त्रके मूलग्रथोके अध्ययनकी परवाह न की।

– स्याद्वाद, जैनदर्शन विशेषांक, पान १८२

## (६) सर षण्मुखम् चेट्टी–

आर्य लोग बाहरसे भारतमें आए थे। उस समय भारतमे जो द्रविड लोग रहते थे, उनका धर्म जैनधर्मही था। अत प्रमाणित होता है कि **भरतवर्षके आदिम निवासी जैनधर्मके आराधक रहे हैं।**

– महावीर जयती निमित्त भाषण, मद्रास, १९४३.
(जैनशासन, पा. २९०).

## (७) पुरातत्त्व-विशेषज्ञ श्री रामप्रसाद चंदा–

The pose of the image (Standing Rishabha in Kayotsarga form from Mathura reproduced in fig 12) closely resembles the pose of the standing deities on the Indus seals three to five (Plate II F. G. H.) with a bull in the foreground may be the prototype of Rishabha.

– Sindh, Five Thousand years Ago
in Modern Review, August, 1932.

## (८) डॉ. ए. गिरनाट–

याच्या मते मानवाच्या उन्नतीसाठी आवश्यक अशा सदाचाराला जैनधर्माने अधिक महत्त्व दिले आहे जैनसिद्धान्त इतरापेक्षा अधिक मौलिक, स्वतन्त्र आणि तर्कशुद्ध आहे ब्राह्मणधर्मापेक्षा अधिक सरळ, सपन्न आणि व्यापक आहे आणि बौद्धधर्मासारखा शून्यवादीही नाही–

There is very great ethical value in Jainism for man's improvement Jainism is very original, independent and systematic doctrine. It is more simple, more rich and varied than Brahmanical systems and not negative like Buddhism.

– जैनशासन, पान २९५.

(९) न्यायमूर्ती रांगणेकर

डॉ गिरनाट याच्या मताला अधिक पुष्टी देतात–

It is true, the Jains reject the Scriptural character of the vedas and repudiate the Brahmanical doctrins... Now it is true as later historical researches have shown that Jainism prevailed in this country long before Brahmanism that came into existance or converted into Hinduism

– A. I R. 1939, Bombay–377.

(१०) प्रा. इ. डब्ल्यू. हॉपकिन्स

यांनी तर त्यासाठी बौद्धाची साक्ष काढली आहे–

The Nigganthas (jains) are never referred to by the Buddhists as being a sect, nor is their reputed founder Nataputta spoken of as their founder, whence Jacobi plausibly argues that their real founder was older than Mahavira and that this sect preceded that of Buddha (Page 283).

The Jain Literature left to us is quite large and enough has been published already to make it necessary to revise the old belief in regard to the relation between Jainism and Buddhism (Page 286).

– The Religions of India, PP. 283+286.

(११) जेम्स विन्सेट प्रेट

यांनी जैन शास्त्रातील विज्ञानवादाची प्रशंसा केली आहे–

The writers of the Jain Sacred Books are very systematic thinkers and particularly 'Strong' on Arithmetic. They know just how many different kinds of different things there are in the universe and they have them all tabulated and numbered, so that they shall have a place for every thing and every thing in its place.

– India and its Faiths, p. 258.

(१२) गणितशास्त्रज्ञ प्रा. दत्त

यानी गणितशास्त्रातील जैनाची प्रगती मान्य केली आहे–

What is more important for the general history of Mathematics, certain methods of finding solutions of rational triangles, the credit for the discovery of which should very rightly go to Mahavira, are attributed by modern historians, by mistake to writers posterior to him

– Bulletin, Calcutta Math. Soc. XXI, P. 116.

## जैनधर्माचा प्रभाव

जैनधर्माच्या सनातनतेचा, तत्त्वविचाराचा, सयममार्गाचा, तपश्चर्येचा आणि ध्यानमयतेचा प्रभाव, भारतात जे जे आले आणि गेले अशा सर्व मानवावर, पडलेला स्पष्ट दिसतो आणि जे येथे स्थिरावले त्या वैदिकावर, ब्राह्मणावर, शैव-शाक्तावर, वैष्णवावर आणि नव्याने निर्माण झालेल्या बौद्धावरही जैनाची धर्ममुद्रा उमटली आहे हे सर्व परिणमन लक्ष वेधून घेतल्याशिवाय राहात नाही यासवधी पुढील ५ विद्वानाची मते व अभिप्राय पहा–

(१३) आचार्य बलदेव उपाध्याय–

' वैदिक युग में हि साहित्य की दो धाराएँ प्रतीत होती है– एक धारा तो विशुद्ध धार्मिक है जिसमें किसी देवता की स्तुति तथा प्रार्थना ही मुख्य लक्ष्य है। दूसरी धारा विशुद्ध लौकिक है जिसमें लोक में प्रख्याति पाने वाले महनीय व्यक्तियो का तथा लोक-प्रसिद्ध वृत्त का वर्णन करना ही अभीष्ट तात्पर्य होता है। '

– I. H S. R. ( Jayapur, April, 1973 ) Vol. I, P. 61.

(१४) लोकहितवादी गोपाळ हरी देशमुख–

" एकाचे मूळ मत्रात आहे व दुसऱ्याचे मूळ उपनिषदात आहे. एकात कर्म हा विषय व दुसऱ्यात ज्ञान हा विषय आहे, एकाचे अनुयायी ब्राह्मण व दुसऱ्याचे अनुयायी जैन त्यानतर वैष्णवानी उपासना मार्ग काढून त्यात ईश्वरास सविग्रहत्व व सगुणत्व मानिले व त्याचे पूजन करावे असे ठरविले त्याचप्रमाणे लिंगाइतानी शैवोपासना काढली व ब्राह्मणानी शक्तीची उपासना व स्मार्त धर्म काढला अशी अनेक रूपातरे झाली ...... वास्तविक म्हटले असता वैदिक व जैन हे उभय धर्म व त्यांची तत्त्वे परस्परापासून अगदी विरुद्ध स्थितीत आहेत. "

– आश्वलायन-गृह्यसूत्र (लोकहितवादीकृत भाषातर), मुंबई, १८८०, पा. ५.

यावरील विवेचनात डॉ निर्मलकुमार फडकुले म्हणतात, '.. लोकहित-वादींनी असे मत प्रतिपादित केले आहे की, जैन व बौद्ध याच्या अहिंसातत्त्वाचा प्रभाव त्यावेळी विशेषत्वाने पडू लागल्यामुळे वैदिक धर्म लोकात अप्रिय होत चालला, कारण त्यात हिंसाश्रित यज्ञयाग अधिक होते पण कुमारिलभट्टानी दूरदर्शीपणे सूत्रात प्रतिपादलेली हिंसा आपल्या (आश्वलायनसूत्रावरील) कारिकातून गाळून टाकली.'

– लोकहितवादी : काल आणि कर्तृत्व, पुणे, १९७३, पान १४०-१४१.

## (१५) बौद्ध विद्वान धर्मकीर्ती–

याच्या स्वत च्याच 'न्यायबिंदु-प्रकरण' नावाच्या ग्रथातील सर्वज्ञ आणि आप्त यामधीच्या साक्षीवरुन जैनधर्म बौद्धधर्मापेक्षा प्राचीन असून जैनाच्या २४ तीर्थंकराना त्याची आदरपूर्वक मान्यता असलेली स्पष्ट दिसते–

"यः सर्वज्ञ आप्तो वा स ज्योतिर्ज्ञानादिकमुपदिष्टवान्, यद्यथा ऋषभवर्धमानादिरिति ।"

जो सर्वज्ञ किंवा आप्त आहे त्यानेच ज्योतिषशास्त्रादिकाचा उपदेश केला उदाहरणार्थ ऋषभ, वर्धमान इत्यादि

## (१६) डॉ. राधाकृष्णन्, मेहता आणि ग्लासेनॉप–

ब्राह्मणग्रथ वेदाग आहेत हे निश्चित पण उपनिषदे मात्र वेदाना अनुकूल नाहीत वेदप्रामाण्याबाबतीत ती दुतोंडी धोरण स्वीकारतात एकीकडे वेदांच्या मौलिकतेला मान्यता देतात तर दुसरीकडे परम सत्य अशा दैवी ज्ञानापेक्षा वैदिक ज्ञान कमी दर्जाचे असून वेद मुक्ती देण्यास असमर्थ आहेत असेही सागतात नारदाच्या विधानाप्रमाणे ऋग्वेद, सामवेद आणि यजुर्वेद याच्या अभ्यासाने केवळ मत्राचे व विधिशास्त्राचे ज्ञान होते, आत्मतत्त्वाचे नव्हे! माण्डूक्य उपनिषदात, वेदातून प्राप्त होणारी विद्या निम्नस्तरीय आहे असे स्पष्ट म्हटले आहे कठ उपनिषदकाळी वैदिक धर्माला विरोध करणाऱ्या दार्शनिकाचा सद्भाव आढळतो पण याचा अर्थ तत्पूर्वीच्या काळी वेदविरोधी दार्शनिक विद्यमान नव्हते असा नव्हे!

आणि हा पारपरिक विरोध आकस्मिक नसून तो ऋषभसंस्कृतीचाच परिपाक होय याच विरोधातून उपनिषदामध्ये ब्रह्मजिज्ञासा निर्माण झाली तरीही त्यात वेदाचे प्रामाण्य स्वीकारून त्यातील ज्ञानाला मात्र निम्नस्तरीय गणण्यात आले उपनिषदानी आध्यात्मिक सिद्धान्ताचे प्रतिपादन तर केले, परतु वैदिक क्रियाकाण्डाला मात्र विरोध केला नाही उलट त्या क्रियाकाण्डाला उच्चस्तरीय

आध्यात्मवादाशी साधण्याचा अयशस्वी प्रयत्न केला परिणामी भगवद्गीतेत आणि अनतरकालीन उपनिषदामध्ये परस्पर विरोधी सिद्धान्ताचे मिश्रण झालेले आढळते अशा आध्यात्मवादाला जैनधर्माचा मुख्य आधार होता जेव्हा इन्द्रादिकाना देवताचे स्थान मिळून त्याची पूजा होऊ लागली तेव्हा पुन एकदा वैदिक धर्माला स्थिरावण्याचा प्रयत्न झाला फलत रामायण व महाभारत उदयास आले आणि राम व कृष्ण याना अवताराची प्रतिष्ठा प्राप्त झाली. या परिणमनामुळेच महाभारतावरील ऋषभसस्कृतीचा प्रभाव नजरेस येतो.

– Indian Philosophy, Vol. I
Pp. 149,264-65-66, 275-76.
यावर आधारित

अशा माम्यावरून जैनधर्म उपनिषदातून निघाला असून तो हिंदूधर्माचा एक क्रान्तीकारी सुधारक पथ आहे असा समज करून घेणे मोठा भ्रम होय श्री नर्मदाशकर देवशंकर मेहता आपल्या ‘उपनिषद - विचारणा’ या ग्रथात ( पान २०१ ) म्हणतात–

‘ उपनिषदोना छेवटना भागमा वेदबाह्य विचारवाला साधुओना आचार-विचारो अरण्यवासिओमा पेठेला जणाय छे, अने तेमा जैन अने बौद्ध सिद्धातोना प्रथम बीजे उग्या होय एम जणाय छे । उदाहरण तरीके “ सर्वाजीव ब्रह्मचक्रमा हस एटले जीव भमे छे, जीवघन परमात्मा छे, जीव जे जे शरीरमा प्रवेशे छे ते ते शरीरमय थई जाय छे, केटलाक परमहसो निर्ग्रन्थ अने शुक्लध्यान परायण हता।” आ विगेरे उपनिषद् वाक्यो श्री महावीर पूर्वभावी निर्ग्रन्थ साधुओना विचारोना पूर्वरूप छे। जैनोना आद्य तीर्थंकर ऋषभदेव आ वर्गना निर्ग्रन्थ साधु हता। अने पाछळथी तेमने हिन्दुधर्मिओने विष्णुना अवतार मान्या छे।’

तसेच जर्मन विद्वान ग्लासेनॉप आपल्या जैनधर्म ( Jainism ) नावाच्या ग्रथात प्रा हर्टेलच्या साक्षीने खात्री देतात की– ब्रह्मलोक आणि मुक्तिविषयक जैन सिद्धान्त उपनिषदातील कल्पनापेक्षा वेगळा आहे दोन्ही समान असणे शक्य नाही दोन्हीमध्ये जो साम्य आढळतो तो केवळ शाब्दिकच आहे या अभिप्रायाची सत्यता प्रसिद्ध इतिहासज्ञ स्व म. म गौरीशंकर हीराचद ओझाजीच्या साक्षीने अधिक खोलवर रुजल्याशिवाय राहणार नाही–

“ बौद्ध और जैनधर्मके प्रचारसे वैदिकधर्मको बहुत हानि पहुची। इतना ही नहीं, किंतु उसमें परिवर्तन करना पडा। और वह नये साचेमे ढलकर पौराणिक धर्म बन गया। उसमे बौद्ध और जैनोसे मिलती धर्मसबधी बहुतसी नई बातोंने

प्रवेश किया । इतना ही नही, किन्तु बुद्धदेवकी गणना विष्णुके अवतारोमें हुई और मासभक्षणका थोडा वहुत निषेध करना पडा । ''

– राजपुतानेका इतिहास, प्र० खण्ड, पृ. १०-११.

## (१७) मेजर जनरल जे. सी. आर. फर्लांग–

याचे अभ्यासपूर्ण विधान अगदी हृदयग्राही आणि विचारप्रवर्तक आहे–

' उत्तर, पश्चिम आणि उत्तर-मध्यभारत इ सनपूर्व १५०० ते ८०० वर्षांपर्यंत– खरे तर अज्ञात कालखडापासून तुराणी लोकाच्या अधीन होता त्यानाच द्रविड असेही सबोधण्यात येत असते त्याच्यामध्ये वृक्ष–सर्प–लिंगपूजा रूढ होती पण त्याच्यावरोवर त्याच काळी सपूर्ण उत्तरापथामध्ये एक पुरातन व अत्यत सघटित धर्मही प्रचलित होता तो दर्शनशास्त्र, आचारधर्म आणि उच्चतम तपश्चर्या यात श्रेष्ठ असून त्याचे नाव जैनधर्म असे होते ब्राह्मणधर्माने आणि बौद्ध धर्मानेही संयमनाचे प्राथमिक स्वरूप स्पष्टत. त्यापासूनच स्वीकारले आहे. इ सनपूर्व ८–९ व्या शतकात होऊन गेलेल्या इतिहासमान्य पार्श्वनाथ या २३ व्या जैन तीर्थंकरापूर्वी आणि वैदिक आर्य गगेच्याच नव्हे तर सरस्वतीच्या खोऱ्यातही पोहोचण्याच्या फारच पूर्वकाळी जैनाच्या २२ तीर्थंकरानी धर्मतीर्थाचे प्रवर्तन केले होते. '

फर्लांगसाहेब शेवटी या निर्णयाला पोहोचतात की–– **' जैनधर्माचा प्रारभकाल शोधणे अशक्यच आहे. '**

" All upper, Western, North Central India was then say 1500 to 800 B C and indeed from unknown times— ruled by Turanians, conveniently called Dravids and given to tree - serpent - phalic - worship But there also then existed throughout upper India an ancient and highly organised religion, philosophical, ethical and severely ascetical viz. Jainism, out of which clearly developed the early ascetical features of Brahmanism and Buddhism Long before the Aryans reached the Ganges or even Sarswati, Jains had been taught by some 22 prominent Bodhas, saints or Tirthankaras, prior to the historical 23 rd Bodha

**Parsva of the 8th or 9th century B. C ...... .. It is impossible to find the beginning of Jainism."**

– Short Studies in the Science of Comparative Religion, Pp. 243-44 etc

## जैन क्षत्रिय आणि क्षात्रतेज

इतिहासप्रसिद्ध जैन सम्राटावद्दल विनाकारणच गैरसमज व अपवाद पसरविण्यात येत असतात. अलिकडील सशोधनामुळे दक्षिण भारतातील जैन सम्राटाना मात्र इतिहासाची मान्यता लाभू शकली तीच स्थिती राजस्थान, गुजरात व माळवा येथील जैन वीर, राजे व महाराजे याचीही आहे तसेच विपुल शिलालेखाच्या बळावर खारवेल, सप्रती इत्यादी प्रतापी सम्राटाना जैन मानण्याशिवाय गत्यतरच उरलेले नाही पण त्याही पूर्वीचे वलाढ्य सम्राट प्रथम महाराज नंद, पुष्यमित्र इत्यादी नद घराण्यातील राजे व महाराजे आणि मौर्य घराण्यातील चंद्रगुप्त आणि अशोक याच्या विपयीची तेढ शक्य तर चालू ठेवण्याचे किंवा वाढविण्याचे प्रयत्न चालू असतात म्हणून या तीन प्राचीन सम्राटावरील काही ऐतिहासिक अभिप्राय लक्षवेधी ठरतात याशिवाय नाथ व लिच्छवी राजवंश, वैशालीचे महाराज चेटक, सिंधुसोवीरचा उदायन, उत्तर आयुष्यात जैनधर्म स्वीकारणारा मगधाधिपती बिंबीसार श्रेणिक व पूर्वायुष्यात कट्टर जैन असणारा अजातशत्रू कूणिक इत्यादी प्रागैतिहासिक काळातील मान्यवर सम्राट डोळ्याआड करण्यासारखे खास नाहीत डॉ याकोबीसारख्या विश्वमान्य विद्वानाने आपल्या 'जैन सूत्रग्रंथाच्या प्रस्तावने' मध्ये अनेक प्रसगी ते जैन असल्याची पुराव्यानिशी खात्री दिली आहे भारतीय इतिहासाला पूरक असल्याने जैन साहित्याचा अभ्यास अटळ ठरतो

तसेच जैनी अहिंसेमुळे भारताची लढाऊ वृत्ती कमी झाली अशी व्यर्थ हाकाटी पिटविण्यात येत असते पण त्याना डॉ आळतेकरानी परस्पर दिलेले उत्तर किती समर्पक आहे !

### नंद राजे

जैनधर्माच्या प्राचीनतमतेच्या व जैन साहित्याच्या ऐतिहासिक प्रामाण्यासाठी अत्यत महत्त्वाचा ठरणारा आणि नदराजे जैन होते व ते ऋषभजिनांची पूजा करीत होते हे स्पष्ट करणारा हाथीगुंफा ( जि पुरी, प्रान्त ओरिसा ) येथील एक शिलालेख पहा–

"नमो अरहतानं, नमो सवसिधानं। ऐरेन महाराजेन महामेघवाहनेन .. . कलिंगाधिपतिना सिरिखारवेलेन . .... बारसमे च वसे .मागधं च राजानं बह(स)तिमित पादे वंदापयति, नंदराजनीतं कलिंगजिनं संनिवेसं अग-मगधवसुं नयति ..। . ."

या सविस्तृत दीर्घ शिलालेखाचा कटेपर्यंत सखोल अभ्यास करून पुरातत्त्वज्ञानी काढलेले निष्कर्ष वाचकांना उपयुक्त ठरतील

## (१८) डॉ काशीप्रसाद जायसवाल तथा बॅ. चंपतराय–

"But from the point of view of the history of Jainism, it is the most important inscription yet discovered in the country. It confirms the Puranic record and carries the dynastic chronology to era 450 B. C. Further it proves that Jainism entered Orrisa and probably became the state religion within hundred years after Mahavira."

– J. B. O. R Society vol III, Pp. 448 etc.

याच लेखातील कलिंगजिन या मूर्तिविषयी बॅ चंपतराय लिहितात–

"This statue most probably dated back prior to Mahavira's time and possibly even to that of Parshvanatha."

– Rishabhadeva, P 67.

## सम्राट चंद्रगुप्त मौर्य

जगप्रसिद्ध शिकंदर बादशहाला भारताबाहेर पिटाळून लावणाऱ्या अत्यंत प्रतापी अशा या सम्राटाच्या जैनत्वासंबंधी पुढील ४ पुरावे लक्षवेधी आहेत–

(१९) डॉ. एफ्. डब्ल्यू. थॉमस–

The testimony of **Megasthenes** would likwise seem to imply that **Chandragupta** submitted to the devotional teachings of Sramanas as opposed to the doctrins of the Brahmins.

– Jainism or Early Faith of Asoka, P. 23.

(२०) डॉ. विन्सेंट स्मिथ–

I am now disposed to believe that the tradition is probably true in its main outline and that **Chandragupta** really abdicated and became Jain ascetic.

– History of India, P. 146.

(२१) रायबहादुर श्री नरसिंहाचार्य–

The hill which contains the foot-prints of his (**Chandragupta's**) preceptor is called **Chandra Giri** after his name and on it stands a magnificent temple called **Chandra Basti** with its carved and decorated walls, portraying scenes from the life of the great Emperor. He was a true hero and attained the heaven from that hill in the jain manner of **Sallekhana.**

– Jain-Shasana, Pp. 307-308.

(२२) डॉ. काशीप्रसाद जायसवाल–

The Jain books of the 5th cen- A D. and later Jain inscriptions claim **Chandragupta** as a Jain Imperial ascetic. My studies have compelled me to respect the historical data of jain writings and see no reason why we should not accept the Jain claim that Chandragupta at the end of his reign accepted

Jainism and abdicated and died as Jain ascetic. I am not the first to accept the view, Mr **Rice,** who has studied the Jain inscriptions of **Sravanbelgola** thoroughly, gave VERDICT in favour of it and **Mr. V. Smith** has also leaned towards it ultimately.

–J. B. O. R. Society, vol. VIII.

## सम्राट अशोक

आणि बुद्धधर्माचा भक्त म्हणून विख्यात असलेल्या सम्राट अशोकासंबंधीही कित्येक विद्वानांचे मत, अशोकाशी निगडित असलेल्या साहित्याच्या सूक्ष्म अवलोकनावरून, असे बनले आहे की, अशोकाच्या जीवनाचा जैनधर्माशी घनिष्ठ संबंध होता

(i) इंडियन अँटिक्वेरीच्या ५ व्या खंडात म्हटले आहे की अशोक प्रथमत. जैनधर्मीय होता. नतर तो बौद्ध झाला अशोकाच्या प्रारभीच्या शिलालेखात तो बौद्ध असल्याचा कोणताही पुरावा मिळत नाही उलट त्यातील सैद्धान्तिक भावना जैनधर्मीय आहेत 'देवानां पिय पियदसी' ही उपाधी जैन ग्रथातच आढळते. परतु २२ व्या वर्षी लिहिलेल्या भावरा येथील प्रशस्तिलेखामध्ये मात्र राजाची उपाधी केवळ 'पियदसी' एवढीच आढळते तेथे 'देवानां पिय' नाही शिवाय तो बौद्ध असल्याचे अन्य प्रमाणही स्पष्ट दिसतात म्हणजे त्याच सुमारास तो बौद्ध झाला असला पाहिजे.

(ii) अहिंसेच्या पालनार्थ अशोकने ज्या नियमांचा प्रचार केला ते बौद्धापेक्षा जैनधर्माशी जास्त सुसगत आहेत. त्यावरूनही तो प्रथमत जैन होता असे सिद्ध होते. या मताचे समर्थन डॉ. थॉमस यानेही त्याच्या Early Faith of Asoka या ग्रथात केले आहे

(iii) दिल्ली येथील अशोकस्तंभावरील प्रशस्तीमध्ये 'निग्गंठ' या शब्दाने जैनधर्माचा उल्लेख केला आहे अशोकने इतर सप्रदायावरोबरच 'निग्गठ' धर्मियासाठीही धर्म-महामात्याची नेमणूक केली होती.

(iv) प्राणिदयेसबंधीचा अशोकाचा आदेश बौद्धापेक्षा जैन सिद्धान्ताशी जास्त सुसगत आहे अशी–

(२३) प्रा. कर्ण यांचीही धारणा दृढ आहे–

"His (Asoka's) ordinances concerning the sparing of animal life agrees much more closely with the ideas of heretical Jains than those of Buddhists."

– Indian Antiquary, vol. V, Page 205.

(v) अशोकाने जैनधर्माचा प्रचार काश्मीरमध्येही केल्याचा उल्लेख महाकवी कल्हणच्या 'राजतरंगिणी' या संस्कृत ग्रंथातही आढळतो–

यः शान्तवृजिनो राजा प्रपन्नो जिनशासनम्।
पुष्कलेऽत्र वितस्तात्रौ तस्तार स्तूपमण्डले ॥ (तरंग १/१०१)

मात्र येथे धर्मात्मा अशोक राजाचा उल्लेख 'सम्राट' पदाने विभूषित केलेला नाही

(vi) 'राजावलिकथे' या कन्नड ग्रंथात आणि अबुलफजलच्या 'ऐने अकबरी' मध्येही अशोक जैन असल्याचे प्रमाण मिळतात (जैनशासन, पान ३०८–३०९).

## जैनांचे देदिप्यमान क्षात्रतेज

अहिंसाधर्म अंगीकारूनही जैनांच्या क्षात्रतेजाला कमीपणा कधीही आलेला प्रत्यक्षात आढळत नाही–

(i) A braver soldier, a more devout Jain and a more honest man than **Chamundaraya** Karnataka had never seen.

– Medieval Jainism, P. 102.

(ii) स्मिथ आणि कनिंगहॅम यानीही ज्या सुहलदेवाला जैन मानले आहे त्यानेच अखेर बहरिचमध्ये मुस्लिम सैन्याचा पराभव केला मुसलमानानी गायींची रांग समोर उभी केल्याने हिंदू सैन्य आणि स्वत राजाही किंकर्तव्यमूढ होऊन स्तब्ध राहिले अशा कठीण प्रसंगी जैनधर्मीय सुहलदेवाने अहिंसेचे सारभूत तत्त्व लक्षात घेऊन अत्याचारी यवनांचा फडशा पाडून विजय मिळविला (जैनशासन, पान ३१६) अशा अगणित ऐतिहासिक उदाहरणावरून–

(२४) डॉ. आळतेकरांनी निष्कर्ष काढला तो असा–

" In the face of achievements of the Jain princes and Generals of this period, we can hardly subscribe to the theory that Jainism and Buddhism were chiefly responsible for the military emasculation of the population, that led to the fall of the Hindu India."

– The Rastrakutas and their Times, Pp. 316-17.

जैनाच्या अहिंसेमुळे मानवी वीर्य-शौर्यादी गुणाना मुळीच हानी पोहोचलेली नाही असा डॉ. आळतेकरांचा निर्णय अकस्मात टपकणे शक्य नाही. जैनधर्माच्या मौलिक श्रद्धेच्या व्यापकतेमधूनच त्याचा अवतार झालेला आहे. जैन आचारमार्ग केवळ निवृत्तीपर नाही तो लढाऊ वीरासाठीही तितकाच प्रभावी आहे यासवधी प्रसिद्ध इतिहासकार स्मिथ महाशयाचा पुढील अभिप्राय लक्षात घ्या. ते जैनाचे आचारशास्त्र कोणत्याही जीवाला कोणत्याही अवस्थेत उपयुक्त असल्याची ग्वाही देतात–

Jain ethics are ment for men of all positions– for kings, warriors, traders, artisans, agriculturists and indeed for men and women in every walk of life. Do your duty and do it as humanely as you can. This, in brief, is the primary principle of Jainism.

– History of India, P. 53.

## एक सर्वंकष साक्ष

(२५) म. म. वैष्णवाचार्य स्वामी राममिश्र–

" इस देश में आजकल अनेक अल्पज्ञ जन बौद्ध मत और जैन मत को अेक जानते है, और यह महाभ्रम है। जैन और बौद्धो के सिद्धान्त को एक जानना ऐसी भूल है कि– जैसे वैदिक सिद्धान्त को मानकर यह कहना कि वेदोमें वर्णव्यवस्था नही है, अथवा जाति-व्यवस्था नही है .।

जब कि आद्य खण्डनकार श्रीहर्षने स्वय अपने ग्रथ में बौद्ध के साथ अपनी तुलना की है, और कहा है कि हम लोगो से (याने निर्विशेषाद्वैत सिद्धान्तियो से)

और वौद्धो से यही भेद है कि– हम ब्रह्म की सत्ता मानते है, और सव मिथ्या कहते हैं, परतु वौद्धशिरोमणि माध्यमिक सर्व शून्य कहता है, तव तो जिन जैनो ने सव कुछ माना, उनसे नफरत करनेवाले कुछ जानते ही नहीं, और मिथ्या द्वेप मात्र करते है यह कहना होगा।

मैं आपको कहाँ तक कहू– वडे वडे नामी आचार्यो ने अपने ग्रथो में जो जैन मत खंडन किया है वह ऐसा किया है कि जिसे सुन-देखकर हँसी आती है।

मैं वैष्णव सप्रदाय का आचार्य हूँ तौ भी भरी मजलीस मे मुझे यह कहना सत्य के कारण आवश्य हुआ है कि जैनो का ग्रथ-समुदाय सारस्वत का एक महासागर है।

जैन मत जवसे प्रचलित हुआ है ? 'जवसे ससार में सृष्टि का आरभ हुआ है तवसे' यही इसका सत्य उत्तर है। इसमें किमी प्रकार का उज्र नही है कि जैन दर्शन वेदान्तादि दर्शनों से भी पूर्व का है।

तवही तो भगवान् वेदव्यास महर्षि ब्रह्मसूत्रो में कहते है–'नैकस्मिन्नसभवात्' वेदो में अनेकान्तवाद का मूल मिलता है। अनेकान्तवाद तो एक ऐसी चीज है कि, उसे सवको मानना होगा, और लोगो ने माना भी है। देखिये विष्णुपुराण, द्वितीयाश, अध्याय ६, श्लोक ४२ में लिखा है–

**नरक-स्वर्ग-संज्ञे वै पापपुण्ये द्विजोत्तम।**
**वस्त्वेकमेव दुःखाय सुखायेर्ष्योद्भवाय च।**
**कोपाय च यतस्तस्माद्वस्तु वस्त्वात्मकं कुतः॥ ४२॥"**

– Historical Facts About Jainism, Pp. 50-51.



# परिशिष्ट ५

# महापुराणातील राजतंत्राची रूपरेखा

## समीचीन दृष्टिकोण

आचार्य जिनसेनांच्या महापुराणातील राजनैतिक विचारधारणेसबंधी जैन दृष्टिकोण कोणत्या स्वरूपाचा व कितपत प्रगत ठरतो याचा अभ्यास करण्यासाठी त्याच्या जीवनमूल्याचा, श्रद्धागुणाचा, आचार-विचाराचा आणि आम्नायप्रणालीचा सदर्भ सुसगतपणे खोलवर जाणणे क्रमप्राप्त ठरते त्याशिवाय आतताईपणाने वावलेले सर्व तर्क स्वैर व निरर्थक ठरतात. 'धनाद्धर्म ततः सुख' पेक्षा जैनाची धारणा अत्यत वेगळीच नव्हे तर 'धर्मादिष्टार्थसपत्तिस्तत कामसुखोदयः'(५/१५), 'धर्मः कामार्थयोः सूतिः' (२/३२), 'धर्मो हि मूलो सर्वासां धनर्द्धिसुखसंपदाम्' (२/३३), सर्व प्रकारच्या ऐहिक वैभवाची प्राप्ती गुणानुष्ठानामुळेच होते इच्छेची पूर्ती आणि विलासाची सिद्धी देखील धर्ममुळेच होत असते हा विचार निखालसपणे 'धनद्धर्म तत सुखम्।' या श्रद्धाप्रणालीपेक्षा आमूलाग्र वेगळा आहे केवळ वर्णाश्रमपद्धतीपेक्षा अधिक महत्त्वाच्या मानवी धारणा येथे विपुल आढळतात समाज-जीवनाच्या दृष्टीने त्याना महत्त्व आहे सर्वोदयवादी श्रद्धाचा अगीकार विश्वप्रेमाची निष्पत्ती, कर्तव्यभावनेची वाढ, मानवतेच्या समन्वयाची निकोप भावना इत्यादी सर्व आविष्कार हा जैनाच्या समीचीन दृष्टीचाच प्रभाव आहे. याच्या सर्वंकप अभ्यासाला एक निश्चित दिशा लाभावी एवढाच मर्यादित हेतू येथे बाळगला आहे.

## सीमांकन

(१) राजाचे ८ प्रकारे वर्गीकरण, (२) राजकीय सल्लागार व अधिकारी वर्ग, (३) प्रात-ग्रामादी राज्याग-रचना-विधान, (४) केंद्रीय शासनयत्रणा, ग्रामशासन व स्वायत्तता ( १६/१६८, २९/१२३ इ ), (५) कायदेकानू मडळ, (६) सेनानिर्मिती व वर्गीकरण, सैन्यप्रकार, सेनानियोजन, स्कंधावार (१०/१९८; २९/६, ३०/३ इ ), (७) शस्त्रास्त्र-निर्मिती, आयुधप्रयोग, शिक्षण, युद्धशास्त्र, सामर्थ्याची आधारस्थाने, अमात्यकोप, बाह्यकोप, जनताकोप इ तीन भयस्थाने, सग्रामनीती, राज्यविस्तार, व्यूहरचना (३१/३६ व ७६, ४४/१०९, १११ व ११२), (८) श्रीग्रह ( ३७/८५ ) किंवा कोपसरभ, (९) गूढनीती (११/८१-८३, ४१/१३७), (१०) आरक्ष (Police) किंवा तलवर (४६/३०४), (११) दुष्टदमनविधी (४२/४६, १६४ इ ), (१२) षाड्गुण्य परराष्ट्रनीती (२८/२८,

४१/१३८-१३९, ४६/७२), (१३) दूत व गुप्तहेर (४/१७० इ), (१४) गुप्तमत्रणा (४३/२०२), (१५) शासनाची चार परिक्षेत्रे राष्ट्रीय-सामाजिक-आर्थिक-नैतिक, (१६) राज्याभिषेक, युवराज, उत्तराधिकारी, सामतवर्ग, राजन्यवर्ग आणि (१७) वदि-वैतालिकादी इतरेजन (१६/१९८ २२९ इ) अशा राज्यशास्त्राच्या लहानमोठ्या अगोपागाच्या गुत्यात न सापडता या ठिकाणी फक्त प्रशासनशास्त्राच्या आधारभूत सिद्धान्ताचाच थोडक्यात आढावा घेतला आहे जैन लेखकानी भारतीय राज्यशास्त्राच्या आचारविचारामध्ये मौलिक वा आनुषगिक, पारंपरिक वा प्रागतिक, परिसरात्मक वा परिक्रमात्मक भर कितपत घातली याचा सविस्तर विचार हा स्वतत्र अभ्यासाचा विषय आहे

## राजतंत्राची बैठक

जिनसेनाचार्यांनी महापुराणामध्ये राज्यशास्त्राचा विचार दण्डनीती किंवा राजतंत्र अशा दोन्ही सज्ञापदानी पुरस्कृत केला आहे राजतत्रालाच राजविद्या असेही म्हटले आहे (४२/३४) तेथेच त्याचे फलितही स्पष्ट केले आहे–'राजविद्यापरिज्ञानादैहिकेऽर्थे दृढा मति ।' राजविद्येचे परिज्ञान झाल्याने ऐहिक पुरुषार्थासबधी वुद्धी व्यवहारामध्ये अधिकाधिक दृढ होत राहते पण येथील राजतत्र याचा अभिप्राय पाश्चात्यधारणेतील राजतत्रासारखा नाही त्याचा अर्थ राजाधिष्ठित शासनपद्धती (Monarchism) असा मुळीच अभिप्रेत नाही. दैवताधिष्ठित, साक्षात दैवी किंवा परमेश्वरी अशात्मक अगर सर्व सत्ता आणि सपत्ती स्वत च्या मन पूत इच्छेप्रमाणे वापरणारा व भोगणारा निरकुश, उद्दण्ड, उन्मत्त किंवा स्वार्थांध राजा महापुराण-कर्त्यांना मान्य नाही तेव्हा येथे राजतत्राचा अर्थ फक्त राजनैतिक विचारप्रणाली एवढाच आहे राजाच्या सदर्भात प्रजाहितदक्षता या गुणाचे अधिष्ठान अकाटच आहे–

क्षतत्राणे नियुक्ताः स्थ यूयमाद्येन वेधसा ।

(४२/२).

रक्षणाभ्युद्यता येऽत्र क्षत्रियाः स्युस्तदन्वयाः ।

(४२/११).

तेषां समुचिताचारः प्रजार्थे न्यायवृत्तिता ।

(४२/१२).

परार्थबद्धकक्ष्यौ तौ पालयामासतुः प्रजाः ।

(११/५३).

नृपास्तस्मादयोनिजाः ।

(४२/१५).

स्वदुःखे निर्घृणारंभाः परदुःखेषु दुःखिताः ।

(९/१६४)

प्रजानां प्रीणनम् ।

(३/२११).

या अशा कर्तव्यपालनामुळे आणि अंगभूत गुणवैशिष्टयामुळे काही आदर्श राजे शलाका पुरुष ठरले त्याना मानवी जीवनात मोठी महनीय पदवी प्राप्त झाली–

क्षत्रियास्तीर्थमुत्पाद्य येऽभुवन् परमर्षयः ।
ते महादेवशब्दाभिधेया माहात्म्ययोगतः ॥

(४२/३५).

आदिक्षत्रियवृत्तस्थाः पार्थिवा ये महान्वयाः ।
महत्त्वानुगतास्तेऽपि महादेवप्रथां गताः ॥

(४२/३६).

भारतामध्ये राजतंत्राचा अभ्यास पुरातन कालापासून होत आला आहे या राजतंत्रामध्ये राजा, राज्य आणि शासनसंस्था याच्या सबंधीचे विचार प्रगट होत असतात राजाची कर्तव्ये, शासनकर्म व कार्यवाही तंत्र, समाजव्यवस्था, सामाजिक संघर्ष आणि राजकीय संग्राम इत्यादी सर्व विषयाची गणती राजतंत्रातच होत असते त्यातून खास जैन कल्पना नेमक्या ओळखून काढणे जरा कठीण कर्म आहे त्यासाठी खोल विचाराची आणि निर्मळ दृष्टिकोणाची गरज भासते महापुराण हा काही राज्यशास्त्रावरचा खास ग्रंथ नव्हे पण त्याच्या जीवनव्यापी स्वरूपामध्ये राज्यशास्त्राचा विचार सहज सामावून गेला आहे त्यात आन्वीक्षिकी, त्रयी, वार्ता व दण्डनीती अशा चार राजविद्याचा खास उल्लेख आला आहे. (४१/१२९)

## दण्डनीतीची व्याप्ती

या दण्डनीतीचा अर्थ प्राचीन भारताचे प्रशासन-शास्त्र असा घेणे सहज शक्य आहे त्या पदाचा अर्थ फक्त Criminal Code असा संकोचित करण्याचे कोणतेच कारण नाही कारण ही दण्डनीती सामाजिक आणि राजनैतिक संबंधा-शिवाय व्यक्तिश राजा, मंत्री, सेना, न्यायदान, शिक्षापद्धती इत्यादी क्षेत्रातही

परिव्याप्त आहे मनूने ( मनुस्मृति, ७/१८ ) तसेच व्ही आर् आर्. दीक्षितार ( Hindu Administrative Institutions - Page 10 ) यानेही दण्डलाच राजा अथवा खरी शासनसस्था मानली आहे. जीवनातील विराधनेच्या दमनक्रियेला दण्ड म्हणतात असा कामदकाचाही अभिप्राय आहे ( डॉ. परमात्माशरण · प्राचीन भारत में राजनीतिक विचार एव सस्थाएँ, मीनाक्षी प्रकाशन, मेरठ, १९६७ – भूमिका - पान २ वर उद्‌धृत ) याच विचारप्रणालीला अनुसरून राजा व दण्ड शासनाची प्रतीके असल्याने व्यक्तिश. राजालाही दण्ड मानतात आणि त्याच्या समस्त प्रशासनकार्याला दण्डनीती म्हणून ओळखतात यास्तव दण्डनीतीचा अर्थ प्रशासनविद्या असा करणे जास्त सयुक्तिक व उपयुक्त वाटते जिनसेनाचार्यांनी राज्यशास्त्राचे वर्णन दण्डनीतीच्या सज्ञेने देखील केलेले आढळते हे लक्षात घेणे अत्यत आवश्यक आहे त्याशिवाय अभ्यास अपुरा राहतो राजा प्रजेचे पालन करतो आणि सर्वांकडून त्याच्या त्याच्या विहित कर्तव्याचे पालन करवून घेतो म्हणून राज्यशास्त्राचे आणि समाजव्यवस्थेचे विविध नियम प्रचलित होत असतात खरा राजा त्या नियमांची मर्यादा स्वत'ही ओलांडित नसतो. म्हणून या विचार-प्रणालीला दण्डनीती असे म्हटले आहे समाजजीवन सुखी, समाधानी व सपन्न करणे व ती अवस्था चिरकाल टिकवून ठेवणे राजाच्या उपरोक्त नीतीच्या क्षमतेवर अवलबून असते

## समतोलवृत्ती

राज्यामध्ये राजाचे महत्त्व शासनसस्थेचा एक सर्वातिशायी प्रमुख या दृष्टीने सर्वंकष आहे चागल्याचा स्वीकार आणि वाईटाचा परिहार करण्यासाठी योग्य दृष्टिकोणाची गरज असते, तशीच शासनसस्थेत राजाची – स्वामीची – राष्ट्रप्रमुखाची गरज असते चागला राजा राष्ट्रहितामध्ये सदैव तत्पर राहतो सरक्षण, प्रजेचे कल्याण, सदाचार, कुलीनता, दुष्टदमन, शिष्टानुपालन व त्यासाठी राष्ट्रबलाचा व न्यायसस्थेचा वापर ही राजाची प्रमुख कर्तव्ये होत अराजकता, अदाधुदी, स्वैराचार इत्यादी समाजघातकी घटनाचा निरास करणे हे राजाचेच काम प्रजापालनामध्ये अति कठोर किंवा अगदी मऊ न राहता राजाने न्यायार्पित बुद्धीने समतोलवृत्ती राखावी असा स्पष्ट आदेश आहे (४/१६३) या जैन समताभावाची अनुवृत्ती जीवाच्या सर्व थरामध्ये खोलवर शिरलेली आढळते

## आन्तर विजय

राजाने स्वराष्ट्रातील अव्यवस्था आणि परचक्राचा व्याघात अशा सर्व प्रकारच्या अरिष्टानाच नव्हे तर अतरगातील विकारभावानाही जिंकले पाहिजे–

उभयेऽपि द्विषस्तेन शमिता भूतिमिच्छता ।

(४/१६४).

या पद्यामध्ये बाह्य शत्रूबरोबर मनोविकाररूपी अंतरंग शत्रूंचेही दमन करण्याच्या कर्तव्याला महत्त्व दिलेले आहे ही गोष्ट लक्षणीय आणि महनीय आहे राजाने धर्म, अर्थ व काम या तीन पुरुषार्थांमधील विरोध व संघर्ष टाळला पाहिजे (४/१६५). आपल्या बुद्धि चातुर्याने आणि आचार कौशल्याने त्रिवर्गामध्ये साहचर्य व मैत्रीभाव निर्माण करावा. विवेकाच्या बळावर याथातथ्य न्यायनिवाडा करावा (४/१६६) अशा नीतिचातुर्यामुळे मानवी जीवनातील सर्वच संघर्ष संपुष्टात येतो हीच ती जीवनातील श्रेष्ठ नीती होय.

**पंचविध कर्तव्य**

तारुण्य, रूप, ऐश्वर्य, कुल, जाती आणि गुण इत्यादींची श्रेष्ठतम प्राप्ती करून घेऊन निरहंकारी राहणे राजाचे कर्तव्य आहे (४/१६७) राज्यवैभवाचा अहंकार व विषयसेवनामधील तल्लीनता राज्यपालनामध्ये अडथळे आणतात (४/१६८) अन्याय, अत्यधिक भोगविलास व अज्ञान या तीन दुर्गुणांचा तर दूरूनच त्याग करावा (४/१६९) राजाचे बाह्य शरीरही दिव्य, भव्य व सुंदर असावे (४/१७३ ते १७५) कुलानुपालन, मत्यनुपालन, आत्मानुपालन, प्रजानुपालन आणि समंजसपणा ही पाच राजाची प्रमुख कर्तव्ये आहेत (४२/४). महापुराणातील संपूर्ण बेचाळीसाव्या पर्वामध्ये या पाच क्षेत्रातील प्रजाहिताच्या कर्तव्याचे सविस्तर विवरण आहे–

श्रेष्ठ परंपरा जतन करणे, प्रजापालनात न्यायवृत्ति राखणे, राजस्वाची (Tax) वसुली नीतीला धरून करणे, स्वतः भ्रष्ट न होता प्रजेला धर्ममार्गाचा अवलंब करावयास लावणे, तीर्थपरंपरेची थोरवी वाढवीत राहणे (४२/५ ते २८) म्हणजे कुलानुपालन होय

मतिर्हिताहित ज्ञानमात्रिकामुत्रिकार्थयोः ।

(४२/३१)

ऐहिक आणि आगामी जीवनासंबंधी हिताचे आणि अहिताचे जे शुभ ज्ञान त्यालाच मती किंवा मेधा म्हणतात आत्मकल्याणाच्या विरुद्ध आचरणाची जी बुद्धी निर्माण होते अशा अनात्मबुद्धीपासून स्वतःचे रक्षण केल्यामुळेच पृथ्वीच्या अखंड संरक्षणाची पात्रता क्षत्रियाच्या अंगी बाणते (४२/४९). याशिवाय अखिल मानवाच्या कल्याणासाठी हेयोपादेयात्मक बुद्धीचे पावित्र्य राखणे आणि अविद्या

मिथ्याज्ञान व अतत्त्वामधील तत्त्वबुद्धी टाळून विवेकाची कास धरणे, तसेच कर्तव्याकर्तव्याची जागृतता व कामभोगक्षेत्रामधील विवशता टाळणे (४२/३१ ते ६०) इत्यादी सर्व मत्यनुपालनाचा विषय होय

आत्मगुणाचा– व्यक्तित्वाचा विकास करणे, राजतन्त्रातील कुटिल नीतीचा मनावर वाईट संस्कार होऊ न देणे, आत्महिताचा विचार सुरक्षित ठेवणे आणि त्यासाठी लोकैषणा, पुत्रैषणा, धनैषणा इत्यादी प्रापचिक व्यवहारापासून स्वत च्या शाश्वत गुणाचे रक्षण करणे, शरीरपोषणाबरोबरच आत्मगुणविकासाकडे लक्ष देणे म्हणजे आत्मानुपालन होय (४२/४९ ते १३६)

प्रजेला जीवनानदाचा लाभ घडविणे, प्रजापालनातील न्यायाची प्रतिष्ठा वाढविणे, दुष्टाचे दण्डन व शिष्टाचे पोषण करीत असताना मत्स्यन्याय बोकाळू न देणे आणि कोणाच्याही उदरनिर्वाहाला हानी न पोहोचेल याची जबाबदारी पत्करणे (३८/२५७ ते २५९), प्रशासन कार्यात सदैव अप्रमादी व दक्ष राहणे, सर्व प्रकारच्या उपद्रवापासून प्रजेचे रक्षण करणे, त्याच्या आजीविकाची सुधारणा करणे, एकनिष्ठ नोकराना उत्तेजन देणे, प्रजाकल्याणाचा कार्यक्रम यशस्वी करणे, प्रशासन यत्रणेतील अधिकारीवर्गावर चोख देखरेख ठेवणे, गुणी सेवकाना बढती देणे, चोराचा बदोबस्त करणे, राष्ट्रीय साधनाची समृद्धी वाढविणे, ग्रामीण क्षेत्राचा विकास करणे, सत्यनिष्ठा, दयाळूपणा, प्रजासहयोग इत्यादी राजसगुण वाढविणे, पाटबधारे व दळणवळणाचे मार्ग उपलब्ध करणे, आपत्काळासाठी धान्यसग्रह करणे इत्यादी नित्य, नैमित्तिक आणि राजकीय कर्तव्यात दक्ष राहणे, बुद्धिभेद निर्माण करणाऱ्या ठग, धूर्त, हिंसक व बलिष्ठ गुड इत्यादी अक्षरम्लेच्छांवर कडक नजर ठेवणे आणि त्याच्याही आजीविकेची योग्य ती सोय करणे व विशिष्ट कार्यात त्याना सदैव गुतवून ठेवणे, त्याचे दमन-दण्डन करणे, क्षात्रधर्माचे पालन तीर्थपरपरेला अनुसरून करणे आणि सुप्रजेच्या भल्यासाठी जे जे शक्य असेल ते ते सर्व काही करीत राहणे अशा सुविशाल क्षेत्रातील राजानुयोगाला प्रजानुपालन म्हणतात (४२/१३७ ते १९८).

अन्याय हा विलयाचा मार्ग असल्याने तो टाळण्यासाठी बलाचा योग्य उपयोग आणि न्यायाची प्रतिष्ठा जाणणे, दुष्ट निग्रहण व शिष्टानुपालन, नि पक्षपाती वृत्ती, कुमार्गपरावर्तन, समदृष्टी इत्यादी राजयोगासाठी बुद्धीची विशुद्धी, निर्णयातील समतोलपणा, प्रशासनातील मानवता आणि व्यक्तित्वाची ओजस्विता याबरोबरच सर्वातिशायी प्रभुता निष्कलक ठेवण्यासाठी समजसपणाची गरज फार मोठी असते (४२/१६९ ते २०३) राज्यसस्था ही मानवी जीवनातील सर्वस्पर्शी सस्था आहे ती समजसपणाशिवाय साभाळणे कठीणच

## राजाचे पारंपरिक गुण

राजाला देश आणि प्रजा प्राणापेक्षा प्रिय असावी प्रजापालनाच्या पात्रतेसाठी राजाने स्वत निषिद्ध आचार अगीकारू नये, सदैव प्रशस्त आचारमार्गच अनुसरावा. कौटिल्याच्या अर्थशास्त्रात ( चौखबा प्रकाशन, १९६२, पान ५३५) आभिगामिक, प्रज्ञा, उत्साह आणि आत्मसपत् अशा चार राजगुणाचा उल्लेख केला आहे या सर्वच गुणाचा अंतर्भाव जिनसेनांच्या महापुराणातील पचविध धर्मकर्तव्यामध्ये केलेला आढळतो (१) क्षुद्र परिवार न बाळगणे, सामतावर प्रभाव गाजविणे, शुद्धाचार, प्रियवादित्व, धार्मिकता, दूरदृष्टी इत्यादीना तेथे आभिगामिक गुण म्हटले आहे (२) समरागणावरील वीरतेसाठी शस्त्रास्त्रातील कुशलता व जीवनातील इतर मानवशास्त्रातील निपुणता, विवेक, सुसगतपणा, चित्ताची दृढता इत्यादी क्षेत्रातील क्षमतेला प्रज्ञागुण म्हटले आहे. (३) शौर्य, क्षिप्रकारिता, दक्षता, अमर्ष इत्यादी अभिभावाना उत्साहगुण आणि (४) वाक्पटुता, प्रगल्भता, स्मरणशीलता, समर्थता, उन्नतविचार, सयम, कार्यनिपुणता, शत्रुदमनातील क्षमता, स्वसेनेवरील प्रभुता, उपकार-अपकाराच्या प्रतिकाराची योग्यता, सधिकरणकुशलता, कोशसपन्नता, प्रौढता, उदारता इत्यादी गुणाचा अतर्भाव कौटिल्याने आत्मसंपदेत केलेला आहे

याज्ञवल्क्यस्मृतीमधील 'राजधर्म' प्रकरणामध्ये ( श्लोक ३०९-३१० ) अशाच स्वरूपाच्या राजगुणाचा उल्लेख आहे आत्मविद्या व राजनीती या दोन्ही क्षेत्रामध्ये प्रवीणता अपेक्षित आहेच मनुस्मृतीतही अशाच गुणाची अनुवृत्ती आहे पण या सर्वांपेक्षा जिनसेनांचा विचार अधिक शास्त्रशुद्ध आहे. त्यात समाजवादाची आणि कल्याणकारी राज्यपद्धतीची बीजे अधिक खोलवर रुजलेली असून सदा डवरलेल्या त्या वृक्षसपदेचा आविष्कारही फार विशाल आहे.

## सामर्थ्यानुयोग

या सर्व कर्तव्याचा आणि नृपगुणांचा योग्य आविष्कार होण्यासाठी तीन प्रकारच्या सामर्थ्याची नितात गरज असते– (१) प्रभुता किंवा साधनसपत्ती व सैन्याची समृद्धता, (२) ऊर्जा, आत्मवीर्य किंवा विक्रमबल आणि (३) मत्र-सामर्थ्य किंवा ज्ञानबल (११/१८९) राजाने या तीन बलाचे नित्य वर्धन करावे याशिवाय या सर्व सामर्थ्यांच्या योग्य व वास्तव विनियोगासाठी राजाने साम-दाम-दण्ड-भेदात्मक चार उपायाची योजना साम, भेद, दाम व दण्ड अशा आनुपूर्वीने अवलबावी (महापुराण, ८/२५३+टीका) म्हणजे सर्व शत्रुमित्रावर प्रभुत्व स्थापणे व स्वामित्वाचा अनुभव घेणे सुकर व सुखद होते आपल्या शत्रूना व मित्रानाही सदैव आपल्या अधीन ठेवण्यासाठी हे चार उपाय विहित आहेत

ते सर्व भारतीय सस्कृतीत सर्वत्र समानच आढळत असले तरी त्यातील परापरत्व आणि प्रयोगातील आनुपूर्वीचा विचार मात्र महापुराणामध्ये स्वतत्रपणे प्रगत झालेला स्पष्टपणे प्रतीत होतो तो लक्षणीयच नव्हे तर अनुकरणीय आहे–

साम सर्वोत्तम, भेद मध्यम, दाम अधम तर दण्ड कष्टतम आहे द्रव्यादी कशाचीही हानी न होता कार्यसिद्धी होत असल्याने सर्व उपायामध्ये साम उत्तम ठरतो कुलीन, कृतज्ञ, उदारचेता व वुद्धिवत याच्याशी व्यवहार सामप्रधान असावा वाग्विलास हा या पहिल्या उपायाचा खरा आधार आहे साम निष्प्रभ झाल्यावर भेदाचा अवलव करावा परस्पर भेदभाव निर्माण करणे, शत्रूना परस्पर झुंजवून त्याची खच्ची करविणे ही भेदनीती होय. साम परस्पर मिलनासाठी किवा आपण त्याना मिळण्यासाठी तर भेद फूट पाडून शत्रूना आपल्यात सामील होण्यास भाग पाडण्यासाठी अवलवावयाचा मार्ग आहे

तिसरा उपाय दाम किवा दान होय. धनसपत्ती किवा अन्य भौतिक वस्तू देऊन वलिष्ठ शत्रूला प्रसन्न करून घेणे यामुळे लोभी राजा स्वाधीन होतो. म्हणून भूमी, धनधान्य, कन्या, दासी, सहकार, सल्ला आणि अभयदान या मार्गाने शत्रूला अनुकूल वनविणे जमते आणि जेथे साम, भेद व दाम हे तीन उपाय निष्फळ ठरतात तेथे शेवटी दण्डाचा प्रयोग करावा मात्र दण्डाच्या प्रयोगापूर्वी आपल्या सामर्थ्याचा सारासार विचार करणे आवश्यक ठरते दण्डाचा प्रयोग हीनशक्ती शत्रूवरच करावा, समर्थावर नव्हे ।।

## कार्यक्षेत्राची विशालता

क्षत्रियता म्हणजे केवळ शारीरिक सामर्थ्य किंवा रणागणावरील शौर्य नव्हे। तसेच जर समजले तर आजारपणात, अपघातात, म्हातारपणात, अपगावस्थेत क्षत्रिय व्यक्ती क पदार्थ ठरेल।। जैन क्षत्रियतेतील गुणवत्ता शारीरिक व्याधीतही वाढविता येते. तिच्या आराधनेने जरामरणावर देखील विजय मिळविता येतो. म्हणून मुनिपर्यायातही जैन क्षत्रियानुयोग पूज्यच ठरतो कारण त्याचा मूलाधार देहधर्म नसून आत्मवीर्य आहे कर्मनाश केल्यावर जशी अनत ज्ञानाची तशीच अनत वीर्यगुणाचीही सप्राप्ती सिद्ध होत असते हा अनत वीर्यगुणच क्षत्रियतेचे परम अधिष्ठान होय याला मोडून किवा यापेक्षा वेगळ्या व विरोधी शक्तीना (Forces) आत्मगुणात किंवा मानवतेत स्थान नाही म्हणून क्षत्रियता केवळ शारीरिक असू शकत नाही.

योगक्षेमासाठी षट्कर्म-प्रवर्तनाला महत्त्व आहे त्यातही असिकर्मच अग्रगण्य. म्हणूनच ती भ ऋषभदेवानी समग्र प्रजेला शिकविली पण प्रत्यक्षात

अग्निकर्म सेवेसाठी (१६/१८१) ज्या पात्र आणि समर्थ लोकाची नियुक्ती झाली (१६/२४३) तो श्रेष्ठ वर्ग म्हणजे क्षत्रिय होय सर्वच पुरुषार्थाची समग्र सिद्धी म्हणजेच त्याच्या पात्रतेचा आणि गुणवत्तेचा निकष होय–

**लोकाग्रवासस्त्रैलोक्यशिखरे शाश्वती स्थिती: ।**
**अशेषपुरुषार्थानां निष्ठा परमसिद्धता ॥**

(४२/१०७).

या श्लोकात काही केवळ मुक्त जीवाची व्याख्या दिली नाही. ज्याना कोणताही पुरुषार्थ अपवर्ग नसतो, ज्याची निष्ठा आणि परिसमाप्ती समग्र पुरुषार्थ क्षेत्रात सर्वंकष असते त्यानाच या लोकामध्ये अग्रिमता लाभते तेच त्या अत्युच्च स्थानी शाश्वतपणे टिकू शकतात!

रक्षणधर्माला वाहून घेतलेल्या क्षत्रियाना आत्मवीर्यापासून दूर कसे राहता येईल ? कोणत्याही विनिपातापासून जीवाला व आत्म्यालाही वाचविणे हा तर मूलधर्म (२/३७) सर्व प्रकारच्या अपायापासून रक्षण करून जो अध पतनापासून जीवाचा उद्धार करतो तोच धर्म आणि तोच क्षत्रियही. दोन व्याख्या व्यजनत भिन्न वाटल्या तरी हेतुत एकच आहेत! अशा एकरूपतेचे स्वच्छ उदाहरण म्हणजे तीर्थंकरत्व होय म्हणून सर्वच तीर्थंकर क्षत्रियधुरधर असूनही प्रकृत्याच धर्मधुरधरही असतात जैन क्षत्रियता समग्रपणे अशी दिव्यानुभावी आहे!!

म्हणूनच जैन राज्यसस्थेचे कार्यक्षेत्र सुविशाल आहे शातता, सुव्यवस्था, सुरक्षा आणि न्यायदान या चौकटीतील आधुनिक राजतत्रावरोबरच धर्मपालनही राज्यसस्थेचे एक अविभाज्य अग आहे कारण मानवी गुणधारणेसाठी धर्मासारखा दुसरा आधार उपलब्ध नाही. राजा हा (१) कायदा व सुव्यवस्थेचा रक्षक असणे, (२) शेती, व्यापार-उदीमद्वारे अर्थोत्पादन तथा खानी-वन-नदी-तलाव इत्यादी साधनाचा विकास करून राष्ट्रीय अभ्युदयाचा प्रवधक ठरणे, (३) समस्त भौतिक कल्याणाचा सवर्धक बनणे; (४) समग्र जीवनकलाचा अधिष्ठाता होणे अशा आवश्यक चार क्षेत्रांशिवाय (५) अखिल भूतमात्राची हितचिंता वाहणे; (६) धार्मिकतेची व नैष्ठिकतेची प्रेरणा निर्माण करणे आणि (७) अध्यात्म-मार्गातील अभिभावकाचीही भूमिका पार पाडणे त्याला श्रेयस्कर ठरते अशा प्रकारे विकासशील जीवनाच्या सर्वच बाजूंचा अंतर्भाव राजाच्या कर्तव्यक्षेत्रात केलेला आढळतो.

हिसानाश टाळून सर्वांच्या हितसुखाची वृद्धी करणे, दयाभाव बाळगणे, दुर्बलाना बलप्रदान करणे ही राज्यसस्थेची प्रधान कर्तव्ये होत अशी कल्याणकारी

राज्यसस्था मानव्याचे प्रतीक आहे दण्डसस्था तिचे सर्वश्रेष्ठ सामर्थ्य आहे राजाचे बळ हे सर्व दुर्बलाचे बळ असल्याने त्याहून दुसरा कोणीही सबल ठरू शकत नाही म्हणून मत्स्यन्यायाचा आपोआप परिहार होतो मानवी जीवनातील सार्वत्रिक कल्याणाची ही किमया जैन सस्कृतीने मुळारभापासूनच साध्य केली आहे तिची प्रकृतीच सर्वोदयी आहे। दण्डप्रयोगाच्या समजस आविष्कारातूनच राज्यसस्थेमध्ये इद्रस्थान व यमस्थान अशा दोन प्रकारच्या व्यक्तित्वाची कल्पना साकारली (५५/१०) दण्डधारण करण्याची पात्रता आचार्य जिनसेनांनी–

**लोकस्य कुशलाधाने निरूढं यस्य कौशलम् ।**

(३१/१००).

या शब्दात सागितली आहे दण्डधारणा ही कुशलसाधनाच आहे

## आत्मप्रभाव

सामाजिक समस्या सोडविण्यासाठी लागणारी दूरदृष्टी, तत्त्वबोधासाठी उत्स्फूर्त अतर्दृष्टी आणि राज्यावरील प्रभुता वर्धिष्णू राहण्यासाठी आत्मप्रभाव सतत वाढविण्याची गरज असल्यामुळे राजालाही निश्चितपणे आध्यात्मिक अधिनेत्याची गरज लागतेच ह्या अधिनेत्याचे स्थान राजकीय नेत्यापेक्षा उच्च असते कारण तो विश्वगुरू केवळ राष्ट्रनेता नव्हे तर मानव्याचा नेता असून सकलांग जीवनदर्शी असतो या दृष्टीने भरतचक्रीला ऋषभनाथाचे मार्गदर्शन सतत मिळत राहिले राष्ट्रनेता निरकुश बनत चालला आणि त्याला साभाळण्यासाठी विश्वगुरू नसेल तर राष्ट्रात गैरव्यवस्था व पुढे मत्स्यनीती वळावते दण्डशक्तीच उद्दण्ड बनते आणि प्रजेनेच त्याचे दमन करण्याचा उलटा प्रसग उद्भवतो तेव्हा हा अनवस्था प्रसग टाळण्यासाठी आणि मानवी शांतता अभंग राखण्यासाठी दण्डशक्तीलाही मार्गदर्शकाची नितान्त गरज असते ते कार्य सर्वाभिभावक विश्वगुरूशिवाय दुसऱ्या कुणालाच निभत नाही अशा व्यवस्थेच्या अपात्रतेमुळे किंवा अभावामुळे युरोपात ज्या प्रसिद्ध राजक्रान्त्या झाल्या तशा प्राचीन भारतात झाल्या नाहीत हाही प्रभाव भारतातील या आदिम राजतन्त्राचाच असावा। राजनैतिक विचारामध्ये जैन विचारवतानी साधलेला विशालपणा व उच्चता याचा सगम आणि भारतीय राजतन्त्रात त्यानी घातलेली भर दुर्लक्ष करण्याइतकी कमी प्रतीची खासच नाही

## वैशिष्ट्ये

मानव्याच्या दृष्टिकोणातील विशालपणा आणि उच्चता याचा सुरेख सगम साध्य करून जैन विचारवतानी लोकतन्त्रात्मक स्वरूपापासून अखिल जीवतन्त्रात्मक

जीवनपद्धतीपर्यंत केलेली प्रगती विसरण्यासारखी किंवा अवलक्षण्यासारखी मुळीच नाही. व्यक्तिविकास आणि समाजकल्याण यांच्या विरोधी कात्रीत न सापडता त्यांनी साध्य केलेली दोन्ही क्षेत्रातील उन्नती आदर्शभूत आहे. समाजजीवनाला आड न येता संपूर्ण व्यक्तिस्वातंत्र्याचा आणि आत्मविकासाचा मार्ग मोकळा करण्यासाठी जैनांनी भारतीय राजतंत्रात घातलेली भर दुर्लक्ष करण्याइतकी कनिष्ठ खास नाही. या दृष्टीने मुख्यत पुढील बाबीकडे लक्ष वेधते–

(१) प्रजेशी एकरूप होण्यासाठी स्वात्मविजय, आत्मौपम्य दृष्टी आणि समताभावपूर्ण जीवननीती

(२) पुरुषार्थाच्या भूमिकेसबंधी 'धनात् धर्मम्' पेक्षा वेगळी जीवनदृष्टी.

(३) कल्याणकारी राज्याची बीजे रुजण्यासाठी पंचविध कर्तव्यातील सत्यनुपालनाची व आत्मानुपालनाची प्रगत धारणा

(४) सातिशयतेसाठी ज्ञानबलाची साधना आणि उपयोग

(५) साम-दाम-दण्ड-भेदात्मक उपाय-योजनेतील परापरात्वाची खास धारणा.

(६) विकासशील जीवनाच्या सर्व बाजूंचा अंतर्भाव असणाऱ्या सर्वोदयी जीवनतीर्थाच्या प्रतिष्ठेसाठी राजाच्या कर्तव्यक्षेत्राची विशालता

(७) प्रभुता सर्वातिगायी राहूनही ती निरकुश व स्वार्थप्रेरित होऊ नये म्हणून आत्मप्रभाव आणि विश्वगुरूची प्रतिष्ठा



## परिशिष्ट ६

# संदर्भ ग्रन्थ–सूची


I पूर्वसूरि - संहिता–

१ अग्निपुराण
२ अथर्ववेद
३ आचारांगसूत्र
४ आपस्तबीय श्रौतसूत्र
५ आश्वलायन गृह्यसूत्र
६ इतिवुत्तक
७ उत्तरज्झयणसुय
८ ऋग्वेद
९ ऐतरेय आरण्यक
१० ऐतरेय ब्राह्मण
११ कात्यायन श्रौतसूत्र
१२ कूर्मपुराण
१३ कृष्णयजुर्वेद
१४ गोभिलीय गृह्यसूत्र
१५ छादोग्य उपनिषद
१६ जवूदीवपण्णत्तिसुय
१७ ठाणग
१८ ताण्डयब्राह्मण
१९ तैत्तिरीय आरण्यक
२० दसवेयालिय
२१ दुर्गासप्तशती
२२ देवलस्मृति
२३ धम्मपद
२४ धम्मलिपी (अशोककालीन शिलालेख)
२५ नारदपुराण
२६ पण्हावायरण
२७ पारस्कर - गृह्यसूत्र
२८ प्रभासपुराण
२९ प्रश्नोपनिषद
३० वृहदारण्यकोपनिषद
३१ वृहस्पतिसूत्र
३२ बोधायन गृह्यसूत्र
३३ ब्रह्मपुराण
३४ ब्रह्मसूत्र
३५ ब्रह्माण्डपुराण
३६ भगवद्गीता
३७ भागवतपुराण
३८ भास्करनिरुक्त
३९ मज्झिमकाय
४० मत्स्यपुराण
४१ मनुस्मृति
४२ महाभारत
४३ मानवगृह्यसूत्र
४४ मार्कण्डेयपुराण
४५ मिताक्षरा
४६ मुण्डकोपनिषद
४७ याज्ञवल्क्यस्मृति
४८ रामायण
४९ लाटचायनसूत्र

५० लिंगपुराण
५१ वज्रशुचि
५२ वराहपुराण
५३ वायुपुराण
५४ विष्णुपुराण
५५ शतपथ - ब्राह्मण
५६ शिवमहापुराण
५७ शुक्लयजुर्वेद
५८ श्रवणवेळगोळ - शिलालेख
५९ श्रीमालपुराण
६० श्वेताश्वतर - उपनिषद
६१ समवायग
६२ सामवेद
६३ सूत्रकृतांग
६४ सूयगड
६५ संकल्पतन्त्र
६६ स्कदपुराण

II साहित्य - विमर्ष ग्रंथ—

६७ अथर्ववेद इग्रजी भाषांतर (ग्रिफिथ)
६८ अर्थशास्त्र (कौटिल्य) चौखवा, १९६२.
६९ अभिनव इतिहास इ. ८ वी साठी, पुणे, १९६९.
७० अध्ययन - अनुसंधान (शोधपत्रिका) भा० १. जयपूर, एप्रिल १९७३
७१ अभिधान - राजेन्द्रकोष
७२ अमरकोष (धनजय)
७३ अमेरिकन वार्ताहर, १९ मे १९७२
७४ आदिपुराण (पप)
७५ आत्मानुशासन (गुणभद्राचार्य)
७६ आवश्यकचूर्णी
७७ आवश्यकनिर्युक्ति (मलयगिरी)
७८ आश्वलायन - गृह्यसूत्र, मराठी भाषांतर (लोकहितवादी) मुवई, १८८०
७९ उत्तरपुराण (गुणभद्र)
८० उपनिषद - विचारणा (मेहता न दे)
८१ एकनाथी भागवत
८२ करकडचरिउ (कनकामर)
८३ कल्पसुवोधिका
८४ कल्याण - मासिक (ऑगस्ट १९३५)
८५ कसायपाहुड (गुणधर)
८६ कादबरी (वाणभट्ट)
८७ कामदक - नीतिशास्त्र
८८ कुमारपालप्रतिबोध (सोमप्रभ)
८९ कुवलयमाला (उद्योतनसूरी)

९० क्षत्रचूडामणि.
(वादीभसिंहसूरी)
९१ गगा - मासिक
(जानेवारी १९३२)
९२ चउपण्णमहापुरिसचरियं
(शीलाकाचार्य)
९३ जयधवला
(वीरसेन - जिनसेन)
९४ जैनधर्म
(कैलासचद्र शास्त्री)
९५ जैनपथप्रकाश (द्यानतराय)
९६ जैनपदसग्रह (द्यानतराय)
९७ जैन रामायण
(प जिनदास पा फडकुले)
९८ जैन - शासन
(प सुमेरचद दिवाकर)
९९ जवुदीवपण्णत्तिसगहो
(पद्मनदी)
१०० तत्त्वार्थसूत्र–
तत्त्वार्थाधिगमसूत्र
(उमास्वामी)
१०१ तिलोयपण्णत्ति
(यतिवृषभ)
१०२ त्रिषष्टिशलाकापुरुषचरित
(हेमचन्द्र)
१०३ दानसागर (वल्लालसेन)
१०४ द्यानतविलास
(द्यानतराय)
१०५ धर्मका आदि प्रवर्तक
(स्वामी कर्मानन्द)
१०६ धर्मामृत (नयसेन)
१०७ निरुक्त (यास्काचार्य)
१०८ न्यायबिंदुप्रकरण
(धर्मकीर्ती)
१०९ पउमचरिउ
(स्वयभूदेव)
११० पउमचरियं
(विमलसूरी)
१११ पद्मपुराण
(रविषेणाचार्य)
११२ पुराण - विमर्ष
(वलदेव उपाध्याय)
११३ पुरुदेवचपू (अर्हद्दास)
११४ प्रतिष्ठासारोद्धार
११५ प्राकृतप्रकाश (वररुची)
११६ प्राचीन भारत का
भौगोलिक स्वरूप
(डॉ अवधविहारीलाल
अवस्थी)
११७ प्राचीन भारतमे
राजनीतिक विचार
एव सस्थाएँ
(डॉ. परमात्माशकर)
मेरठ, १९६७.
११८ प्रारभिक अर्थशास्त्र
(प्रा. उदयप्रकाश
श्रीवास्तव) पाटना, १९६८
११९ वनारसी विलास
(वनारसीदास)
१२० वृहत्कल्पभाष्य

१२१ वहदारण्यकोपनिषद-भाष्य
१२२ भक्तामरस्तोत्र (मानतुगाचार्य)
१२३ भरतेशवैभव (रत्नाकर वर्णी)
१२४ भारतकी मौलिक एकता (डॉ. अग्रवाल)
१२५ भारतीय सस्कृती का विकास (डॉ मगलदेव शास्त्री)
१२६ भारतीय सस्कृति मे जैनधर्म का योगदान (डॉ हीरालाल जैन)
१२७ महापुराण (जिनसेन - गुणभद्र)
१२८ महापुरिसगुणालकारु (पुष्पदन्त)
१२९ मार्कण्डेयपुराण : सास्कृतिक अभ्यास (डॉ वासुदेवशरण अग्रवाल)
१३० मुनिसुव्रतकाव्य (अर्हद्दास)
१३१ मुंवई समाचार मोक्षमार्ग प्रकाशक (टोडरमल) ४ थी आवृत्ति, मुवई
१३२ यशस्तिलकचम्पू (सोमदेवसूरी)
१३३ यात्राविवरण (अल्वेरुणी)
१३४ युक्त्यनुशासन (समतभद्र)
१३५ योगसूत्र (पतंजली)
१३६ रत्नकरण्ड-श्रावकाचार (समतभद्र-योगीन्द्र)
१३७ राजतरंगिणी (कल्हण)
१३८ राजपुताने का इतिहास खड १ (गौ ही ओझा)
१३९ राजावलिकथे (कन्नड)
१४० रामचरितमानस (तुलसीदास)
१४१ लीलावई (कोऊहल)
१४२ लोकहितवादी : काल आणि कर्तृत्व (डॉ. निर्मलकुमार फडकुले) पुणे, १९७३.
१४३ वसुदेवहिंडी (सघदास-धर्मसेनगणी)
१४४ वसत (दिवाळी अक १९७२)
१४५ विवेकाभ्युदय (कन्नड मासिक, १९४०)
१४६ वैदिक वाङमय का इतिहास
१४७ शाङ्करभाष्य (शकराचार्य)
१४८ श्रीभाष्य (रामानुजाचार्य)

१४९ सायणभाष्य (ऋग्वेदीय)
१५० सार्थ एकनाथी भागवत
१५१ सीतास्वयवर (वेणाबाई) धुळे
१५२ सूरसागर (सूरदास)
१५३ स्याद्वाद, दर्शनविशेषाक
१५४ स्वयभूस्तोत्र (समतभद्राचार्य)
१५५ हरिवगपुराण (जिनसेन पुन्नाटसघीय)
१५६ हाथीगुफा शिलालेख (खारवेल)

## III इंग्रजी ग्रथ–

157 A. I. R. (Bombay, 1939)
158 B. O. R Annals, Vol. 36, Poona (1955)
159 Bulletin, calcutta Math Society
160 Early Faith of Asoka ( Dr F. W. Thomas )
161 Hindu Administrative Institutions ( V. R. R. Dixitar )
162 Historical Facts About Jainism
163 History of India ( Dr. V. Smith )
164 History of India and Indian Architecture
165 I. H S. R. Jayapur, Vol. I, April 1973,
166 India and its Faiths ( J. V. Prett )
167 Indian Antiquary, Vols. V and XXX
168 Imperial Gazzetier of India
169 Jainism ( Mr. H Glassenapp )
170 Journal of Behar and Orrisa Research Society Vols. III and VIII
171 Medival Jainism

172 Modern Review

173 Philosophy of India ( S Radhakrishnan ), Vol. I.

174 Rishabhadeva ( Bart Champat Ray Jain )

175 Short Studies in the Science of Comparative Religion ( J. C R. Furlong )

176 Sindha, Five Thousand years Ago (R. P. Chanda)

177 The Classified List of Indian Post Offices and R M. S. Offices and Sections Part I (April,1966)

178 The Rashtrakutas and Their Times (Dr. Altekar)

179 The Religions of India (Prof. E. W Hopkins)

180 Yesterday and Today (Prof. A. Chakravarty)



## परिशिष्ट ७

# विशेषनाम-सूची

केवळ पुनरावृत्ती आणि औचित्यभग टाळण्यासाठी या सूचीमध्ये पुढील पद्धत स्वीकारली आहे.

**१** नाभिराज तथा नाभिवर्ष (प्रकरण ५, ६, ७ व १४), **२** ऋषभ° तथा ऋषभवर्ष (प्र ५, ६, ७, ८ व १४), **३** भरत° तथा भरतवर्ष (प्र ४, ५, ६, ७, ८, १० व १४) ही विशेपनामे आणि **४** जैनधर्म ही सज्ञा सबधित प्रकरणातच नव्हे तर समग्र ग्रथात इतस्तथा सर्वत्रच आढळणे ग्रथविपयाला अनुसरून असल्याने ती सर्व; तसेच **५** पान २३५ ते २३८ वरील ९ निधी, १४ रत्ने, भरताचे मत्रिमडळ, त्याची सग्राम-सामुग्री, सप्ताग सेना अधिसत्ता, राज्यागविस्तार, साम्राज्यवैभव, भोगवैभव, भोगायतन-विस्तार, अंत.पुर, सतती इत्यादीशी सबधित नावे, **६** पान ३६२ ते ३८० वरील समग्र स्थलनामावली, **७** पान ४०३ ते ४०५ वरील ऋषभपुत्रांची विविध नाममाला इत्यादी सर्व या सूचीतून वगळून आणि **८** महापुराण, महाभारत, भागवतपुराण, ऋग्वेद अशा प्रमुख ग्रथाचा सदर्भ सक्षिप्तपणे निर्दिष्ट करून पुढील सूची तयार केली आहे त्या त्या सज्ञेपुढे पानाचा क्रमाक दिला आहे मात्र प्रारभिक पानावरील सज्ञा-सूची देता आली नाही

### अ

**ट - ठ - ड - ण**



**त - थ**

प - फ

भ

ल



व

# शुद्धि-पत्रक

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ४४ | १६ | अनैतिहसिकत्वाचा | अनैतिहासिकत्वाचा |
| ८० | २३ | लाह्यायण | लाटचायन |
| ८६ | १४ | ईक्ष्वाकू | इक्ष्वाकू |
| ८६ | १५ | ऊग्र | उग्र |
| १०२ | २६ | पुरुदेवचपू | तेराव्या शतकातील अर्हद्दासकृत पुरुदेवचपू |
| १०६ | १५ | परिशिष्ट ४ | परिशिष्ट १ |
| ११६ | १८ | -श्रे० ६/१८ | -श्वे०, ६/१८ |
| ११८ | ३३ | भस्वयं | स्वयभू |
| १३७ | १ | आठवा अवतार | नामकर्माचे कार्य |
| १३७ | २५, २८ व २९ | ऋृषभ- | ऋषभ- |
| १३८ | १० | ऋृषभ- | ऋषभ- |
| १४२ | ६ | तुरगवास | तुरंगवास |
| १९५ | २८ | सयणाचार्यांनी | सायणाचार्यांनी |
| १९८ | २ | हिरण्यगभ | हिरण्यगर्भ |
| २२० | १४ | विष्णूपुराण | विष्णुपुराण |
| २३१ | २४ | पर्व ४० | पर्व २४ |
| ३१४ | २ | अमृतचन्द्र | गुणभद्र |
| ४०८ | २४ | ऋृषभ- | ऋषभ- |

" Professor **J. D. Bhomaj** has collected in this work a good deal of Informative material from the Various layers of Indian Literature on **BHARATA & BHARATA-VARSA.** His observations on the **Cultural Currents of Bharata-varsa are Really Thought- provoking.** This book deserves carefull study by earnest students working in the fields of **Ancient Tradition and Culture of our Land.**"

**– A. N. Upadhye**